# मुक्ता

नाम

## एक अद्भुत कथाग्रंथ.





कर्ता

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी,**

चिकित्साब्धि, आर्यानार्य औषध, पांडवकौरव, रामरावण,
पांडवाश्वमेध, श्रीकृष्णचरित्र इत्यादि प्रसिद्ध
व लोकप्रिय ग्रंथांचा कर्ता.

जामनगर-काठेवाड.

मुंबई:
धी रिपन प्रिन्टिंग प्रेस कंपनी, लिमेटेड मध्यें छापिलें.

१८९७.

किंमत रुपये १४=००

# भाषांतरकाराची प्रस्तावना.

कोणतेंही पुस्तक वाचावयास हातीं घेतलें ह्मणजे त्यापासून ज्ञान, बोध किंवा मनोरंजन यांपैकीं कोणत्या तरी एका गोष्टीची प्राप्ति व्हावी अशी आपली अपेक्षा असते. संसारामध्यें ज्ञानाचा उपयोग किती आहे हें कोणालाही सांगणें नलगे. हें ज्ञान इतिहास, स्थलवर्णनें, शास्त्रीय ग्रंथ इत्यादिकांपासून प्राप्त होतें; बोध नीतिविषयक ग्रंथांपासून प्राप्त होतो; आणि मनोरंजन गोष्टींच्या पुस्तकांपासून होतें. हे तीनही हेतु साध्य होण्यास निरनिराळे ग्रंथ प्रगट झाले आहेत; तथापि प्रस्तुत मुक्ता नामें जो ग्रंथ आह्मी वाचकांच्या हातीं देत आहों त्यांत हे तीनही हेतु एकसमयावच्छेदें करून साधतील असें ह्मणावयास चिंता नाहीं.

या ग्रंथांत प्रसंगानुरोधानें अनेकविध विषय आले असून तत्संबंधानें पुष्कळ उपयुक्त माहिती व मार्मिक विचार यांचाही समावेश झाला आहे. त्याचें सामान्य दिग्दर्शन करूं ह्मटलें असतांही बराच विस्तार होईल. आणि प्रत्यक्ष ग्रंथ वाचकांपुढें आलाच आहे; त्यापेक्षां तसें करण्याचीही तादृश गरज नाहीं. तथापि येथें कांहीं विषयांचीं नांवेंमात्र लिहितों, ह्मणजे 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायानें या ग्रंथांतील विषय-भांडाराची वाचकांस बरीच कल्पना होईल. प्रथमारंभींच मंगलदायक असें पवित्र काशी नगरीचें व भागीरथीचें वर्णन आलें आहे. त्याच्या मागून राजवर्णन, दांपत्यधर्म, पतिव्रताधर्म, बाळंतपण, पुत्रजन्ममहोत्सव, बाललीला, बालसंगोपन, शिक्षणाचा व पाठशाळांचा एक उत्तम नमुना, राजपुत्रांस उपदेश, उत्तम राज्यपद्धति, भोजनाचे नियम, शारीरिक उद्योगाचें महत्व, मृगयेपासून नफे तोटे, उत्कृष्ट विवाहपद्धति, षड्तूंचीं वर्णनें, सृष्टिसौंदर्याचें वर्णन, नायिकेच्या अंगकांतीचें वर्णन, शृंगाराचे

निरनिराळे प्रकार, निःसीम प्रेम, पितृवात्सल्य, सन्मित्रलक्षण, दुष्टजनांचें कौटिल्य, आत्मबोध, इ० इ० विषय मोठ्या खुबीनें व मार्मिकतेनें वर्णिले आहेत.

विषयांच्या उत्कृष्ट निवडीप्रमाणेंच उत्तम ग्रंथाला आवश्यक जे दुसरे गुण तेही यांत प्रगट झाले आहेत. गंभीर विचार, प्रौढ भाषा, उत्प्रेक्षादि अलंकारांचा सुंदर थाटमाट, नवरसांची जागोजाग रेलचेल, सुरस व हुबेहुब वर्णनें, भाषणाचे निरनिराळे चमत्कार यामध्यें पुष्कळच आहेत—सारांश, सर्वच ग्रंथ चमत्कारमय असून हृदयंगम आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं.

मूळग्रंथकार विद्वान व संस्कृतज्ञ असल्यामुळें स्वाभाविकपणेंच संस्कृत लेखनपद्धतीकडे त्यांचा विशेष ओढा आहे. ज्यांस बाणभट्टादि प्रगल्भ ग्रंथकारांच्या भाषासरणीचा परिचय असेल, त्यांस प्रस्तुत ग्रंथाचें मर्म कळून येईलच, परंतु ज्यांस तसा परिचय नसेल त्यांस या ग्रंथाच्या द्वारें तो सुलभतेनें करून घेतां येणार आहे. बाणभट्टाच्या अलंकारिक भाषाप्रकारासंबंधानें ह्मटलें आहे कीं "बाणोच्छिष्टं जगत्सर्वम्" ह्मणजे बाणकवीनें उपमानोपमेयरूपानें वर्णिली नाहीं अशी एकही वस्तु जगांत सांपडावयाची नाहीं, यास्तव हें जग केवळ उच्छिष्ट होय; अशाच प्रकारचा ग्रह प्रस्तुत पुस्तकाच्या वाचनानें होईल असें वाटतें. ह्मणजे संपूर्ण संस्कृत साहित्यभांडारांत जे जे उत्कृष्ट प्रकार सांठलेले आहेत त्यांस साफसुफ करून ते प्रस्तुत ग्रंथांत रसिक वाचकांस कर्त्यानें अर्पण केले आहेत; त्यापेक्षां समग्र संस्कृत साहित्यभांडाराचें सारसर्वस्व यांत उतरलें आहे असें ह्मणावयास चिंता नाहीं.

या शिवाय आणखीही एक गोष्ट विशेषें करून सांगण्यासारखी ही आहे कीं, यांत जागोजाग वैद्यकीय माहिती सांगण्याचा प्रसंग मूळ ग्रंथकारानें वायां जाऊं दिलेला नाहीं. याचें कारणही वरीलप्रमाणेंच

कर्त्यांचा वैद्यक शास्त्राकडे विशेष ओढा हेंच होय. या ग्रंथाचे कर्ते वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी हे स्वतां अनुभविक वैद्य असून आज कित्येक वर्षे वैद्यकीचा धंदा निष्णातपणें चालवीत आहेत, त्यापेक्षां त्यांच्या हातून साहित्यशास्त्रांतर्गत नवरसांचा परिपाक उतरतांना देखील त्यास वैद्यकरसायनाचा वास आला तर नवल नाहीं.

**या** ग्रंथांतील कथानक अगदीं साधें व सरळ आहे. त्यामुळें **बाणभट्ट**कृत **कादं**बर्यादि ग्रंथांत कथेचें अनुसंधान ठेवतां ठेवतां वाचणारांची जी तारांबळ उडून जाऊन फजिती होते ती अर्थांत हा ग्रंथ वाचतांना होत नाहीं. पहिल्यापासून शेवटपर्यंत कथानकाचा ओघ अस्खलित सारखा चालत राहून वाचकाच्या मनाची वृत्ति उदात्त करण्यास तो कारणीभूत होतो. निरनिराळे भाग जे मधून मधून आले आहेत, तेही जागच्या जागीं जोडून दिले असल्यामुळें मुख्य कथनकाचें उत्तम प्रकारें पोषण करतात. यामुळें वाचनानंदांत यत्किंचितही उणेपणा न येतां उलट भरच पडत जाते व तेणें करून मन प्रफुल्लित होतें.

**हें** कथानक थोडक्यांत येथें सांगतों—"**मुक्ता** नामें गंधर्वकन्येला एका दुष्ट दैत्यानें चोरून नेऊन बंदींत ठेवलें असतां, कुसुमायुध नामें राजपुत्राशीं तिची अवचित गांठ पडली. कुसुमायुध हा **काशी**च्या राजाचा एकुलता एक मुलगा असून, त्याच्याकडून शास्त्राभ्यास व शस्त्राभ्यास मोठ्या परिश्रमानें करविला असल्यामुळें व तो स्वतांही बुद्धिमान असल्यामुळें लहानपणांतच शौर्याविषयीं व सद्गुणाविषयीं त्याची प्रसिद्धि झाली होती. **मुक्ते**ची व त्याची दृष्टादृष्ट होतांच दोघेंही प्रेमवश झालीं व लवकरच त्या दोघांचा गुप्तपणें गांधर्वविवाह झाला. पुढें कुसुमायुध **मुक्ते**ला घेऊन चालल्याची खबर कळल्यावर चवताळून चालून आलेल्या दैत्याशीं त्याचें तुंबळ युद्ध झालें; त्यांत दैत्य पडला, व राजपुत्र, नूतन संपादित विजयलक्ष्मीसह **मुक्ते**स घेऊन, सुखरूप स्वनग-

रास येऊन पोहोंचला. इकडे युद्धांत ठार झालेल्या दैत्याचा भाऊ कुसुमायुधाचा सूड उगविण्याचा विचार करूं लागला. प्रजाजनांचीं दुःखें निवारण करण्याच्या हेतूनें राजपुत्र नित्य घोड्यावर स्वार होऊन बाहेर जात असे. त्याप्रमाणें एके दिवशीं गेला असतां, हा दैत्याचा भाऊ त्याच्या वाटेवर महर्षींचें सोंग घेऊन बसला, व मुक्तेनें दिलेला हार त्याच्या गळ्यांत होता तो त्याच्यापासून त्यानें युक्तीनें मागून घेतला. नंतर हा हार घेऊन तो काशीस गेला व राजास हाराची खूण दाखवून राजपुत्र युद्धांत मरण पावल्याची खोटीच वार्ता सांगूं लागला. राजाला, राणीला व तमाम प्रजेला पुष्कळ दुःख झालें. तरी मुक्तेला जें दुःख झालें तें इतकें दुःसह झालें कीं त्यानें ती मूर्छित होऊन पडली असतांच गतप्राण झाली. मग कांहींका दिवसांनीं राजपुत्र परत आला, तेव्हां सर्वांस मोठा आनंद झाला; तथापि मुक्तेच्या प्राणत्यागाची गोष्ट कुसुमायुधाचे कानीं पडतांच तो विव्हळ झाला आणि त्यानें तेव्हांपासून ऐहिक सुखोपभोग सर्व सोडून दिले. मग तो आपला वेळ ज्ञानसंपादनांत व सन्मित्रांच्या समागमांत घालवूं लागला. या मित्रमंडळीमध्यें त्याचा कोणा दोघा नागकुमारांशीं स्नेह पडला असतां, एके दिवशीं त्यांच्याच आग्रहावरून तो नागलोकीं त्यांच्या पित्याकडे पाहुणचारास गेला. हे नागकुमारही नागराजाचेच पुत्र होते. तेथें नागराजाच्या कृपाप्रसादानें संजीवन झालेल्या मुक्तेची व कुसुमायुधाची पुन्हा गांठ पडली. मग तिला बरोबर घेऊन, कुसुमायुध पुन्हा स्वनगरीं येऊन आईबापांस भेटला. ही हकीगत कळतांच सर्वांस पुन्हा मोठा आनंद झाला. मग आपला वृद्धापकाळ झाला असें पाहून राजानें कुसुमायुधास राज्यावर बसविलें, व आपण ईश्वरसेवेंत राहूं लागला. कुसुमायुधही नीतीनें वागून प्रजेचें पुत्रवत् पालन करूं लागला. या प्रमाणें हें कथानक साधें असतांहीं कविकल्पनेचा यथास्थित विकास झाला असल्यामुळें तें फार मनोरंजक झालें आहे.

हा ग्रंथ सकल अभिज्ञ गुर्जर जनांस मान्य झाला असून गुर्जरभाषीय ग्रंथसंग्रहास भूषणप्रद झाला आहे हें याच्या उत्कृष्टत्वाचें एक ठळक प्रमाण गणण्यास हरकत नाहीं. असा श्रेष्ठ ग्रंथ मराठी वाचकांच्या हातीं पडला असतां मोठा उपयोग होईल, असें जाणून, त्याचें मराठी भाषांतर छापून प्रसिद्ध करावें, असें मूळ ग्रंथकारास वाटलें, व तें काम त्यांनीं मजकडे सोंपविलें.

मराठी भाषांतराकरितां जेव्हां हा ग्रंथ माझ्या हातीं आला तेव्हां भाषांतर होतां होईल तों अस्सलबरहुकूमच व्हावें अशी इच्छा याचे विद्वान रसिक कर्ते वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी यांनीं प्रगट केली, व ती मलाही अगदीं मान्य झाली. भाषांतरकाराचें काम ह्मटलें ह्मणजे चित्रकाराप्रमाणेंच मूळांत जें जसें असेल तें तसेंच्या तसेंच उठविणें हें होय. काढलेलें चित्र सुरेख दिसावें ह्मणून मूळच्या आकृतींत फेरफार करणें जसें कधीं योग्य होणार नाहीं तशीच भाषांतर करते वेळीं मूळकृतींत ढवळाढवळ केल्यास ती ही अक्षम्य होय हें उघड आहे. इंग्लंड देशांत क्रामवेल ह्मणून जो एक शूरवीर होऊन गेला त्यानें आपलें चित्र काढविते वेळीं चितार्‍यास जी एक गोष्ट विशेषें करून बजावून सांगितली, ती प्रत्येक भाषांतरकारानेंहीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे असें मला वाटतें. तो ह्मणाला—"हें पहा! मी जसा आहें, तसें माझें चित्र काढ. माझ्या तोंडावरील ह्या सुरकुत्या व हे वण असेच्या असे वठीव. यापैकीं कांहीं गाळशील किंवा कांहीं नवें घालशील तर तुझ्या श्रमाबद्दल एक कवडीही मिळणार नाहीं किंवा हें तुझें चित्र मी हातीं सुद्धां धरणार नाहीं." हें क्रामवेल याचें ह्मणणें गर्वाचें नसून केवळ त्याच्या उदार मनाचें व सत्यप्रियतेचें दर्शक आहे; एवढेंच नव्हे तर मूळ आकृतीचें खरें तेजस्वी स्वरूप प्रगट करावयाचें असल्यास हें ह्मणणें नेहमीं लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे यांत संशय नाहीं.

मूळ ग्रंथ प्रौढ असल्याविषयीं वर सांगितलेंच आहे. यास्तव अशा ग्रंथाचें भाषांतर मूळाप्रमाणें यथास्थित मराठींत उतरणें किती कठीण आहे हें कोणासही सांगणें नलगे. प्रसिद्ध निबंधमालाकारांनीं, भाषांतर करूं जाणारास, एका कुपींतील अत्तर दुसऱ्या कुपींत ओतूं पाहणाराची उपमा दिली आहे ती अगदीं समर्पक आहे. दुसरे कुपींत ओततां ओततां अत्तराचा एक बिंदुही वायां न जाऊं देण्याची व त्याचा सुगंध न उडूं देण्याची जशी अत्यंत काळजी घेणें जरूर आहे, त्याच प्रमाणें भाषांतर करतांनाही मूळांतील स्वारस्य न जाऊं देण्यास फार जपलें पाहिजे. निबंधमालाकारांचें हें ह्मणणें ध्यानांत वागवूनच मी प्रस्तुत ग्रंथाच्या भाषांतरास आरंभ केला आणि होतां होईल तों मूळांतील मर्म न जाऊं देतां रसपरिपाक, वर्णनाची खुबी वगैरे मूळांतल्याप्रमाणेंच कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत सिद्धीस गेला आहे हें पाहणें अर्थात अभिज्ञ वाचकांचें काम आहे.

वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी हे स्वत: वैद्य असून आपल्या लोकोपयोगी धंद्याचें काम आज कित्येक वर्षें आस्थेनें करीतच आहेत. रोगाचें निवारण करून मनुष्यांस शारीक पुष्टि प्राप्त करून देणें हें जसें अत्यंत आवश्यक आहे तसेंच शराराहून उत्तम असें जे मन त्याच्या पुष्टीचें साधन लोकांस सुलभ करून देणें आपलें कर्तव्यच होय अशी त्यांची समजुत आहे. रसायनांच्या सेवनानें जसे शरीरबळानें पोषण होतें तसें मनःशक्तीचें पोषण उत्कृष्ट ग्रंथांच्या वाचनानें होतें. याच समजुतीनें त्यांनीं प्रकृत मुक्ता नामें ग्रंथ व दुसरेही ग्रंथ रचून प्रसिद्ध केले आहेत असें वाटतें. इतर सामान्य धंदेदार वैद्यांमध्यें व यांच्यामध्यें हाच एक मोठा ठळक विशेष आहे असें ह्मणावयास चिंता नाहीं. यांनीं केलेले इतर ग्रंथ प्रकृत ग्रंथाच्याच तोडीचे आहेत व त्या प्रत्येकांत एकेक विशेष गुण साधण्याचा यत्न केला आहे. यापैकीं

'चिकित्साब्धि' नामें वैद्यक ग्रंथाचें भाषांतर प्रस्तुत मीं आरंभिलें आहे. आणि जसजशी चहा पडत जाईल तसतशीं इतर ग्रंथांचींही मराठी रूपांतरें यथावकाश बाहेर पडतील. 'चिकित्साब्धि' ग्रंथ, सर्वमान्य संस्कृत वैद्यकग्रंथांचें परिशीलन करून आणि शरीरविवेचनांत आधुनिक पाश्चात्य माहितीचेंही साहाय्य घेऊन, काळजीनें तयार केलेला आहे. असा ग्रंथ गुजराथी भाषेंत तर पहिलाच आहे अशी त्याची ख्याति आहे, आणि मराठींतही त्याची योग्यता वरचे पायरीला लागेल अशी माझी समजूत आहे. सदर ग्रंथ छापतच आहे व तो कांहीं दिवसांनीं प्रसिद्ध होणारच आहे, त्यापेक्षा त्याच्या विषयीं येथें जास्त लिहिण्याची गरज दिसत नाहीं.

मुंबई ता. १९ माहे सप्तंबर सन १८९७.

भाषांतरकार,
**खंडेराव भिकाजी बेलसरे.**

# विष्णुशास्त्री चिपळुणकर

यांच्या

## किरकोळ लेखांचा संग्रह.

**MISCELLANEOUS WRITINGS & LETTERS**

OF *VISHNUSHASTRI CHIPLUNKER*

*Edited with introduction and index by*

**KHANDERAO B. BELSARE.**

यांत पूर्वी स्वतंत्र पुस्तक रूपानें न छापलेले सर्व लेख आले आहेत तेः—१ शाळापत्रक. २ ज्ञानप्रकाश. (इंग्रजींत) ३ सत्यशोधक. ४ केसरी. ५ हातचीं पत्रें वगैरे. ६ प्रस्तावना व उपोद्घात. ७ इंडेक्स. याप्रमाणें विविध विषय असून विद्यार्थी, बहुश्रुत, सुधारक, देशाभिमानी वगैरे **सर्व लोकांस वाचण्यालायक लेख** आहेत.

एकंदर भाग २ किंमत रु. २॥. शिवाय पोष्टेज ४ आणे निराळें पडेल.

**पत्ता—के. आर कुळकर्णी, निसबत बेलसरे यांची कंपनी.**

वैद्य मणिशंकर गोविंदजी यांचे औषधालयांत, काळकादेवी रस्ता, मुंबई.

---

याशिवाय **बेलसरेकृत** खालील वाचनीय पुस्तकें आमचेकडे मिळतलि—

१ **तीन गोष्टी**—( म्ह० १ संसारांत मुख्य प्रेम. २ गुणवती स्त्री. ३ खरें प्रेम ) सुबोध, चटकदार, स्त्रियांनीं अवश्य वाचण्यालायक, विविधज्ञानविस्तारांत छापल्या किं.।.

२ **विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र.**—बोधपर, चटकदार, वर्तमानपत्रांचे उत्तम अभिप्राय, कोरीव तसबिरीसहित. पानें १५०. अवश्य वाचून संग्रहास योग्य किं. ||~

३ **लार्ड लेलसन यांचें चरित्र**—दक्षिणाप्रैझ क. चें बक्षिस. किं. रु० १.

४ **मदालसा व ऋतुध्वज यांचें चरित्र**—नवीन तऱ्हेची पौराणिक कादंबरी. ( शुद्ध करून दिलेली ) सुबोध भाषा. पन्नासांवर कोरींव चित्रें घातली आहेत. किं. |||.

५ **वटसावित्रीकथागीत**—बायकांचें जुनें गाणें, शुद्ध करून, टीपा दिलेलें किं. ~=

६ **बिल्हणचरित्र**—मूळ संस्कृत व त्याचें मराठी कविताबद्ध भाषांतर. हा एक अद्भुत शृंगाररसाचा उत्कृष्ट चुटका आहे. पूर्वी कोठेही प्रसिद्ध झालेलें नाहीं. किं. ।~

**उद्यांवरची गोष्ट**—आजचें काम उद्यांवर ढकलण्यानें कसें नुकसान होतें हें यांत स्वोदाहरणानें उत्कृष्ठ दाखविलें आहे. विद्यार्थ्यांनीं वाचल्यावांचून राहूंच नये अशी ही बोधपर गोष्ठ किं. ।|.

# सूचना.

माझा मुक्ता नामें अद्भुत कथाग्रंथ मी गुजराथी भाषेमध्यें सन १८९४ सालीं प्रगट केला, तो गुर्जरजनांस अत्यंत मान्य झाला आहे हें कळविण्यास मला मोठा आनंद होत आहे. त्याचें भाषांतर मराठी भाषेंत व्हावें व त्याचा रसास्वाद माझ्या महाराष्ट्र देशबांधवांसही घेतां यावा अशी माझी फार इच्छा होती. ती आज सिद्ध झालेली पाहून मला आज विशेष आनंद होत आहे. माझ्या गुजराथी वाचकांप्रमाणेंच हा ग्रंथ मराठी वाचकांसही प्रिय होईल अशी मला आशा आहे.

या ग्रंथाच्या भाषांतराचें जबाबदारीचें काम माझे मित्र रा० रा० खंडेराव भिकाजी बेलसरे यांनीं पतकरिलें व त्यांनीं श्रम घेऊन माझ्या मनाप्रमाणें यथास्थित तडीस नेलें ह्मणून मी त्यांचा आभारी आहें. रा० बेलसरे यांस गुजराथी भाषेचें मार्मिक ज्ञान असल्यामुळें त्यांच्या हातून हें एवढें जबाबदारीचें काम उत्तम प्रकारें शेवटास गेलें हें उघड आहे. गुजराथी भाषेचें एवढें ज्ञान असलेला दुसरा कोणी महाराष्ट्र भाषांतरकार मिळाला असता असें मला वाटत नाहीं. रा० बेलसरे यांसही मराठींत लिहिण्याची हौस आणि सराव असल्यामुळें त्यांचें हें भाषांतर सुरेख उतरलें आहे असें मी समजतों.

हा ग्रंथ छापण्याचें काम सुरेख करून बांधणीही मजबूत व सुंदर केली आहे तसाच कागद जाड व घोटीव घातला आहे. तथापि पहिलेच कांहीं फर्म्यांचे कागद किंचित काळसर पडले आहेत. या बद्दल वाचकांस वाईट वाटण्याचें कारण नाहीं. त्यांच्या योगानें '**मुक्ते**' ची सौभाग्यशोभा उणी न होतां ती, अधिक मनोवेधक मात्र होऊन भाळीं तीट लावल्याप्रमाणें दृष्ट उतरल्याचें कार्य होईल असें मी समजतों.

मुंबई, ता. १९ सप्तंबर १८९७.

ग्रंथकार,

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी.**

जामनगर-काठेवाड.

एक उपयुक्त विस्तीर्ण ग्रंथ.

# चिकित्साब्धि.

## (मराठी भाषेंत छापत आहे.)

---

हा ग्रंथ संस्कृत आणि इंग्रजी वैद्यक ग्रंथांचें परिशीलन करून आस्थेनें तयार केला आहे. जाणण्यासारखीं वैद्यकीय तत्वें न सोडतां, होईल तेवढें करून, संपूर्ण माहिती देण्याचा यांत यत्न केला असल्यामुळें, हा ग्रंथ वैद्यकी करणाऱ्यांस तसाच कुटुंबवत्सल जनांस अत्यंत उपयोगी झाला आहे. गुजराथीमध्यें हा ग्रंथ एवढा लोकप्रिय झाला आहे कीं याच्या तीन आवृत्ति भराभर निघून गेल्या.

या ग्रंथावर समुद्राचें रूपक काल्पिलें आहे आणि यांतील भरपूर माहिती व रचना यांचा विचार करतां तें रूपक केवळ यथार्थ आहे असें दिसून येईल. याचे मुख्य चार भाग केले असून त्यांस तरंग असें नांव दिलें आहे आणि पोटविभागांस प्रकरणें समजून रत्न अशी संज्ञा योजली आहे.

सारांश हा ग्रंथ वाचून जवळ बाळगल्यास वैद्याची घडी घडी गरज सरून, शारीरिक व सांपात्तिक असें दोनही प्रकारचें हित साधतां येईल.

कागद जाड व तुळतुळीत, आणि आकार डेमी द्वादशपत्री धरला असून बांधणी उत्कृष्ट केली जाईल. पृष्ठसंख्येच्या मानानें किंमत मागाहून लावण्यांत येईल.

कर्ता,

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी.**

जामनगर-काठेवाड.

# प्रस्तावना.

केवळ साधारण इतिहास नव्हे, केवळ उपदेश नव्हे, तशीच नुसती गद्यरचनाही नव्हे आणि केवळ पद्यरचनाही नव्हे, वेदाप्रमाणें शब्दाचेंच प्राधान्य अशी रचनाही नव्हे, पुराणादिकाप्रमाणें अर्थावरच दृष्टि देणारेंही नव्हे; परंतु लोकोत्तर चमत्कारानें भरलेलें, हुबेहूब वर्णन करण्यामध्यें निपुण अशा कवीनें रचलेलें, आणि रमणीय अर्थाचें प्रतिपादन करणारें असें जें शब्दमय कृत्य तें काव्य होय. हें काव्य यशाला, धनाला, व्यवहारज्ञानाला, अनिष्टाच्या नाशाला आणि जें वाचीत असतां विषयांतराचें ग्रहण होऊंच नये अशा तात्कालिक रसास्वादरूप आनंदावलीला प्राप्त करून देतें, इतकेंच नव्हे तर, पवित्र कांतेप्रमाणें रसाचा आविर्भाव करून आणि मन वळवून सदुपदेशही करतें. असा साहित्याचार्यांचा सिद्धांत आहे आणि तो सुद्धां अनुभवानेंच सिद्ध होतो. दृष्य काव्य आणि श्राव्य काव्य असे काव्याचे दोन मुख्य भेद आहेत. त्यां पैकीं नाटकादि रूपकें आणि नाटिकादि उपरूपकें यांचा दृष्य काव्यांत अंतर्भाव होतो. आणि याशिवाय बाकी राहिलेलीं सर्व काव्यें श्राव्य काव्यांमध्यें येतात. श्राव्य काव्याचेही गद्यमय आणि पद्यमय असे आणखी दोन भेद होतात. गद्यमय काव्याच्या भेदांत आख्यायिका आणि कथा असे जे दोन पोटभेद आहेत ते एवढे विलक्षण नाहींत आणि अमुक ठिकाणीं अमुक प्रकारचीं पदें आलीं पाहिजेत असे नियम पाळण्याची चमत्कारिक अटही त्यांच्या ठिकाणीं नाहीं.

काव्याच्या स्वरूपाचें लक्षण सांगतांना मम्मटभट्ट ह्मणतो कीं दोषरहित, गुणयुक्त, अलंकारयुक्त असे शब्द आणि अर्थ मिळून जें होतें

त्यास काव्य ह्मणावें. परंतु एखादे विषयांत अलंकार नसला तरी त्यापासून काव्याची हानि होत नाहीं. या लक्षणाचें युक्तिपूर्वक खंडण करून विश्वनाथ कविराज ह्मणतो कीं ज्यामध्यें रस, भाव आणि रसाभास इत्यादि जीवनरूप प्रकार असतात तेंच काव्य समजावें. दोष, रसामध्यें न्यूनता आणणारे आहेत. तसेच गुण, अलंकार आणि रीतिविशेष हीं रसाचा उत्कर्ष करणारीं* आहेत. या लक्षणाचेंही प्रौढ युक्तीनें खंडन करून जगन्नाथराय पंडित ह्मणतो कीं लोकोत्तर आल्हाद देणाऱ्या अर्थाचें प्रतिपादन करणारा जो शब्दसमुच्चय त्यासच काव्य ह्मणावें. गुण हे काव्याचे धर्म होत आणि अलंकार त्यास शोभा देणारे होत. काव्याचें स्वरूप दाखवून मम्मटभट्ट ह्मणतो कीं ज्यांत वाच्यार्थाची गौणता आणि व्यंग्यार्थाची मुख्यता असते तें उत्तम अथवा ध्वनि काव्य ह्मणून समजावें; ज्यामध्यें व्यंग्यार्थाचें आणि वाच्यार्थाचें सारखेंच प्राधान्य असेल अथवा व्यंग्यार्थाची गौणता असून वाच्यार्थाची मुख्यता असेल तें मध्यम काव्य समजावें; आणि ज्यामध्यें आस्वाद देणारा व्यंग्यार्थ मुळींच नसून केवळ गुण आणि अलंकारच असतील तें अधम काव्य समजावें. विश्वनाथ कविराज ह्मणतो कीं ज्याचा पहिल्या व दुसऱ्या भेदांत अंतर्भाव होऊं शकतो तेंच काव्य समजावें. अर्थात काव्याचे दोनच भेद झाले. तिसरा अधम काव्य नांवाचा भेद ह्मणजे अकाव्यच. त्याची काव्यांत गणना नाहीं. जगन्नाथराय पंडित लिहितो कीं ज्यामध्यें शब्द आणि अर्थ गौण असून मुख्यता धरणारें कांहीं चमत्कारिक व्यंग्य इष्टार्थ दाखवीत असेल तें उत्तमोत्तम काव्य जाणावें. ज्यामध्यें व्यंग्यार्थ अप्रधान असून चमत्कार दाखवीत असेल तें उत्तम काव्य समजावें; ज्यांत वाच्यार्थाच्या चमत्काराहून व्यंग्यार्थाचा चमत्कार कमी असतो त्यास मध्यम काव्य समजावें; आणि ज्यामध्यें वाच्यार्थाचाच चमत्कार असून व्यंग्यार्थाचा चमत्कार

कांहींच नसतो तें अधम काव्य होय. हाच पंडित आणखी असेंही मानितो कीं ज्यामध्यें वाच्याचा चमत्कार नाहीं आणि असलाच तर तो केवळ शब्दाचाच चमत्कार असेल अशा बंधकाव्य, यमककाव्य वगैरे काव्यांची गणना काव्यांच्या पंक्तींत करूं नये.

ध्वनि अथवा उत्तमोत्तम काव्य याचेही शब्दशक्तिमूळ आणि लक्षणामूळ असे दोन मुख्य भेद आहेत. आणि त्यांच्या मध्येंही शब्दशक्तिमूळाचे, रसध्वनि, वस्तुध्वनि आणि अलंकारध्वनि असे आणखी तीन भेद आहेत. लक्षणामूळाचेही अर्थांतरसंक्रमितवाच्य आणि अत्यंततिरस्कृतवाच्य असे दोन भेद आहेत. अशा प्रकारें या पांच प्रकारच्या ध्वनींमध्यें रसध्वनि परमरमणीय होय असे मानिलें आहे.

काव्य कोणतें आणि त्याचे कोणकोणते व कसकसे भेद आहेत हें सांगणें कांहींसें विषयांतरासारखें भासेल तरी त्याचें प्रस्तुत किती अगत्य आहे हें सांगण्याचें काम जरासें एका बाजूस ठेवून, मला पाहिल्यानें सांगितलें पाहिजे कीं सांप्रत हायस्कुलें, कालेजें आणि विश्वविद्यालयें यांत इंग्लिश भाषेबरोबर संस्कृत भाषेचाही अभ्यास कराविण्यांत येत असतो, त्यामुळें अलिकडे सुमारें दीडशें वर्षांपासून संस्कृत विद्येचा अभ्यास जो शिथिल होऊं लागला होता त्यास उत्तेजन मिळून तो बराच वाढूं लागला आहे असें ह्मटलें तर चूक होणार नाहीं. तथापि प्राचीन काळीं जी उन्नत स्थिति तीस प्राप्त झाली होती ती सांप्रत प्राप्त व्हावयास बराच अवकाश लागेल; अथवा इतर भाषांचें आणि त्यांतील ग्रंथसंग्रहाचें परिशीलन करण्यामध्यें लोकांचा फार काळ जाऊं लागल्यानें संस्कृत विद्येच्या अभ्यासाला प्राचीन काळच्यासारखी उन्नति फिरून प्राप्त होणें कठिण आहे असेंही कदाचित् ह्मणतां येईल. संस्कृत भाषा बोलतां किंवा लिहितां येऊं लागल्यानें संस्कृत भाषेंतील उत्तम उत्तम ग्रंथांचें हृदय समजलें असें ह्मणतां येणार नाहीं. जेव्हां निरनिराळ्या

विषयांचा बराच वेळपर्यंत सारखा अभ्यास करून त्यांचें परिशीलन होईल तेव्हांच त्यांत कांहीं गति झाली तर होऊं शकेल. परंतु अशा प्रकारचें परिशीलन प्रस्तुतच्या अर्थप्रधानकाळीं आमच्या विद्वान ह्मण-विणाऱ्या लोकांकडून होणें बरेंच असंभाव्य वाटतें. याच कारणास्तव न्याय, सांख्य, योग, आणि वेदांत यांजसारख्या तत्वज्ञानानें भरलेल्या अतिगंभीर आणि अत्युत्तम ग्रंथांचें साधारण परिज्ञानही आमच्या देशां-तून बहुतेक नष्ट झाल्यासारखेंच झालें आहे. याप्रमाणेंच साहित्या-सारख्या मनोरंजक विषयाचेंही तत्वज्ञान व्हावें तसें होत नसून नष्ट होण्याच्या पंथास लागलें आहे असेंही ह्मणावयास चिंता नाहीं. सांप्रत आपल्या देशामध्यें कवि पुष्कळ उत्पन्न होऊं लागले आहेत आणि त्यांच्या हातून कवितात्मक ग्रंथही पुष्कळ निपजूं लागले आहेत, तथापि कवितात्मक ग्रंथांमध्यें जशा प्रकारचा अवश्य आस्वाद अपेक्षित आहे तसा तो, सांप्रत जे ग्रंथ निर्माण होतात त्यांपैकीं फारच थोड्यांत आद-ळण्यासारखा आहे असा बोभाटा जो विद्वान लोकांच्या तोंडून ऐकूं येतो तो बरेच अंशीं खरा आहे असें मानावयास बरींच सबळ कारणें आढतात. जोंपर्यंत संस्कृत भाषेंतील साहित्यासंबंधीं गुण, दोष, अलं-कार, रीति, रस, आणि व्यंग्याचे चमत्कार यांचें पूर्ण ज्ञान आणि त्यांचा अभ्यास यांच्या साहाय्यानें आमच्या कवींस प्रौढपणा आला नाहीं तों पर्यंत संस्कृत भाषेचीं अपत्यें ज्या सांप्रतच्या प्रचलित देशी भाषा त्यां-च्यांतील काव्यसंग्रह कधींही उत्तम दशेस पोंचेल अशी आशा धरतां येणार नाहीं.

साहित्याच्या अवलंबनावांचून तात्विक विषयामध्यें त्वरित प्रवेश कर-णाऱ्या लोकांची संख्या प्रस्तुत फारच थोडी आहे, यासाठीं केवळ पांडि-त्यानें भरलेला प्रबंध सर्वांच्या उपयोगी पडत नाहीं. साधारणबुद्धीच्या लोकांचा ह्मटला ह्मणजे मोठा भरणा, त्यांस कांहीं बोध व्हावा अथवा

एखाद्या श्रेष्ठ विषयाचें अवलोकन करतां यावें अशी कोणाची इच्छा असेल तर रसिक आणि मनोरंजक वस्तूंचें त्याशीं मेळवण केल्यावांचून ही इच्छा सुलभतेनें सिद्धीस जाणें कठिण आहे. याच कारणामुळें प्रत्येक भाषेंतील सरस्वतीच्या भांडाराची जर आपण झडती घेतली तर आपल्या सहज लक्षांत येईल कीं प्रास्ताविक पुस्तकांपेक्षां प्रास्तादिक विषयांबरोबर प्रधानवार्ताविन्यासयुक्त पुस्तकांचाच भरणा अधिक असतो. अशा पुस्तकांचा मुख्य आणि उत्तम हेतु एकच आहे, आणि तो हाच कीं त्यांच्या वाचनानें वाचणाऱ्याच्या मनोवृत्तीवर अत्यंत प्रशस्त वर्तनाची छाप पडावी. सूर्याच्या तेजस्वी बिंबाचें अवलोकन करतां क्षणींच कमळाची निर्मळ आणि मनोहर लक्ष्मी जशी प्रफुल्लित होत जाते त्याच प्रमाणें कथांच्या पुस्तकांतील वस्तूंचें अवलोकन झाल्यानें लोकांच्या हृदयकमळाची सद्वर्तनसंपत्तिही उत्तम प्रकारें प्रफुलित होते. हा हेतु साध्य करण्याच्या उद्देशानें अशीं पुस्तकें रचणारांस वेळानुसार संभवाच्या मजबुत दोरखंडावर पाय ठेवून पलीकडे बरीच उडी मारावी लागेल तथापि असें करतांना या दोरीवरून आपले हात साफ सोडून देण्याची गरज आहे असें आह्मांस वाटत नाहीं. ईश्वरी प्रसादावर अविश्वास धरणाऱ्या साधारण बुद्धीला ही उडी संभवापासून फार दूर गेली असें कदाचित् वाटेल परंतु असाधारण बुद्धीला ईश्वरी प्रसादाविषयीं पक्की खात्री असल्याकारणानें अशा उड्या संभवापासून फार दूर पडतात असें वाटत नाहीं; अथवा दुसऱ्या पक्षीं असेंही ह्मणतां येईल कीं मानुषी बुद्धि अशा उड्यांस असंभाव्य ह्मणून लेखण्यास उतावळी होईल परंतु दैवी बुद्धि त्यांस संभवाच्या मर्यादेबाहेर गणण्यास तयार होण्यापूर्वी बराच दूरवर विचार करील असें आह्मांस वाटतें; आणि एवढा दूरवर विचार केल्यावरही त्यापैकीं कांहीं उड्या संभवाच्या मर्यादेबाहेर पडल्या असें दिसून आलेंच तर त्यांत जो उत्तम

हेतु साध्य केला असेल त्याजकडे दृष्टि देऊन अशा उड्यांकडे विद्वान लोक दुर्लक्ष्य करतील आणि त्या ग्रंथास अनुत्तम गणणार नाहींत यांत संशय नाहीं. कारण कीं एवढी मोकळीक पुस्तककार जी घेतात ती मुख्यत्वें करून पुस्तकांतील कथेच्या वस्तूमध्येंच असते आणि वस्तूचें फळ त्यावरून मिळणारा बोध त्यांत असत नाहीं.

तात्विक विषयप्रधान, कथाविषयप्रधान आणि उभय विषयप्रधान या तीन्ही प्रकारच्या कथापुस्तकांच्या अधिकारी वाचक मंडळाचेही तीन वर्ग होतात. तात्विक विषयप्रधान पुस्तकाचें अधिकारी वाचक मंडळ आपल्या इष्ट विषयाच्या तत्वासाठीं 'जिज्ञासु असतात. कथाविषयप्रधान पुस्तकांचें अधिकारी वाचकमंडळ आपल्या इष्ट विषयाच्या तत्वजिज्ञासेपासून बहुत दूर धडपडत असतें आणि उभय विषयप्रधान पुस्तकांचें अधिकारी वाचकमंडळ आपल्या इष्ट विषयाच्या तत्वजिज्ञासेप्रत पूर्णपणें यदाकदाचित जाऊन पोहोंचलें नसलें तर न पोहोंचो तथापि तिच्या जवळ जवळ तरी जाऊन भिडण्याच्या तयारींत असतें; ह्मणजे साधारणपणें कथाविषयक पुस्तकाच्या अधिकारी वाचक मंडळामध्यें बहुतेक प्रकारचे वाचकांचा समावेश होतो असें ह्मणावयास चिंता नाहीं. परंतु सांप्रत काळीं केवळ कथाविषयप्रधान पुस्तकें रचण्याकडेच बहुतेक ग्रंथकारांच्या लेखण्या वळलेल्या दिसून येत असल्याकारणानें तीं वाचण्याला तदधिकारी वाचकमंडळच बहुत करून उत्सुक असतात आणि बाकीचा वर्ग त्यापासून विरक्त असतो. अशी रीत बहुत करून पुष्कळ वेळपर्यंत चालत आली असल्याकारणानें कथाविषयक पुस्तक हे शब्दच कथाविषयक पुस्तकें वाचणाऱ्या मंडळी मध्येंही अनादरास पात्र झाले आहेत असें दिसून येतें. ज्यामध्यें नायका नायिकांचीं अमर्याद वर्तनें आणि भाषणें असतील, त्यांचा वियोग झाल्यावर 'अरेरे प्रियकरा आणि अरेरे प्रिये' अशीं बोलणीं असतील आणि वाचतां वाचतां कंटाळ-

णाऱ्या वाचकांच्या मनोवृत्तीला पुन्हःपुन्हा ओढून धरण्यासाठीं ग्रंथकर्ता त्यांतील पात्रांस आपल्या मर्जीस येईल त्याप्रमाणें दुःखांत ढकलीत आहे, मर्जीस येईल त्या प्रमाणें अमर्यादपणा चालवीत आहे आणि मर्जी प्रमाणें वाटेल तेव्हां मारून टाकण्यासही कमी करीत नाहीं, असा प्रकार ज्यांत असेल त्यासच आजकाल कथाविषयक पुस्तकें ऊर्फ कादंबऱ्या असें समजतात. परंतु विचार केला असतां खरी गोष्ट अशी नाहीं असें दिसून येईल. कारण कीं ईश्वरी कृपेनें उत्कृष्ट उतरलेल्या कथेच्या सेवनानें धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चारही पुरुषार्थ सिद्ध होतात आणि काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे साहाही आत्मशत्रु नाश पावतात. उत्तम कथेमध्यें विद्वत्ता आणि नीतिबोध या दोनही गुणांस अवश्य स्थळ मिळालें पाहिजे. उत्तम कथेमध्यें केवळ लौकिक चित्र काढीत बसण्यापेक्षां लोकोत्तर चित्र काढण्याकडे चित्रकाराच्या लेखणीची धांव विशेष असली पाहिजे. खरी स्थिति अशी असतांही लोकांच्या मनांत असें भरून गेलें आहे कीं कथाविषयक पुस्तकांमध्यें लौकिक चित्राशिवाय दुसरें कांहींही असूं नये. परंतु सूक्ष्म विचार केला असतां दिसून येईल कीं खरी खुबी ह्मटली तर लोकोतर चित्र देखण्यांतच राहिली आहे. सहृदय जनांच्या पंक्तीमध्यें गणलेले विद्वान पुरुष तर कथेच्या या लोकोत्तर खुबीवरच आसक्त होतात. पण ज्यांच्या ठिकाणीं सहृदयत्व नसतें अशा साधारण लोकांचें अंतःकरण आकर्षून घेण्यास ही लोकोत्तर खुबी समर्थ नाहीं. अत्यंत रमणीय तरुणी जशी तरुण पुरुषाच्या अंतःकरणाला आपल्याकडे ओढून घेते त्याप्रमाणें बालकांच्या अंतःकरणाला ओढून घेऊं शकत नाहीं. यांत सहृदय आणि सहृदयत्वहीन अशा लोकांचें अधिकारित्व आणि अनधिकारीत्व कारणीभूत आहे. यावरून उघड दिसून येईल कीं कोणाही कथाविषयक पुस्तककारानें आपल्या पुस्तकांत लौकिक खुबीबरोबरच अलौकिक खुबीचाही समावेश करण्यास

ह्मटलें पाहिजे. ज्या वेळेस लोकोत्तर चमत्कारांनीं भरलेल्या कथाविषयक पुस्तकांचा भरणा भाषाभांडारामध्यें वाढेल त्याच वेळेस भाषारूप भव्य भामिनी आपल्या खऱ्या वैभवानें शोभूं लागेल. यास उत्तम उदाहरण ह्मटलें ह्मणजे संस्कृत भाषेचें. देशी भाषांमध्यें जरी कित्येक चांगलीं चांगलीं कथात्मक पुस्तकें झालीं आहेत तरी त्यांपैकीं बहुतेक इंग्रजी पद्धतीला अनुसरूनच रचलेलीं आढळतात आणि त्याशिवाय बाकीचीं केवळ साध्या लेखणीनें लिहिलेलीं आहेत, असें ह्मणावयास चिंता नाहीं. यास्तव संस्कृत पद्धतीस अनुसरून, आपल्या भाषेस चमकणारें सुवर्णालंकारभूत होईल असें एखादें कथात्मक पुस्तक असेल तर आवश्यक आहे. अशा विचाराचें बहुत वर्षांपूर्वी माझ्या हृदयभूमिकेमध्यें बीजारोपण झालें होतें. त्याप्रमाणें यथाशक्ति संस्कृत भाषेच्या साहित्याचें परिशीलन करून आपल्या देशबांधवांस साहित्यचमत्कारांची ओळख करून द्यावी अशा उद्देशानें हा "मुक्ता" नामक ग्रंथ लिहिण्यास आरंभ केला, आणि अनुकूळ समयाचा योग प्राप्त होतांच तें पूर्ण करून आज विद्वज्जनांस सादर केलें आहे. वर दर्शविल्याप्रमाणें या पुस्तकास काव्य बनविण्याचा माझ्या अल्पमत्यनुरूप प्रयत्न मीं केला आहे. वर सांगितलेंच आहे त्याप्रमाणें या काव्यास आख्यायिका अथवा कथा ह्मणून ह्मणतां येईल. यांत एक पद्यबंधमात्र कमी आहे; त्याशिवाय महाकाव्यास लागू अशा बहुतेक बाकीच्या लक्षणांनीं हा परिपूर्ण आहे; असें सर्वथैव वाचकांच्या लक्षांत येईल. कारण कीं या पुस्तकांत धीरोदात्त उत्तम कुळांतील क्षत्रिय कुसुमायुध नामें वीरपुरुष हा नायक आहे. शृंगाररस प्रधान आहे. दुसरे रस अंगभूत आहेत. नाटक शास्त्रांत सांगितलेलें मुख, प्रतिमुख इत्यादि संधिही यथायोग, सांगोपांग साधिले आहेत. सज्जनांच्याच इतिहासाचें वर्णन आहे. चारही पुरुषार्थांचें वर्णन आलें आहे. फलरूपानें कोणाचें वर्णन आहे, हें समजणें सुशक्य

केलें आहे आणि संध्या, सूर्य, चंद्र, रात्रि, प्रदोष, अंधकार, दिवस, प्रातःकाळ, मध्यान्हकाळ, मृगया, पर्वत, ऋतु, वन, संभोग, विप्रलंभ, मुनि, नगर, यज्ञ, रणप्रयाण, विवाह, मंत्र, पुत्रोदय इत्यादि सर्व प्रकार वर्णिले आहेत. सर्गांच्या ठिकाणीं चालू नव्या प्रचारास अनुसरून प्रकरणें पाडलीं आहेत.

प्राचीन साहित्याचार्यांच्या अनुभवसिद्ध नियमाप्रमाणें ही कथा सर्वत्र ध्वनिरूपच करण्याचा आरंभीं विचार होता; परंतु विद्वान वाचकांच्या वर्गांतही ध्वनि समजणारे असे अपवादभूत लोक फार थोडेच आढळतील. मग साधारण लोकांस ध्वनीचें बीज कोठून समजणार? ही गोष्ट मनांत आणून जरी कित्येक ठिकाणीं रसाला, वस्तूला आणि अलंकाराला वाच्य करून अथवा कित्येक वेळां गौणही करून ते दर्शविले आहेत, तरी अनेक स्थळीं त्यांस ध्वनिरूप करण्याचाही प्रयत्न केला आहे. ज्या ज्या स्थळीं जो जो रस दाखविला आहे त्या त्या स्थळीं त्या त्या रसाचे आलंबनाविभाव, आलंबनचेष्टा इत्यादि, तसेंच देशकाल इत्यादि उद्दीपनविभाव आणि आंगिक, स्वाभाविक, यत्नजन्य व सात्विक इत्यादि अनुभाव आणि रसाच्या स्थितिपर्यंत असणारे स्थायीभाव आणि स्थायीभावांत उन्मग्न निमग्न होणारे व रसाला अनुकूळ असून प्रगट होणारे संचारी भाव हे सर्व यथासंभव वर्णिले आहेत. उदाहरणार्थ, प्रस्तुत कथेमध्यें शृंगाररसास मुक्ता आणि कुसुमायुध आश्रयरूप असल्याकारणानें आलंबनविभाव आहे; मुक्तेच्या आणि कुसुमायुधाच्या चेष्टा, देशकाल, आणि चंद्र इत्यादि गोष्टी रतिमय शृंगाराला उद्दीपन करणाऱ्या असल्याकारणानें उद्दीपनविभाव आहेत; निर्विकार चित्तामध्यें विकार प्रथम अंकुरित होणें वगैरे आंगिक अलंकार, शोभा आणि कांति हे स्वाभाविक अलंकार, लीला आणि विलास हे यत्नजन्य अलंकार आणि स्तंभ, स्वेद व रोमांच इत्यादि सात्विकभाव हे मागाहून उद्भवणारे असल्याकारणानें

अनुभाव आहेत; रति शृंगाराच्या स्थितीपर्यंत रहावयाची असल्याकारणानें स्थायीभाव आहे; लज्जा, हर्ष आणि उत्सुकता इत्यादि संचारीभावही योग्य ठिकाणीं प्रगट झाले आहेत. जरी संचारी भावांपैकीं अथवा दहा कामदशांपैकीं मरण हें शृंगार रसाला विरुद्ध आहे तथापि फिरून मृताचें संजीवन जर वर्णन करावयाचें असेल तर मरणाचेंही वर्णन करण्यास साहित्यशास्त्रकारांनीं मोकळीक ठेविली आहे, आणि हीच मोकळीक घेऊन करुणविप्रलंभामध्यें मुक्तेच्या मरणाचेंही वर्णन प्रस्तुत ग्रंथांत आणिलें आहे. वीररसाला असुर आलंबनविभाव आहे. असुराच्या चेष्टा वगैरे उद्दीपनविभाव आहेत. असुराची अवज्ञा वगैरे अनुभाव आहे, उत्साह स्थायीभाव आहे, आणि धैर्य तशीच मति इत्यादि संचारीभाव आहेत.

करुणरसामध्यें खोट्या बातमीनें मरण पावला असा समजलेला कुसुमायुध आणि मरण पावलेली मुक्ता आलंबनविभाव होत; त्यांच्या पतन, आणि दाह इत्यादि अवस्था उद्दीपनविभाव होत; दैवनिंदा आणि आक्रंदित इत्यादि अनुभाव होत, आणि शोक स्थायीभाव असून निर्वेद, मोह, खेद आणि ग्लानि वगैरे संचारी भाव आहेत.

अद्भुतरसामध्यें मुनीचा लोकोत्तर आश्रम आलंबनविभाव आहे, आश्रमामधील घातक प्राण्यांचीही वर्णिलेली परस्परमैत्री इत्यादि गुणांचा महिमा हा उद्दीपनविभाव आहे. संभ्रम आणि रोमांचोद्गम इत्यादि अनुभाव होत, विस्मय स्थायीभाव आहे, आणि वितर्क व हर्ष इत्यादि संचारीभाव होत.

भयानकरसामध्यें कुसुमायुध आलंबनविभाव आहे, कुसुमायुधाच्या भयंकर चेष्टा उद्दीपनविभाव होत, डुकराच्या रूपानें आलेल्या नीच भीमासुर दैत्याच्या ठिकाणीं दाखविलेली विवर्णता, गद्गदस्वर, प्रलय, स्वेद, रोमांच आणि कंप इत्यादि प्रकार अनुभाव होत, भय स्थायी-

भाव आहे, आणि संमोह, त्रास, ग्लानि, दीनता आणि शंका इत्यादि प्रकार संचारीभाव होत.

बीभत्सरसामध्यें रणभूमीवरील दुर्गंध आणि मांस वगैरे पदार्थींचें वर्णन आलंबनविभाव आहे, शरीरावयवांचें विदारण वगैरे उद्दीपनविभाव आहे, समजण्यांत येणारा नेत्रसंकोच इत्यादि अनुभाव आहे, जुगुप्सा स्थायीभाव आहे, आणि आवेग, मोह वगैरे संचारीभावही आहेत.

रौद्ररसामध्यें पाताळांतील असुर आलंबनविभाव होत, त्यांच्या चेष्टा उद्दीपन विभाव होत, आयुधें फेंकणें वगैरे क्रिया अनुभाव होत, आणि क्रोध स्थायीभाव असून उग्रता व अमर्ष इत्यादि प्रकार संचारीभाव होत.

शांतरसामध्यें संसाराची अनित्यता आणि ब्रह्मस्वरूपवर्णन वगैरे आलंबनविभाव होत, सन्याशांचा समागम इत्यादि उद्दीपनविभाव आहे, दृष्टोत्पत्तीस येणारे रोमांच वगैरे प्रकार अनुभाव आहेत आणि शत्रुजितास प्राप्त झालेला शम स्थायीभाव असून निर्वेद वगैरे प्रकार संचारीभाव होत.

या प्रमाणें प्रस्तुत ग्रंथामध्यें इतर ठिकाणींही ज्या ज्या रसाचे चमत्कार आढळून येतील त्या त्या रसा संबंधेंही वरील प्रमाणेंच साहित्य शास्त्रोक्त रीतीची कल्पना करावी.

प्रस्तुत ग्रंथामध्यें यद्यपि हास्यरस स्वतंत्रपणें वर्णिला नाहीं आणि कदाचित् यद्यपि कोठें कोठें थोडा बहुत प्रगट झालाही असला; तथापि तो नसल्यासारखाच आहे, कारण तो आणण्याचा उद्देशून प्रयत्न केलेला नाहीं. परंतु—

**प्रायेण मुह्यन्ति हि ये लिखंति।**

या नियमास अनुसरून ह्मटलें ह्मणजे प्रस्तुत ग्रंथ लिहितांना ज्या ज्या ठिकाणीं माझ्या हातून चुका झाल्या असतील व दोष घडले असतील तीं

तीं स्थळें हास्यरसाचीं ह्मणून समजावीं आणि त्या त्या ठिकाणीं विद्वान वाचकांच्या हृदयांत आपोआपच हास्यरस उत्पन्न होणार आहे. यास्तव हास्यरसालाही प्रस्तुत ग्रंथांत अवकाश मिळाला असें मानतां येईल अशी माझी समजूत आहे.

ज्या विषयामध्यें जो रस वर्णिला आहे तो विषय वाचतांच किंवा ऐकतांच जर त्या रसाचे विभाव, अनुभाव, स्थायीभाव आणि संचारीभाव केवळ वर्णिलेल्या पात्रांच्या संबंधानेंच झाले, अशी वाचणाऱ्याला अथवा ऐकणाऱ्याला प्रतीति न होतां वर्णिलेलीं जीं पात्रें तन्मय होऊन जाण्याच्या भावनेनें त्या त्या भावाचा त्यांच्या मनांत आणि अंगांत जर पूर्ण उद्बोध होईल तरच त्या विषयामध्यें तो रस यथार्थ आला असें स्वताचीच साक्ष पटली असें ह्मणतां येईल. कारण कीं विभाव, अनुभाव तसेच संचारी भाव हे सर्व पहिल्यानें खंडरूपानेंच प्रतीयमान होऊन मागाहून अखंडरूपाप्रत जेव्हां पावतात तेव्हांच त्यांस रस हा यथार्थ शब्द लावतां येतो. आणि विभाव इत्यादि ही स्वता लोकांमध्यें जों पर्यंत असतात तों पर्यंत त्यांस विभाव इत्यादि शब्द लावून व्यवहारांत बोलण्यास योग्य होत नाहींत, परंतु ज्या वेळेस त्यांचें वर्णन काव्यांत दाखल केलें जातें त्याच वेळेस ते त्या शब्दानें व्यवहार करण्यास योग्य होतात. याच प्रमाणें काव्यत्वामुळें आणि नित्यत्वामुळें रसरहित असतांही विभाव इत्यादिकामुळें ते उत्पन्न होतात असें ह्मटलें आहे. परंतु ते परमानंदमयत्वानेंच संवेद्य होत. याप्रमाणें या मुक्तानामक काव्यामध्यें सहृदय वाचकांस जर रसास्वाद आढळून आला नाहीं, तर रस आणण्याचा मी पाहिजे तेवढे जरी यत्न केले असले तरी ते व्यर्थच गेले असें ह्मटलें पाहिजे. रसोद्भावाची परीक्षा करण्याचें व त्याची साक्ष पटविण्याचें काम मार्मिक व सहृदय वाचकाचेंच होय, यास्तव यासंबंधानें मी कांहीं अधिक लिहावें हें योग्य होणार नाहीं.

महाकाव्याच्या पद्धतीला अनुसरून या काव्यग्रंथामध्यें कित्येक इतर शास्त्रीय विषयही प्रसंगानुरोधानें आले आहेत. वास्तविक ह्मटलें तर हा ग्रंथ पद्यमय नसतांही काव्यच होय. तो पद्यात्मक करण्याचें मनांत आणिलें असतें तर छंद, अनुप्रास इत्यादि प्रकारांस अनुसरण्याची गरज पडली असती आणि त्यामुळें संकोच उत्पन्न होऊन मनसोक्त चमत्कार दाखल करतां आले नसते. असें समजून महाकवि बाणभट्ट याच्या सुप्रसिद्ध कादंबरी नामक गद्य काव्याच्या लेखनसरणीच्या धर्तीवर गद्यात्मकच हा ग्रंथ रचला आहे. तथापि कादंबरींतील किंवा अशाच इतर कोणत्याही ग्रंथांतील चमत्कार उच्छिष्ट समजून प्रस्तुत ग्रंथांत ते न येऊं देण्याविषयीं आपले कडून बरीच सावधगिरी ठेविली आहे. हें अभिज्ञ वाचकांच्या सहज लक्षांत येईल. आणखी असेंही एक भय वाटतें कीं वर्तमानपत्रें आणि मासिक पुस्तकें इत्यादिकांचे कांहीं कांहीं अनभिज्ञ कर्ते आणि कित्येक पंडितमान्य पुरुष रसराज शृंगाराचें रहस्य न समजतां प्रस्तुत ग्रंथांत शृंगाररसाचीं वगैरे जीं वर्णनें आलीं आहेत तीं वाचून कांहीं भलताच अभिप्राय देतील. शृंगार रसराज असतांही लिहिते वेळीं प्रस्तुत काळास अनुसरून कोठें कोठें शृंगार रसाचा अत्यंत सरस भाग जो वास्तविक वर्णिला पाहिजे तोही मोठ्या दुःखानें सोडून द्यावा लागला. तसेंच शृंगारामध्यें अश्लीलपणाची लेशमात्रही भेसळ न व्हावी ह्मणून ठेवतां आली तितकी सावधगिरी ठेविली आहे. तथापि येथेंही हीच शंका उत्पन्न होते कीं कांहीं अल्प समजुतीच्या लोकांस शृंगाराचें तादृश वर्णन अश्लीलपणाचें कदाचित वाटेल.

या ग्रंथांतील मूळकथा आपलेकडील पुराणग्रंथातून घेतली आहे. भाषा होतां होईल तों सुबोध करण्याचा यथाशक्ति यत्न केला आहे. भाषाकाठिण्याच्या भयामुळें अनेक ठिकाणीं कित्येक अनुकूळ असणारे

किंवा पारिभाषिक शब्द व अपरिचित वाटणारे संस्कृतशब्द अजिबात काढून टाकावे लागले आहेत. हा ग्रंथ रचतांना जर माझे परम पूज्य वडील बंधु कालिदास शास्त्री यांचें साहाय्य मिळालें नसतें तर हा ग्रंथ इतक्या उत्तम प्रकारें प्रसिद्ध करण्याला मी शक्तिमान झालों असतों किंवा नाहीं याची शंकाच आहे. शेवटीं या ग्रंथामध्यें बुद्धिदोष, लेखनदोष, दृष्टिदोष, किंवा मुद्रणदोष इत्यादि कोणत्याहि प्रकारें कांहीं उणेपणा दिसेल तर त्याबद्दल विद्वज्जन मला क्षमा करतील असा मला भरंवसा आहे. ह्मटलें आहे:—

**गुणदोषौ बुधो गृण्हन्निंदुक्ष्वेडाविवेश्वरः ।**
**शिरसा श्लाघते पूर्वं परं कंठे नियच्छति ॥**

माझ्या मतानें हें सुक्ताकाव्य कितीही उत्तम झालें असलें तरी

**आपरितोषाद्विदुषाम्**
**न साधु मन्ये प्रयोग विज्ञानम् ।**

या सर्व संमत उक्तीप्रमाणें ज्या वेळेस हा ग्रंथ सहृदय व मार्मिक विद्वानांस संतोष देईल तेव्हांच खरें ह्मटलें असतां त्यानें उत्तमत्व संपादन केलें असें ह्मणतां येईल. राजाप्रमाणें काव्य आज्ञेच्या बळानें नव्हे किंवा मातापितरांप्रमाणें गौरवाच्या बळानें नव्हे किंवा मित्राप्रमाणें संबंधाच्या बळानेंही नव्हे, तर रसानें थबथबलेलीं, अलंकारांनीं देदीप्यमान झालेलीं, संपूर्ण सत्वगुणानें युक्त, विद्योत्कर्षानें वाखाणण्यास योग्य, नीतिमार्गास लावणारी, धर्मामध्यें साहाय्य करणारी, आणि अवलोकनानेंच अलौकिक आनंद देणारी अशा उत्तम कांतेच्या भाषणाप्रमाणें सरसता उत्पन्न करून काव्य हें सदुपदेश करतें. हा उपदेश कोणत्याही प्रकारच्या जुलमानें होत नसल्या कारणानें आपला खरा पगडा वाचकाच्या मनावर बसविल्यावांचून रहात नाहीं. अर्थात राजाच्या-

प्रमाणें वाटणारी जी वेदाची आज्ञा, मातापितरांच्याप्रमाणें भासणारी जी धर्मशास्त्राची शिकवणी, आणि मित्राच्याप्रमाणें लागणारी जी पुराण ग्रंथाची बोधरीति; या सर्वांवरून नव्हे तर कांतेच्याप्रमाणें काव्याच्या बोधरीतीवरून जो उपदेश मिळतो तो वेद, धर्मशास्त्र आणि पुराणें यांपासून मिळणाऱ्या उपदेशापेक्षांही अधिक प्रिय वाटून अंतःकरणावर चांगला ठसतो असें सहृदय विद्वानांचें मत आहे; त्याची प्रतीति संस्कृत भाषेंतील उत्तम उत्तम काव्यें जशीं देतात त्याचप्रमाणें माझें हें प्राकृत भाषेंत रचलेलें काव्यही तें मत खरें करून दाखवो अशी परमेश्वराची मी प्रार्थना करतों.

हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत मुख्य हेतु सर्व प्रसिद्धच आहे. तो माझा हेतु सफळ होवो अथवा न होवो त्याचा आधार वाचकवृंदावर आहे. तथापि हा **मुक्ता**नामक ग्रंथ कोणास अर्पण करावा याविषयीं बराच विचार करतां करतां असें दिसून आलें कीं ज्या भूमीमध्यें माझा जन्म झाला आहे आणि ज्या भूमीमध्यें माझा कांहींसा अभ्युदयही झाला आहे त्याच भूमीचा धनी जो खरोखर **मुक्ता** (मोतीं) हिचाही धनी होय. यास्तव त्यालाच ही **मुक्ता**नामक कथा जातीच्या लोभानें नव्हे, तर राजावर प्रजेचें जें प्रेम असावें त्यास परवश होऊन अर्पण केली आहे. यापेक्षां प्रस्तुत ग्रंथाविषयीं अधिक लिहिणें प्रशस्त वाटत नाहीं. कारण,

**न सुखं नच सौभाग्यं स्वयं स्वगुणवर्णने ।**
**यथैव च पुरंध्रीणां स्वहस्तकुचमर्दने ॥**

# अनुक्रमणिका.


| प्रकरण. | | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | स्वाभाविक उत्कंठा. | १ |
| २ | आशेचे अंकुर. | १७ |
| ३ | समागम. | २७ |
| ४ | जन्ममहोत्सव | ३९ |
| ५ | राज्यचर्या. | ४९ |
| ६ | बाळरक्षण. | ६१ |
| ७ | शिक्षण. | ७१ |
| ८ | चौसष्ट कळा. | ८१ |
| ९ | स्वारी. | ८९ |
| १० | परीक्षा. | ९९ |
| ११ | आगमन. | १०९ |
| १२ | गुप्त मसलत. | ११७ |
| १३ | शिकवणी. | १२३ |
| १४ | प्रजामत. | १४३ |
| १५ | यौवराज्याभिषेक. | १४९ |
| १६ | मातृप्रेम—राज्यभवन. | १५९ |
| १७ | मृगया. | १६५ |
| १८ | दिग्विजय. | १७७ |
| १९ | विवाहविचार | १८९ |
| २० | वर्षा | १९७ |
| २१ | शरत्. | २१३ |
| २२ | सद्भाग्यसोपानाची पहिली पायरी. | २२९ |
| २३ | सृष्टिसौंदर्याविषयीं कुसुमायुधाचे विचार | २४१ |
| २४ | सात्विक सृष्टि. | २५१ |
| २५ | अंधारी गुहा | २५९ |

| प्रकरण. | | पृष्ठ. |
|---|---|---|
| २६ | नायिकाप्रवेश.... .... .... .... .... .... | २६७ |
| २७ | निस्सीम सौंदर्य. .... .... .... .... .... | २७९ |
| २८ | सात्विक भाव. .... .... .... .... .... | २९६ |
| २९ | कुसुमायुधानें केलेली मुक्तेच्या मनाची स्थिति. .... .... | ३०९ |
| ३० | संदिग्ध प्रेम आणि कामाची सत्ता. .... .... .... | ३१७ |
| ३१ | धीर. .... .... .... .... .... .... | ३३१ |
| ३२ | दोष. .... .... .... .... .... .... | ३४३ |
| ३३ | गांधर्व विवाह. .... .... .... .... .... | ३५३ |
| ३४ | इष्टसिद्धि. .... .... .... .... .... .... | ३६३ |
| ३५ | उत्सव आणि अभिनंदन. .... .... .... .... | ३६७ |
| ३६ | वधूविलास. .... .... .... .... .... .... | ३७३ |
| ३७ | हेमंत आणि शिशिर..... .... .... .... .... | ३७७ |
| ३८ | वसंत. .... .... .... .... .... .... | ३८३ |
| ३९ | ग्रीष्म. .... .... .... .... .... .... | ३९३ |
| ४० | अचिंत्यदैव. .... .... .... .... .... .... | ३९९ |
| ४१ | दैत्यविनाश आणि आश्रमरक्षण. .... .... .... | ४०७ |
| ४२ | कपट. .... .... .... .... .... .... | ४१३ |
| ४३ | अनिष्टचिंतन.... .... .... .... .... | ४२३ |
| ४४ | वाईट खबर आणि दुःखी आईबाप. .... .... .... | ४२९ |
| ४५ | अनुमरण. .... .... .... .... .... .... | ४४५ |
| ४६ | अत्मबोध आणि शोकोपशांति.... .... .... .... | ४५५ |
| ४७ | शोकांत हर्ष आणि हर्षांत शोक. .... .... .... | ४६५ |
| ४८ | मित्रलाभ. .... .... .... .... .... .... | ४७५ |
| ४९ | सन्मित्रतेचें साफल्य..... .... .... .... .... | ४८३ |
| ५० | आश्चर्य आणि आनंद. .... .... .... .... | ४९१ |



# मुक्ता.

## प्रकरण १ लें.

### स्वाभाविक उत्कंठा.

**श्री** विश्वेश्वर नामें प्रसिद्ध शिवलिंगाच्या वास्तव्यानें व पतितांस पावन करणाऱ्या श्री भागीरथीच्या सामीप्यानें सगळ्या तीर्थांमध्यें शिरोमणीभूत; अनेक पंडितजनांचें तसेंच विद्वान व ब्रह्मनिष्ठ संन्यासिजनांचें मुख्य निवासस्थान; सकल आर्यविद्यांची जन्मभूमि; उंच फडकणाऱ्या ध्वजांच्या द्वारा, जणोंकाय पापास दुरूनच येण्यास प्रतिबंध करीत आहेत अशा देदीप्यमान देवमंदिरांनीं शोभायमान; केवळ अज्ञजनांसच नव्हे तर पशुपक्षी यांसही जेथें मरणानेंच मुक्तिलाभ होतो अशा या आपल्या प्रभावास्तव, अनेक विचारांच्या संकटांनीं व्याप्त ब्रह्मविद्येच्या मुक्तिदायक गुणाचा गर्व हरण करणारी; व्यापारी लोकांच्या मणिमाणिक्यादिकांनीं भरगच्च भरलेल्या हजारों दुकानांनीं रत्नाकराच्या असाधारण नांवाला सुद्धां साधारणत्व आणणारी; आर्यविद्येच्या गंभीर शास्त्रार्थविचारणाघोषानें सर्वकाळ गजबजून गेलेली; सत्पुरुषांच्या निवासामुळें जणों, असंख्य कल्पवृक्षयुक्तच आहे कीं काय असें भासविणारी; चंद्राच्या स्वच्छतेशीं आपल्या स्वच्छतेची तुलना करून जणों पहातच आहेत अशा सौधशालांनीं, तसेंच जागोजाग बांधलेल्या सभामंदिरांच्या, पाठशाळांच्या, नाटकगृहांच्या, यंत्रकलामंदिरांच्या मोठ्या भव्य इमारतींनीं भरगच्च भरलेली **काशी** अथवा

बनारस नांवाची जी प्रख्यात नगरी, तिची कीर्ति अझूनही या कलिकालांत पूर्वीप्रमाणेंच जशीच्या तशीच कायम आहे.

सगळ्या भरतखंडाचें मुख्य आभरणच अशा या नगरीमध्यें पूर्वी चंद्रवंशीय राजकुलरूपी कमळाला प्रफुल्लित करण्यांत सूर्याची उपमा पावणारा, जो धन्वंतरि या नांवानें प्रसिद्ध व स्वतः आयुर्वेदाचा आचार्य असून सुश्रुतमुनीचा उपाध्याय, अशा दिवोदास नामक राजाचा वंशज शत्रुजित् नामें राजा राज्य करीत होता. या राजानें सोमरसाच्या आहुतींनीं अखिल देववृंदास तृप्त केलें होतें. या राजाला पाहून, "हा काय दोनच डोळ्यांसहित इंद्र आला आहे? किंवा हा एकमुखी ब्रह्मदेव आहे? किंवा कलंकविरहित चंद्र आहे? किंवा अंगधारी अनंग आहे? किंवा बृहस्पतिच याच्या रूपानें पृथ्वीवर अवतरला आहे? किंवा मनुष्यदेह धारण करणारा हा सागरच आहे?" असे असंख्य कल्पनातरंग मनुष्यांच्या अंतःकरणांत उठत असत. धर्मशास्त्राच्या सतत उपदेशानें त्याच्या राज्यांत सर्व पुरुषवर्ग एकपत्नीव्रत पाळीत असे. परंतु त्याचाच उग्र प्रताप पृथ्वीचें आक्रमण करीत होता, सर्व दिशांस आलिंगन देत होता, पाताळ भूमीचें चुंबन करीत होता, देवनगरी अगम्य खरी तरी तिच्या अंतस्थ भागांतही नेहमी संचार करीत होता, पराक्रमी जनांच्या मनोवृत्तिला आपलेकडे ओढीत होता, तसाच समुद्रवेलेला जाऊन भिडला होता. त्याच्या राज्यांत सर्व स्त्रीजन पतिव्रताधर्मानें वागत असे पण त्याचीच कीर्तिरूप स्त्री भरबाजारांत, चवाठ्यावर, घरोघर, देशोदेशीं, फिरून प्रत्यक्ष त्याच्या शत्रूच्याही विलासनिवासालयांत सुद्धां सर्वदा यथेच्छ संचार करीत होती; एवढेंच नाहीं पण बळानेंच त्याच्या हृदयांत शिरून इतकी रममाण होत असे कीं कांहीं केल्यानें ती तेथून निघत नसे. तो राजा दुसऱ्यांच्या स्त्रियांचें पातिव्रत्य राखणारा ह्मणवीत होता खरा तरी स्वतः शत्रूच्या

राज्यलक्ष्मीचें बळानें पातिव्रत्य हरण करीत असे. त्याचा क्रोध हालाहलाप्रमाणें होता, प्रसाद कामधेनूप्रमाणें सद्यःफलप्रद होता, यश चंद्राप्रमाणें स्वच्छ होतें, हात कल्पवृक्षाप्रमाणें, भाषण अमृताप्रमाणें, हत्ती ऐरावताप्रमाणें, घोडे उच्चैःश्रव्याप्रमाणें, स्वस्त्री लक्ष्मीप्रमाणें, दासीजन देवांगनांप्रमाणें, राजवैद्य धन्वंतऱ्याप्रमाणें, मणि कौस्तुभाप्रमाणें, मानसंमान मादकपणामुळें मदिरेप्रमाणें, भ्रूलतिका शार्ङ्गधनुष्याप्रमाणें, आणि सेवन दक्षिणावर्त शंखाप्रमाणें होतें. त्यामुळें त्याला चौदा रत्नांचा जनक जो क्षीरसागर त्याची उपमा प्राप्त झाली होती. या राजाच्या भयानें पळून गेलेले व चिंतेनें अत्यंत दीन झालेले शत्रु पर्वताच्या अरुंद दऱ्यांमध्यें शिरतांना चिंतलासुद्धां मोठी उपकार करणारी मानीत होते. त्याचे शत्रु जंगलामध्यें भटकत फिरतां फिरतां, थकून जाऊन वृक्षांच्या तळीं आश्रयार्थ जात, त्यावेळीं ते वृक्षसुद्धां, शत्रुजिताच्या प्रभावानें भय पावूनच कीं काय त्यांस कांटे टोंचून पीडा देत असत. त्या राजानें उत्तम उत्तम वैद्य ठेवून, राज्यांत कोठेंही रोगास थारा न मिळे अशी व्यवस्था ठेवली होती. तरीपण तरुण स्त्रिया कामज्वरानें पीडित होत्या, विद्येंत अतिसाराचें प्राबल्य नजरेस येत होतें, विरहिणीस उन्मदावस्थेनें घेरलें होतें, वीण्याच्या ठिकाणीं स्वरभेद आढळत असे, दुराचाराला क्षय लागलेला दृष्टीस पडत होता, भांडाराला वृद्धि लागली होती आणि वार्षिक आनक अर्बुदयुक्त होती. त्याची तरवार स्वतः अशुद्धानें भरलेली असूनही वैराची शुद्धि करीत असे, मजबुत मुठीची असूनही शत्रूस स्वर्गांत सुख देत असे. क्रूर असूनही कीर्तीचा उदय करीत असे, तिचे ठिकाणीं पुष्कळ पाणी असूनही शत्रूंस तृषेनें व्याकूळ करीत होती, आणि जरी स्वतः चपळ होती तरी राज्याचें रक्षण करण्यांत स्थिर होती. त्याचे कृपाकटाक्ष कोमळ होते तरी ते विद्वानांचें दारिद्र्य कापून टाकीत होते, स्वतः आर्द्र असूनही दीनजनांच्या शोकाश्रूंस सुकवून टाकीत होते, स्वतः पात

सोसून ही सुजनांच्या भाग्यास उन्नतावस्थेस नेत होते. आणि स्वत: शीतल असून कल्पवृक्षच्छायेचा अभिमान लोपवीत होते, त्या राजाचा क्रोध शत्रूच्या भाग्याबरोबरच बाहेर पडत असे, धनुष्याची दोरी शत्रूच्या लक्ष्मीबरोबरच खेंचत असे, आणि बाण शत्रूच्या शिराबरोबरच खालीं पडत असत. हा राजा प्रजेला पिता, राणीला कामदेव, याचकांस चिंतामणि, मंत्रिजनांस इष्ट देवता, शत्रूंस काळ, अपराध्यांस अग्नि, आणि निरपराध्यांस बंधु या प्रमाणें भासत होता. तो आपलीं इच्छिलेलीं सर्व कामें अप्रतिबंध सिद्धीस नेत असे त्यावरून विधात्याशीं सख्य करूनच तो प्रत्येक कामास प्रवृत्त होत आहे असें सर्वांस वाटत असे. त्याच्या कारकीर्दीत पालन पृथ्वीचें होत होतें पण पुष्टि लक्ष्मीला मिळत होती, रक्षण न्यायाचें होत असे पण संतोष प्रजेला होत असे, द्वेष दुर्गुणांचा होत असे तरी देशांतर कीर्तीस करावें लागत होतें, उत्तेजन विद्यांस मिळत असे पण लाभ सगळ्या देशाला होत असे, बंधन कायद्यांचें होत असे पण गति गुन्ह्यांची बंद होत असे, अधर्माचा छेद होत असे तरी दुराचरणाला संकट प्राप्त होत असे, न्यायान्यायाचें पृथक्करण होत असे तरी अन्यायी लोकांचेच सांधे मोडत असत, धनाचा पूर येत असे तरी तरंग आनंदाचे उसळत असत, शीतळ कटाक्ष विद्वानांवर पडत असत तरी कंप त्यांच्या दारिद्र्यासच प्राप्त होत असे; या प्रमाणें एका क्रियेचा परिणाम दुसऱ्यास भोगावा लागत असे ही मोठी आश्चर्याची गोष्ट होती! लक्ष्मी आणि सरस्वती ह्या दोघींनीं राजापाशीं राहून, केवळ आपलें स्वाभाविक वैरच नव्हे पण सवतीमत्सराचें वैर सुद्धां सोडून दिलें होतें. त्याचा क्रोध शत्रूच्या लक्ष्मीस काशीची, स्त्रियांस वनाची, प्राणांस परलोकाची आणि कीर्तीस अस्तमार्गाची, यात्रा वारंवार करवीत होता. या पराक्रमी राजानें शत्रूच्या सर्व सुखांस आकर्षण करून घेतलें होतें तरी शत्रु ( रणभूमीवर मरण पावल्यामुळें ) विमा-

नांत बसून जात असत, अमृताचें पान करीत असत व त्यांस अप्सरांचें आलिंगन प्राप्त होत असे. त्याची कीर्ति स्वतः निर्मळ असतां, सर्व लोकांच्या हृदयाचें आलिंगन घेत असे, सुरक्षित असूनही देशोदेशीं भ्रमत होती, आणि स्वतः कोमळ खरी पण तरवारीच्या धारेंतच निवास करून राहिली होती. त्याचें साम दानविरहित, दान सत्कारविरहित आणि सत्कार गुणज्ञताविरहित नव्हता. लक्ष्मी जणों अतिदुःसह प्रतापाच्या संतापानें कोमेजूनच कीं काय, त्या राजाच्या छत्राची सावली क्षणभरही सोडीत नव्हती. सर्व राज्यांत धर्मन्याय विष्णुप्रमाणें सर्वत्र व्यापून राहिला होता, आरोग्य भगवन्माये प्रमाणें सर्वत्र पसरलें होतें, अधर्माचा वंध्यापुत्राप्रमाणें कोठें ठिकाण लागत नव्हता, मत्सर आकाशाप्रमाणें शून्यस्वरूप राहिला होता, लोभ खपुष्पांप्रमाणें आणि दुर्गुण शशाच्या शिंगाप्रमाणें अभावरूपच केवळ होते.

**त्या** राजाचे मंत्री सकलशास्त्रांत बृहस्पतीप्रमाणें विचक्षण, राज्याचें कल्याण करण्यासाठीं स्वतःचे प्राणही खर्ची घालणारे, व्यसन आणि नीच लोकांची संगति यांस चांडालस्पर्शाप्रमाणें लेखणारे, न्याय करण्याचे प्रसंगीं पुत्र व शत्रु यांस समान कक्षेंत गणणारे, आणि राजा व प्रजा या दोघांचेंही हित करून अपूर्व कीर्तीला पात्र झालेले असे मोठे कर्तृत्ववान होते. त्यांस जशी कांहीं दिव्यसिद्धिच प्राप्त झाली आहे अशा रीतीनें बसल्या जागींच देशोदेशची गुप्त बातमी इत्थंभूत जाणूं शकत होते. ते नीतिशास्त्राच्या प्रयोगांत कुशळ होते. राज्यकारभाराच्या मोठ्या संकटांच्या प्रसंगींसुद्धां न डगमगणारे असे ते धीर, गंभीर आणि चतुर होते. धैर्याचें मंदिर, सत्याचा सागर, चातुर्याचे आगर, सिद्धीचें लीलास्थान असें तें मंत्रिमंडळ असून मेरुपर्वतावरील अत्युच्च पदावर वास करणाऱ्या देवराज्यलक्ष्मीसही बुद्धिबळानें सहज वश्य समजणारें त्यांचें कर्तृत्व होतें. राज्यतंत्रमंत्रास रत्नाप्रमाणें गुप्त राखण्यामध्यें त्यांस रत्नाकराचीच

उपमा साजत होती. सर्व राज्यतंत्राचा बोजा जरी त्यांनीं शिरीं घेतला होता तरी ते उन्नतावस्थेमध्यें राहात होते. पण या सर्वांत हा एक विशेष होता कीं ते प्रजा व राजा यांच्यामध्यें वैमत्य कधींही येऊं देत नसत.

**या** शत्रुजित् राजाच्या राणीचें नांव **मनोरमा** ह्मणून होतें. आणि खरोखरच ती रूपानें जशी मनोरम असून अनुपम होती त्याप्रमाणें तिचे गुणही अनुपमच होते. पातिव्रत्यधर्मांत तिला रति, पार्वती व लक्ष्मी यांची उपमा देतांना कवीस उपमेयाचेंच आधिक्य वाटत असे. तिचें मुख चंद्राप्रमाणें, हास्य चंद्रिकेप्रमाणें, कस्तूरीचा तिलक कलंकाप्रमाणें आणि आभरणामध्यें जडलेलीं रत्नें तारागणाप्रमाणें, शोभत असल्यामुळें ती भर दिवसासही पौर्णिमारात्रीची भ्रांति उत्पन्न करीत होती. किंवा **म**नोरमा राणीला सुंदर नदीचीही उपमा शोभत होती. पहा कीं तिचे मुख कमळाप्रमाणें, केश त्यावरील भ्रमर पंक्तीप्रमाणें, बाहू कमलनालाप्रमाणें, आणि उदरस्थ रोमावली शेवाळीप्रमाणें दिसत असे. पीनस्तनांच्या भारानें लवलेली व लाल ओठ आहेत जीचे अशी ती सुंदरी **म**नोरमा, पुष्पगुच्छांनीं लवलेल्या व नवीन पल्लव फुटलेल्या लतेप्रमाणें शोभत होती. सारांश जसा चंद्रासारखा एक चंद्रच त्याप्रमाणें **म**नोरमेप्रमाणें एक तीच **म**नोरमा होती, तीस दुसरी उपमा नाहीं. कोणती सरस उपमा घेतली तरी तिनें मूळ सौंदर्याचा अंशतःमात्र बोध होण्यासारखा होता. **म**नोरमेच्या गतीची तुलना करून पाहण्यासाठीं हंसाचें, स्वराच्या तुलनेसाठीं कोकिलांचें, मुख व नेत्र यांच्या तुलनेसाठीं कमलाचें, केशांच्या तुलनेसाठीं भ्रमरपंक्तीचें, दातांच्या तुलनेसाठीं दाळिंबाच्या बीजांचें, अधाराच्या तुलनेसाठीं बिंबफळांचें, कंठाच्या तुलनेसाठीं शंखाचें आणि कुचांच्या तुलनेसाठीं कनककलशांचें किंवा हत्तीच्या गंडस्थळांचें कवि पुनः पुनः अवलोकन करून पहात, पण दोहोंत पु-

ष्कळच अंतर आढळून येत असल्यामुळें त्यांच्या मनाचें व्हावें तसें समाधान होत नसे. तेव्हां शेवटीं हात टेकण्याचा प्रसंग येऊन "खरोखर हिच्या योग्य असें उपमान पुढें भावी सृष्टींत ब्रम्हद्यानें निर्माण केलें तर नकळे!" असें ह्मणून त्यांस स्वस्थ बसावें लागे. शत्रुजित् राजा शिकार करीत असतां, मनोरमेच्या केशपाशाचें स्मरण होऊन मयूरांवर, नेत्रांची आठवण होऊन हरिणांवर, कटाक्षांचें चापल्य मनांत येऊन खंजन पक्ष्यांवर बाण फेकण्यास त्याचा हात वाहात नसे. "अशा मनोरमा सुंदरीला निर्माण तरी कोणीं केलें? तिला बनविण्यांत चंद्र ब्रह्मा झाला होता—किंवा कामदेव—किंवा वसंत? कोणीही असो, तरी वेद घोकून घोकून जड बुद्धि होऊन कशांतही कौतुक वाटूं नये अशी मनोवृत्ति ज्याची झाली आहे अशा वृद्ध ब्रह्मदेवाच्या हातून असें मनोहर रूप कसें घडावें?" असेच बोल तिला पाहणारांच्या तोंडांतून निघत असलेले कांनीं येत असत. देवळांत विष्णुदर्शन करण्यासाठीं ती आली असतां, प्रत्यक्ष विष्णूलाही क्षणभर "ही आपल्या वक्षःस्थळावरून उतरून लक्ष्मीच माझ्या समोर उभी आहे काय?" असा संशय उत्पन्न होऊन, आपल्या वक्षस्थळाला वारंवार हात लावून पाहण्याचा प्रसंग येत असे. मनोरमेला पाहून तिच्या दासींच्या मनांत वारंवार असे संशय येत कीं "ही काय वीज आहे?—चंद्रिका आहे?—कनकलता आहे?—किंवा कामदेवाची साम्राज्यलक्ष्मी आहे?" इतर राजे मनोरमेला लक्ष्मीच समजत, विद्वान ही शारदाच आहे असें मानीत, प्रजाजन हिला जगदंबा ह्मणून लेखीत, तिच्या दासींस ती अभीष्ट देवताच आहे असें वाटे, दीन लोकांस मूर्तिमती दयाच केवळ भासे, अपराध्यांस साक्षात् रूपवती क्षमाच वाटे, पतिव्रतांस सती अरुंधतीच ही अवतरली असें वाटे, याचकवृंदांस सशरीर उदारताच ही आमच्या उद्धारार्थ आली अशी कल्पना होई, आणि शत्रुजित् राजा तर ही आपल्या प्राणांची मूर्तिच

ह्मणून मानीत होता. मनोरमेचे स्तन, जणुं, परस्परांच्या समागमसुखानें परिपुष्ट झाले आहेत; मध्यभाग, जणूं, स्तनांच्या परम उन्नतीच्या ईर्षेनें अगदीं कृष होऊन गेला आहे; नेत्र, जणूं, परस्परांस पाहण्याचा आनंद आपणास न मिळाल्यामुळें चंचळ झाले आहेत; आणि मुखचंद्राचा प्रकाश मस्तकावरच्या भागाला न पोंचल्यामुळें अंधकारच जणूं केशकलापांच्या रूपानें एकवटला आहे अशा कल्पना तिला पाहून मनांत येत असत. मनोरमेच्या अधरमाधुरीपुढें उत्तम कवींच्या उत्तम वाणीची माधुरीही नीरस आहे असें राजाला वाटत असे. मनोरमेच्या मुखाला राहूच्या रोषाची धास्ती नव्हती, कलंकाचा स्पर्शही नव्हता आणि पांडुरताही नव्हती, एवढेंच नव्हे परंतु त्याची अपूर्व कांति दिवसेंदिवस वृद्धिच पावत होती; यास्नव राहूच्या धास्तीनें पीडिलेला, कलंकयुक्त, पांडुरवर्णाचा व क्षयी असा जो चंद्रमा त्याची उपमा तिच्या वदनाला देणें ह्मणजे मोठें साहसच समजलें पाहिजे.

राजा शत्रुजित् याजला देशदेशांतरींही कोणी शत्रु ह्मणून राहिला नव्हता आणि मंत्र्यांनीं धरलेल्या चांगल्या शिस्तीमुळें राज्यकारभाराकडे विशेष लक्ष पुरविण्याचेंही कांहीं प्रयोजन नव्हतें; यास्तव तो आपली प्राणप्रिया मनोरमा हिजबरोबर यौवनावस्थेचीं अप्रतिम सुखें निश्चिंतपणें भोगीत होता. केव्हां केशरयुक्त धाराजळानें स्नान करावें, कधीं दिवसासही मनोरमेच्या विलाससमागमानें कृतार्थ व्हावें, कधीं बगीच्यांतील पुष्करणींत जलक्रीडा करावी, केव्हां कमलवनांची शोभा पहावी, केव्हां वीणा, सतार, जलतरंग इत्यादि वाद्यें वाजवीत असावें किंवा गायनश्रवणानें कर्ण संतृप्त करावे; याप्रमाणें तो आपला काळ सुखांत घालवीत होता. तरी जरूर पडे त्या वेळीं मंत्र्यांच्या विनंतीवरून राज्यव्यवस्थेकडे लक्ष देत नसे असेंही नव्हतें. यामुळें राज्यतंत्रही सुरळीत चाललें असून, राज्योपभोगही त्यास मिळावा तसा मिळत असे.

तरुणपणचीं सुखें जरी तो एवढीं तत्परतेनें सेवीत होता, तरी देवपूजनादि धर्मकृत्यास तो विसरला नव्हता हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्यानें यज्ञांनीं देवतागणास, वेदादिकांच्या अध्ययनानें ऋषींस आणि श्राद्धादिक क्रियांनीं पितरांस तृप्त केलें होतें. संसारांत भाग्यशाली पुरुषांस जीं जीं सुखें मिळावयाचीं तीं तीं सगळीं राजा शत्रुजितास प्राप्त झालीं होतीं. तथापि सर्वांत मोठें असें एक सुख त्यास उणें होतें. तें हेंच कीं त्याच्या वयाला बरींच वर्षे उलटून गेलीं होतीं तरी पुत्रमुखदर्शनाचें सुख त्याला प्राप्त झालें नव्हतें. जसजसा अधिकाधिक काळ लोटत चालला तसतसें त्याचें मन चिंतेनें घेरून, शरीर संतप्त होऊं लागलें. शत्रुजिताचें मन आणि मनोरमेचें मन, तसेच शत्रुजिताचे प्राण आणि मनोरमेचे प्राण एकरूपच असल्याकारणानें चिंता आणि संताप यांस त्यांच्या दोघांच्या मनास व प्राणांस पीडा देण्याकरतां निरनिराळे श्रम पडत नव्हते. “ निपुत्रिकाला गति नाहीं. निपुत्रिकाच्या हातून जें उदक व पिंड मिळतात ते पितर श्वास टाकीत टाकीत मोठ्या कष्टांनीं ग्रहण करतात. यमाच्या दरबारीं निपुत्रिकास ऋणनिर्मुक्त झालासें समजत नाहींत. ” अशा अर्थाचीं वचनें जीं वेदशास्त्रांत जागोजाग आहेत तीं त्यांस शल्याप्रमाणें दुःख देत. वारंवार त्यांच्या मनांत असे विचार येत कीं “ ईश्वरानें आह्मास सगळीं सुखें दिलीं आहेत, पण त्यांत पुत्रसुखाची उणीव ठेवली. आपल्यामागें या एवढ्या राज्याला वारस कोण ? पुत्र हा स्वतःचें प्रतिबिंब होय असें वेदशास्त्रें सांगतात. सकाळचे प्रहरीं वांझेचें तोंड पाहण्यासही लोकांस आवडत नाहीं. जरी संसार इंद्रजाळाप्रमाणें, मृगजळाप्रमाणें आणि स्वप्नाप्रमाणें मोहकर, मिथ्या आणि क्षणिक आहे तरी प्रभूच्या मायेनें प्राण्यांच्या मनांत अशी एक इच्छा उत्पन्न होते कीं ती मरणसमयापर्यंत त्यांस सोडीत नाहीं. प्रीति, बळ, सुख, वंशविस्तार, यश आणि स्वर्गेच्छा या सर्वांस आधारभूत

असा एक पुत्रच होय. वांझ माणसास धनादिकांची संपूर्णता जरी असली तरी तो अपूर्णच खरा; शरीरानें धट्टाखट्टा जरी असला तरी तो लांकडाच्या पुतळ्याप्रमाणें केवळ निर्बळ आहे; प्रतिष्ठित जरी असला तरी त्यास खरोखर प्रतिष्ठा वाटत नाहीं; न्यूनता झांकण्याला सर्व गोष्टींची अनुकूळता असली तरी तो उघडाच पडलेला भासतो; विश्वास्य असूनही तो अविश्वास्यच आहे; खरा वैराग्यशील जरी असला तरी त्यास दुःखानें वैराग्य घेतलेला समजतात; आणि निष्काम धर्म आचरीत असला तरी सकामबुद्धीनेंच धर्म करीत आहे असें ह्मणतात."

**रा**जा **श**त्रुजित् आणि राणी **म**नोरमा याप्रमाणें हमेश चिंतेनें व्याकुळ होऊन गेलीं होतीं, तरी तें दुःख, केवळ दैवच अनुकूळ झालें तरच दूर होणार, यास्तव त्याबद्दल रिकामी वळवळ करून परस्परांस कष्टी करणें विचारी दंपतीचें कर्तव्य नव्हे असें समजून तीं आपली चिंता एकमेकांस प्रगट करीत नसत.

**ए**के दिवशीं नित्याचीं सगळीं धर्मकृत्यें आणि नियमाप्रमाणें रोजचीं राज्यकृत्यें आटोपल्यावर राजा **श**त्रुजित् अंतःपुरामध्यें गेला, तेव्हां चिंतेनें घेरलेली **म**नोरमा पलंगावर बसलेली त्यानें पाहिली. ज्याप्रमाणें सकाळीं कमलपत्रांतून दंवाचे बिंदु टपटप खालीं गळतात त्याप्रमाणें तिच्या डोळ्यांतून अश्रुबिंदु गळत होते. त्या अश्रूंनीं चोळी तसाच लुगड्याचा पदर भिजून चिंब झाला होता. डोळ्यांच्या पापण्या कांहींशा ताठून गेल्या होत्या. जशी काय चित्रांतच रेखली आहे अशी अगदीं निश्चल दिसत होती. डाव्या तळहातावर तिनें तोंड ठेवलें होतें त्यावरून देठासहित कमलाच्या पाकळीवर दैवयोगानें चंद्र येऊन पडला आहे कीं काय असा भास होई. तिची एकाग्रदृष्टि जवळच्या कोणत्याही वस्तूवर गेलेली नसून किंवा परिजनाकडे वळलेली नसून केवळ पायां खालच्या जमिनीवर लागलेली दिसत होती. कांहीं व्याधि उत्पन्न झाली आहे अशा रीतीनें

तिच्या शरीराचा वर्ण बदलून गेला होता. जणुं धुरानें व्याप्त अशी अग्नीची ही ज्वालाच आहे, किंवा खोट्या आरोपानें कलंकित झालेली कीर्तिच आहे, अन्यायामुळें भ्रष्ट झालेली राज्यलक्ष्मीच आहे किंवा ढगांनी व्याप्त अशी चंद्राची प्रभाच आहे किंवा अभ्यास सुटून गेल्यामुळें मलिन झालेली विद्याच आहे अशी ती दिसत होती.

पट्टराणी मनोरमेला अशा स्थितींत पाहून शत्रुजिताला एकदम अत्यंत खेद झाला. तो आपल्या मनांत विचार करूं लागला:—मी परांगनांस सर्वदा विमुख आहे तरी माझ्याविषयीं अशासंबंधें तिला कांहीं संशय आला असेल ? तिचा मान राखण्यांत माझ्याकडून कांहीं हयगय झाली असेल ? तिच्या माहेराहून कांहीं खेदकारक वर्तमान आलें असेल ? कोणी भविष्यवाद्यानें कांहीं खराब भविष्य सांगीतलें असेल ? एखादा ग्रंथ वाचल्यानें हिच्या मनांत संसारसंबंधी सुखांच्या अनित्यत्वाचे विचार आले असावेत ? कोणी विश्वासु परिजनानें कांहीं न करण्यासारखें काम केलें असेल ? ती माझ्या प्रीतिचें पात्र आहे; तिचा कोणी अपराध तर केला नसेल ? किंवा कांहीं व्याधीचें लक्षण तर नजरेस आलें नसेल ? अथवा कोणी प्रथम आशा दाखवून नंतर त्याप्रमाणें आपलें वचन तर मोडलें नसेल ? किंवा मनांत आणलेली कांहीं एखादी गोष्ट सिद्धीस जाईल न जाईल अशी शंका तर आली नसेल ? किंवा जी चिंता माझ्या चित्ताला हंमेश जाळीत आहे त्याच चिंतेनें तिचेंही मन घेरलें तर नसेल ?

याप्रमाणें अनेक तर्कवितर्कामुळें चिंताग्रस्त झालेल्या राजानें मनोरमेला त्याच पलंगावर बसवून व आपणही तिच्या शेजारीं बसून रुमालानें तिच्या नेत्रकमलांवरील, गालांवरील आणि कुचकलशावरील अश्रुबिंदूंस पुसून काढीत काढीत, एकीकडे विचारिलें:—" सुंदरि ! प्राणप्रिये ! तुझ्या पवित्र व कोमल अंतःकरणांत चिंतारूपी चांडाळणीनें प्रवेश करण्यासाठीं काय कारण पाहिलें बरें ? लाडके ! तुझ्या पापण्यांशीं आलेले हे आ-

सर्वांचे बिंदु वाटोळे अनग्र असूनही माझ्या हृदयाला घरे पाडीत आहेत. माझें हृदय सुधीर असूनही तुझ्या चिंतेचें कारण ऐकण्यास अधीर झालें आहे. माझ्या हृदयामध्यें अखंड राहणारी तुझी मूर्ति या उष्ण निःश्वासामुळें माझ्या शरीरास संतप्त करीत आहे हें मनांत आणून तरी त्वां हे निःश्वास बंद करावे हें योग्य आहे. सगळे मनोरथ पूर्ण करणारा मी सिद्ध असतां, एखादा तुझा मनोरथ अपूर्ण राहील अशी शंकाही तुझे मनांत न यावी. असें समजून माझें मन दुसऱ्या असंभाव्य कल्पनांकडे धाव घेतें. ज्या ज्या असंभाव्य कल्पना माझ्या मनांत उत्पन्न होतात त्या जर तुला सांगितल्या तर तूंच मला उन्मत्त समजशील. या अधीर सेवकानें तुझा नकळत कांहीं अपराध केला आहे काय? पण स्वप्नांतही अशी गोष्ट घडण्याचा संभव नाहीं ही माझी खात्री आहे. कोणी दासींनीं तर माझ्याविषयीं कांहीं भलता संशय तुझ्या मनांत भरवून दिला नसेल? पण छे, तुझ्यापाशीं इतक्या नीच स्वभावाची दासी कोणीही नाहीं असें मला वाटतें. तुझी अशी खिन्न मूर्ति मीं कधीं पाहिली नव्हती. यास्तव मला वाटतें मी स्वप्न तर पाहात नाहीं? पण छे, मी चांगला जागा आहें. तर काय मग तुझ्या माहेराकडून कांहीं खराब वर्तमान आलें आहे? पण हेंही शक्य नाहीं; तुझ्या माहेराकडून आलेलीं पत्रें प्रथम माझे हातीं यावीं आणि मग त्वां वाचावीं अशी तुझी रीत आहे. राज्यकार्यांतली एखादी गोष्ट मनांत धरलीस आणि ती तशी घडली नाहीं असें झालें काय? अरेरे! हा प्रश्न केवळ व्यर्थ आहे. कारण राज्यप्रकरणांत हात घालण्याची तुझी रीतच नाहीं. तर मग काय, दैवयोगानेंच पूर्ण झाली तर व्हावी अशी जी माझ्या मनांतली आशा तिनें तुझ्याही मनाला ग्रासलें कीं काय? बोल. बोल. सुंदरि! आतां तुझ्या चिंतेचें कारण जें असेल तें सांग. पुष्पांच्या किंवा अंगलेपाच्या भारानें तर काय, पण त्याच्या स्मरणानें सुद्धां श्रमून जाणारें तुझें हृदय चिंतेच्या

दुर्धर भाराचें सहन करण्याला कसें समर्थ होईल? प्रियजनापाशीं निवेदन केल्यानें चिंतेचा बोजा कांहीं विभागला जातो, ह्मणून तुझ्या दुःखांत मला विभागी कर. चिंतेचा परिणाम किती दुर्धर आहे पहा, चिंता मनुष्याचा वर्ण बदलून टाकते, बुद्धीला भ्रमिष्ट करून टाकते, धैर्याला शिथिल करून टाकते, उत्साहाला नाहींसा करते, शंकांस उत्तेजन देते, विद्येला दुर्बळ करून टाकते, शोकाला पेटवून मदत देते, मोहाला साहाय्य करते, उद्योगाला आडवी येते, रोगांस आमंत्रण देऊन बोलावते, संशयांस प्रिय मानावयास लाविते, आणि इतकेंही करून कोणीं उपदेश केला तरी त्या उपदेशाला देशांतराला पाठविते. प्रिये! तूं एक शब्दही बोलत नाहींस, यास्तव तुझें मुकें रुदन माझ्या मनाला भेदून त्याचे तुकडे तुकडे करून टाकीत आहे, त्यावरून, प्राचीन तत्वज्ञात्यांनीं मन सूक्ष्म आणि निराकार आहे ह्मणून लिहिलें आहे तें खोटें असें वाटूं लागतें. रोगाच्या ज्या निदानाची वैद्यास माहिती नसेल ती त्यास सांगण्यांत लज्जा धरल्यानें रोग्यास नुकसान पोंचतें, ही गोष्ट लक्षांत आणून मजपासून तुझ्या चिंतेचें कारण त्वां गुपित ठेवूं नये. मी तुझ्या अंतःकरणमयच आहें असें तूं मानतेस हें मला ठाऊक आहे. यास्तव ज्या गोष्टीचा विचार तूं आपल्या अंतःकरणापाशीं करतेस त्या गोष्टींचाच विचार तूं माझ्याशीं कर. लाडके! तुझा प्रिय अनुयायी जन अगदीं घाबरून गेला आहे. यासाठीं मौनव्रत सोडून दे. माझ्या व्यग्र चित्ताला शांत कर. तुझे निःश्वास जसे तुझ्या कंचुकीस कंपवीत आहेत तसे ते माझ्या मनालाही कंपवीत आहेत.

राजाचें असें भाषण ऐकून राणी मनोरमेला दुप्पट संकोच उत्पन्न झाला. मग मोठा निःश्वास टाकून खालच्या नजरेनें व मंदमंद स्वरानें ती या प्रमाणें बोलूं लागलीः—आर्यपुत्र! माझ्याप्रमाणें आपणही चिंतातुर होतां, या योगानें व्रणांत क्षार टाकल्याप्रमाणें मला वाटूं लागतें. मी

आपली दासी आहें. मी चिंता वाहिल्यानें कोणाचेंही नुकसान होण्याचा संभव नाहीं. पण कोणत्याही कारणानें आपण जर व्यग्रचित्त झालां तर प्रजेचें नुकसान होण्याचा संभव आहे. जर राजाचें मन ठिकाणावर नाहीं तर प्रजापालनाचें कार्य बरोबर कसें व्हावें? आणि प्रजापालन बरोबर न झाल्यानें राज्यांत अधर्माचा प्रवेश होईल, अधर्मप्रवेशानें लोक निरंकुश होऊन परदार व परद्रव्य वगैरेचें हरण करतील आणि असें झाल्यावर मग जें होईल तें बोलून दाखविल्याशिवायही सहज समजण्यासारखें आहे. आजपर्यंत आपणास एकट्यालाच सर्व राज्यकारभार वाहण्याचे परिश्रम करावे लागत आहेत व चिंता वहावी लागत आहे. पण त्या परिश्रमांत व चिंतेंत विभागी होणाराची प्राप्ति जी माझ्यापासून आपल्यास व्हावयाची ती दुर्दैवानें होऊं शकली नाहीं हेंच माझ्या चिंतेचें कारण आहे; दुसरें काय? 'रतिपुत्रफला दारा:' रति आणि पुत्र यांची प्राप्ति हाच स्त्रियांचा उपयोग आहे. या धर्मशास्त्राच्या वचनाप्रमाणें माझ्याकडून आपल्यास जीं दोन फळें मिळावयाचीं त्यापैकीं एकाचा लाभ आपण अंगीकृत करीत असलां तरी दुसरा लाभ देण्या इतकें भाग्य माझें नशिबीं नाहीं याचाच मला खेद होत आहे. संपूर्ण लाभ होऊन जन्माचें साफल्य पावण्या इतकें माझें दैव कोठें आहे?"

"**प्राण**प्रिये! जी वस्तु दैवाधीन आहे तिच्यासाठीं शोक करीत बसल्यानें काय फायदा? दैव ज्या स्थितींत ठेवील तींत समाधान मानून मुकाट्यानें राहण्यावाचून मनुष्याला दुसरा काय उपाय आहे? पूर्व जन्मीं पुण्याईंत कांहीं उणेपणा असेल ह्मणूनच सर्व सुखें प्राप्त झालीं असूनही पुत्रमुखदर्शनाचें सुख मिळालें नाहीं. दैवाची गति फळ मिळाल्याच्या पूर्वी समजत नाहीं. ह्मणून निराश होऊन मनाला रिकामे क्लेश देणें वाजवी नाहीं. मनुष्याच्या जीवनाचीं साधनें आशा आणि सहिष्णुत्व हीं होत. दैव एवढें निष्ठुर आहे कीं मनुष्य कितीही संताप करो

तरी ठरलेला समय येईल त्याच वेळीं तें फळ देतें; इतर वेळीं कोणताही उपाय चालत नाहीं. दैव अनुकूळ होईल तेव्हा ब्रह्मांडाच्या कोनाकोपऱ्यांतून आणि शून्याकार आकाशांतून सुद्धां अभिमत पदार्थांची घटना तें करवितें. सुख, दुःख, हानि, लाभ, जीवित किंवा मरण जें कांहीं घडतें तें सर्व दैवयोगानेंच घडून येतें. जें काम अनेक यत्न केल्यानेंही होत नाहीं तें दैव अनुकूल असल्यावर आपोआपच होतें. तथापि यत्न करण्यांत कसूर करणें बुद्धिमान मनुष्याचें काम नाहीं. पुत्रप्राप्तिसाठीं शास्त्राज्ञेप्रमाणें जो यत्न करणें मनुष्याच्या स्वाधीन आहे तो त्यानें करावा हेंच योग्य. देवब्राह्मणांची भक्ति करावी, सत्पात्र अतिथींची सेवा करावी, व्रतादिकांचा तत्परतेनें आदर करावा, श्री विश्वेश्वराची, जगदंबेची, व भागीरथीची महापूजा बांधावी, आणि तन, मन, धन व कर्म अर्पण करून परोपकारीं सर्वदा रत राहावें, याप्रमाणें वागलें असतां शुभफळाचा प्रतिबंध करणाऱ्या पापाचें निवारण पुण्यानेंच होतें. जेथें फार दिवस अंधकाराशिवाय कांहींच नांदत नव्हतें तेथें कधीं प्रकाशही पडेल अशी आशा धरणें गैरवाजवी नाहीं. यास्तव निराश होणें योग्य नाहीं. मी सुद्धां तुझ्या सख्यांच्या तोंडांतून 'मनोरमा शरीरानें कृश झाली आहे, उदरानें गुरु झालेली दिसते, पथ्य जेवीत असूनही ओकत असते, तोंडांतून वारंवार चूळ येतात, अन्नादिकावर अरुचि उत्पन्न झाली आहे, ढेंकर वारंवार देत असते, ग्लानीनें घेरलेली असते, शरीर रोमांचित असतें, एवढेंच नाहीं तर केव्हां केव्हां मूर्छा सुद्धां येते,' अशीं वाक्यें निघालेलीं माझे केव्हां कांनीं पडतील? अशी चिंता करतां करतां रात्रीच्या रात्री निघून जातात. मंदमंद चालतानां, निरनिराळ्या पदार्थांची इच्छा करतांना, सखीच्या मुखानें इच्छा गेलेला पदार्थ मागवितांना, आणि पायांस सूज आलेली अशी तुला केव्हां पाहीन बरें? तुझे डोहळे पूर्ण करण्याचा दिवस मला कधीं

येईल बरें ? ' तुमच्या घरांत मुलगा झाला ' अशी खबर माझ्या कधीं कानीं पडेल ? अशी खबर सांगण्यास आलेल्या सेवकास, त्याला वाटेल तें इनाम देण्याचा सुयोग केव्हां येईल ? तुझ्या मांडीवर निजलेल्या मुलास खेळवितां खेळवितां आसक्त झालेली तुला केव्हां पाहूं ? दांत आलेले नसून, कारण नसतां हंसरें, रमणीय तोंड, पूर्णिमेच्या चंद्रासारखें मनोहर असें माझ्या केव्हां दृष्टीस पडेल ? राजमंदिरांमध्यें रांगणारा, पायांतील दागदागिण्याच्या आवाजानें विस्मय पावून वारंवार मागें मागें वळून पाहणारा, चहुंकडे रांगत रांगत फिरत असतां दासींनीं ज्यास वारंवार उचलून परत आणिलें आहे, सर्व लोक ज्यास " उदंड आयुष्याचा हो " असें म्हणत आहेत सभागृहांत बसलेले राजेलोक सुद्धां लांब लांब हात करून ज्यास घेत आहेत, आरशांत तसेंच मणिमय भूमिकेंत आपलेंच प्रतिबिंब पाहून त्यास धरण्यास गेला असतां सर्व पाहणारांस हंसविणारा, आणि अनेक जन्माची पुण्याई एकत्र मिळून झालेला जणों हिचा एक पुंजच असा पुत्र माझ्या केव्हां दृष्टीस पडेल ? असे असे मनचे मांडे खातां खातांच सर्व वेळ निघून जातो पण या मनोरथांची सिद्धि केवळ दैवाच्याच हातीं आहे हें उघड आहे. जोंवर मी निपुत्रिक आहें तोंवर सगळें जग मला शून्य वाटत आहे, जीवित व हें सर्व राज्य निष्फळ भासत आहे, आणि भुकेलेल्या मनुष्याप्रमाणें दुसऱ्या कोणत्याही गोष्टींत मन रमत नाहीं. जी गोष्ट हातची नाहीं तेथें काय उपाय ? धैर्य धरून परमेश्वराच्या भक्तींत तत्पर राहावें, दुसरें काय ? धैर्याचें व भक्तीचें फळ फार गोड आहे. "

अशा अनेक रीतींनीं मनोरमेच्या चित्ताचें शांतवन करून व दासीजनांस तिचा चांगला सांभाळ करण्यास ताकीद देऊन, शत्रुजित् राजा अंतःपुरांतून सभेमध्यें गेला आणि पूर्वींहूनही जास्त भक्तीनें देवपूजनाची वगैरे व्यवस्था त्यानें केली.

---

# प्रकरण २ रें.

## आशेचे अंकुर.

शोकाचा वेग मंद पडल्यामुळें आणि आशेचें बंधन अझून तुटलें नसल्यामुळें, जिच्या मनाला थोडा धीर प्राप्त झाला आहे अशी मनोरमा, पुत्रप्राप्तीच्या उत्कंठेनें, त्या दिवसापासून धर्मशास्त्राच्या पद्धतीस अनुसरून, देव, ब्राह्मण, अतिथि आणि गुरु यांच्या पूजनांत तत्पर राहूं लागली. स्त्रीजातीच्या रीतीप्रमाणें पुत्रेच्छेच्या स्वाधीन होऊन मंत्र, तंत्र, यंत्र, दोरा, टांक वगैरे अज्ञ लोकांच्या अडाणी पद्धतीचाही ती गुण घेऊन पाहूं लागली. आशारूप प्रबळ पिशाचिकेनें लक्ष्मीचा पति जो भगवान् श्रीविष्णु त्यासही वामन बनवून बलीच्या घरीं भीक मागावयास पाठविलें; मग त्याच पिशाचिकेनें साधारण मनुष्यास अनेक क्षुद्र चाळे करावयास लावावें यांत काय नवल ? जोशी ग्रहगतीचें शुभाशुभ फळ सांगूं लागले, ह्यातार्‍या ह्यातार्‍या बाया तोडगे सांगूं लागल्या, मांत्रिक लोक निरनिराळे प्रयोग करण्यास सांगूं लागले, वैदिक लोक दानें करण्यास सांगूं लागले, वैद्य औषधोपाय सुचवूं लागले, सामुद्रिक जाणणारे हातापायावरील रेखा पाहून शुभाशुभ कथन करूं लागले, मूर्तिपूजक नवस वगैरे करण्यास सांगूं लागले, नेत्रस्फुरण वगैरे जाणणारे त्यांचीं लक्षणें पाहून फळें ऐकावीं ह्मणून विनवूं लागले, पक्ष्यांच्या वगैरे उडण्या ओरडण्यावरून शकुनाचें काय फळ मिळावें तें सांगूं लागले, अनुभविक सुईणी त्यांच्या त्यांच्या माहितीचे उपचार करून पाहावे ह्मणून विनवूं लागल्या, जती लोक ताईत बांधूं लागले आणि दासींची अशा प्रकारच्या लोकांच्या खबरा आणण्यानें त्यांचें बरेंच फावूं लागलें. या प्रमाणें राजवाड्यांत अनेकांच्या मतांप्रमाणें अनेक उपाय चालू झाले,

शतचंडी, सहस्रचंडी, लघुरुद्र, महारुद्र इत्यादिकांचीं पुरश्चरणें सुरू झालीं. नागबलि वगैरे कित्येक बलि काढण्यांत आले. ज्यांच्या फलश्रुतींत पुत्रप्राप्ति होण्याविषयीं सांगितलें आहे अशा कित्येक लहान मोठ्या पुराणकथा ऐकविण्यांत आल्या. अमुक प्रदेशापर्यंत गेलें असतां जी स्वाभाविक लोकवाणी ऐकूं येते ती भविष्यसूचक असते असें समजून दासी निरनिराळ्या प्रदेशांत फिरूं लागल्या. हजारों ब्राह्मणांस व संन्यासीयांस जेवूं घातलें. शहरांतल्या मुलांस वारंवार बोलावून त्यांस त्या त्या ऋतूंत होणारीं फलादिक वाटण्यांत आलीं. बेदाणा, खडीसाखर, जेष्ठमध, खपाट, वडाच्या पारंबीचे कोमळ अग्रभाग व नागकेशर हीं मधांत, दुधांत, तसेंच तुपांत वाटून प्यावयास दिलीं. ऋतुस्नात झाल्यावर अस्कंदाच्या काढ्यांत दूध घालून उकळविल्यावर त्यांत तूप घालून पिण्यास दिलें. पुष्यनक्षत्रांत पांढऱ्या भुईरिंगणीचें मूळ, कुंवार मुलीच्या हातानें दुधांत वाटून, पिण्यास दिलें. पिंवळ्या फुलांच्या कांटे शेराचें मूळ, धावणीचें मूळ, वडाच्या पारंबीचे कोमळ अग्रभाग, आणि काळें कमळ हीं दुधांत वाटून पिण्यास दिलीं. जिरें आणि पांढऱ्या फुलाचा शरपुंखा यासहित पारस पिंपळाचीं बोंडें वाटून पिण्यास दिलीं. चारी वेदांचें पारायण करविलें. पिंपळाभोंवतीं प्रदक्षिणा घालविल्या. तुळस, पिंपळ वगैरेंच्या तळाशीं काळ्या मडक्यांतून पाणी घालविलें. पितरांच्या बाधा घेण्यांत आल्या. शनवार आणि मंगळवार वगैरेचीं एकासनें करविलीं. स्वप्नांची हकीगत सांगून त्यांचीं फळें काय तीं विचारून आणविलीं.

तृष्णा ही लोकांच्या समाधानकारक भाषणांनीं प्रफुल्लित व्हावी हें साहजिकच आहे. तृष्णारूपी वावटळीच्या सपाट्यांत सापडून, मनुष्याचें चित्त हेंच कोणी जून तृण, तें वाटोळें वाटोळें भ्रमण करूं लागतें यांत नवल काय? ही महा वावटळ एवढी बळवान आहे कीं ती पुरुषाच्या ताठ मनालाही भ्रमविते, नाचविते, कोठच्या कोठें दूर दूर घेऊन नेऊन टाकते,

अगदीं कंगाल करून टाकते, सर्व विवेक नाहींसा करून टाकते, रिकामी धावाधाव करण्यास लाविते, अनेक इंद्रजालिक देखावे दाखविते, हजार रिकाम्या उठाठेवी करण्यास लावते, आणि वृद्धालाही तृणा सारखें करून सोडते; अशी स्थिति ज्यापेक्षां पुरुषांची, त्यापेक्षां बायकांचें मन याहूनही विकारवश झालें तर त्यांत नवल कसलें ?

याप्रमाणें कांहीं काळ गेल्यावर आशेचें साफल्य होणार अशीं चिन्हें मनोरमेच्या शरीरांत दिसूं लागलीं. अत्यंत काळीं ज्यांचीं अग्रें आहेत व जे पुष्ट झाले आहेत असे तिचे स्तन, नीलमण्याचे लहान लहान बुच आहेत अशा सुवर्णकलशांप्रमाणें शोभूं लागले. रोमराजि, शरीराशीं हमेश निकट संबंध असल्या कारणानें, सर्वांच्या अगोदर गर्भ लक्षण जाणूनच कीं काय, अभिनंदन करण्यासाठींच उत्सुक होऊन, उभी राहूं लागली. डोळ्यांच्या पापण्या, भावी आनंदाच्या भरांतच विचारमग्न झाल्याप्रमाणें अधिकाधि मिटूं लागल्या. गर्भरूप चंद्राच्या अमृताचा पूर शरीरांत न सामावल्यामुळें जणों बाहेर उंचबळतच आहे ह्मणून तोंडांतून पाण्याचे चूळ येऊं लागले. उदर तर, आपण पुत्ररत्नाचें निधान आहों अशा घमेंडीनेंच काय, मानानें गौरवयुक्त दिसूं लागलें. तोंडांत चावून उच्छिष्ट झालेला आहार आंत उतरला असतां, गर्भाला स्पर्श होईल या धास्तीनें, तसाच्या तसाच परत फिरूं लागला. चालण्याची ढब तर मूळची मंद होती, ती विशेषच मंद झाली. नाकाला सुगंधानेंही त्रास वाटूं लागला. व एकंदरीनें सर्व शरीरांत ग्लानीनें प्रवेश केलेला दिसूं लगला.

महाराणीच्या शरीरांत अशीं शुभ चिन्हें उद्भवलेलीं पाहून सगळ्या परिचारिका जणों अमृताच्या प्रवाहांत निमग्न होऊन गेल्या. आपणास भूमंडळाचें राज्य प्राप्त झालें, किंवा ब्रह्मलोकचें वैभव लाधलें असें त्यांस वाटूं लागून ब्रह्मानंदाहून्ही विशेष अशा हर्षामध्यें त्या गढून गेल्या.

कोणासही न समजे अशा रीतीनें जोशाकडून एक चांगलासा दिवस व शुभमुहूर्त पाहून, राजघराण्यांतल्या रीतिभाती पूर्ण जाणणारी व राजाबरोबर भाषण करण्याचा जिला परिचय आहे अशी एक हुशार मालती नामें दासी अभिनंदन करण्यासाठीं मोठ्या सकाळींच राजाकडे गेली. ते वेळीं शत्रुजित् राजा स्फटिकमय शिवलिंगाची पूजा करीत होता. वैदिक ब्राह्मण वेदमंत्रांचा सारखा घोष करीत होते. अगरु धूपाच्या सुगंधि धुरानें तो सर्व प्रदेश भरून गेला असून सर्वांच्या नासिकारंध्रास तृप्त करीत होता. गुलाब, जाई, जुई, मालती, चाफा, नागचाफा, इत्यादि सुगंधि पुष्पें, आपल्या सुगंधानें, जणों नासिकेच्या द्वारा प्रवेश करून हृदयाचें आकर्षण करीत आहेत असें वाटत होतें. शुद्धसत्वप्रधान बनलेलीं तेथल्या सर्वजनांचीं हृदयें, जणों शुभ्र पुष्पाचें रूप धरून शिवलिंगावर लटकलीं आहेत काय असें वाटत होतें. सगळ्या ब्रह्मांडाचा शुद्ध सत्वगुण एक ठिकाणीं पिंडीभूत होऊनच, जणों, या स्फाटिकमय शिवलिंगाच्या रूपानें राहिलें काय अशा रीतीनें तें शोभत होतें. आजूबाजूस बसलेल्या मांडलीक राजांस पाहून, हे शिवभक्तीच्या अवलोकनाचा आनंद अनुभवण्यासाठीं, जणों, इंद्रादिक दिक्पालच आले आहेत काय असे शोभत होते. मंत्रघोष करणारे ब्राह्मण, जणों, ब्रह्मलोकांहूनही अधिक वैभवाचा अनुभव घेण्यासाठीं ब्रह्मलोकास सोडून, भृगु, मरीचि, अत्रि आदीकरून मुनिजनच राजाच्या पूजागृहामध्यें येऊन बसले कीं काय असें भासत होतें. घृतमय दिव्याच्या ज्योतीही सदाशिवाचें ध्यान धरून, जणों, प्राणायाम करीत आहेत अशा रीतीनें निश्चळ उभ्या जळत होत्या. स्फटिकमय शिवलिंगांत सभोंतालच्या सर्व लोकांचीं प्रतिबिंबें स्पष्ट उमटलीं असल्यामुळें, तें, सर्व सकल जीवसृष्टीच्या विराट स्वरूपाचें, जणों, दर्शनच घडवीत आहे काय असें वाटत होतें. दिव्याच्या प्रभेनें अधिकच चमकणारीं राजांचीं रत्नमणिमय आभरणें, जणों, शिवदर्शनाच्या प्रभावानेंच

अचेतनभाव सोडून देऊन, चेतना धारण करून, सजीव झालीं आहेत काय असें क्षणभर वाटत होतें. स्फटिक लिंगाच्या शुभ्रप्रभेनें तसेंच शत्रुजित्राजानें सर्वांगलिप्त भस्मोद्धूलनाच्या धवल तेजानें तें पूजागृह भरून टाकल्यामुळें, तें चंद्रिकामय आहे, सत्वगुणमय आहे, कीर्तिमय आहे, धर्ममय आहे, रजत तेजोमय आहे, कैलासमय आहे, शांतरसमय आहे, भागीरथीतमय आहे, क्षीरसागरमय आहे किंवा अमृतफेनमय आहे असे अनेक कल्पनातरंग मनांत उठत होते. वरणभात, अनेक प्रकारच्या भाज्या, कोशिंबिरी, पंचामृतें, लोणचीं, भजीं, अमटी, लाडू, खिरी, पोळ्या, मालपुवा, जिलबी, घीवर, श्रीखंड, शिरा, पुऱ्या, तशींच जातीजातींचीं फळें, आंबे, केळीं, जंबू, पपनस, डाळिंब, साखर लिंबू, संत्रीं, नारिंगें, अंजीर, द्राक्षें, बदाम, पिस्ते, आक्रोडाचें बीज, इत्यादि उत्तमोत्तम पदार्थांनीं युक्त असा महानैवेद्य, समीप सिद्ध करून ठेविला होता, तो सर्वांची दृष्टि आपल्या रसाळ तेजानें व सुगंधयुक्त घमघमाटानें आकर्षण करून घेण्यानें लगामीचें काम बजावीत होता. शत्रुजित्राजाच्या ललाटीं भस्माचा जो त्रिपुंड्र लाविला होता, त्याच्या तीन रेखा ह्या, लक्ष्मी, सरस्वती, व कीर्ति अशा तिघींचा योग त्यास प्राप्त होईल अशा भाग्याक्षरांच्या ओळीच प्रत्यक्ष विधात्यानें लिहिल्या आहेत काय असें दिसत होतें. राजानें अनेक रुद्राक्ष धारण केले होते त्याजवरून, आपल्या शरीरांत सामावलेल्या अनेक ब्रह्मांडगोलकांसहित भक्तजनांस दर्शन देणाऱ्या शंकराप्रमाणें तो शोभत होता. अगोदर त्याच्या शरीराचा बांधा उंच व वर्ण गौर, तशांत आणखी धवल भस्मविलेपनानें भर घातल्यामुळें तो, जणों, ऐरावत असावा, हिमालय असावा, शरदृतूंतील अभ्रांचा पुंज असावा, किंवा काशीची शोभा पाहण्याच्या मनःप्रेरणेनें चंद्रलोकच पृथ्वीवर उतरला असावा अशी त्याची कांति तेजःपुंज चमकत होती. मंत्रोच्चार करतेवेळीं शत्रुजित राजाचे मुखांतून बाहेर पडणारा शुभ्र दंतपक्तींचा किरणसमुदाय, त्याच्या जिव्हाग्रीं विलासस्थान करूच राहि-

लेल्या सरस्वतीच्या मंदस्मिताची भ्रांति उत्पन्न करीत होता. प्रभातकाळीं कमळवनाला प्रफुल्लित करून व त्यांतील ताजा सुगंध लुटून घेऊन, मंद शीतल वायु सर्वांस आल्हाद देत होता; त्यावरून तो जणों असेंच जाणवीत होता कीं फुलांचा भार न पडतां त्यांचा सुगंध मात्र मिळावा अशी आपली इच्छा आहे; तसेंच प्रत्यक्ष देवापेक्षांही त्याचे भक्त आपल्यास अधिक मान्य आहेत असेंही अनुमान होण्यासारखें होतें. तमानें भक्तजनांच्या हृदयप्रदेशाचा तसाच सर्व दिक्प्रांताचा ठाव एकदम सोडून देऊन, दूर प्रयाण केलें. पिंजऱ्यांत पाळलेले पोपट सुद्धां, पवित्र मंत्रोच्चारांचें अनुकरण करून शिवभक्तिचें पुण्य संपादन करीत होते. प्रातःकाळच्या मंद वायूनें कंपित होणाऱ्या फुलांच्या पाकळ्या, जणों स्वतः शिवाराधनार्थ नृत्य करीत आहेत असें वाटत होतें. पूजागृह, अनेक जातींचीं फुलें, मंजरी आणि कोमल पल्लव यांनीं सुशोभित केलें होतें. त्यामुळें तें केवळ वसंतसमयमय बनलें आहे असा भास होत होता. शत्रुजित्राजाचा धर्म श्रद्धेनें शोभत होता, श्रद्धा उदारतेनें, उदारता लक्ष्मीनें, आणि लक्ष्मी नीतीनें शोभत होती. किंवा असेंही ह्मणावयास चिंता नाहीं कीं शत्रुजित् श्रद्धेनें शोभत होता व श्रद्धा शत्रुजितानें शोभत होती.

शिवध्यानरूप परमानंदीं लय लागल्यामुळें शत्रुजितराजाच्या लक्षांत मालती आल्याचें आलें नाहीं. दुसरे कोणीं कळवावें तर ध्यानभंग होईल या भीतीनें तेही कोणी बोलले नाहींत, व त्याच कारणास्तव मालती ही न बोलतां उभीच राहिली. पण त्याच वेळीं राजाचा उजवा पाय, उजवा बाहू व उजवा डोळा हे स्फुरण पावले, त्यावरून कांहीं अपूर्व अभ्युदयाची ही सूचना आहे असें कळून त्यांनीं त्यास डोळे उघडण्यास लाविलें हे त्यांचे मालतीवर मोठे उपकारच झाले ह्मणावयाचे. राजानें डोळे उघडून पाहिलें तों सर्व अंग हर्षानें रोमांचित झालेली, आणि मंद-

स्मित केल्यामुळें विकसितमुखी अशा मालतीस पाहून, ही जणों अमृताचा वर्षाव करण्यासाठीं उद्युक्त झालेली मेघमालाच आहे, किंवा अलभ्य लाभ देण्यासाठीं कल्पवृक्षाची लताच आहे, किंवा दीर्घकाळ प्राप्त झालेला शोकसंताप दूर करण्यासाठीं आलेली ही शिवकृपाच आहे, किंवा पितरांच्या ऋणांतून मुक्त करण्यासाठीं ही मूर्तिमान पितृभक्तिच आहे, दीर्घकाळ अवलंबिलेली धैर्यवृत्तिच फळ देण्यासाठीं देहरूपानें आली काय, भक्तीचें फळ देणारी ही श्रद्धाच आहे काय, प्रजापालनानें मिळालेला आशीर्वाद सफळ करण्यासाठी ही नीतिच आली काय, किंवा चिंता सचिंत करून घालवून देण्यासाठीं ही चिंतामणीची चमकच आहे काय असेंच क्षणैक तो मानूं लागला. शिवपूजेच्या वेळीं तेथें येण्यास स्त्रियांस सक्त प्रतिबंधच होता, त्यामुळें मालतीच्या येण्यानें, आणि नेत्रस्फुरणादि अननुभूतपूर्व चमत्कार अगोदर कळून आल्यानें, जरी राजाच्या मनांत मनोरथ सफल होण्याची खुणगांठ प्रथमच बांधून चुकली, तरी अशा प्रसंगीं मन फार उतावीळ व्हावयाचेंच हा जो स्वभावसिद्ध नियम त्यास अनुसरून मोठ्या घाईनेंच, फक्त तिच्या मुखावाटे आपली अटकळ पुनरुक्त करून घेण्याच्या इच्छेनें, त्यानें विचारलें कीं "मालति ! या वेळच्या तुझ्या येण्यानें माझें मन कांहीं नवीनच कल्पनाप्रदेशांत शिरूं पाहतें. मंदहास्यानें प्रफुल्लित झालेले तुझे गाल या कल्पनेला उत्तेजन देतात. तूं जें मंगलसूचक वस्त्र परिधान केलें आहेस तें माझ्या मनांत मनोरमेसंबंधी विचार आणितें. तर खरी हकीकत सांग. मनोरमेचा मनोरथरूपी वृक्ष सुफलित होऊन मला राज्याचा भार वल्हाण्यांत कांहीं मदत होईल असें लक्षण तुमच्या दृष्टीस पडतें काय ?"

राजाच्या प्रश्नानें, हृदयांत सांठलेल्या आनंदाच्या पुराला, दांत व स्मित यांच्या शुभ्र किरणांच्या मिषानें, जणूं बाहेर लोटीत आहे अशी मालती, दुसरें कोणास न ऐकूं जाईल अशा रीतीनें, आपलें तोंड राजाच्या

कानासमीप नेऊन, हलके स्वरानें येणें प्रमाणें बोलली:—" महाराज ! आमच्या मातु:श्रीस कांहीं दिवस गेल्याचीं लक्षणें दिसतात. आपल्या व आमच्या मातु:श्रीच्या धिराचें आणि देवब्राह्मणांच्या आशीर्वादाचें फळ मिळण्याचा शुभयोग प्राप्त झाला आहे. आह्माला आज बरेच दिवस संशय होता, पण पुरता निश्चय झाल्याच्या अगोदर आपल्यापाशीं सांगणें प्रशस्त नाहीं ह्मणून कांहीं कळविलें नाहीं या बद्दल क्षमा असावी.

मालतीच्या भाषणानें राजा, जणूं अमृतांत न्हाला कीं काय असें होऊन, रोमांचित झाला. जसें कांहीं रसायन लागू पडलें अशा रीतीनें त्याच्या सर्व शरीरावर प्रफुल्लितपणा उमटला. चिंतारूपी शल्य निघून गेलें खरें, तरी त्याचें हृदय स्वस्थ न होतां आनंदभरानें व्यग्र होऊन गेलें, आणि आशा सफळ झाल्यामुळें देवब्राह्मणांच्या पूजनाविषयीं त्याची श्रद्धा अधिकच वाढली. स्वत: जीं जीं धर्मकृत्यें व नित्यकृत्यें आचरलीं होतीं त्यांची आठवण होऊन, त्यांच्या सामर्थ्याविषयीं खात्री झाली. ' धिराचें फळ फार गोड' ही गोष्ट स्वानुभवावरून शाबीत झाल्यानें, त्याच्या प्रौढ विचारांवर गंभीर आस्थेची दाट छाया पसरली. आनंदोदय गुप्त राखण्याचा यत्न राजानें पुष्कळ केला तरी तो सिद्धीस न जातां, त्याचीं चिन्हें शरीराच्या प्रत्येक अवयवावर स्पष्ट दिसूं लागलीं. हर्षाचा पूर हृदयांत न मावल्यामुळें अश्रुरूपानें बाहेर प्रगट होऊं लागला. शिवपूजनाचे जे जे विधि अवशिष्ट राहिले, त्यांचा घोटाळा उडून, एकाचा भाग दुसऱ्यांत, ह्याचा त्यांत व त्याचा ह्यांत असे होऊन गेले. मालती निघून गेल्यावर मागून, मालतीला ही गोष्ट विचारली असती तर बरें झालें असतें व ती गोष्ट सांगून ठेवली असती तर बरें होतें असे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. पूजासमाप्तीच्या वेळीं पुष्पांजलि समर्पण करतानां आज महारुद्राची राजानें अगदीं मनापासून प्रार्थना केली. पूजासमयीं डोळा लवला असतां त्याचें फळ तावडतोब मिळतें असा दृढ विश्वास उत्पन्न झाला.

वेदमंत्र ह्मणणाऱ्या ब्राह्मणांचा व इतर आलेल्या याचकसमुदायाचा राजानें आज जास्तच आदरानें सत्कार केला. या सर्व प्रकारावरून तेथें बसलेल्या चतुरस्त्र लोकांनीं, मालती व राजा यांच्या दरम्यान हंसत हंसत काय रहस्याचें भाषण झालें त्याचें सार बहुतेक जाणलेंच.

नित्याच्या नियमाप्रमाणें सर्व विधि आटोपल्यावर आलेल्या सर्व लोकांस घरोघर जाण्यास आज्ञा देऊन, राजानें मुख्य मंत्र्यास बोलावून आणण्यासाठीं, खासगीकडील एका विश्वासू नोकरास घोड्यावर बसवून, ताबडतोब रवाना केलें.



# प्रकरण ३ रें.

## समागम.

मंत्रिमुख्याला बोलावूं पाठविलेल्या घोडेस्वाराचे मनांतून, " आज राजाच्या मनाला कांहीं अपूर्व व लोकोत्तर आनंद झालेला आहे " असें हळूच त्यास कळवावयाचें होतें. पण तसा प्रसंग आलाच नाहीं. कारण मंत्री मोठा चतुर पुरुष होता, त्याला मालतीची हकीगत पूर्वींच विदित होऊन चुकली होती, एवढेंच नव्हे तर मनोरमा राणीसाहेबांस कांहीं दिवस गेल्याची खबरही थोड्या दिवसांपूर्वींच त्याच्या कानावर आली होती. राजानें सांगितलेला निरोप कळविण्यासाठीं आलेला घोडेस्वार मंत्रिमुख्याच्या वाड्याशीं येऊन ठेपला. मंत्रिमुख्याचा वाडा सुद्धां राजवाड्याप्रमाणेंच, चंद्रमंडळाची, शरद् ऋतूंतील अभ्रसमुदायाची, तशीच कैलासाची स्पर्धा करीत आहे असें वाटण्यासारखें होतें, कारण त्यास अनेक सौधशाळा होत्या व पुनः त्यांचीं शिखरें फार उंच अशा आकाशांत शिरलीं होतीं. विनंति करून आपलीं कामकाजें करून घेण्यासाठीं अनेक राजे रजवाडे मंत्रिमुख्यास भेटण्यास आले होते, त्यांच्या गाड्याघोड्यांची दाराशीं रस्त्यावर एवढी गर्दी झाली होती कीं तेथें जाण्यायेण्याला नीट रस्ताही मिळत नव्हता. वाड्यांत विद्वान ब्राह्मण आणि साधु संन्यासी यांची गर्दी होऊन गेल्यामुळें, तो धर्ममय दिसत होता; राजे रजवाडे आणि मोठमोठे व्यापारी यांच्या गर्दीमुळें अर्थमय दिसत होता; नानारत्नांच्या आभरणांनीं व उत्तमोत्तम वस्त्रप्रावर्णांनीं विजेप्रमाणें चमकणाऱ्या दासींच्या येण्याजाण्यानें काममय दिसत होता; जागोजाग उपनिषदें वगैरे वेदांत ग्रंथांचीं व्याख्यानें चाललीं असल्याकारणानें, मोक्षमय दिसत होता; काळे पोशाक घालून, व नागवीं शस्त्रें हातांत घेऊन, शि-

पाई पाहारे करीत होते, त्यावरून, तो वाडा यमदूतमय भासत होता; निरनिराळ्या दालनांत बैठकी, बिछाने, घड्याळें व इतर शेकडो मौल्यवान वस्तु ठेविल्या होत्या त्यावरून तो कुबेरभवनाप्रमाणें वैभवानें शोभत होता. कित्येक दासी सुवर्ण कलशांनीं पाणी भरीत होत्या; कित्येक केशर वाटीत होत्या व चंदन उगाळीत होत्या; कांहीं जणी फुलांच्या माळा करीत होत्या व कांहीं पंखे, शेले, चोळ्या, लुगडीं यांत तीं गुंफीत होत्या; कांहीं जणी आंगण्यांतील वृक्षांवरील इरसाल फळफळावळ पक्ष्यांनीं खाऊं नये ह्मणून फळांभोंवतीं मोतीलग पिशव्या टांगीत होत्या; दुसऱ्या कित्येक जणी कोकिलास आंब्याचा मोहोर, पोपटास डाळिंबाच्या बिया, आणि चकोरांस पिंपळीचें वीं देत होत्या; कांहीं जणी सोन्या रुप्याचीं भांडीं घासून विसळीत होत्या; कांहीं जणी दागदागिने कुंचलींनीं कुंचलून स्वच्छ करीत होत्या; कांहीं गायनशाळेंत वीणा, सतार, मृदंग इत्यादि वाद्यें साफसूप करून ठेवीत होत्या; कांहीं पलंगावरील अंथरुणाचे पलंगपोस व बैठकी तक्ये वगैरे वरील आस्तरें बदलून नवीं धुतलेलीं घालीत होत्या; कांहीं जणी बगीचांतील झाडांचीं पडलेलीं सुकीं पानें व कचरा जमा करून काढून टाकीत होत्या; कांहीं गाई, म्हशी, व त्यांचें दूधदुभतें यांचा संभाळ घेत होत्या; कांहीं पोपट, मैना वगैरे पाळलेल्या पक्ष्यांस बोलवीत होत्या; कित्येक जणी मोठमोठ्या रुप्याच्या माथण्यांत ताक करीत होत्या. ताक करण्याच्या रवीच्या घुसळण्यानें व घुसळणारींच्या गाण्यानें तेथें कामासाठीं आलेल्या लोकांचीं परस्परांमधील भाषणें परस्परांच्या कानीं पडण्यासही मोठी अडचण पडत होती. शहरांतील, प्रांतांतलि, तसेच खेडे गांवांतील रहिवाशी लोक तेथें एकत्र मिळालेले पाहून तो वाडा ह्मणजे शत्रुजित राजाचें सर्व राज्यच समष्टिरूपानें दृष्टीस पडत आहे असें सहजच मनांत येत असे. कित्येक शिपाई कामासाठीं आलेल्या लोकांस वारंवार आंत घेऊन जात होते. कित्येक

शिपाई बसल्या बसल्या मिशांस पीळ घालीत होते. त्यांनीं फक्कड फेटे बांधले होते तसेच नकशीदार कंबरबंध अडकविले होते, तशीच त्यांची चालचलणूकही वाकड्या तिकड्या अंगविक्षेपानें मोठी ऐटबाज दिसत होती, असे दिमाखदार शिपाई आपल्या अक्कडबाज शिपाईगिरीच्या गोष्टी सांगत व त्यांतच चवदार गप्पांच्या थक्क करून सोडणाऱ्या मसाल्याची यथास्थित रेळचेळ करीत होते. कांहीं ठिकाणीं मृदंग, वीणा वगैरे वाद्यें वाजत होतीं. कित्येक जागीं सोंगट्याचे व कित्येक जागीं बुद्धिबळाचे डाव चालले होते. कांहीं दालनांत चमत्कारिक कारागिरीचे नमुने जमवून ठेविले होते ते पाहण्यांत कांहीं लोक गुंतले होते. एका अंगाला मस्त मेंढे, कोंबडे, बैल वगैरे जनावरांच्या टकरा चालल्या होत्या; एका बाजूस त्या त्या मुलखांतील अजब वस्तूंचा संग्रह करून ठेवलेला कांहीं लोक पाहात होते. पण कांहीं लोक तर आपण ज्या कामासाठीं आलों आहों त्यांच्या चिंतेंत निमग्न झाल्यामुळें डोळे मिटून न बोलतां मुकाट्यानें एके ठिकाणीं बसलेले होते, त्यांवरून त्यांनीं जणों समाधि लाविली आहे काय असें वाटत होतें.

शत्रुजित राजानें पाठविलेल्या घोडेस्वाराच्या पोशाकावरून व इभ्रतीवरून हा कांहीं तरी राजकारण घेऊन आलेला असावा असें जाणून त्यास मार्गांत कोणींही हरकत केली नाहीं. तो तसाच तडक दुसऱ्या चौकांत जाऊन घोड्यावरून उतरून, खासदाराजवळ लगाम देऊन, आंत गेला; तों तेथें एका मोठ्या कोचावर मंत्रिमुख्य बसले होते ते त्याच्या दृष्टीस पडले. मंत्रिमुख्याचें " **मंत्रनिधि** " हें नांव अगदीं अन्वर्थक असून, त्याजला सेवकजन वाळ्याच्या पंख्यानें वारा घालीत होते. आसपास कोचें मांडलीं असून त्यांवर लहान मोठे मांडलिक राजे बसले होते. त्यांपैकीं कांहींकांस दृष्टीनें, कांहींकांस मंद हास्यानें, कांहींकांशीं भाषण करून, व कांहींकांस अशाच कांहीं चेष्टितांनीं मंत्रिमुख्य त्या सर्वांस

मान दिल्यासारखें जो करीत आहे; एकीकडे राजदरबारांत जाण्याच्या तयारींत असून जो पोशाख करीत आहे; गाडीवानास गाडी तयार ठेवण्यास सांगण्यासाठीं जो जवळच्या सेवकास सांगत आहे; त्याचप्रमाणें ज्याच्या भोंवतीं सेवकजन त्याची आज्ञा चिंतामणीच्या लाभाप्रमाणें झेलण्यास सदा सिद्ध आहेत; लोकांच्या आशांस आधारभूत असल्यामुळें केवळ जो विधात्याचा सहोदरच असें जाणवीत आहे; आपल्या मनांतल्या हेतूप्रमाणें पुरते सगळे शब्दही सांगण्यास विनंति करणारास भय वाटावें असा प्रभाव धरणारा, उदारमनाचा, रोजच्या परिचयांतल्या लोकांसही प्रभावातिशयामुळें अपरिचिताप्रमाणें भासणारा, बृहस्पतीप्रमाणें गंभीर विचारशक्ति आहे ज्याची असा, व्यसन कसें असतें हें ज्यास माहित नाहीं असा, लोकांच्या चित्ताची परीक्षा करण्यांत अति निपुण, समुद्राप्रमाणें गंभीर, हिमालयाप्रमाणें धैर्ययुक्त, क्रोधामध्यें साक्षात काळाची बरोबरी करणारा, शुक्राचार्यांप्रमाणें नीतिज्ञ, पृथ्वीप्रमाणें क्षमावान्, व राजा आणि प्रजा या दोघांचें हित करण्यांत तत्पर अशा मंत्रनिधि मंत्र्यास त्यानें पाहिलें. हुजऱ्यास येतांना पाहतांच मंत्रनिधीनें त्याच्या योग्यतेप्रमाणें सत्कार करून बसावयास जवळ जागा घेतली. येण्याचें कारण विचारतां, हुजऱ्यानें हळूच कांनांत सांगितलें कीं, "महाराज आपल्या भेटीची फार इच्छा करितात तर लौकर चलावें. महाराजांच्या मनाला आज कांहीं अपूर्व आनंदानें प्रफुल्लित केलें आहे असें दिसतें."

जरी सर्व प्रकार पूर्वींच त्यास कळलेला होता तरी गांभीर्यानें तसें कांहीं एक न दाखवितां, जणों, ही गोष्ट आपल्यास नवीनच कळली असें दाखवून, ती ऐकून आपल्यासही हर्ष झाला अशीं चिन्हें दर्शवून, सर्व लोकांस जाण्यास आज्ञा देऊन, " बरें आहे " असें ह्मणून, हुजऱ्याचा हात धरून, कोचावरून उठून, त्याच्याच बरोबर बाहेर येऊन, त्यालाही आपल्या बरोबर गाडींत बसवून घेऊन, मंत्रिमुख्याची स्वारी राजवाड्या-

कडे चालू झाली. नेहमीच्या वहिवाटीप्रमाणें कित्येक घोडेस्वार गाडीच्या मागें व पुढें चालत होते. नगरकरी लोक मार्गांत मंत्रनिधीला चाललेला पाहून प्रणाम करूं लागले. तोही, मोठ्या दाक्षिण्यानें, कोणास प्रणामानें, कोणास भाषणानें, कोणास अवलोकनानें, कोणास सस्मित मुखानें किंवा अशा कांहीं तरी क्रियेनें सर्वांस मान दिलासें करीत करीत राजवाड्याशीं येऊन पोंचला.

राजवाडा मोठा शोभिवंत होता, त्याचीं गोपुरें व सौधमंदिरें एवढीं उंच व स्वच्छ होतीं कीं तीं जणों चंद्रमंडळाचें चुंबन करीत आहेत; हिमालयाची बरोबरी करूं पाहात आहेत; ऐरावताला शुभ्रपणाचा व उच्चत्वाचा धडा घालून देण्यास उत्सुक आहेत; किंवा तीं यशाचे समुदाय होत; एकवटलेल्या क्षीरसागराचे फेनराशिच होत; एकेच ठिकाणीं जमून अचळ स्थितीचा आनंद अनुभविण्यासाठीं वरून खालीं उतरलेले शरदृतूंतील अभ्रसमूह होत; राहूग्रासाच्या धास्तीनें शत्रुजित राजाच्या आश्रयार्थ येऊन राहिलेल्या चंद्राच्या करांचे पुंज होत; धवल कमलाचे पर्वत होत; किंवा दिग्गजांच्या दंतसुळ्याच्या तुकड्याचे हे गंज घालून ठेविले आहेत असें वाटत असे. त्या राजवाड्यास मोठमोठे दरवाजे होते तरी कोणाचाही आंत प्रवेश होणें अशक्य होतें; तो सदा आनंदमय होता खरा तरी शत्रूच्या हृदयांत शोक उत्पन्न करीत होता; त्यांत सर्व संग्रह होता तरी पापाचा संग्रह बिलकूल नव्हता; तो विस्तीर्ण होता तरी त्यांत दुष्टास अवकाश नव्हता; तो तेजस्वी होता तरी शांत होता; त्याची बांधणी मोठी सुंदर व नाजुक होती तरी शत्रूच्या हृदयांत धडकी भरविणारा होता; जागोजाग चित्रें काढलीं असल्यामुळें तो चित्रयुक्त असतांही विचित्र दिसत होता; आत्मज्ञात्याप्रमाणें तो परलोकभयानें रहित होता; ब्रह्मदेवाच्या मुखाप्रमाणें सरस्वतीचें निवासस्थान होता; न्यायशास्त्राप्रमाणें गुणाचें विवेचन करणारा होता; व्याकरणशास्त्राप्रमाणें

अनेक धातूंनीं भरपूर भरलेला होता; सांख्यशास्त्राप्रमाणें तत्वनिरीक्षण करणारा होता; योगशास्त्राप्रमाणें दूरदर्शन व दूरश्रवण यांच्या साधनांनीं युक्त होता; सूक्ष्मदर्शकाप्रमाणें सूक्ष्मदर्शनयुक्त होता; महाभारताप्रमाणें राजधर्मानें परिपूर्ण होता; रामायणाप्रमाणें नीतिरीतींनीं संपन्न होता; चंद्रमंडळाप्रमाणें प्रजांवर कोमल कर टाकणारा होता; वर्षाऋतूप्रमाणें लोकांस जीवन देणारा होता; नारायणाच्या वक्षःस्थळाप्रमाणें लक्ष्मीचें विलासनिवासस्थान होता; कल्पवृक्षाप्रमाणें याचकांचे मनोरथ सफळ करणारा होता; शंकराच्या अंगाप्रमाणें विभूतिनें व्याप्त होता; मेरुपर्वताप्रमाणें सुवर्णमय होता; रत्नाकराप्रमाणें असंख्य मौल्यवान रत्नांनीं युक्त होता; जादुगिराप्रमाणें क्षणार्धांत लोकांच्या चित्ताचें आकर्षण करणारा होता; कारंज्यांच्या जलतुषारांनीं व बगीच्यांतील उंच व पल्लवयुक्त निबिड वृक्षांच्या अंधकारानें मेघमंडळाप्रमाणें होता; हत्तींच्या जलमय शुंडादंडांच्या फुत्काराप्रमाणें उडालेले तुषार, घोड्यांचीं खिंकाळणीं आणि पाहरेकऱ्यांच्या नागव्या तरवारीचा चकचकाट, यांच्या योगें, वीज व घनगर्जना यांनीं युक्त अशा वर्षारंभाप्रमाणें होता; उत्तम अलंकार, विषय व्यवस्था, उत्तम रीति, रसपरिपाक, आणि सुवर्णरचना यांनीं सुशोभित असल्यामुळें तो वाडा उत्तम काव्याप्रमाणें आनंद देत होता; जणों, काशींत निवास करण्यासाठीं अंतरिक्षांतून उतरून पृथ्वीवर आलेला इंद्रलोकच होय असा तो वाडा शोभत होता. त्यांत एके अंगाला कामदार लोक मुल्की कागदपत्र वाचीत होते; एके अंगाला न्यायासनावर बसून न्यायाधीश लोकव्यवहारांतील वादांचा न्याय करीत होते; एके अंगाला सेनापति लष्कराची कवाईत करवीत होते; एकीकडे मामलेदार आपल्या कामकाजाचे कागद चाळीत व त्यां संबंधें चौकशी करीत बसले होते; एके बाजूला कमाविसदार राज्याच्या निरनिराळ्या प्रांतांतील वसूलाचे कागद पाहण्यांत व तपासण्यांत गुंतले होते; एकीकडे अंतःपुराकडील कामदार दासीच्या मुखानें

आंतील खबर ऐकत होते व पुढें काय व्यवस्था करावयाची त्याबद्दल हु-कूम देत होते; एकीकडे वैदिक व पंडित वेदशास्त्रांची चर्चा करीत बसले होते; एकीकडे संगीतकला जाणणारे गाण्यांत, व मृदंग आदि वाद्यें वाजविण्यांत पटाईत असे तीं वाजविण्यांत अगदीं गढून गेले होते; एकीकडे पुरोहित लोक याचकांचा सत्कार करण्यांत गुंतले होते; एकीकडे कवि रस, ध्वनि, गुणदोष, अलंकार यांची चर्चा करीत होते; एकीकडे मांडलिक राजे, सभासद वगैरे लोक, राजा व मंत्रिमुख्य यांच्या येण्याची वाट पाहात होते; राजवाड्यांतील सर्व माणसें विनयमय आहेत, मंगलमय आहेत, सदाचारमय आहेत, धर्ममय आहेत व राजभक्तिमय आहेत काय अशीं दिसत होतीं. कामकाज करून घेण्याच्या इच्छेनें हजारो माणसें एकसारखीं तेथें येत जात होतीं, त्यावरून तें स्थान, अपरिमित जीवाचा निर्गम आणि प्रवेश यांचें स्थानकरूप मायामय ईश्वराचें स्वरूपच होय असा तर्क होत होता. तसेंच त्या वाड्यांत सर्व पृथ्वीवरील पदार्थांचा आणि जीवांचा संग्रह, संग्रहस्थानांत केलेला होता त्यावरून जणों, सगळा भूगोलच तेथें एकवटला आहे काय असा संभ्रम होत असे.

गाडींतून उतरून मंत्रिनिधि राजाच्या हुजऱ्याचा हात धरून राजवाड्यांत गेला. तेथें त्यास सर्व लोक प्रमाण करीत होते. तो आल्याबरोबर कामदार लोक विशेष लक्ष देऊन आपापलीं कामें पाहूं लागले. सर्व दरबारांत जसें नवीन जीवन आलें असें वाटूं लागलें. मुख्य अधिकारी लोक उठून जवळ येऊन अडचणीच्या कामांचा खुलासा करून उलगडा करून घेऊं लागले. अर्ज घेऊन आलेल्या लोकांस तर त्याचा केवळ दृष्टिपात चिंतामणीच्या लाभाप्रमाणें वाटूं लागला; मंदहास्य कल्पवृक्षफळाप्रमाणें, प्रिय वाणीचा सत्कार कामधेनूच्या प्रसादाप्रमाणें संतोष करणारा, आणि हस्तग्रह अष्टमहासिद्धींच्या उदयाप्रमाणें आनंददायक वाटूं लागला. हातांत दिवा घेऊन येत असतां दिव्याच्या प्रकाशाला अंधारांत

सहज मार्ग मिळतो, कांहीं कष्ट पडत नाहींत त्याच प्रमाणें मंत्रनिधीलाही लोकांची एवढी गर्दी झाली असतांही पैस मार्ग मिळण्यास मुळींच अडचण पडली नाहीं.

हुजऱ्याबरोबर मंत्रनिधि निघाला तो तडक सातव्या चौकांत गेला. तेथें, दुधाच्या फेणाप्रमाणें, चंद्रकिरणांच्या सारांशाप्रमाणें, अमृताच्या लहरीप्रमाणें, सरस्वतीच्या स्मिताप्रमाणें, यशाच्या पुंजाप्रमाणें, किंवा भागीरथीच्या प्रवाहाप्रमाणें स्वच्छ बैठकीवर बसलेला, रुद्राक्षांच्या माळा घातल्यामुळें यमुनेशीं मिश्र झालेल्या गंगाप्रवाहाप्रमाणें शोभणारा, हर्षाचें कारण सांगण्याच्या उत्सुकतेनें जणों उठून सामोरा येत आहे असा भासणारा, आनंदातिशयानें दुप्पट पुष्ट झालासें भासणारा, अंतःपुरांत मनोरमेकडे जाण्यास उतावीळ झाल्यामुळें तक्याशीं टेकून बसतांना मांडी घालून बसलेला; आणि दीर्घकाळपर्यंत सलणारें चिंतारूपी शल्य निघून गेल्यामुळें अपूर्व संतोष होऊन जणों आनंदमय असावा, प्रकाशमय असावा, उत्साहमय असावा, सिद्धिमय असावा, संतोषमय आणि शीतलतामय असावा अशी शंका उत्पन्न करणारा शत्रुजितराजा त्याच्या दृष्टीस पडला. मुख्य मंत्र्यास येतांना पाहून हर्षानें युक्त होत्साता राजा, त्यानें प्रणाम करण्यापूर्वींच संभ्रमयुक्त मधुर भाषणांनींच त्यास आपलेपाशीं आकर्षण करूं लागला. पण राजवाड्यांतली रीतरिवाज त्यास पूर्ण माहीत असल्यामुळें जणों आपल्यास ती रीतरिवाजच मागें ओढीत आहे असें मानून, राजास नम्रपणें प्रणाम करून, त्यानें हातानें व दृष्टीनें दाखविलेल्या बैठकीवर जाऊन बसला.

समीप उभा असलेला परिजन, राजाचा नेत्रसंकेत पाहतांच तेथून दूर निघून गेला, आणि जीवाचा व परमात्म्याचा समागम होतांच जसा साधनांचा खटाटोप दूर होतो, तसा मंत्री व राजा यांची भेट करून देऊन तो हुजऱ्या तेथून निघून गेला.

# प्रकरण ४ थें.

## जन्ममहोत्सव.

दुजन्या गेल्यावर, जवळ कोणी नाही असें पाहून, मंत्रनिधीनें राजा बोलण्याच्या पूर्वीच, हातजोडून, विनंति केली कीं—" महाराज ! जशी वीज मेघाच्या गर्जनेची, काळ्याभोर ढगांची पंक्ति आकाशांत दिसूं लागली ह्मणजे . ती वृष्टीची, वसंताची प्राप्ति पल्लवांच्या प्रादुर्भवाची, रात्रीं पांढुरकी झालेली पूर्वदिशा चंद्रोदयाची, मलयानिलाची लहरी वसंतागमाची, नीति राज्याच्या उत्कर्षाची, विद्या मोठ्या पदवीच्या योग्यतेची, यौवनाची प्राप्ति कामदेवाच्या विकाराची, आणि सुशीलता लोकमान्यतेची सूचक होय तशी आज आपली सुप्रसन्न मुद्रा कांहीं मोठ्या अभ्युदयाला सुचवीत आहे. आपल्या शरीराची प्रफुल्लताच कोणत्या तरी फार दिवसांच्या आशेचें साफल्य दर्शवीत आहे. आपली संतोषित वृत्तिच कांहीं तरी मोठ्या चिंतेची निवृत्ति झाल्याचें दाखवीत आहे. आपल्या आनंदित दृष्टीवरूनच कांहीं मोठा बोजा उतरला असें दिसत आहे. आपलें मंद हास्यच आपल्या हृदयांत मावत नसलेल्या आनंदपूरास प्रगट करीत आहे. आणि आपले अंगविक्षेप अंतःपुरांतून कांहीं तरी अभिनंदनीय खबर आली आहे असें जाणवीत आहेत. याप्रमाणें जरी एकंदर प्रकाराचें सामान्य ज्ञान मला होत आहे तरी तें ज्ञानच विशेष जिज्ञासेला जागृत करून माझ्या मनाला उतावीळ करीत आहे. असा कोण आश्रित आहे कीं त्यास आपल्या अन्नदात्याचा अभ्युदय जाणण्याची इच्छा नाहीं? कोणत्या सेवकाचें चित्त आपल्या धन्याची चढती पाहण्याला चंचळ होणार नाहीं? कोणत्या अनुचराचें अंतःकरण स्वस्वामीच्या आनंदाचें कारण न समजलें

तरी चिंता नाहीं असें म्हणून स्तब्ध राहात असेल? जोंपर्यंत तर्क केलेलें कारण निश्चय कोटीवर चढलें नाहीं तोंपर्यंत मन विजेच्या झपाट्यापेक्षांही जास्त वेगानें धावत असतें, वावटळीपेक्षांही अधिक गरगर फिरत असतें, वानराच्या उडीपेक्षांही अधिक जोरानें उड्डाण करीत असतें, गरुडापेक्षांही अधिक झपाट्यानें उडून जात असतें; आणि त्यामुळें, तें धीर धरीत नाही गंभीरता सोडून देतें, विवेकाची किंमत जाणीत नाहीं, विश्रांतिही घेत नाहीं, किंवा स्वतःच्या कल्पनेलाही जुमानीत नाहीं असें होणें स्वाभाविक आहे.

“आज प्रातःकाळीं मालतीनें माझ्यावर देवब्राह्मणांचा आणि पितरांचा प्रसाद झाल्याची मधुर खबर कळविली. फार दिवसांनीं माझ्या मनोरथरूप कल्पवृक्षाला सुफळ लागलें आहे. आशेनें कामधेनूचें रूप धरलें आहे आणि चिंतेनें चिंतामणीचें रूप धारण केलें आहे असेंच ह्मटलें पाहिजे. आशा धैर्याला धमकावून हाकून लाविते, औदार्याला उलटें करून टाकते, गांभीर्याला गिळून टाकते, स्थिरतेला थंड करून सोडते, शांतीला शून्य करून टाकते, कांतीला कापून टाकते, कीर्तिला कलंकित करते, अभिमान ग्रंथीला शिथिल करून टाकते, आणि विक्षेपाला वाढविते. परंतु तीच जर एखाद वेळीं सफळ झाली तर सुकणाऱ्या तृणावर पडलेल्या पर्जन्यवृष्टीप्रमाणें गुण करते, रोग्याला रसायण पोचल्याप्रमाणें रूप दाखविते, अंधाला दिव्य दृष्टि प्राप्त झाल्याप्रमाणें आनंद देते, योग्याला मिळालेल्या आत्मस्वरूपाच्या अनुभवाची बरोबरी करूं शकते, मृताला अमृतसेवन झाल्याप्रमाणें गुणावह होते, धर्ममार्गावर श्रद्धा उत्पन्न करते, वेदशास्त्रांच्या वचनास खरी करते, गरीब लोकांनीं दिलेला दुवा निरुपयोगी नाहीं असें सिद्ध करून देते, ब्राह्मणाचे आशीर्वाद सर्वोत्कृष्ट असल्याचें प्रतीतीस आणून देते, आणि नीतीची पद्धत सर्व कल्याणाची शिडी आहे असें प्रत्यक्षास आणून देते. ह्या गोष्टी मी

माझ्या अनुभवावरून सांगतों. जरी मालती कोणत्याही कारणास्तव कधींही मजपाशीं खोटें बोलली असें मला आठवत नाहीं तरी माझें एवढें भाग्य कोठचें? सृष्टीमध्यें कोणताही प्राणी सर्वसुखसंपन्न असण्याचा संभव कमीच. हा जो सर्व साधारण नियम, त्याला मीच अपवादक कसा होऊं? असे असे अनेक तर्क माझ्या मनाला संशयित करतात; तेव्हां जर तुमचा सल्ला पडत असेल तर या गोष्टीचा एकदा निर्णय करावा असें माझ्या मनांत आहे."

"महाराज! आपल्या पूर्वजांचा तसा आपला पुण्यप्रभाव सृष्टिनियमांत फेरफार करण्यास समर्थ आहे. शिवपूजनाचा प्रभाव मोठा अद्भुत आहे. प्रजेचें पालन सर्व प्रकारच्या अभ्युदयाचें मूळ आहे. धर्माचें रक्षण सर्व विपत्तींस जमीनदोस्त करून टाकतें. परिणामीं धैर्याचें फळ फार मधुर असतें. स्थैर्य कधींही निष्फळ होत नाहीं; आणि सर्व दुःखास अंत म्हणून आहेच. या सर्व नियमांकडे लक्ष देतां, मला असें ह्मणण्यास बिलकूल शंका वाटत नाहीं कीं मालतीनें जी अभिनंदनाची गोष्ट सांगितली तींत काडी इतकाही संशय घेण्याचें कारण नाहीं. आपला मनोदय सिद्ध झाल्यानें आमचें जीवित धन्य होईल. प्रजांची आकांक्षा पूर्ण होईल. आपल्या पूर्वजांचे निश्वास शीतल होतील, तसेंच तुमच्या शत्रूंचे निःश्वास उष्ण होतील. आणि आपल्या कीर्तिप्रमाणें कुलसंततीचा ओव सुद्धां अविच्छिन्न चालू राहील. जशी परमात्म्याच्या प्रतिबिंबामुळें माया शोभते, चंद्राच्या प्रतिबिंबामुळें भागीरथी शोभते, आणि वेदघोषाच्या प्रतिध्वनीनें अध्ययनशाळा शोभते, तशाच आपल्या प्रतिबिंबामुळें महाराणीसाहेब शोभत असतील, तेव्हां त्यांच्या भेटीनें आपल्या नेत्रांचें पारणें फेडून घ्यावें हें आपल्यास उचित होय. आज देव ब्राह्मणांच्या आशीर्वादांचें साफल्य होण्याचा, परिजनांस आनंदमग्न होण्याचा, पितरांस दीर्घ आशा धरण्याचा, शत्रूंस निराश होऊन बस-

ण्याचा, मित्रमंडळास हर्षितांतःकरण होण्याचा, राज्यलक्ष्मीस सुचिरस्थायी होण्याचा, महाराणीचे दोहद पूर्ण कराण्याचा, तसेंच बाळंतखोलींत रक्षणाची, शृंगारण्याची, व पूर्णकलश ठेवण्याची व्यवस्था ठेवण्याचा, राजवैद्यांस गर्भाचें रक्षण व पोषण होईल असे उपचार करण्याची सिद्धता ठेवण्याचा, ब्राह्मणांस उत्तम भोजन व दक्षणा मिळण्याचा, अंतःपुरांतील माणसांकडून काडी मात्र हयगय न होऊं देण्याचा चिरकांक्षित समय येऊन ठेपला आहे."

ज्या भाषणांत सगळी इतिकर्तव्यता प्रतिबिंबित झाली आहे अशा या मंत्रिमुख्याच्या भाषणानें दुप्पट आनंद, दुप्पट उत्साह, दुप्पट प्रेम आणि दुप्पट प्रफुल्लितपणा शत्रुजित् राजास प्राप्त होऊन, तो मंत्रनिधि मंत्रिमुख्यास सभेस जाण्यास आज्ञा करून, स्वतः अंतःपुरांत निघून गेला.

अंतःपुरांत हजारों दासी वावरत होत्या, त्यावरून जसें काय हें एखादें स्त्रीराज्यच आहे; किंवा जेथें पुरुषाचा संसर्ग नाहीं अशी एखादी नवीच सृष्टि आहे; किंवा भविष्य काळच्या अनेक सृष्टींमध्यें उपयोग करण्यासाठीं विधात्यानें, जसा काय, उत्पन्न करून एकीकडे हाता-निराळा करून गुप्त ठेविलेला हा स्त्रीरूप रत्नांचा भांडारच आहे; किंवा ज्याच्या उदरांत अनेक लक्ष्मीरूपें आहेत असा हा क्षीरसागरच काय; अनेक उर्वशी ज्यांत सामावल्या आहेत असें नारायण ऋषीचें हें हृदयच काय; किंवा ज्यांत अनेकविध रतिच्या मूर्ति चमकत आहेत असें कामदेवाचें घरच काय; असें तें अंतःपुर शोभा पावत होतें. तसेंच दासींच्या मुखांनीं जसें काय तें अंतःपुर चंद्रमय होय; कटाक्षांनीं कामदेवाच्या बाणमय होय; भ्रुकुटींनीं कुसुमधन्व्याच्या धनुष्यमय होय; केशकलापांनीं अंधकारमय होय; मंदहास्यांनीं पुष्पमय होय; कपोलमंडलांनीं दर्पणमय होय; कुचांनीं कनककलशमय होय; कंठांनीं शंखमय होय; नाभींमुळें आवर्तमय होय; पोटऱ्यांनीं केळींच्या स्तंभमय होय; भूषणांत जडलेल्या

हिऱ्यांच्या प्रभेनें चंद्रमंडलमय होय; मोत्यांच्या प्रभेनें सरस्वतीमय होय; नीलमण्यांच्या प्रभेनें यमुनामय होय; आणि माणकांच्या कांतीनें रजोगुणमय होत; असें भासत होतें. दासी वायुवाद्यांचे चुंबन करीत होत्या; वीण्यांच्या तारांमध्यें नखांचा खेळ चालला होता; कंदुकांस हाताचा फटकारा देऊन उडवीत होत्या; कनककलशांचे कंठास हातांनीं आलिंगन करून लतांच्या मुळांत पाणी घालीत होत्या; तांबूल तोंडांत घालून त्यास दंतक्षत करीत होत्या; हिंदोळ्यावर बसून नितंबाचें व स्तनांचें परिचालन करीत होत्या; आणि कारंजांनीं युक्त अशा लतामंडपांत बसून शीत्कार करीत होत्या; या सर्व चेष्टांनीं, जशा काय त्या सुरतविहाराची शुष्केष्टिच करीत आहेत असें क्षणभर भासत होतें. दासींच्या सर्वत्र पसरलेल्या लावण्यप्रभेच्या पुरामुळें तें अंतःपुर, जणो, अमृताच्या रसानें, चांद्रिकेच्या प्रवाहानें, भागीरथीच्या जलानें, लक्ष्मीच्या मंद हास्यानें किंवा मुनिजनांच्या सात्विक वृत्तीनें व्याप्त आहे असें वाटत होतें. तेथें कित्येक दासी फुलांचे पंखे गुंफीत बसल्या होत्या. कित्येक सुगंधमय चंदन उगाळीत होत्या. कित्येक सुवर्णाच्या कलशांनीं लतांस पाणी घालीत होत्या. कित्येक आभरणें घासून पुसून, स्वच्छ करून ठेवीत होत्या. कित्येक पिंजऱ्यांत पाळलेल्या पक्ष्यांस पाणी व दाणा घालीत होत्या. कांहीं जणी पोपटांस व मैनांस शिकवीत होत्या. कांहीं वस्त्रें साफ करून घडी घालून ठेवीत होत्या. कांहीं लतांच्या शुष्क काड्या काढून त्या साफ करीत होत्या. कांहींजणी मनोरमेच्या भाग्योदयाच्या गोष्टी बोलत बसल्या होत्या. कांहींजणी मुलगा व्हावा म्हणून ईश्वराची प्रार्थना करीत होत्या. याचप्रमाणें दुसऱ्याही कित्येक निरनिराळ्या कामांत केवळ निमग्न झाल्या होत्या.

राजास येतांना पाहतांच कांहीं दासी सामोऱ्या येऊन अभिनंदनपूर्वक त्यास मार्ग दाखवूं लागल्या. त्याच वेळीं त्याच्या उजव्या डोळ्याची पापणीही फडफडून अभिनंदनपूर्वक भावी भाग्योदयाचा मार्ग सुचवूं लागली.

राजाचें मन जसें कांहीं हर्षभरानें परवश होऊन गेलें, व उत्कंठेनें उतावीळ झालें. राजा मालतीचा हात धरून, आंतल्या एका दालनांत गेला. तेथें चंद्राच्या किरणाप्रमाणें शुभ्र चांदवा आहे ज्याला, तसाच ज्याच्या चार खुरांशीं गर्भाच्या रक्षणार्थ औषधि, चिठ्या, आणि कलश मांडले आहेत, अशा मणिमय पलंगावर मंगळकारक वेश धारण करून, आणि मंगळकारक गोष्टी बोलत, वृद्ध वृद्ध दासींची सेवा घेत, मनोरमा बसली होती. आणखी कुचपर्वत मध्यें आल्यामुळें, मुखचंद्राला पाहण्यासाठींच कीं काय, जिचें उदर दिवसेंदिवस वाढत चाललें आहे; व त्यामुळें जी सुंदर दिसत आहे; आंत चंद्र बुडलेला आहे अशी शरदृतूंतील अभ्रांच्या पंक्तिप्रमाणें भासणारी जी; "आमच्या सगळ्या इंद्रियांस नेत्रमय केलें असतें तर बरें" अशी दासी जनांस उत्कंठा उत्पन्न करणारी; मणिमय भिंतीमध्यें प्रतिबिंबें उमटल्यामुळें, जणों, शेंकडो लक्ष्मीमूर्तींची सृष्टि निर्माण करणारी; मंद हास्यानें हजारो चंद्रकिरणांसच जणों पसरणारी; वस्त्राच्या भारानें सुद्धां ग्लान होणारी; पुष्पांच्या धारणानें सुद्धां श्रम पावणारी; वाळ्याच्या पंख्याच्या वाऱ्यानें सुद्धां कंपित होणारी; मोत्यांची एकसरी गळ्यांत घातल्यानें सुद्धां गुदमरल्याचे क्लेश पावणारी; उत्तम आश्रय मिळाल्यामुळें हर्ष झाला आहे अशा गर्भवतींच्या लक्षणांनीं युक्त; क्षीरसागराच्या भरतीच्या प्रवाहांत हे दोन अमृताचे कलश तरंगतच आहेत असे पुष्ट स्तन धारण करणारी; केवळ उदरांतच नव्हे तर मन, स्तन आणि नितंब यांतही गौरव धरणारी; मुख पांडुरवर्ण झाल्यामुळें, प्रभातकाळाच्या सांनिध्यानें निस्तेज झालेल्या चंद्रानें युक्त अशा पौर्णिमेप्रमाणें शोभणारी; सुगंधाची अरुचि जरी उत्पन्न झाली होती तरी आपल्या निश्वासाचा सुगंध न सोडणारी; आणि डोळ्यांच्या पापण्या वारंवार मिटूं लागल्याकारणानें योगाच्या भूमिकेप्रत पावलेली अशी ती मनोरमा राजाचे दृष्टीस पडली.

गर्भाच्या भारानें शरीर जड झालें असतांही, आपण आलों असें जाणून संभ्रमानें एक हात दासीच्या हातांत आणि एका हाताचा भार पलंगावर देऊन, मनोरमा उठूं लागली. पण "पुरे पुरे" असें ह्मणून ती उठण्याच्या पूर्वींच पलंगावर बसून, आपला डावा हात तिच्या गळ्यांत घालून, आलिंगन देऊन राजा या प्रमाणें बोलूं लागला:—"प्रिये! आज मालतीनें आणलेल्या बातमीनें मला जो आनंद झाला आहे त्याचें यथास्थित वर्णन करण्याला मला बरोबर शब्दही सांपडत नाहींत. हृदय आनंदाच्या भारानें दडपून गेल्यामुळें, तेथून साधारण शब्द सुद्धां सुलभतेनें बाहेर पडण्याची मारामार पडत आहे. आज माझा आत्मा कृतार्थ झाला, जीवित सफळ झालें, पूर्वज प्रसन्नचित्त झालेले दिसतात, आणि दीर्घ काळची चिंता दूर झाली. प्राणप्रिये! आज तुझी अशी अलस आकृति पाहून माझें मन तृप्त होण्याला हे दोन डोळे फार अपुरे होत. या साठीं इंद्राच्या शरीराप्रमाणें माझें शरीर जर नेत्रमय होईल तर फार बरें असें वाटूं लागतें."

गुप्त आनंदाचा उत्कर्ष प्रकट करणारें राजाचें हें भाषण ऐकून मनोरमेचे डोळे, गाल, आणि नेत्र यांच्यांत अपूर्व चमत्कार दिसून आले. लाजेनें डोळे मोडून ती ह्मणाली कीं, "प्राणनाथ! मालतीनें आपल्यास अशी काय खबर दिली? मला तर कांहीं माहीत नाहीं. अलीकडे कांहीं दिवस माझें शरीर अस्वस्थ झालें आहे एवढें बरीक मी जाणतें."

"प्रिये! माझ्या बोलण्यानें जर तूं लाजेच्या स्वाधीन झालीस तर मग पहा कीं माझें बोलणें मी पुरें करतों. पण तुझ्या शरीरांत चंपकाच्या फुलाप्रमाणें पांडुरवर्ण, स्तनाच्या अग्रभागाला अति कृष्णवर्ण, रोमांचाचा उद्गम, पापण्यांची वारंवार हालचाल आणि सर्व अवयवांची वृद्धि, एवढी चिन्हेंच मालतीच्या भाषणाची सत्यता सिद्ध करण्यास पुरेशीं आहेत. सुंदरि! या राज्यावर जेवढी माझी सत्ता आहे तेवढी तुझीही आहे. तरी पण मी

तुला सांगतों कीं तुला अलभ्यही वस्तूची इच्छा झाली तरी ती मला मालतीच्या तोंडून कळव. पाताळांतली किंवा स्वर्गांतली सुद्धां वस्तु मला दुर्लभ आहे असें नाहीं. मालति! व वृद्ध दासीनो! तुह्मी सर्व गोष्टी अगोदरच जाणत आहां ह्मणून मी सांगतों तें जरी केवळ पुनरुक्त आहे असें खरें, तरी स्वाभाविकपणें माझ्या मनाला जें वाटतें तें सांगीतल्यावाचून राहवत नाहीं कीं अशा प्रसंगीं अनेक विघ्नें आकरून बसलेलीं असतात. कित्येक स्नेही ह्मणविणारीं सुद्धां माणसें अनेक कावे करतात. राज्याचे शत्रुही पुष्कळ असतात. माणसांच्या मनोवृत्तींचाही पुरा अंदाज होत नाहीं. दगे करण्याचे प्रकार निरनिराळे असतात. पैसा देऊं केला असतां भल्या माणसांचेंही मन भ्रमतें. हेवा किंवा मत्सर अंतःकरणांतल्या सर्व सौमनस्याला गिळून टाकतो, व कुलीनपणाला चुरून चूर्ण करून टाकतो; शत्रुत्व विवेकाला गट्ट करून टाकतें; अभिमान सर्व भान हिरावून घेतो; दांडगेपणा दयेला जागचे जागीं दाबून टाकतो; कपटवृत्ति नम्रतेला पुढारी करते. ह्मणून माझें येवढेंच सांगणें आहे कीं मनोरमेचा संभाळ करण्यांत तुह्मीं यत्किंचितही गाफील राहतां कामा नये. सावलीप्रमाणें हमेश जवळ असावें; वैद्यशास्त्राच्या पद्धतीप्रमाणें अयोग्य आहारविहाराचा प्रतिबंध करावा; नवीन चिन्हांची परीक्षा करावी; वेळोवेळीं जी घडेल ती हकीगत मला कळवीत जात्री परकी मनुष्यावर विसंबून राहूं नका; परीक्षा केल्यावाचून पदार्थांचा उपयोग करूं देऊं नका; अमंगळ गोष्ट कानीं जाणार नाहीं अशी सावधगिरी ठेवा; अशुभ पदार्थ दृष्टीस पडणार नाहीं असें करा; देव, ब्राह्मण व अतिथि यांच्या पूजेंत हमेश तत्पर राहील अशी तजवीज ठेवा, मनांतली इच्छा पुनःपुनः विचारून, प्रश्न करून, काढून घेऊन मला कळवीत जा; स्वप्नांतली दर्शनें मला सांगीतल्यावाचून राहूं नका; आणि आमच्या कुलपरंपरेच्या आचारांत अंतर पडूं देऊं नका. जी कांहीं विशेष तजवीज करणें असेल

ती मी मंत्रिमुख्याच्या व राजवैद्याच्या सल्यानें तावडतोब करीन. आतां आमच्या सर्वस्वाचा आधार एकंदर तुमच्या कर्तृत्वावर आहे."

**या प्रमाणें मा**लती व दुसऱ्या दासी यांस चांगली सावधगिरी ठेवण्यास सांगून, त्यांस योग्य इनामानें खुश करून, **म**नोरमेबरोबर बराच वेळ हंसून व विनोद करून, **श**त्रुजित राजा सभेस गेला.

**स**भेंत गेल्यावर राजकीय कामें जीं काय करावयाचीं तीं करून त्यानें सभा विसर्जन केली आणि मुख्यमंत्र्याला एकांतात घेऊन अंत:पुराच्या रक्षणासंबंधें सर्व बंदोबस्त केल्यावर राजवैद्याला बोलावून आणविलें. गर्भाचें रक्षण व पोषण वगैरेबद्दल जी व्यवस्था करणें ती केल्यावर राजा तेव्हांपासून धर्मक्रियांमध्यें अतिशयच खर्च करूं लागला. इकडे **म**नोरमेची कोणती इच्छा त्यानें अपूरी ठेवली नाहीं. प्रवास, वहानावर बसणें, परिश्रम, ब्रह्मचर्याचा भंग, उपवास, अजीर्ण, धावणें, वमन, विरेचन, क्लेश, खराब द्रव्यांचा उपयोग, तीक्ष्ण, क्षार, उष्ण, तिखट, कडू व रूक्ष पदार्थांचें सेवन, विषम आसन, विषम शयन, आणि भय इत्यादि गर्भपात करणाऱ्या क्रिया व पदार्थ यांचा तेथें संसर्गही न पोंचे अशी सक्त तजवीज त्यानें ठेविली. चौथ्या महिन्यांत उपलसरी, रास्ना, भारंगी आणि ज्येष्ठमधीचा कल्क, दूधांत घोळून प्यावयास दिला. पांचव्यांत उभी भुईरिंगणी, पसरट भुईरिंगणी, शिवण आणि वड या पांच चिकाच्या वृक्षाचीं कोंवळीं कोंवळीं बोंडें व त्याच वृक्षांची साल यांचा तुपाशीं कल्क करून दुधांत घालून नित्य प्यावयास दिला. सहाव्या महिन्यांत वेखंड, शेगवा, गोखरू आणि शिवणी यांचा कल्क करून वरल्याप्रमाणेंच प्यावयास दिला. सातव्या महिन्यांत शिंगाडे, कमळाचा कांदा, द्राक्ष, ज्येष्ठमध आणि साखर यांचा कल्क करून प्यावयास दिला. आठव्या महिन्यांत कोष्ट, उभी भुईरिंगणी, वेलफळ, कडू पडवळ, ऊंस व बैठी भुईरिंगणीचें मूळ हीं औषधें थंड पाण्यांत वाटून कल्क

करून, बत्तीस पलभार पाण्यांत मिश्र करून आठ पळभार पाणी घालून, ते सर्व मिश्रण उकळून, पाणी नाहींसें होई तोंपर्यंत आटवून, केवळ दूध राहिल्यावर तें प्यावयास दिलें. नवव्या महिन्यांत, ज्येष्टमध, पांढरी उपलसरी, आस्कंद व तांबडा धमासा यांचा कल्क दुधांत घालून प्यावयास दिला. या प्रमाणें दहाव्या महिन्यांत सुंठ, ज्येष्टमध व देवदार यांचा कल्क दूध घालून प्यावयास दिला.

**आ**पल्या प्रियेवरील प्रेमाला, स्वतःच्या मोठेपणाला, औदार्याला, व अपार संपत्तीला, साजेल अशा रीतीनें, शास्त्र संप्रदायास अनुसरून राजानें रक्षाबंधन, सीमंत, पुंसवन वगैरे सर्व क्रिया योग्य महिन्यांत व योग्य मुहूर्तावर केल्या.

**जे**व्हां उदर शिथिल झालें, हृदयाचें बंधन सुटलें, पोट दुखूं लागलें, ओटी पोटांत व पाठींत तिडका सुरू झाल्या, तेव्हां **म**नोरमेच्या सर्वांगाला तेल रगडून चोळून, ऊन पाण्यानें स्नान घातलें. जरा जरा गरम तूप घालून दुधांत शिजविलेली कांजी तिला प्यावयास दिली. चांगल्या नरम उशा घालून मऊ तयार केलेल्या विस्तीर्ण शेजेवर, बाजेवर, क्लेश कमी होतील अशा व्यवस्थेनें, तिला निजविलें. ज्ञात्याच्या ज्ञात्याच्या अनुभविक चार सुईणी तिच्या सेवेला जवळ उभ्या ठेविल्या, त्या अशा कीं ज्यांच्या विषयीं कोणत्याही प्रकारचा वहीम नव्हता व सुटका करण्याच्या कामांत तरबेज असून ज्या **म**नोरमेवर अत्यंत प्रेम करणाऱ्या होत्या. त्या सुइणींचीं नखें अगोदरच काढवून, मग त्यांस प्रसवगृहांत सोडलें होतें. जन्मवेळा बरोबर कळावी ह्मणून घटकायंत्र केव्हांपासून पाणी भरून काळजीनें तयार करून ठेविलें होतें, तसेंच बाहेरच्या बाजूला ज्योतिःशास्त्रांत पारंगत असे नामांकित जोशी आणून बसवून ठेविले होते.

**ज्या** प्रमाणें नीति अर्थाला, धैर्यवृत्ति अभ्युदयाला, विद्या संतोषाला, दया अभयाला, शांति सुखाला, सहिष्णुता क्षेमाला, शिक्षणपद्धति विनयाला मैत्री प्रसादाला, आणि श्रद्धा धर्माला जन्म देते, त्या प्रमाणें **म**नो-

रमा राणीनें, ज्यावेळीं पांचही ग्रह उच्चस्थानीं होते अशा शुभलग्नावर पुत्ररत्नाला जन्म दिलें.

मुलाच्या जन्म समयींच लोकांचीं मनें, दिशांचें प्रांत, व जलाशयांचीं जलें प्रसन्न होऊन गेलीं. चहोंकडे चौघडे वाजूं लागले. फुलांची वृष्टि होऊं लागली. गवई सुस्वर काढून गाऊं लागले. मंद शीतल सुगंध वायु वाहूं लागला. राजवाड्यांत तर महोत्सवाची एकच गर्दी होऊन राहिली. पुत्र-प्राप्तीची पहिली खबर देणारी मालती, जोशी, मंत्री, यांस व यांच्याच प्रमाणें दुसऱ्या परिजनांसही मोठमोठीं इनामें वाटण्यांत आलीं. राजा जणों कल्पवृक्षाच्या किंवा चिंतामणीच्या अवयवांनींच बनविला होय अशा रीतिनें सर्व लोकांचे मनोरथ पूर्ण करूं लागला. फक्त छत्र व चामर एवढीं दोन राजचिन्हें मात्र आपल्यास दुसऱ्यांस देतां येत नाहींत, असें तो मानूं लागला. उत्सवाचा कोलाहल त्रैलोक्यांत दुमदुमून राहिला. मंत्री व्यापारी वगैरे राज्यांतील सर्व मोठमोठे लोक राजाचें अभिनंदन करूं लागले. मांडलिक राजे मौल्यवान नजराणे घेऊन येऊन राजास आपला आनंद दर्शवूं लागले. पुत्ररूपी चंद्राचा उदय होतांच, इष्ट-मित्रांच्या आनंदसागरास भरती येऊं लागली. शत्रूंचीं मुखपद्में संकोच पावूं लागलीं. मनोरमारूप पूर्वदिशा प्रकाशमान होऊं लागली. शत्रुजित राजाचा मनोरूप चंद्रकांतमणि द्रवीभूत होऊं लागला. शत्रूंचीं मनें हेच चक्रवाकपक्षी, त्यांचा आशारूप चक्रवाकीशीं वियोग होण्याची वेळ आली. पूर्वजांचा खिन्नतारूप अंधकार नष्ट झाला. दासी मालतीरूप मालतीलता प्रफुल्लित झाली. याचकरूप औषधि दानामृताच्या सेचनानें तृप्त होऊन टवटवीत झाल्या. गुणीजनांचा दारिद्र्यरूप संताप नाहींसा झाला. दासींचे नेत्ररूप चकोर तृप्त झालेले दिसूं लागले. शत्रुजितरूप कामदेव उल्हास पावूं लागला. शत्रूंच्या स्त्रिया ह्याच विरहिणी होऊन हृदयांत दाहज्वर अनुभवूं लागल्या. शत्रूंची राज्यलक्ष्मी हीच मानवती, तिची मानग्रंथि आपोआप

सुटूं लागली. पण्यवीथिका ह्याच गणिका त्या, चकपकीत दिसूं लागल्या. गल्ल्या ह्याच वासकसज्जा नायिका, त्या शृंगार करून शोभूं लागल्या. पोशाकाच्या थाळ्या याच अभिसारिका त्या ठिकठिकाणीं फिरूं लागल्या. राजमार्गरूप नायक हे, ध्वजा व पातका याच नायिका, त्यांच्याशीं विचित्र समागम पावले, आणि पुष्पवृष्टिरूप कुलटांगना स्वच्छंदपणें कोणाही जाणारा येणाराच्या गळीं पडूं लागल्या.

पुत्रजन्माच्या सहाव्या दिवशीं औंशीस गणपति, जन्मदा, जीवंती अथवा षष्ठीदेवी, शस्त्रगर्भादेवी वगैरे देवतांच्या पूजनाचा समारंभ झाला. दीपोत्सवानें अंधकाराला त्रास देऊन पार हकलून लाविलें, तेव्हां तेथून निघून अखेरीस तो शत्रूच्या हृदयाचा ठाव धरून बसला असें वाटूं लागलें. अगरूच्या धूपाचा धूर जणों गणपति वगैरे देवांस आमंत्रण देण्यासाठीं आकाशांत वर चालला, तो सर्व अंतरिक्षास व्यापून राहिलासें दिसूं लागलें. चंदन, फुलें व धूप यांचा सुगंध एवढा बळकट सुटला कीं तो प्रत्येक जणाच्या नासिकरंध्रांतून प्रवेश करून, ब्रह्मरंध्रांत असलेलें अमृत जणों बाळकासाठीं आणण्याचा यत्न करीत आहे असें भासूं लागलें. नौबदींचा ध्वनि जणों तेथें होत असलेल्या महोत्सवास पुरेशी जागा नसल्यामुळें आणखी जागा करून देण्यासाठीं ब्रह्मांडाला भेदून त्याच्यावरील आवरणाला मोकळें करण्यास जात आहे कीं काय अशी शंका मनांत येऊं लागली. ब्राह्मणांच्या मुखांतून निघालेला वेदमंत्रांचा घोष एवढ्या कडाक्यानें ऐकूं येऊं लागला कीं तो सर्वांच्या हृदयांत शिरून, तेथून पापाला बाहेर काढून, दिक्प्रांताच्या शेवटापर्यंत पार पिटून लावीत आहे कीं काय असें अनुमान होऊं लागलें. पूजनगृहाच्या द्वाराशीं ठेवलेली मंगलकलशाची जोडी, जणों, तेथें आलेल्या सरस्वतीच्या वीण्याच्या भोपळ्याचीच जोडी असावी असें वाटण्यासारखें होतें. द्वारांतच लटकावून दिलेलें व्याघ्रचर्म जणों, गणपतीचा पिता व सर्व देवींचा स्वामी जो सदा-

शिव तोही आपल्या परिवारासहित तेथें येणार ह्मणून त्याच्यासाठीं सिद्ध करून ठेवलेलें आसन होय असें वाटत होतें. दूर्वा, ताजे कोंवळे नवीन पल्लव, जातीजातींचीं फुलें आणि आसनें यांच्या योगानें तें पूजनगृह, जणों, देवीच्या विहारासाठीं सिद्ध केलेला लतामंडपच होय असें शोभत होतें. तेथें कित्येक दासींनीं स्वस्तिकें काढलीं, कित्येकीनीं लोकाचाराप्रमाणें पिंवळीं वस्त्रें करून षष्ठीदेवी लिहिली आणि कित्येकीनीं कार्तिकेय स्वामीला काढलें. अनेक वृद्ध स्त्रिया मंगल गीतें गाऊं लागल्या. विश्वासू पाहरेकरी रक्षणार्थ हातांत नागव्या तरवारी घेऊन, बाळंतगृहाच्या चौफेर फिरूं लागले. तुपाचे दिवे लाविले होते त्यांच्या ज्योति निश्चळ उभ्या सरळ जळत होत्या त्या पाहून असें वाटे कीं जणों हे दिवे एकाग्रता धरून राजकुळाचें शुभ चिंतन करीत आहेत. राजानें सर्व मंगलविधि केल्यावर दाईच्या हातें मुलाला घरांत आणलें. तांदुळांच्या डिंगोळ्यावर गणपतींचें व षष्ठी वगैरे देवींची आव्हानपूर्वक स्थापना करून व विधिपूर्वक सोळा उपचारांनीं पूजन करून, मुलास पायां पाडलें. नंतर त्यांचे विसर्जन करून ब्राह्मणांस अपरिमित दक्षिणा दिल्या.

पुत्रमुख पाहून राजाचे नेत्र धाले; जणों, सर्व तृष्णेचा अंत आला, नव्या निधीची प्राप्ति झाली, आणि ब्रह्मानंदाचा अनुभव मिळाला; असा अपूर्व आनंद राजास प्राप्त झाला. हा बाळ ह्मणजे दैवगतीनें कोमलता पावलेला कौस्तुभमणि असावा, केशराच्या पाण्यांत घोळलेला चंद्र असावा, मनुष्यरूपानें तयार केलेल्या कल्पवृक्षाचा नवीन पल्लव असावा, रजोगुणानें परिपूर्ण असें जीवनतत्वरूप असावा, उदय पावणाऱ्या सूर्याच्या किरणांचा पुंज असावा, बालकरूप धरून आलेल्या लक्ष्मीचें हृदय, किंवा चुंबनाच्या व राज्यभोगाच्या आनंदविषयाची परीक्षा करण्यासाठीं, जणों, अवतरलेला रतीचा अधर असावा, असा तो बाळ लोहचुंबकाप्रमाणें प्रेक्षकांचीं अंतःकरणें आकर्षण करून घेऊं लागला.

---

# प्रकरण ८ वें.

## राज्यचर्या.

कुमाराच्या जन्मानंतर, त्याच्या जन्मग्रहांची चौकशी करतां, फलज्योतिषांनीं सांगितलें कीं " महाराज ! कुमाराच्या जन्मकुंडलींत सूर्य, मंगळ, बृहस्पति, शुक्र आणि शनि, हे पांच ग्रह आपापल्या उच्चीं आले आहेत. चंद्र स्वगृहीं आहे आणि बुध दशम घरांत आहे. यावरून हा कुमार रूप व चातुर्य यांनीं संपन्न होईल. सूर्यासारखा तेजस्वी, पृथ्वीसारखा क्षमावान् , बृहस्पतीसारखा बुद्धिमान, आणि शुक्रासारखा नीतिज्ञ निपजेल. दीर्घकाळपर्यंत राज्यसुख भोगील. प्रजा व धर्म यांचें रक्षण करील. इंद्राप्रमाणें वैभव भोगील. महात्म्यांवर उपकार करील. विद्येंत पारंगत होईल. युद्धांत एकवीर होईल. गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करील. शत्रूंना उच्छेद करील. उत्तम लोकांचा समागम सेवील आणि पुष्कळ दिवस मातापितरांनें सुख भोगील. मंगळ सातव्या भुवनांत आलेला आहे त्यामुळें मात्र यास फार दिवस स्त्रीचा वियोग प्राप्त होईल. आतां शुक्र नवव्या गृहीं आहे. त्यावरून पाताळ लोकाकडून पुन: त्यास स्त्रीचा समागम लाभेल. या मुलास देवजातीनी स्त्री मिळेल. पुत्र पुष्कळ होतील आणि ही स्त्री व सगळे पुत्र ब्रह्मविद्येंत मोठे प्रवीण होतील."

जन्मग्रहांचा फलादेश ऐकल्यावर सामुद्रिक लक्षणें जाणणाऱ्यांस राजानें विचारलें असतां त्यांनीं मुलाचीं अंगें प्रत्यंगें पाहून, सांगीतलें कीं " महाराज ! या कुमाराचे केश व पायाच्या रेखा स्निग्ध आहेत, स्वर व नाभि गंभीर आहे, नेत्रांचे कोणप्रांत, नखें, व हातापायांचे तळवे रक्तवर्ण आहेत, भोंवया व हात लांब आहेत, कंठ व उदर यांच्यावर

तीन वळ्या पडतात; कंठ, पाठ व पोटऱ्या हे सर्व लघु आहेत. डोक्यावर तीन भोंवरे आहेत. आंगठ्याच्या मुळांत तीन रेखा आहेत, ओंठ लाल आहेत, नाक लांब, उंच सुंदर आणि शुकचंचूसारखें आहे. बोटांचीं पेरें बारीक आहेत. यावरून हा कुमार धनवान, भाग्यशाली, गंभीर, बुद्धिवान, विद्वान, राजाधिराज आणि दीर्घायुषी होईल.

याप्रमाणें फळजोशांचीं व सामुद्रिकांचीं भाषणें राजास रसायनाप्रमाणें, कामधेनूच्या दुधाप्रमाणें, अमृताप्रमाणें, व इष्ट देवाच्या वरदानाप्रमाणें फार गोड लागलीं, आणि त्यामुळें तो जसा पुनः यौवनदशेप्रत पावला असावा, दुप्पट पुष्ट झाला असावा, अजरामरत्व पावला असावा, आठही महासिद्धि पावला असावा अशा रीतीनें सुखावलेला दिसूं लागला. त्यास राजानें एवढीं मोठीं इनामें दिलीं कीं त्यांचें दारिद्र्य याचकवृत्तिसहित पार विछिन्न होऊन गेलें; रोमांच, कुटुंबाच्या मनुष्यांसहित, हर्षित झाले; विद्या आशासहित सफळ झाल्या; घरें अंतःकरणांसहित मोठीं झालीं; स्त्रिया भाग्यरेखांसहित प्रफुल्लित झाल्या; आणि शास्त्राभ्यास संतोषासहित स्थिरता पावला.

षष्ठीपूजनाची क्रिया समाप्त होतांच देशोदेशीं राजेरजवाड्यांकडे कुमाराचीं छापलेलीं पावलें पाठवून देण्याचा बंदोबस्त करून कुमारास पुनः मनोरमेजवळ पाठवून, राजा विश्रांतीसाठीं शयनगृहांत गेला. तेथें पलंगावरील चांदवा चंद्राची, छताची झालर शुभ्र अभ्रांची, वाद्यांचे मधुर स्वर हंसरुताची, रत्नें तारागणाची, मोत्यांची प्रभा चंद्रिकेची, आणि शुभ्र गालिचा निर्मळ जलाशयाची स्पर्धा करीत आहेत आणि तेणेंकरून तेथें शरदृतु प्राप्त झाला आहे असें भासत होतें.

प्रातःकाळीं हमेशाच्या रीतीप्रमाणें वही वांचणारे व गवय्ये स्तुति व गायन करूं लागले. वीणा, मृदंग वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. त्यांचा ध्वनि व प्रतिध्वनि ऐकून बगीच्यांतील वृक्षांवरील तसेच पिंजऱ्यांत ठेवलेले

पोपट वगैरे पक्षीसुद्धां मधुर शब्द करूं लागले. चंद्रमा लांब आकाशपंथ चालून जाण्याचे श्रम शांत करण्याच्या हेतूनें शीतल जलांत आंघोळ करण्यासाठींच पश्चिम समुद्रावर उतरूं लागला. आकाश, प्रजेच्या मनांत न मावणाऱ्या राजावरील अनुरागानें जणों रंगून गेल्यामुळें तांबडें होऊं लागलें. शत्रुजिताची कीर्ति सामावत नसल्यामुळें व जास्त अवकाश मिळावा ह्मणून दिशा जास्त स्पष्टपणें फाकूं लागल्या. शत्रुजिताचें भाग्य अवलोकन करण्याच्या इच्छेनें अंतरिक्षांत आलेल्या देवतांच्या हर्षाश्रूंचे बिंदुच जणों पडत आहेत असें भासविणारे उपवनांतील वृक्षांच्या पल्लवावरील तुषारबिंदु पडूं लागले. रात्री थंडी लागल्यामुळें आंखडून गेल्यासारखा वायु मंद मंद वाहूं लागला. रात्रिरूप नायिकेचा वियोग होणार ह्मणून चंद्र खिन्न होऊन जणों विवर्ण होऊन गेला. आपल्यास प्रफुल्लितपणा देणारा चंद्र अस्ताप्रत चालला असें पाहून कुमुदें ग्लान होऊन संकोच पावूं लागलीं. जणों आपला पति सूर्यनारायण प्रवासांतून आलासें पाहून हर्षित होत्साती कमलिनीरूप नायिका प्रफुल्लित होऊं लागली. प्रभातकाळचा संध्याराग वृक्षांवर पडल्यामुळें त्यांवर घरोटीं करून राहिलेले पक्षी दावानलाची शंका उत्पन्न होऊन, ते वृक्ष सोडून घाबऱ्या घाबऱ्या जणों इतस्ततः उडूं लागले. गाईच्या दोहनाचा तसाच दधिमंथनाचा ध्वनि ब्राह्मणांच्या वेदपठनाच्या शब्दांशीं मिश्र पावून आकाशांत शांतपणें चढूं लागला. पक्ष्यांचें मौनव्रत अंधकाराबरोबर नाहींसें होऊं लागलें. निद्रा लोकांच्या नेत्रांस सोडून, रात्रिविकासी पुष्पांमध्यें शिरणारे चंद्राचे किरण विरहिजनांस मूर्छित केल्याच्या पापाचें फळ पावत आहेत अशा रीतीनें मूर्छित होऊं लागली. सूर्याच्या किरणरूप लांब लांब भाल्यांनीं सौधशिखरें व वृक्षांचीं अग्रें जणों जखमी झालीं आहेत अशीं लाल दिसूं लागलीं. प्रकाश वाढत जातांच दिव्यांच्या ज्योति अंधुक होऊं लागल्या. नौबतीच्या दुम दुम शब्दांनीं मयूर मेघगर्जनेच्या

भ्रांतीनें नाचूं लागले. बगीच्यांतील वृक्षाच्या कोमळ पल्लवांच्या भारानें फांद्या मंद मंद वाऱ्याच्या लहरींनीं चामरीच्या लीलांचें अनुकरण करूं लागल्या. मित्राच्या चढती बरोबर त्याच्या स्नेह्यांचीही चढती झाली पाहिजे असा नियम सुचविणारा सूर्य आपला उदय होण्याबरोबर कमळांच्या ठिकाणींही लक्ष्मी उत्पन्न करूं लागला. वृक्षांच्या पानांवरले तुषारबिंदु मंद वायूच्या लहरींनेंच खालीं पडूं लागल्यामुळें "हलका उच्चस्थानीं जरी चढला तरी लागलाच खालीं येणारच" असें ते स्ववर्तनानें दर्शवूं लागले. मंदवायूनें कंपायमान वृक्ष जणों पल्लवरूप ओंजळींनीं सूर्याला पुष्पमय अर्घ्य देऊं लागले. सर्व रात्रभर वियोग पावलेलीं चक्रवाक पक्ष्यांचीं जोडपीं समागम पावून परस्परांवर अपूर्व स्नेह दाखवूं लागलीं. घरें व त्यांतील भांडीं वगैरे वस्तु, जणों सुंदर स्त्रियांच्या हस्तस्पर्शानें खुष झाल्याप्रमाणें, चकचकीत दिसूं लागल्या. अग्निहोत्राच्या धुराचे लोट, जणों, देवतांस होमिलेलें हविष्य पोंचविण्यासाठींच किं काय, स्वर्गलोकाकडे जाऊं लागले. आस्तिकवादी लोकांनीं परमेश्वराला अर्पण केलेले पदार्थ, चंदन, पुष्प, धूप, दीप वगैरे, त्यांचा सुगंध शहरच्या सर्व लोकांच्या घ्राणेंद्रियांस तृप्त करूं लागला. नृत्याचार्याप्रमाणें वायु, पल्लव व पुष्पें यांनीं शोभणाऱ्या लतांस नृत्याचा उपदेश करूं लागला. अशा सुप्रभातकाळीं पवित्र आचरणाचे व सेवा करण्यांत प्रवीण असे कित्येक परिचारक व कित्येक परिचारिका नेहमीप्रमाणें प्रातःकालच्या मुखमार्जनादि क्रियांस उपयोगी पडणारें साहित्य, दंतधावन, चूर्णें, आरसे, धौत वस्त्रें, वाजी करणारीं औषधें, गंगाजळ वगैरे, घेऊन शत्रुजित् राजाच्या शयनगृहांत सिद्ध करून ठेवित्या झाल्या. इतक्यांत राजा जागा झाला, त्यानें मुखमार्जनादि करून इष्ट देवतेचें व गुरूचें स्मरण केलें व तो शयनगृह सोडून बाहेर आला.

अरुणोदयापूर्वींच स्नानाचा राजाचा परिपाठ होता. तथापि अदले रात्रीं षष्ठीपूजनाचा समारंभ झाला होता आणि दुसरे दिवशीं सकाळीं

सोयर असल्यामुळें शिवपूजनही करावयाचा तगादा नव्हता ह्मणून उठण्यास थोडा विलंब झाला. राजा बाहेर येऊन एका सुंदर आसनावर बसला तों तेथें त्यास परिचारक जन उन्नति पावणाच्या इच्छेनें लवून नमूं लागले, जीवनाच्या आशेनें प्राण सुद्धां खर्ची घालूं असें ह्मणूं लागले, विश्रांतीच्या आशेनें सेवेंत जास्त मेहनत करूं लागले, धन मिळविण्याच्या बुद्धीनें शांत राहूं लागले, प्रीति संपदण्यासाठीं मुकाट्यानें बसूं लागले, सेव्य होण्याच्या इच्छेनें सेवा करूं लागले आणि गौरव प्राप्त करून घेण्यासाठीं लघुवृत्ति पत्करूं लागले.

येथें कांहीं वेळ बसून, लागलाच शत्रुजित राजा जोडी करण्यासाठीं तालीमखान्यांत गेला. तेथें ठरल्याप्रमाणें श्रम करून व मोत्यांच्या दाण्याप्रमाणें घामाचे बिंदूनीं सर्वांग अलंकृत करून, स्नानगृहांत गेला. तेथें अगोदरच सुगंधि पाण्यानें भरून ठेवलेले लहानमोठे कित्येक सोन्यारुप्याचे कलश, श्याम वस्त्राखालीं झाकून ठेवलेले दिसत होते. ते काळया रंगाच्या चोळयांच्या आंत लकाकणाऱ्या कामिनींच्या कुचांच्या शोभेची स्पर्धा करीत आहेत असें दिसत होतें. भिंतींत चोहोंकडे रत्नमय दर्पण बसवून दिले असल्याकारणानें परिमित मनुष्येंही अपरिमित आहेत असें भासवून ऐंद्रजालिक चमत्कार दाखवीत होते. मणिमय भूमिकेंत वरून चालणाऱ्या मनुष्यांचीं प्रतिबिंबें उलटीं उमटल्यामुळें, पाताळ लोकच्या मनुष्यांचे उलटे पाय व मस्तकें कशीं दिसत असतील यांची प्रत्यक्ष प्रतीति पाहावयास मिळत होती. शुभ्र छत आकाशगंगेच्या शोभेचा तिरस्कार करीत आहे असें भासत होतें. स्नानास बसण्याच्या स्फटिकमय चौरंगांत जो जो पदार्थ जवळ आणावा त्याच्या रंगाचें तो ग्रहण करीत असल्यामुळें भोळ्या मनुष्याच्या मनाचें अनुकरण करीत होता. स्नान केल्यावर नेसण्यासाठीं आणून चुणून ठेवलेली सूक्ष्म वस्त्रांची जोडी मोठ्या सर्पाच्या शुभ्र कांतित्वचेप्रमाणें शोभत होती. घालण्यासाठीं पुष्पांच्या माळाही

आणून ठेविल्या होत्या; त्यावर जे भ्रमर बसले होते ते माळ हलविली असतां उडून जाऊन पुनः येऊन बसत त्यावरून ते मान अपमान न धरतां आपलें काम साधण्याचा उपदेश याचकजनास करीत आहेतसें वाटत होतें. पुष्पांचा सुगंध चोहोकडून भ्रमरांचें आकर्षण करीत होता त्यावरून गुणिजनांचें आकर्षण करणाऱ्या सुयशाचा दृष्टांत प्रत्ययास येत होता. स्नानगृहांत त्या वेळीं आवश्यक सामग्री सिद्ध ठेवून सेवकजन उभे राहिले होते, ते, जणों, जीवात्म्याची वाट पाहणाऱ्या मायेचे सत्वादिक गुणांप्रमाणें, निश्चलता धरून स्तब्ध होते.

सेवकांकडून आपल्या शरीरावर सौगंधिक चूर्णाचें चांगलें मर्दन क-रवून, कलशांत भरून ठेवलेल्या भागीरथीच्या पवित्र पाण्यानें स्नान क-रून, जणों कर्पूरमय असावा, चंद्रिकामय असावा, क्षीरसागराच्या फे-णाप्रमाणें असावा, शरदृतूंतील अभ्राप्रमाणें असावा अशा शुभ्र निर्मळ रुमालानें वस्त्रानें शरीर पुसून काढवून, शुभ्र धौत वस्त्रें परिधान करून, अशौच असल्यामुळें शिवाचें केवळ मानसिक पूजन करून, शत्रुजित्‌राजा प्रसाधनशाळेंत आला. जसा योगी सिद्धींच्या प्राप्तीच्या नादीं लागून, सात्विकवृत्ति सोडून राजसवृत्ति स्वीकारतो; जसा सूर्य पूर्वा-न्हकाळची कोमलता सोडून मध्यान्हकाळची उग्रता धरतो; जसा वायु वसंतकाळची मंदता सोडून ग्रीष्मकाळची तीव्रता अंगीकारतो; जसा समुद्र हेमंतांतला स्थिरपणा टाकून आगोटीचा उद्धटपणा स्वीकारतो; जसा अग्नि शीतकाळची सौम्यवृत्ति टाकून उष्णकाळीं प्रचंडपणाचा अंगीकार करितो; आणि जसा परमात्मा सृष्टि निर्मिण्यापूर्वीचें निर्विकारित्व सोडून देऊन सृष्टि-काळीं मायेच्या क्षोभानें विकारवशत्व धारण करतो; तसा शत्रुजितराजानें पहिला सात्विक वृत्तिचा साधा पोशाक काढून ठेवून राजसभेंत जाण्यास उचित असा राजविलासी वेश चढविला.

याप्रमाणें राजविलासी पोशाक करून, अंगावर घातलेल्या अलंकारांसन्

आपल्या अवयवांनीं शोभा आणून राजानें कमरेला कट्यार बांधली व हातांत तरवार घेतली, आणि बेताचीं चाकरमाणसें घेऊन तो सभेस जावयास निघाला. पण जाण्यापूर्वी बाळबाळंतिणीची खबर काढवून घेण्यास तो विसरला नाहीं. शत्रुजित सभेंत येतांच, प्राण आल्यानें इंद्रियमंडळ, सूर्य उगवतांच कमलमंडळ, पाऊस पडतांच औषधिमंडळ, संतोषाच्या आगमानें गुणमंडळ, आनंद येतांच रोममंडळ, यौवन येतांच विकारमंडळ, इंद्र येतांच देवमंडळ, त्याचप्रमाणें सगळें राजमंडळ उभें राहिलें. उभें राहण्याच्या गडबडींत कित्येकांस परस्पराशीं चाललेल्या गोष्टी सोडून देणें भाग पडलें, कित्येकांस उद्धतपणा दिसेल अशा चेष्टा सोडून द्याव्या लागल्या, कित्येकांस धैर्य सोडून द्यावें लागलें, कित्येकांस हासें सोडावें लागलें, कित्येकांस अभिमान, व कित्येकांस अवधानसुद्धां सांडण्याची पाळी आली. यावेळीं च्छडीदारांच्या ललकारण्यानें, प्रणाम करण्याच्या धांदलीमुळें लौकर लौकर पुढें सरतां सरतां राजेरजवाड्यांच्या पायाच्या वगैरे खडबडीनें, चामर ढाळण्याकरता आलेल्या दासींच्या नूपुरांच्या ध्वनीनें, पुष्पांच्या माळांवर उडणाऱ्या भ्रमरांच्या झंकारनादानें, अभिनंदनार्थ वाजणाऱ्या वाद्यांच्या ध्वनीनें, चारण वगैरें स्तुतिपाठकांच्या जयजयकार शब्दांनीं, घाईमध्यें मणिमय भूमिकेवर तुटून पडणाऱ्या राजांच्या आभारणांच्या शब्दांनीं, गडबडीमुळें भयभीत झालेल्या बगीच्यांतील पक्ष्यांच्या कोलाहलानें आणि या सगळ्या गोंगाटाच्या प्रतिध्वनीनें, तो सगळा सभामंडप गजबजून गेला.

कित्येकांचा हस्तग्रहानें, कित्येकांचा भाषणानें, कित्येकांचा मंद हास्यानें, कित्येकांचा दृष्टिपातानें, याप्रमाणें कोणाचा कशानें, कोणाचा कशानें तरी सर्व लोकांचा सत्कार करून, शत्रुजित राजा, जसा उदयाचलावर सूर्य, नारायणाच्या नाभिकमलावर ब्रह्मा, योग्यांच्या हृदयकमलावर नारायण, कैलासशिखरावर शिव, मेरुशिखरावर इंद्र आणि कामिनींच्या

हृदयावर कामदेव विराजतो, तसा मोठ्या शृंगारलेल्या सिंहासनावर जाऊन बसला. तेव्हां त्याच्यापुढें अनेक भेटी येऊन पडल्या, सही करावयाचे कागद पाहण्यासाठीं आणले, अनेक कामाचे फैसले लिहूं लागले, मांडलिक राजांच्या व लोकांच्या अर्ज्या ऐकण्यांत आल्या, उत्पन्न खर्चाचे हिशोबतपासणीचें काम चालू झालें, देशोदेशींहून कुमाराच्या जन्माविषयीं अभिनंदनपर पत्रें आलीं होतीं तीं वाचून पाहण्यांत आलीं, नवीं नवीं रत्नांचीं आभरणें व वस्त्रें वगैरे वस्तूंची खरेदी करण्यांत आली, किंमतीचा निश्चय करतां येण्यासाठीं त्याच जातीच्या दुसऱ्या वस्तूंचा मुकाबला करून पाहूं लागले, अनेक जातींच्या आयुधांची परीक्षा करण्यांत येऊं लागली, हत्ती घोडे वगैरे जनावनारांची पारख करूं लागले, कळा जाणणारे लोक आपापल्या कळा मोठ्या मार्मिकतेनें दाखवूं लागले, नाना कळा जाणणाऱ्या कसबी लोकांस इनामें देण्यांत आलीं, कुमाराच्या जन्मोत्सवसंबंधी काव्यें व गीतें गाण्यांत व वाचून दाखविण्यांत येऊं लागलीं. येणेंप्रमाणें सर्वत्र आनंदही आनंद गाजून राहिला.

भरसभेंत उघड रीतीनें जीं कामें व्हावयाचीं तीं संपल्यावर, सभा बरखास्त झाली. कांहीं मंत्र्यांस बरोबर घेऊन राजा संधिविग्रहाचा गुप्त विचार करण्या करतां एकांत गृहांत गेला. नंतर मंत्र्यास जाण्यास परवानगी देऊन त्यानें राजवैद्यांस बोलाविलें व कुमाराची आणि त्याच्या आईची प्रकृति कशी आहे याची चौकशी करून, त्यांची काळजीनें योग्य व्यवस्था ठेवण्यास सांगीतलें. इतकें झाल्यार तो थोड्याशा सेवकांसहित पाकशाळेंत आला, तेथें नित्याप्रमाणें सुवर्णाचे माणिमय पाट मांडले होते; लहान मोठे मौल्यवान कलश मांडले असून त्यांत सुगंधि निर्मळ व गार गंगेचें पाणी भरून ठेविलें होतें, व त्यावर सुंदर काळे रुमाल झांकण घातले होते. काळ्या कुळकुळीत अभ्रांतून तारांचा चकचकाट दिसावा, अंधकारांतून काजव्याचा प्रकाश दिसावा, तशीच काळ्या रुमालांच्या आंतून कलशांचीं रत्नें झळकत होती.

वर सांगितल्याप्रमाणें पारांच्या बाजूला मांडलेले कलश जणों तारामंडळाचीं पोरें आहेत, रजोगुणाचे पिंड आहेत, रत्नाकरानें दिलेली भेट आहे, मेरुपर्वताचा सारभूत अंश आहेत, कल्पवृक्षाचीं फळें आहेत, चिंतामणीचे नमुने आहेत किंवा शत्रूस सोडून आलेल्या राज्यलक्ष्मीचे कुच आहेत, असे शोभत होते. शुभ्र च्छत दिलें होतें तें जणों, सरस्वतीचें मंदहास्य असावें मंदाकिनीचा प्रवाह असावा, ऐरावताची त्वचा असावी, आणि शेषसर्पाची कांत असावी, असें दिसत होतें. केळींचीं मोठमोठीं पानें व वाळ्याचे पंखे यांच्यांत विस्तीर्णत्वाबद्दल व शीतलत्वाबद्दल स्पर्धा चालली आहे असें वाटत होतें. त्या पाकशाळेंत चोहोंकडे माळा टांगल्या होत्या व पुष्पांचे कुंज केले होते त्यांच्यायोगानें मेघाडंबराप्रमाणें देखावा दिसत होता. जाती जातींचीं पक्वान्नें शिजवून तयार करून ठेवलीं होतीं त्यांच्या सुगंधयुक्त घमघमाटानें त्या पाकशाळेंत आपलें साम्राज्य स्थापन केलें होतें. तेथें जे आचारी होते ते स्वच्छ शरीराचे, स्वच्छ वस्त्रें नेसलेले, तसेच वेताचेंच पण स्वच्छ अलंकार घातलेले असे होते. राजाला संतुष्ट करण्यांत त्यांची आपआपसांत चढाओढ चालली होती, व आपल्या प्राविण्याविषयीं त्यांच्या लांब लांब गोष्टी चालल्या होत्या.

**पा**कशाळेंत आल्याबरोबर पहिल्यानें राजानें आपला दरबारी प्रौढ पोशाक काढून ठेवला, आणि मोत्याची माळ घालून व पीतांबर नेसून, उष्णपाण्यानें हातपाय धुववून, पाट मांडले होते त्यांतल्या मधल्या उत्तम पाटावर येऊन बसला. व आपले मागून आपले पंक्तीला भाऊबंदास त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें आपापल्या पाटांवर त्यानें बसविलें. तेव्हां शत्रुजित फारच शोभूं लागला. तो तारांनीं वेढलेला चंद्र असावा, देवांसहित इंद्र असावा, मधुमासादि साह्यकारी गणासहित कामदेव असावा, सुशीलपणा आदीकरून सद्गुणांनीं परिवेष्टित असा सुबोध असावा, सामान्य मण्यांच्या माळेंत गोंवि-

लेला कौस्तुभमणि असावा असें प्रेक्षकांस वाटत होतें. पाटापुढें सोन्याची ताटें मांडलीं होतीं, बाजूला सोन्याच्या वाट्या, पेले वगैरे ठेवले होते; त्यांत नानाप्रकारचे रसाळ, चवदार व मनोहर पदार्थ वाढले होते. चटण्या, कोशिंबिरी, लोणचीं वगैरे कित्येक किरकोळ पदार्थ बाजूला केळीच्या पानांवर वाढले होते. राजाचा भोजनविधि शास्त्रनियमाप्रमाणें होत असे. प्रथम, भोजनाच्या आरंभींच, सैंधवांत खारलेलें आलें त्यानें चाखलें. नंतर, पहिल्यानें मधुर रस, मध्यें आंबट व खारट रस आणि शेवटीं तिखट कडवट व तुरट रस असे पदार्थ खाण्यांत येतील, तसेंच, प्रथम तूप चोपडलेले भाकरीसारखे कठिण पदार्थ, मागून वरणभात वगैरे मृदु पदार्थ आणि शेवटीं दूध वगैरे स्निग्ध पदार्थ यांचे सेवन होईल अशी पदार्थांची सिद्धता ठेवली होती. अमुक पदार्थ अमक्याला वाढा असें आग्रह करकरून राजानें भाऊ वगैरे आप्तांवर आपले कृपाविशेष दाखविलें. त्यामुळें ही कृपादृष्टि ह्मणजे इष्ट-

---

(१) सोन्याचीं भांडीं राजवैभवाला साजणारीं असून, वैद्यकाप्रमाणें तीं तीनही दोषांस हरणारीं आहेत, पथ्यकर व दृष्टीचें बळ वाढविणारींही आहेत.

(२) केळीच्या पानांवर जेवण रुचिकारक आहे. तें अग्नीला प्रदीप्त करणारें व विषहारक आहे.

(३) सैंधवसहित आलें भक्षण केल्यानें अग्नि प्रदीप्त होऊन, जीभ व कंठ साफ होऊन रुचि उत्पन्न होते.

(४) प्रथम मधुर रस पोटांत गेल्यानें वायूची व पित्ताची शांति होते मध्यंतरीं खारट आणि आंबट रस घेतल्यानें पित्ताशयांत अग्नीची वृद्धि होते. शेवटीं तिखट कडवट तुरट रसाच्या सेवनानें कफाची शांति होते.

(५) दुधानें कफाची वृद्धि होते खरी, पण ती खारट आंबट वगैरे रसांनीं उत्पन्न झालेल्या पित्ताचें शमन करून, स्वतः क्षीण होते; ह्मणून ही कफाची वृद्धि अग्नीच्या मंदपणाला वगैरे जागा देत नाहीं. याच कारणास्तव भोजनांतीं दुधाचा उपयोग प्रशस्त आहे.

देवतेचा प्रसादच होय, कामधेनूचें वरदानच होय किंवा लक्ष्मीचे कटाक्षच होत असें मानून ते सर्व हर्षयुक्त झाले.

याप्रमाणें भोजनविधि आटपल्यावर, राजानें पिकलेलीं, थोडीं तिखट, लहान लहान, पातळ व पांडुर अशीं नागवेलीचीं पानें व कात, चुना, वेलची इत्यादि सुगंध पदार्थ यांनीं बनविलेला असा विडा तोंडांत घालून, व इतरांस देऊन, बाकीच्या मंडळीस आपापल्या कामास जाण्याला परवानगी दिली आणि स्वतः दुपारच्या वेळेला योग्य असा हलका पोशाक करून विश्रांतीसाठीं कारंजाच्या आरामगृहांत गेला.



# प्रकरण ६ वें.

## बाळरक्षण.

कारंजाच्या आरामगृहांमध्यें ग्रीष्मऋतूंतही वर्षाकाळचें सुख प्राप्त होत असे; दिवस असतांही चांदण्या रात्रीची मौज अनुभवास येत असे; भर दोन प्रहरीं सुद्धां मध्यरात्रींची शीतलता प्राप्त होत असे; जणों प्रखर सूर्यकिरणांपासून भय पावलेली शीतलता, सर्व ठिकाणचा तळ उचलून, दीनांचें रक्षण करणाऱ्या राजाचा आश्रय घेण्यासाठीं, याच गृहांत येऊन बसली कीं काय असें मनांत येत असे; सूर्यकिरणांच्या प्रचंड तेजामुळें सर्व भागीं, क्रोधाविष्ट वेणेकऱ्याच्या आ पसरलेल्या तोंडाप्रमाणें दिसणाऱ्या आकाशानें आपल्या स्वाभाविक सौम्यपणाचा एक नमुना ह्या घरांत राखून ठेवला काय अशी शंका मनांत येत असे; पांढऱ्या कमळांच्या राशि हे, शीतलतेनें अत्यंत व्याकुळ होऊन मरण पावलेल्या उष्णतेचे अस्थिपुंज पडले आहेत असें वाटत होतें. उंच उंच उडत जाऊन जाडी होणाऱ्या कारंजाच्या धारा, ग्रीष्माचा अभिमान हरण करून, जणों चढून गल्यामुळें आकाशाला लगटण्याचा यत्न करीत आहेत असें अनुमान होत असे. सुगंधि फुलावर गुंजारव करणारे भ्रमर, ग्रीष्मऋतूनें ग्लान करून टाकलेल्या कामदेवास शक्तिमान करण्यासाठीं जणों सिद्ध मंत्राचा जप करीत आहेत काय असें भासत होतें. अतिशय उंच उडणाऱ्या कारंजाच्या गुलाब पाण्याच्या धारा, ग्रीष्मकाळच्या संतापामुळें पित्तज्वरानें घेरलेल्या आकाशाच्या अंगावर शीतोपचारार्थ तुषार फेंकीत आहेत काय असें दिसत होतें. वाळा, चंदन, अशोकपल्लव, पांढरीं कमळें आणि कारंजाच्या पाण्याच्या धारा हीं दाहशमना-

साठीं एकत्र करून ठेवलेला जणों ऊष्महर सिद्धौषधांचा समूह होय, कुंजांचे पल्लव व पुष्पें यांतून पडणारे जलाचे बिंदु जणों मध्यान्ह प्रभावानें भिऊन जाऊन, पळून आलेल्या व एथें येऊन स्थिरता पावलेल्या अंधकाराच्या नेत्रांतून हर्षाश्रु पडणारेच बिंदु होत असा भास होत असे. कारंजाच्या मुखांतून अनेकधा निघणाऱ्या जळाच्या स्वच्छ धारा जणों विद्वानांच्या मुखांतून निघणाऱ्या सरस्वतीच्या धारांचें अनुकरण करीत आहेत असें दिसत होतें. कारंजाच्या धारांमध्यें वारंवार वर खालीं येणारे पण त्यांमधून निसटून बाहेर निघण्यास असमर्थ असे पुष्पकंदुक, जणों मायेच्या रचनेमध्यें वारंवार वरच्या किंवा खालच्या योनीप्रत प्राप्त होणारे पण त्यांतून सुटून मुक्त होण्यास असमर्थ अशा जीवात्म्यांचें साम्य पावत होते. यंत्राच्या विचित्र रचनाप्रभावानें क्षणक्षणीं निरनिराळे आकार घेणाऱ्या व निरनिराळ्या रीतीनें परिभ्रमण करणाऱ्या जळाच्या धारा, अदृष्टपूर्व ऐंद्रजालिक चमत्कार दाखवीत होत्या. या गृहांत प्राप्त झालेला वायु, जळधारांच्या व पुष्पांच्या सुगंधानें सुखावून जणों तेथून जाऊं इच्छित नाहीं अशा हेतूनेंच फार मंद मंद वाहात होता. मृदंग, तंबुर वगैरे प्रौढ व कोमळ ध्वनींची साज असल्यामुळें, प्रवीण गवयांचें सारंग रागांतलें गायन, श्रोत्यांचे चित्तास सर्व वासनांचा विसर पाडून, जणों, धारणा, ध्यान व समाधि या योगाच्या साधनांगांचा अभ्यास करवीत आहे असें वाटत होतें. कारंजाच्या उंच उंच उडणाऱ्या धारा, जणों गाण्याच्या मधुर ध्वनीनें प्रसन्न होऊन, ज्याचा गुण शब्द आहे अशा आकाशाला अभिनंदन करण्यासाठीं वर जात आहेत असें भासत होतें. शीतलतेपासून पराभव पावलेली उष्णता जणों फिरून तेथें पायही ठेवावयाचा नाहीं अशी दृढ प्रतिज्ञा करून निघून गेली असें दिसत होतें. हें गृह, जलाच्या धारांमुळें जणों वर्षामय होय, शीतलतेमुळें शिशिरमय होय, पुष्पांच्या समृद्धीमुळें वसंतमय होय, असें भासत होतें. आणखी तें गृह, जळधारांच्या कोमळ ध्वनीनें, गा-

यनाच्या मधूर स्वरानें, वाद्यांच्या गंभीर शब्दानें आणि भ्रमरांच्या मनोरंजक गुंजारवानें, जणों शब्दब्रह्ममय होय असें भासे. या घरांत उष्णता चित्तासहित शांत होत असे, जलधारा आनंदासहित वर उसळत होत्या, पुष्पें भ्रमरासहित चित्ताचें आकर्षण करीत होतीं, राग रोमांचावलीसहित उन्नति पावत होता, आणि शीत मंद सुगंध वायूची लहर निद्रेसहित तेथें प्राप्त होत होती. भ्रमर पुष्पांच्या सुवासाचें व सौंदर्याचें गायन करीत होते; पल्लव जणों आपलीं शिरें हालवून भ्रमरांच्या गाण्याची प्रशंसा करीत होते; वाद्यें जणों पल्लवांच्या गुणज्ञतेबद्दल त्यांचें अभिनंदन करीत होतीं; आणि जलधारा जणों वाद्यांच्या ध्वनीच्या तालावर नाचत होत्या. पल्लवांच्या टवटवीतपणावरून, मृदंगाच्या गर्जितावरून, कुजांतील अंधकारावरून, जलधारांच्या वर्षावावरून, बगळ्याप्रमाणें दिसणाऱ्या पांढऱ्या पुष्पांच्या माळांवरून आणि जलधारांच्या तुषारांत मण्यांचें रंग प्रतिबिंबित झाल्यामुळें इंद्रधनुष्यासारख्या दिसणाऱ्या देखाव्यावरून तेथें वर्षाऋतु प्राप्त झाल्याप्रमाणें आडंबर माजलें होतें. निर्मळ जळाला उंच उंच चढवून मागून खालीं फेकून देणारीं कारंजीं पवित्र अधिकाऱ्यास पदभ्रष्ट करणाऱ्या अविवेकी राजांप्रमाणें वाटत होतीं. जळबिंदूचा प्रहार अंगावर लागत असतांहीं सुवासाच्या लालसेनें पुष्पांस न सोडूं इच्छिणारे भ्रमर, संसारांतलीं विविध संकटें सोसूनही विषयसुखांच्या वासनेमुळें इंद्रियसंगति न सोडणाऱ्या कामी लोकांचा दृष्टांत दाखवीत होते. जलधारांचे तुषार उडून जाऊन मणिमय दर्पणाचें चुंबन घेत होते; भ्रमर पुष्पाच्या सुगंधानें आकर्षले जाऊन त्यांस आलिंगन देत होते; मृदंग सारंगीला अनुसरण्याच्या लालसेनें हाताचे टोले खात होते; पुष्पमाळा भ्रमरांनीं आडविली असतांही दुसऱ्यांस सुवासानें सुख देण्यास कमी करीत नव्हती; आणि सारंगी तारांवर दंडाची योजना होतांच, त्या त्या स्वरांच्या संयोगांस प्रकट करीत होती. जल-

धारा निर्मळ असूनही दुसऱ्यांचें चित्त चोरीत होत्या; वीणा काष्ठमय असूनही अनेक रागांनीं युक्त होती; मणि कठिण असतांही आनंद देण्यांत मोठी उदारता धरीत होते; वायु मंद असूनही दुसऱ्यांचा परिश्रम त्वरेनें हरीत होता; आणि पुष्पें कोमळ खरीं पण कामदेवाच्या अस्त्राचें काम करीत होतीं. भ्रमर मदांध झाले होते पण मूर्छित वीणा झाली होती; शीतल धारा पल्लवांवर पडत होत्या पण ममुष्याची उष्णता नाहींशी होत होती. जळधारा उंच उडत होत्या पण वायुला श्रम आल्यामुळें तो मंद वाहात आहे असें वाटत होतें; आणि जळबिंदु खालीं पडत होते पण कंप पल्लवांस प्राप्त झाला होता. फुलें भ्रमरांनीं शोभत होतीं, भ्रमर मधुर गुंजारवानें शोभत होते, गुंजारव आरामगृहांत व्यापून राहिला होता, गृह निकुंजानीं शोभत होतें, निकुंज पल्लवांनीं वेढिलेलें होतें, पल्लव जळधारांनीं भिजत होते आणि जळधारा शत्रुमर्दनराजाच्या अंतःकरणाचें आकर्षण करीत होत्या.

कारंजाच्या गृहांत मध्यान्हकाळ काढून, बरोबर थोडेसे अनुचर घेऊन राजाची स्वारी विनोदशाळेंत गेली. तेथें कांहीं निवडक मांडलिक राजांस व मंत्र्यांस बोलावून आणून व त्यांच्या बरोबर चार गमतीचे खेळ खेळून व मालतीकडून बाळबाळंतिणीची खुषखबर काढवून, आनंदित होत्साती राजाची स्वारी, सायंकाळ होतांच, त्या समयाला योग्य असा पोशाक बदलून, घोडेस्वार होऊन व बरोबर कांहीं निवडक घोडेस्वार घेऊन, शहराच्या बाहेर फिरावयास निघाली.

या समयीं सूर्याचीं किरणें जणों जगतीला संताप दिल्याच्या पापामुळें लाज पावून संकोचित होत चाललीं होतीं. सूर्य सुद्धां याच पापापासून मुक्त होण्याच्या इच्छेनें तीर्थस्नान करण्यासाठीं पश्चिमसमुद्रतीरावर उतरत होता. सूर्यमंडळ जणों ब्राह्मणांनीं दिलेल्या रक्तचंदनयुक्त सायंसंध्येच्या अर्घ्यांनीं रंगित झालें आहे असें दिसूं लागलें. सगळ्या

दिवसभर वेगानें चालावें लागल्यामुळें श्रमून गेलेल्या सूर्यानें, स्वतः येण्यास सवड न मिळाल्यामुळें आपल्या प्रतिनिधीला भागीरथींत संध्यास्नान करण्यासाठीं पाठविलें आहे असें भागीरथींत त्याच्या पडलेल्या प्रतिबिंबावरून वाटत होतें. गंगेच्या जलांत लाटांच्या हेलकाव्यामुळें लांबच लांब दिसणारें सूर्याचें प्रतिबिंब पाहून जणों हा पाण्यांत सोन्याचा पूलच बांधला आहे असें वाटत होतें. सूर्याचे किरण जणों स्वतःस झालेली उष्णता शांत करण्याच्या हेतूनें वृक्ष पर्वत घरें इत्यादिकांच्या शिखरांवर उंच ठिकाणीं हवा खाण्यासाठीं बसले काय असें अनुमान होऊं लागलें. पक्ष्यांबरोबर सूर्याचीं किरणें भूतल सोडून देऊन, वृक्ष, देवळें, घरें, डोंगर वगैरे यांच्या शेंड्यांवर जाऊन बसूं लागलीं. सायंकाळच्या तांबड्या किरणांनीं व्यापिलेले वृक्षादिकांचे अग्रभाग जणों तांबडे रेशमी पीतांबर परिधान करून सोंवळ्यानें संध्यावंदन करीत आहेत असें वाटूं लागलें. पश्चिम दिशा केशरी रंगाचें लुगडें नेसून जणों प्रवासाहून आलेल्या सूर्याला सामोरी आली काय अशी शंका होऊं लागली. बाकीच्या तिनही दिशा उष्णतेनें जळून कोळशासारख्या काळ्या ठिक्कर पडत चालल्या किंवा चारी दिशांपैकीं सूर्यानें पश्चिमेस मात्र भेट दिली यामुळें सवतीमत्सर वाटून लज्जेनें बाकीच्या दिशांनीं आपलीं तोंडें काळ्या पदरांनीं झाकून घेतलीं कीं काय अशी शंका मनांत येऊं लागली. कमळें, जणों, आपला हितकर्ता जो सूर्य, त्यास नीच पडत्या स्थितींत पाहण्याला न इच्छून संकोच पावूं लागलीं. आपला पति सूर्य अस्त पावला असतां, भ्रमराच्या पंक्तीस बाहेर काढून देऊन कमलिनी जणों सगळा उल्हास बंद करून, कमळरूपी डोळे मिटून व भ्रमरपंक्तिरूप रुद्राक्षांची माळ घेऊन पाण्यांत तपश्चर्या करीत आहे काय असें अनुमान होऊं लागलें. पश्चिमसमुद्राचें पाणी एवढें लाल झालें कीं उंचावरून सूर्यबिंब मोठ्या जोरानें पश्चिमसमुद्रांत पडल्यामुळें जें पाणी उसळलें त्याच्या लाटांनीं संध्याकाळचा आकाशाचा तांबडा रंग

धुपून जात आहे काय अशी शंका मनांत येत होती. अंधकारानें घेर-लेला पूर्वदिक्प्रदेश, पाणी सुकून गेल्यावर चिखल शिल्लक राहिलेल्या सरोवराप्रमाणें, दिसूं लागला. सूर्य रागयुक्त असून पायां पडत असतांही, हा अशक्त होऊन गेला असें जाणून पश्चिमदिशा त्यास हाकून देत आहे असें वाटूं लागलें. सूर्य, चंद्र, प्रकाश, अंधकार, दिवस, रात्र, तारागण या पैकीं कांहीं एक दिसत नाहीं असें खगोलाचें पश्चिमार्ध, सृष्टीच्या पूर्वी ब्रह्मतत्वाच्या स्थितीचें अनुकरण करीत आहे असें दाखवीत होतें. मित्राचा अस्त झाला आणि काजवे चमकूं लागले. हंस मुके झाले आणि घुबडें कोलाहल करूं लागलीं. कमळें संकुचित झालीं आणि कुमुदें उकलूं लागलीं. प्रकाश नष्ट झाला व अंधकार यथेच्छ फिरूं लागला. कुलीन-स्त्रिया आपापल्या घरांत स्वस्थ राहिल्या व व्यभिचारिणी मदोन्मत्त होऊन बाहेर वावरूं लागल्या. ब्राह्मणांच्या अग्निहोत्रांचा धूर आपला मित्र जो अंधकार त्यास भेटण्यासाठीं खिडक्यांतून बाहेर पडूं लागून वरवर चढूं लागला. अंधकारामुळें लोकांची दर्शनशक्ति नीचपुरुषांच्या सेवेप्रमाणें नि-ष्फळ होऊं लागली. जग जणों काजळानें सारविलें आहे, काळ्या वस्त्रानें गुंडाळलें आहे, तमोगुणानें व्यापिलें आहे, कस्तुरीनें लेपिलें आहे, व अंधकारानेंच बनविलें आहे असें भासूं लागलें. अंधकारानें पांढरें, काळें, लहान, मोठें, सरळ, वाकडें, स्थिर, अस्थिर, जाडें, पातळ, उंच, नीच, इत्यादि भेद नाहींसा करून सगळें सारखें असा प्रकार करून टाकल्या-मुळें अविचारी गुणानभिज्ञ मनुष्याचें वर्णन देण्याला कवीस हा चांगला दृष्टांत होऊन बसला. अंधकार पृथ्वीपासून सुरू होऊन आकाशांत प-सरला आहे किंवा आकाशांत सुरू होऊन पृथ्वीपर्यंत पसरला आहे याचा निर्णय होणें अशक्य होऊं लागलें. अंधकार हा त्रैलोक्याचा विजय करूं निघालेल्या कामदेवाच्या सैन्यांतली हत्तींची घंटा होय, किंवा विरहिज-नांचे प्राण घेण्यास निघालेल्या यमदूतांचें मंडळ होय, किंवा जगांतील

सगळ्या प्रोषितभर्तृकांच्या दुर्भाग्याचा संग्रह होय, किंवा अकालीं प्रलय करावयास निघालेली मेघमाला होय, किंवा चोहोंकडे चिकटून गेलेले सूर्यरूपी दिव्याचें काजळ होय, किंवा रतियुद्ध करतां करतां सुटून गेलेला देवांगनांच्या केशकलापाचा समूह होय, किंवा सुरतश्रमांनीं उत्पन्न झालेल्या घर्मबिंदूंनीं विरून गळून पडणारी देवांगनांच्या शरीरास लाविलेल्या कस्तुरीचा लेप होय किंवा सारा दिवस उष्णता लागल्यामुळें वितळलेल्या निळ्या आकाशाचा रसच होय, किंवा व्यभिचारी लोकांच्या अंतःकरणांस व्यापिल्यावर बाकी राहिलेल्या काळ्या कपटाचा समूहच होय, किंवा भूगोलाप्रमाणें सूर्यगोलालाही रसातळांतून बाहेर आणण्यासाठीं उद्युक्त झालेल्या वराहाचा हा अवतारच होय असें वाटूं लागलें. आणखी सर्व लोकांच्या नेत्रांची दर्शनशक्ति चोरून नेल्याच्या पापामुळें जणों काळा झाला असावा, विरहिणीच्या प्राणरूप अपथ्यानें भक्षण केल्यामुळें सुजून गेला असावा, सारा दिवस कैदेंत राहावें लागल्यामुळें अखडून गेलेल्या आपल्या अंगावर जणों विरहिलोकांच्या उष्णोदकानें सिंचन करीत आहे, जणों तारारूप नेत्रांनीं अभिसारिकांच्या अपूर्व चेष्टांनें अवलोकन करीत आहे, जणों सर्व स्थळीं व्यापून राहून लोकांस गर्भवासाचें स्मरण देत आहे, कोठेंहीं उंच नीच भावास स्थळ न दिल्यामुळें जणों अविचारी लोकांचें अनुकरण करीत आहे, आणि रात्रीं जागण्याची संवय असल्यामुळें जणों अंगांत वातविकार वाढल्यामुळें निश्चेष्ट होऊन गेला आहे असा अंधकार बराच झालेला पाहून, महाराज शत्रुजितानें हवा खाण्याचें काम बंद करून घोड्याला शहराकडे परत वळविलें.

या समयीं मशाली धरणारे त्याच्या जवळ येतांच अंधकार मदहीन होऊन गेला. निश्चेष्टारूप वातव्याधीनें ग्रस्त असूनही दिव्याच्या प्रकाशानें स्वेदनक्रिया घडल्यामुळें तो सचेष्ट झाल्यासारखा दिसूं लागला. आणि स्वतःचा वैरी जो प्रकाश त्याच्या स्पर्शानें सुद्धां विटाळ लागेल अशा शंकेनें तो दूर

दूर जाऊं लागला. पण ज्या ज्या प्रदेशांतून जसजसा प्रकाश निघून गेला तसतसा तो तो प्रदेश तो जय मिळवूं इच्छिणारा प्रमाणें काबीज करीत चालला.

बरोबरीच्या मंडळीबरोबर उघड्या हवेच्या गुणाबद्दल व कसरत खेळण्यापासून होणाऱ्या हितकारित्वाबद्दल गोष्टी बोलत बोलत व घोड्यास हळू हळू चालवीत राजाची स्वारी शहरांत येऊन पोंचली. शहरांत दिव्याची रोशनाई अद्भुत रीतीनें झाली होती. संध्याकाळच्या देवपूजेच्या धूप दीप पुष्पें यांच्या सुगंधानें सर्व दिशा व्यापून गेल्या होत्या. वेदमंत्राच्या घोषानें सर्व लोकांचीं कर्णेंद्रियें परम संतुष्ट होऊन गेलीं. कांचेच्या हंडींत लावलेले दिवे मायारूप उपाधींत राहिलेल्या ईश्वराप्रमाणें बाहेर व आंत असे दोहींकडे प्रकाशत होते. चोहोंकडे पुष्पांच्या माळा, पुष्पांचे गुच्छ व तुरे व पुष्पांचें पंखे यांची खरेदी चालली होती. रस्त्यांत लोकांची फार गर्दी आहे असें जाणून, राजानें घोड्यास फार हळू हळू चालविलें होतें. त्यामुळें राजवाड्याशीं येण्यास बराच वेळ लागला. आल्याबरोबर घोडेस्वारांस जाण्यास सांगीतलें. या वेळीं राज्यकारभारी लोक सर्व राजकीय कामें आटोपून घरोघर गेले होते त्यामुळें राजवाड्यांतील त्यांच्या जागा फार मोठ्या विस्तीर्ण दिसूं लागल्या. जागोजाग चौकीपहारेवाले हजर होते, बगीच्यांतील व पिंजऱ्यांत पाळलेले पक्षी अगदीं गप्प झाले होते. राजवाड्याचा सगळा देखावा मनाला व शरीराला पुष्टि व तुष्टि देणारा होता. मणिमय दिव्यावर निश्चल जळणाऱ्या ज्योती जणों राजवाड्याचें शुभचिंतन करीत आहेत अशा दिसत होत्या. प्रत्येक दालनांतून बाहेर येणारा पुष्पादिकाचा घमघमाट जणों शत्रुजिताला आपल्याकडे बोलावीतच आहे असें भासत होतें. शत्रुजित आंत जाऊन उष्ण पाण्यानें स्नान करून पाकशाळेंत गेला, व रात्रीच्या समयाला व ग्रीष्मकाळाला योग्य असें लघु भोजन करून, तांबूल वगैरे खाऊन व मालतीच्या हातें बाळबाळंतिणीचें क्षेमवर्तमान विचारून तो शयनगृहाकडे गेला. तेथें से-

चकाकडून हातपाय रगडविले व उत्तम मऊ बिछाना घातला आहे आणि वस्त्रें स्वच्छ व पुष्पाचा वास दिलेलीं आहेत अशा पलंगावर पडून व ईश्वराचें नामस्मरण करून तो स्वस्थपणें निद्रासुख घेऊं लागला.

**या** प्रमाणें नित्य मोठा उत्साह चालला असतां कुमाराच्या जन्माला तेरा दिवस झाले. त्या दिवशीं अशौच सोडून देऊन, शुभमुहूर्तावर ब्राह्मणांकडून पुण्याहवाचनपूर्वक धर्मशास्त्राचे नियमाप्रमाणें कुमाराच्या रूपगुणाप्रमाणें अन्वर्थक असें **कुसुमायुध** नांव ठेवलें, आणि पाळण्यांत घालण्याची क्रिया व शंखानें गाईचें दूध पाजण्याची क्रिया करण्यांत आल्या. यावेळीं ब्राह्मणांस लाखो मोहरा, पुतळ्या व गाई दान दिल्या व त्यास संतुष्ट केलें. मंत्र्यांस व इतर दरबारी मंडळीस इनामें दिलीं. गोरगरीबांसही अन्नवस्त्रादिक देऊन त्यांचा आशीर्वाद घेतला. नगरांत व देशांतही महोत्सव करवून, दिवसेंदिवस औदार्य वृद्धिंगत केलें. राजवैद्यांच्या संमतीप्रमाणें दाई ठेवली ती क्षत्रिय जातीची, मध्यम वयाची, चांगल्या स्वभावाची, आनंदी स्वभावाची, पुत्रवती, निर्दोष, दुधाळ, बहुप्रेम धरणारी, आधीन राहणारी, कुलीन, चांगल्या मातापितरांची, निष्कपट, कुमारास पोटच्या पुत्राप्रमाणें लेखणारी, अशी पाहूनच ठेवली. ती दाई कुमाराचा चांगला प्रतिपाळ करूं लागली, त्याशीं कधीं तुसडपणा करीत नसे, निजत असल्यास जागवीत नसे, बसण्याला असमर्थ होय तों पर्यंत त्याला बसवीत सुद्धां नसे, अभ्यंग करण्याच्या वेळेशिवाय उगाच रडवीतही नसे, वैद्यकशास्त्रास अनुसरून मुलास रोज तेलानें चोपडीत असे. शरीरावर उत्तम हितावह चूर्णें चोळीत असत, कवोष्ण निर्मळपाण्यानें स्नान घालीत असत, कोमळ मृदु पदार्थांचे त्याच्या नाजुक अवयवांवर लेप करीत असत, मऊ मऊ अशा वस्त्रांत त्यास गुंडाळीत असत, मोत्यांचा एखादा लहानसा हार गळ्यांत घालण्याशिवाय दुसरे अलंकारांचा बोजा त्यावर घालीत नसत, आणि वेळोवेळीं वैद्याला त्याच्या प्रकृतीची मुद्दाम खबर देत असत.



झालें. दंतरहित असूनही गुळगुळीत गालांनीं प्रफुल्लित दिसणारें मुलाचें वदनकमल, कारणाशिवाय उत्पन्न झालेल्या मंद हास्यावरून, लक्ष्मीसमागमाचें सुख जणों सुचवीत आहे, अमृताच्या ओघाचा वर्षाव जणों करीत आहे, सगळ्या वासनांचें विस्मरण जणों पाडीत आहे, ब्रह्मानंदाला जणों बोलावित आहे, अशा प्रकारचा आल्हाद राजाच्या मनास देत होतें.

जमिनीवर रांगतां रांगतां कुमाराचें आंग धूळीनें लिप्त होत असे, तरीपण त्यास उचलून घेतलें असतां तें आंग चंदनाच्या पुडीनें किंवा कमळाच्या परागानें किंवा कस्तुरीच्या कल्कानें, चंद्रकिरणांच्या चूर्णानें किंवा प्रेमाच्या परमाणूंनीं लिप्त झालें असावें असें परमसुखकारक वाटूं लागलें, मुलाच्या हातापायांवरील स्निग्ध व शुभरेखा, आयुर्वेदांत "दृष्टिप्रसादनी" ह्मणून ज्या प्रसिद्ध शलाका सांगीतल्या आहेत त्यांच्या प्रमाणें शत्रुजिताच्या नेत्रांस परम सुख देऊं लागल्या. शत्रुजिताच्या हातांतून मुलाला घेण्यासाठीं आपापले दोनही हात लांबलांब करणारे मांडलिक राजे, मंत्री वगैरे सभासद, अमृतमंथनाचे वेळीं धनवंतऱ्याच्या हातांतून अमृतकलश घेण्यासाठीं उत्सुक झालेले देवांप्रमाणें दिसूं लागले. मुलाच्या प्रतिबिंबांनीं शोभणारे माणिमय खांब सुद्धां जणों आपल्या हृदयांत सांठवून मुलास आलिंगितच आहेत असा भास होत असे. बालचापल्यानें सभागृहांत चोहोंकडे फिरणारा तो मुलगा, सभासदांच्या दृष्टीला व हृदयांला सुद्धां स्वतःबरोबर भ्रमण करवूं लागला. अंतःपुरा सभोंवरच्या आंगणांमध्यें जोरानें इकडे तिकडे फिरणाऱ्या त्या मुलाला उचलून घेण्यासाठीं शेकडों दासी त्याच्या मागें धावत असतां, त्या, ऐरावताच्या मस्ती करणाऱ्या पोराला पकडण्याचा प्रयत्न करणाऱ्या अप्सराच होत अशा दिसूं लागल्या. मुलाच्या अंगावर जीं आभरणें घातलीं होतीं तीं सुद्धां जणों त्याच्या अंगस्पर्शानें आपल्या जड स्थितींतल्या जन्माचें साफल्य झालें असें मानून संतुष्ट झालीं आहेत अशीं शोभादायक चमकत होतीं.

मुलाच्या कानाजवळ आलेला काजळाचा ओघळ, जणों नेत्रकमळांतील मकरंद पिण्यासाठीं निश्चळ होऊन टपत बसलेला भ्रमरच होय, मुखचंद्राच्या हालण्यानें त्यावरील सरून बाजूला आलेला कलंकच होय, आणि गाल हेच सुवर्णकलश, त्यांतून बाहेर पडणाऱ्या लावण्याच्या पुराला प्रतिबंध करण्यासाठीं नीलवीच्या रसाचा हा बांधच होय असें वाटत होतें. मनोरमेचा स्तन पीत असतां हा मुलगा ह्मणजे कमळकोशांतील मकरंद पिणारा हंस होय, आणि अमृतकलश हातांत घेऊन अमृत पिणारा जयंत होय असा शोभत होता. जशी निर्धनाची चित्तवृत्तिं निधीच्या दर्शनानें, चक्रवाकी उदय पावणाऱ्या सूर्याच्या दर्शनानें, लता वसंताच्या आगमनानें, मयूरी पावसाच्या दर्शनानें, पूर्वदिशा उदय पावणाऱ्या चंद्राच्या दर्शनानें आणि योग्यांची वृत्ति परमात्म्याच्या दर्शनानें प्रसन्न होते तशी मनोरमा मुलाच्या दर्शनानें संतुष्ट होत असे. मुलाला मांडीवर घेऊन जेव्हां मनोरमा त्यास स्तन देण्यास बसे तेव्हां ती जयंताला स्तन देणाऱ्या इंद्राणीप्रमाणें, चंद्राला स्तन देणाऱ्या अनसूयेप्रमाणें, वामनाला स्तन देणाऱ्या अदितीप्रमाणें, आणि ब्रह्माला स्तन पाजणाऱ्या महालक्ष्मीप्रमाणें शोभूं लागली. जो आनंद निधीच्या लाभानेंही मिळूं नये, अमृतपानापासूनही मिळूं नये, योगमार्गाच्या सेवनानेंही मिळूं नये, कल्पवृक्षाच्या आश्रयानेंही मिळूं नये, राज्यलक्ष्मीच्या लीलेनेंही प्राप्त होऊं नये, आणि जीवनमुक्तीच्या प्राप्तीपासूनही न लाभावा, तो आनंद मनोरमेला केवळ पुत्रमुखाच्या चुंबनानें प्राप्त होऊं लागला. तो मुलगा मातापित्यांच्या आनंदाबरोबर दिवसेंदिवस वाढूं लागला, आणि प्रेमाबरोबर पुष्ट होऊं लागला. शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें तो जसजसा वृद्धि पावूं लागला, तसतसा मातापितरांच्या हर्षरूपी समुद्राला भरती आणूं लागला, शत्रूंच्या मुखकमळांस संकोचवूं लागला, आशारूपी कुमुदिनीस प्रफुल्लित करूं

लागला, परिजनांच्या नेत्ररूप चकोरीस तृप्त करूं लागला, संतापरूप अंधकाराला दूर सारूं लागला, पूर्वजांच्या दैन्यरूप उष्म्याला शांत करूं लागला, आणि लोकांच्या प्रीतिरूप चंद्रिकेला विस्तारूं लागला. या मुलाचे बारीक बारीक आणि सारखे हारीनें आलेल्या समस्थितियुक्त दंतांच्या पंक्तीची शोभा जणों चंद्रकिरणांनीं बनविली आहे, अमृताच्या लहरींनीं रचलेली आहे, मण्याच्या चकचकाटानें बनविली आहे, कामधेनूच्या दुधाच्या धारांच्या सारांशांतून काढलेली आहे, पांढऱ्या मोगऱ्याच्या पाकळ्यांच्या रसांतून सिद्ध केली आहे, ताऱ्यांच्या चकचकीत प्रकाशाचा अभ्यास करून अवतरली आहे किंवा सरस्वतीच्या मंदहास्यमय आहे अशी सुंदर दिसत होती.

आठव्या महिन्यांत शत्रुजितानें शुभमुहूर्त पाहून, देवब्राह्मणांचें पूजन करून, कुसुमायुधाला मनोरमेच्या मांडीवर बसवून, सुवर्णपात्रांत दहीं मध व तूप यांनीं युक्त असा दूधपाक करवून तो सुवर्णाच्या चमच्यानें त्याच्या तोंडांत भरविला. याप्रमाणें अन्नप्राशन विधि अटोपल्यावर मुलाची जीविकापरीक्षा पाहण्याच्या हेतूनें शास्त्ररीतीप्रमाणें त्याच्यापुढें शास्त्र, शस्त्र, वस्त्र प्रावर्ण इत्यादि अनेक वस्तु मांडून ठेवल्या असतां त्यांतून त्यानें प्रथम शस्त्राचाच परिग्रह केला हें पाहून मातापितरांचीं व परिजनाचीं अंतःकरणें आनंदपूरांत केवळ गटंगळ्या खात राहिलीं. कान टोंचण्याची क्रिया जी केवळ आभरणें घालण्यासाठींच नव्हे, तर आरोग्यासाठींही आवश्यक आहे, तीही आठव्या महिन्यांत मुलाला दाईच्या मांडीवर बसवून, वैद्याच्या हातानें केली. उजव्या कानाच्या कातडींत स्वाभाविकच एक छिद्र असतें तेथें नेमकें टोंचल्यामुळें कुसुमायुधाला कांहीं एक वेदना झाली नाहीं. पहिलें वर्ष पुरें होतांच विधिपूर्वक मार्कंडेयपूजन करविलें, आणि प्रत्येक वर्षास वाढदिवशीं तसें पूजन करविण्याचा परिपाठ ठेवला. याचप्रमाणें तिसऱ्या वर्षीं चौल संस्कार केला,

आणि पांचव्या वर्षीं शुभ मुहूर्त पाहून देवब्राह्मणांच्या पूजेसहित मोठ्या दणक्यानें विद्यारंभ करविला.

कुशाग्र बुद्धि व उग्रभागी असलेल्या कारणानें, कुसुमायुध थोड्याच वेळांत लिहिण्या वाचण्यास शिकला व कित्येक सामान्य ज्ञानाचीही प्राप्ति त्यानें करून घेतली. मुलाच्या हातचीं अक्षरें काळीं असूनही शुभ्र यशास उत्पन्न करूं लागलीं, गोल असूनही लोकांचीं हृदयें विंधूं लागलीं, मलिन असूनही स्वच्छ दिसूं लागलीं, एका हद्दीनें लिहिलीं असून बेहद्द सुंदर दिसूं लागलीं, आणि काजळाचा संसर्ग असतांही डागांशिवाय दिसत होतीं. कुसुमायुधाचें वाचन नियमित असूनही कोणत्याही ग्रंथांत प्रतिबंध पावत नव्हतें, सरळ असूनही हृदयाचें आकर्षण करण्यांत अंकुशाप्रमाणें वाटत असे, विकाररहित असून, ऐकणारांचीं मस्तकें कांपवूं लागलें, अनेक वर्णांनीं युक्त असूनही एकाच रंगानें युक्त राहूं लागलें आणि स्वरभेदरहित असूनही लोकांच्या ठिकाणीं राग उत्पन्न करूं लागलें. मुलाचें वाचन जलद असूनही विरामअर्धविरामादिकांत चूक मुळींच होत नसे; बालक असूनही प्रौढ माणसाप्रमाणें तो गांभीर्य धरूं लागला; व्याकरणाचे परिज्ञान फारसें नव्हतें तरी त्याचा वर्णोच्चार शुद्धच असे; छंदःशास्त्र अवगत नसूनही कविता वगैरे चांगल्या ढबीनें म्हणूं लागला; शिक्षाग्रंथाचा अभ्यास नसून "गीती शीघ्री शिरःकंपी" इत्यादि अधम पाठकाचे दोष त्याच्याठिकाणीं नव्हते. कुसुमायुधाची गंभीरता स्वाभाविकपणानेंच अग्नीच्या उष्णपणाचें, चंद्राच्या शीतळतेचें, समुद्राच्या अगाधपणाचें, सूर्याच्या तेजस्वीपणाचें, चिंतामणीच्या औदार्याचें, हिमालयाच्या स्थैर्याचें, अमृताच्या माधुर्याचें, पृथ्वीच्या सहिष्णुत्वाचें आकाशाच्या विस्तीर्णपणाचें आणि जळाच्या रसवत्तेचें अनुकरण करीत होती.

पुत्राची वयोऽवस्था, स्थिति व मन हीं विशेष अभ्यासक्रमाला योग्य आहेत असें पाहून आशासमुद्रांत मोठमोठ्या मनोरथरूपी कल्लोलमालांवर तरंगणाऱ्या शत्रुजित राजानें, मुलाच्या मनाचें वळण खेळाच्या व्यासंगांतून निघून केवळ विद्येच्या व कळांच्या ज्ञानप्राप्तीच्या अभ्यासांत गढून जावें अशा हेतूनें, नगराबाहेर भागीरथीच्या तीरावर सपाट जागा पाहून, फार द्रव्य खर्चून, एक अति विस्तीर्ण व रमणीय विद्यामंदिर बांधविलें.

तें विद्यामंदिर गंभीरतेमध्यें पाताळलोकाप्रमाणें, उंचीमध्यें मेरुपर्वताप्रमाणें, आंतील उंची पदार्थांच्या उत्कृष्टत्वामध्यें अमरावतीप्रमाणें, सभोंतालच्या बगीच्या संबंधानें नंदनवनाप्रमाणें, शुभ्रवर्णामध्यें हिमालयाप्रमाणें, ऋतुसमयींच्या सौख्यामध्यें कुबेरनगरी अलकावतीप्रमाणें, सर्प वगैरे विषारी प्राण्यांनीं रहित असल्यामुळें आरोग्यामध्यें काश्मीरदेशाप्रमाणें, चित्ताची एकाग्रता ठेवण्याच्या संबंधें समाधीप्रमाणें, आणि निर्विक्षेपपणामध्यें ब्रह्मानंदाप्रमाणें दिसत होतें. त्याचा कैलासाप्रमाणें उंच व शुभ्र चौफेर किल्ला जगदंबेच्या मणिदीपाच्या किल्ल्याची लीला घेऊं लागला. किल्ल्याच्या सभोंवर खोल खंदक खोदला होता व त्यांत भागीरथीचें पाणी खेळत होतें; तो खंदक पाहून मणिदीपाच्या किल्ल्याभोंवती वेष्टलेल्या अमृतसमुद्राच्या वलयाची स्मृति होत असे. चार दिशांस किल्ल्यांत जाण्याचे चार दरवाजे ठेवले होते व त्याजकडे जाण्यासाठीं भागीरथीच्या खंदकावर चार मोठमोठे पूल बांधले होते, ते जणों कर्ममार्गांत प्रविष्ट करविणारे चार वेद होत, पुरुषत्वामध्यें गणना करविणारे चार पुरुषार्थ होत, विद्यामार्गांत प्रविष्ट करविणाऱ्या चार[1] पद्धति होत, आणि आत्मानुभवाकडे नेणारीं चार[2] साधनें होत असें वाटत होतें. या विद्यामंदिराच्या दरवाजांचीं कवाडें मजबूत असून, दारांवर चौकीपाहऱ्याचा बंदोबस्त होता. शिवाय

---

१. शिकणें, जाणणें, त्याप्रमाणें वर्तणें व दुसऱ्यास शिकवणें.

२. श्रवण, मनन, निदिध्यास आणि समाधि.

शत्रुजिताच्या परवानगीशिवाय प्रत्यक्ष वायूसही तेथें प्रवेश करणें अशक्य—मग इतरांची कथा काय? मंदिराच्या एके भागांत कसरतशाळा, एके भागांत शस्त्रशाळा, एके भागांत पुस्तकालय, एके भागांत अश्वशाळा, एके भागांत पाकशाळा, एके भागांत शयनमंदिर, एके भागांत हस्तिशाळा, एके भागांत वाद्यालय, एके भागांत शिल्पशाळा, याचप्रमाणें इतर भागांत दुसऱ्याही अनेक शाळा बांधून दिल्या होत्या. घोडे वगैरे फिरवण्यासाठीं व मंडळ वगैरे घेण्यासाठीं सुद्धां ऐस पैस जागा राखून ठेविली होती.

सर्व विद्यांमध्यें व कलांमध्यें पूर्ण प्रावीण्य संपादन केलेले व त्या विद्या व त्या कला शिकविण्यांत प्रतिष्ठा पावलेले असे नामांकित अनुभविक आचार्य शोध करून, बोलावून आणून, मोठमोठ्या पगारावर शिकवायास ठेवले. मंत्र्यांचे मुलगे, तसेच मांडलिक, राजेराजवाडे, यांचे कुमार, व आचार्यांचेही बटु कुसुमायुधाबरोबर सहाध्यायी ह्मणून शिकण्यास ठेवले. विद्या व कला यांचा अभ्यास संपूर्ण झाल्यावाचून विद्यार्थ्यांस विद्यामंदिराच्या बाहेर जाण्याची सक्त मनाई होती. त्यांच्या आप्तमित्रांस त्यांस भेटणें झालें तर नेमलेल्या दिवशीं मात्र भेटावें. विद्यामंदिरांतील माणसांनीं, प्रत्येकानें, अमुक अमुक रीतीनें वागावें ह्मणून लेखी नियम करून ठेवले होते व त्या प्रमाणें सक्त अमलबजावणी होत असे. या प्रमाणें व्यवस्था करून यथाविधीनें त्याची वास्तुशांति मोठ्या वैभवानें झाल्यावर त्यांत अध्यापन चालूं झालें.

**या** नंतर जोशास बोलावून, दक्षिणा देऊन, सुप्रसन्न करून, चांगला शुभ दिवस पाहून व पुण्याहवाचन करून, राजानें कुसुमायुधाला विद्यामंदिरांत नेऊन, अभ्यासासाठीं आचार्यांच्या स्वाधीन केलें. लगेच अभ्यासास सुरवात झाली. पृथक् पृथक् अभ्यासासाठीं पृथक् पृथक् वेळ नेमून ठेवला होता. इतर विद्यार्थ्यांच्यापेक्षां कुसुमायुधाची बुद्धि आचार्यांस

विशेष चमत्कारमय भासली. आपल्या उपदेशाचें सार्थक होण्यासारखीं पात्रें मिळालेलीं पाहून त्याचे गुरु विशेष काळजीनें व उत्सुकतेनें त्यांस शिकवूं लागले. ज्याप्रमाणें चंद्राचे किरण सर्व पृथ्वीवर सारख्याच तेजानें प्रकाश टाकीत असतांही, स्फटिकाचे भूमीवर त्यांचा कांहीं अपूर्व चमत्कारमय चकचकाट दृष्टीस पडतो; ज्याप्रमाणें पाउसाच्या धारा पृथ्वी-वर सर्वत्र सारख्या पडत असूनही, चांगल्या जमिनींत विशेष फलप्रद होतात; ज्याप्रमाणें वैद्याची रसायनौषधें घेतलीं असतां सर्व माणसांच्या शरीरामध्यें एकसारखीच क्रिया करतात, तरी पंचकर्मांनीं शुद्ध झालेल्या माणसाच्या शरीरांत विशेष प्रभाव दाखवितात; ज्याप्रमाणें नाट्यपात्रांचे अभिनय सर्व जनसमाजाला थक्क करून सोडतात तरी सहृदय रसिकाच्या मनांत कांहीं अलौकिक ठसा उमटवितात; आणि ज्याप्रमाणें कोकिलाचा पंचमस्वर सर्वांच्या कानावर सारखाच येत असूनही विरही मनु-ष्याच्या मनावर मात्र निराळाच चमत्कारिक विकार उत्पन्न करतात; त्याचप्रमाणें आचार्यांनीं सांगीतलेल्या विद्यांचें व कलांचें शिक्षण, सर्व विद्यार्थ्यांस सारखेंच मिळत असतां, कुसुमायुधाचें मनावर कांहीं चमत्कारिक प्रभाव दाखवूं लागलें. प्रत्येक विद्या व कला जणों कुसुमायुधाच्या हृदयांत प्रवेश करण्यांत आपण एकटीच मागें राहिलों तर त्यांत हीण आहे असेंच समजत होती; जणों दुसरीच्या अगोदर आपणच अगोदर प्रविष्ट झालों तर हा मोठा मान मिळाला असें समजत होती; जणों पहिल्यानेंच आपण प्रविष्ट होऊन त्याच्या शुद्ध हृदयाच्या स्पर्शसुखाचा आनंद एकटीच मिळवूं असें इच्छित होती; जणों, अनेक विद्या व कला त्याच्या हृदयांत शिरून सर्व प्रदेश अडवून टाकल्यावर आ-पल्यास जागा कोठून मिळेल ह्मणून धास्तीनें इतरांच्या अगोदर पुढें सरण्यास पहात होत्या, आणि जणों, पहिल्यानें प्रविष्ट होऊन, आपापल्या मानाचा विशेष हक्क आहे असें दाखविण्यास उत्कंठित आहेत अशा बुद्धीनें अहं-

पूर्विका भाव धरूं लागल्या. ज्याप्रमाणें मोठमोठ्या वस्तुंसही दर्पणामध्यें प्रवेश करण्यास मुळींच कठिण पडत नाहीं आणि मोठमोठ्या शक्तीसही राजशक्तींत प्रवेश करण्यास वेळ लागत नाहीं त्याप्रमाणें मोठमोठ्या विद्यांस आणि कलांसही कुसुमायुधाच्या हृदयांत प्रवेश करण्यास कांहींच वेळ किंवा काठिण्य लागलें नाहीं.

शत्रुजितानें सहा सहा महिन्यांनीं विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्याचा समारंभ करण्याचें ठरविलें. याशिवाय वेळोवेळीं मनोरमेसहित विद्यामंदिरांत जाऊन तो विद्यार्थ्यांस उत्तेजन देत असे. साहा महिने भरले ह्मणजे एक मोठी सभा भरवीत असे, आनंदाचीं वाद्यें वाजत असत, व भाऊबंद, मंत्री, सेनापति, व्यापारी, शेटसावकार आणि इतर प्रतिष्ठित लोक यांचा मोठा समदाय एकत्र होऊन, महासागरासारखा देखावा दिसत असे. स्त्री व पुरुष यांची परस्पर दृष्टादृष्ट न होय पण विद्यार्थि समुदाय मात्र सर्वांच्या दृष्टीस पडे अशी व्यवस्था मुद्दाम केली होती. सुशोभित विद्यामंदिरास ध्वजा, पताका वगैरे उभारून, विशेष शृंगारण्यांत येत असे. तेजस्वीपणांत सूर्याप्रमाणें, आल्हादामध्यें चंद्राप्रमाणें, चंचलतेमध्यें मनाप्रमाणें, पुरुषार्थांमध्यें मोक्षाप्रमाणें, ऋतूमध्यें वसंताप्रमाणें, जलाशयांत समुद्राप्रमाणें, वृक्षामध्यें आंब्याप्रमाणें, वक्त्यामध्यें बृहस्पतिप्रमाणें, पुष्टिकारक पदार्थांमध्यें दुधाप्रमाणें, रसामध्यें शृंगार आणि पारद यांच्या प्रमाणें, मंत्रामध्यें प्रणवाप्रमाणें, नीतिज्ञामध्यें शुक्राप्रमाणें व आत्मानुभवाच्या उपयोगित्वामध्यें योगाप्रमाणें, परीक्षा देणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांमध्यें कुसुमायुध सर्वोत्तम गणला जात असे. जसजशीं वर्षें गेलीं तसतशी कुसुमायुधाची विद्या, उपयुक्त वस्तूच्या लक्ष्मीप्रमाणें, नीतिज्ञाच्या शक्तीप्रमाणें, योगाभ्यासाच्या सिद्धीप्रमाणें, मुमुक्षूच्या ब्रह्मविद्येप्रमाणें, व्यभिचाऱ्याच्या अपकीर्तिप्रमाणें, उदाराच्या कीर्तिप्रमाणें, व्यसनी मनुष्याच्या अवलक्ष्मीप्रमाणें, खर्चिकाच्या अवदशेप्रमाणें, विवेकी जनाच्या सुदशेप्रमाणें,

ग्रीष्माच्या उष्णतेप्रमाणें आणि सज्जनाच्या मैत्रीप्रमाणें वृद्धि पावूं लागली.

अकराव्या वर्षी क्षत्रियांच्या धर्माप्रमाणें, थोड्या दिवसांची रजा घेऊन कुसुमायुधाचा व्रतबंध करविला. ते वेळीं मोठा खर्च करून समारंभ केला होता. व्रतबंधक्रिया झाल्यानंतर लागलीच त्याला फिरून विद्यामंदिरांत पाठविलें.

तारांमध्यें चंद्राप्रमाणें, मण्यांमध्यें कौस्तुभाप्रमाणें, तत्वज्ञान्यांमध्यें ब्रह्मवेत्याप्रमाणें, पुष्पांमध्यें धवल कमलाप्रमाणें, आणि गुणामध्यें विवेका प्रमाणें सर्व सहाध्यायींमध्यें कुसुमायुध विशेष शोभूं लागला, व्याकरणशास्त्र सहोदराप्रमाणें त्याची सेवा करूं लागलें, न्यायशास्त्र मित्राप्रमाणें खरा मान देऊं लागलें, धर्मशास्त्र संबंधीप्रमाणें सोईसोईनें वागूं लागलें, गणितशास्त्र स्नेहाप्रमाणें प्रेम दर्शवूं लागलें, नीतिशास्त्र अनुचराप्रमाणें अनुसरूं लागलें, वेदांतशास्त्र वगवशेल्याप्रमाणें वश्य होऊन राहिलें, साहित्यविद्या वनितेप्रमाणें विनोद देऊं लागली, आणि आयुधविद्या अर्धांगनेप्रमाणें आधीन होऊन बसली.



# प्रकरण ८ वें.

## चौसष्ट कला.

१ गायन, २ नृत्य, ३ वाद्य, ४ लेख्यं[1], ५ विशेषकच्छेद्यं[2], ६ चित्रक्रिया, ७ तंदुलादिबलिप्रकार[3], ८ पुष्पास्तरण[4], ९ दशनवसनांगराग[5], १० बलिभूमिका कर्म[6], ११ शयनरचना, १२ उदकवाद्य[7], १३ उदकाघात[8], १४ चित्रयोग[9], १५ माल्यग्रंथ विकल्प[10], १६ शेखरापीड योजन[11], १७ नेपथ्यप्रयोग[12], १८ कर्णपत्रभंग[13], १९ सुगंधयुक्ति, २० भूषणयोजन, २१ इंद्रजाल, २२ रूपपरीक्षा[14], २३ पाकक्रिया, २४ कौचुमारयोग[15], २५ हस्तलाघव[16], २६ पानक रसराग योजन[17], २७ सूचिकर्म[18], २८ सूत्रक्रीडा[19], २९ प्रहेलिका[20], ३० प्रतिमाला[21], ३१ दुर्वाचकयोग[22],

---

१ लेखनचातुर्य. २ टिकल्या वगैरे तोडण्याची रीत. ३ देवळांत तांदुळाचें किंवा फुलांचे स्वस्तिक वगैरे आकृति काढणें. ४ फुलांची शय्या करणें. ५ दांत, कपडे वगैरे रंगविण्याची रीत. ६ उत्तम बैठकी घालणें. ७ जलतरंग इत्यादि जलवाद्यें. ८ पोहणें, पिचकारी मारणें, सुगंधि पाणी बनविणें इत्यादि. ९ चमत्कारिक प्रयोग करणें. १० फुलें गुंफण्याची रीत. ११ नाना प्रकारचीं पागोटीं बांधण्याची व टोप्या शिवण्याची रीत. १२ शृंगार करण्याची रीत. १३ कर्णफुलें वगैरे बनविणें. १४ सामुद्रिकादिकावरून रूपपरीक्षा. १५ पौष्टिक औषधें तशींच अंगकृष्टतेचीं औषधें वगैरे प्रीति उत्पन्न करणारे आणि शरीराला बरें करणारे उपाय. १६ वस्तु नाहींशी करण्याची हातचलाखी. १७ सरबतें मद्यें वगैरे बनविण्याची रीत. १८ शिवण्याची व कशिदे काढण्याची युक्ति. १९ दोरीवरून चालणें. २० विनोदी सभेमध्यें स्पष्टाक्षरें बोलून सुद्धां अर्थ गुप्त राही असें भाषण करण्याची रीत. प्रहेलिकेसंबंधें काव्यादर्श ग्रंथाच्या तिसऱ्या परिच्छेदामध्यें सत्याण्णवव्या कारिकेपासून व्याख्यान केलें आहे. थोडक्यांत, प्रहेलिक

३२ प्रतिमाकरण[२३], ३३ पुस्तकवाचन, ३४ नाटकाख्यायिकादर्शन[२४], ३५ काव्यसमस्यापूरण, ३६ पट्टिकावेत्रवान विकल्प[२५], ३७ तर्कुकर्म[२६], ३८ तक्षण[२७] कर्म, ३९ वास्तुविद्या[२८], ४० रूप्यरत्न[२९] परीक्षा, ४१ आकर[३०]-ज्ञान, ४२ धातुवाद[३१], ४३ मणिरागज्ञान[३२], ४४ वृक्षायुर्वेदयोग[३३], ४५ मेशकुक्कुट[३४]लावकयुद्धविधि, ४६ शुकसारिकाप्रलापन[३५], ४७ उत्सादन[३६] प्रसादन, ४८ अक्षरमुष्टिकथन[३७], ४९ म्लेच्छितक[३८] विकल्प. ५० देशभाषा-

---

म्ह० उखाणें. पखाल म्हणून सांगणें असेल तर " रिकामे पोटी जाते व भरले पोटी येते " असें बोलणें.

२१ कविता ह्मणणारीं मुलें समोरासमोर उभी राहून दाव्याप्रमाणें कविता म्हणतात तें; ह्मणजे एकानें एक कविता ह्मटली कीं दुसऱ्यानें तिच्या शेवटला शब्द पहिल्याने येईल अशी दुसरी कविता म्हणणें. या प्रमाणें करतां करतां जो हटेल तो हरला असें समजतात.

२२ जें वाक्य किंवा शब्द जलदीनें वारंवार बोलतांना गडबड होते तें वाक्य किंवा ते शब्द बरोबर बोलतां येणें. उदाहरणार्थ—" फाटका मुकटा " हे शब्द लौकर लौकर बोलतांना धांदल उडून चुका होतात त्या न होऊं देणें.

२३ मेण किंवा माती यांचे माणसें, पशु, पक्षी वगैरेंचे पुतळे बनविणें.

२४ नाटक किंवा आख्यान वगैरेचे बरोबर प्रयोग करून दाखविणें.

२५ टोपली वगैरे वेताचें काम करणें.

२६ कांतण्याची व चाकडीवर चढवून सोनेरी वगैरे गुंडाळण्याची रीत.

२७ सुतार काम. २८ इमारती बांधण्याचें काम. इजनेरी काम.

२९ शिक्के व जवाहिर वगैरेची परीक्षा.

३० स्फटिक आणि रत्नें वगैरेच्या खाणी काढण्याची रीत.

३१ मातींतून धातु शोधण्याचा उपाय.

३२ डागिन्यास रंग देणें व डाक करणें.

३३ झाड पान वाढविण्याची व त्यांचे रोग दूर करण्याची रीत.

३४ बोकड, कोंबडे, तित्तिर वगैरे लढविण्याची युक्ति.

३५ मैना, पोपट वगैरेस पढविण्याची युक्ति.

३६ शरीर धुऊन स्वच्छ करण्याची व अभ्यंगोपचार करण्याची रीत.

३७ करपल्लवी भाषा. हाताच्या बोटांच्या अक्षरसंज्ञांच्या रूपानें कल्पलेल्या

विज्ञान[३९], ५१ मानसी[४०] चिंता, ५२ छलितक[४१]योग, ५३ वस्तुगोपन, ५४ द्यूत[४२]-विशेष, ५५ बालक्रीडनक[४३], ५६ वैनयिकी विद्या[४४], ५७ वैजयिकी विद्या[४५], ५८ व्यायामिकी[४६] विद्या, ५९ आकर्ष[४७] क्रीडा, ६० यंत्रमातृका[४८], ६१ धारणमातृका[४९], ६२ छंदोज्ञान[५०], ६३ केशसंमार्जन[५१] आणि ६४ अभिधान कोश; या नांवांच्या चौसष्ट कळा जणों कुसुमायुधाच्या जन्माबरोबरच जन्म पावल्या, कुसुमायुधाच्या आश्रयास राहण्यांतच मान समजत होत्या, त्याच्या तर्कशक्तीनें आपल्या संख्येमध्यें कांहीं वाढ होईल अशी उत्कंठा धरीत होत्या, आणि त्याच्या मनाच्या सहवासानें विशेष गांभीर्याचें शिक्षण प्राप्त करून घेऊं इच्छित होत्या असें दिसून आलें.

---

चाळ्यांनीं आशय समजावून देणें. ३८ दुसऱ्यास न समजूं देण्यासाठीं भाषेंत फेरबदल करून बोलण्याच्या रीति. उदाहरणार्थ चकारी भाषा. 'कातर' म्हणून बोलणें झाल्यास चका चत चर असें बोलावयाचें. किंवा शद्वविपर्यय भाषा. 'कंदील' बोलणें झाल्यास "लंदीक" बोलावयाचें, वगैरे.

३९ निरनिराळ्या देशांतल्या भाषा जाणणें.

४० परक्याच्या मनांतली गोष्ट ओळखणें.

४१ उलटें सुलटें सांगून व फसवून छळण्याचे उपाय.

४२ नानाप्रकारचे जुगार खेळयाच्या रीति.

४३ मुलांचे खेळ खेळण्याच्या पद्धतींचें ज्ञान.

४४ सभ्यता राखण्याची व प्रत्येक जातीचें शिक्षण देण्याची रीत.

४५ लष्कराच्या शिपायांस व घोडे वगैरेस कवाईत शिकण्याची रीत.

४६ कसरत व दंड काढणें, जोडी करणें वगैरे ज्ञान.

४७ सोंगट्या, बुद्धिबळें वगैरे खेळण्याच्या पद्धतीचें ज्ञान.

४८ अनेक प्रकारचीं यंत्रें बनविण्याची रीत. असें सांगतात कीं या विषयावर विश्वकर्म्यानें एक ग्रंथ रचलेला आहे.

४९ अष्टावधान शतावधान वगैरे साधण्याची युक्ति.

५० इंद्रवज्रा वगैरे गणवृत्तें व आर्या वगैरे मात्रावृत्तें रचण्याचें ज्ञान.

५१ केश स्वच्छ व सुंदर आकाराचे करण्याची रीत.

५२ निरनिराळ्या भाषांच्या शब्दकोशाचें संपूर्ण ज्ञान.

# प्रकरण ९ वें.

## स्वारी.

कुसुमायुध जसा तेजस्वी जनांमध्यें, रूपवानांमध्यें, विवेकी जनांमध्यें, राजकुमारांमध्यें आणि भाग्यशाली लोकांमध्यें पहिल्या प्रतीचा झाला होता तसाच तो विद्यार्थ्यांच्या परीक्षेंत सुद्धां पहिल्याच पदाला येऊन पोंचला. त्याची सुशीलता कीर्तिबरोबर वाढूं लागली. अवयव गुणांबरोबर पुष्ट होऊं लागले. बळ आकृतीबरोबर उन्नति पावूं लागलें. ऊर तर्कशक्तीबरोबर विस्तीर्ण होऊं लागलें. कांति कळांबरोबर चमत्कार दाखवूं लागली. हृदय स्वराबरोबर गंभीर होऊं लागलें. मांड्या मातापित्यांच्या मनोरथाबरोबर पूर्ण होऊं लागल्या. रोमावली प्रतापाबरोबर उदय पावूं लागली. स्कंध मनाबरोबर मजबूद होऊं लागले. मुख आचार्याबरोबर प्रसन्न होऊं लागलें. नेत्र आचाराबरोबर उज्वळ दिसूं लागले. बाल्य चापल्याबरोबर लय पावूं लागलें. मिशा यौवन विकारांबरोबर अंकुरित होऊं लागल्या. आणि पराक्रम विद्यांबरोबर प्रौढदशेस येऊं लागला. तो टिपलेलीं निशाणें शत्रूच्या अंतःकरणाबरोबर मारूं लागला, उत्तम उत्तम घोडे कामिनींच्या हृदयाबरोबर फिरवूं लागला, सिंह व्याघ्रांस मातापित्यांच्या संतापाबरोबर कापून काढूं लागला, आणि मोठमोठ्या हात्तींस सुद्धां सर्व लोकांच्या मस्तकांबरोबर कंपायमान करूं लागला.

कुसुमायुधामध्यें यौवनाच्या विकासाबरोबर सर्व विद्या आणि कळा यांचा विकासही अपूर्व गौरवाप्रत प्राप्त होतांच, आपले परिश्रम सफळ झालेसे मानून, जणों अमृताच्या पुरांत मग्न झाले असावे, मेरु पर्वताच्या शिखरावर जणों पोंचले असावे, नव्या निधीप्रत जणों प्राप्त

झाले असावे, सगळ्या सिद्धीप्रत जणों पावले असावे, चिंतामणि मंत्राला जणों वश करून घेतलें असावें, आणि ब्रह्मविद्येच्या भूमिकेचें पद जणों भोगूं लागले असावे असा लोकोत्तर आनंद पावलेले आचार्यांनीं, एक चिठी लिहून, शत्रुजित राजाला विद्यार्थ्यांची शेवटली परीक्षा घेण्याचा समय येऊन पोंचल्याची सूचना दिली. ही सूचना मिळतांच शत्रुजित व मनोरमा यांच्या हृदयांत न सामावणाऱ्या आनंदाचा पूरच जणों वाहूं लागला अशा रीतीनें त्यांच्या डोळ्यांतून हर्षाश्रूंच्या धारा चालू झाल्या; शुभवृत्तांतरूप अमृताच्या धारांच्या शैत्यानें जणों व्याकुळ झालीं असावीं अशा रीतीनें तीं रोमांचित होऊन गेलीं; आणि आनंदरूपी पर्वताच्या शिखरापर्यंत पोंचल्यानें जणों थकून गेलीं असावीं अशा रीतीनें शरीराचें सर्व भान विसरून गेलीं.

शत्रुजितानें मनोरमेच्या व मंत्र्यांच्या सल्यानें परीक्षा घेण्याचा दिवस मुक्रर करून विद्यामंदिराच्या आचार्यांस खबर दिली आणि परीक्षेच्या समारंभाच्या आनंदामध्यें आपापला भाग येऊन घेण्याविषयीं आमंत्रणपत्रिका पाठवून, देशोदेशींचे राजे, मोठमोठे व्यापारी, व दुसरे कित्येक संभावित गृहस्थ यांसही बोलाविलें. थोड्याच वेळांत ते सर्व आपापल्या कुटुंबासहित बनारस एथें येऊन हजर झाले. आलेल्या पाहुण्यांचा यथोचित आदरसत्कार करून निरनिराळ्या ठिकाणीं त्यांस राहण्यास जागा दिल्या. सर्वांची बरदास्त राहावी ह्मणून एकेका ठिकाणाकरतां निरानिराळ्या कारकुनाची नेमणूक करण्यांत आली. यावेळीं माणसांची व गाड्याघोड्यांची खूप गर्दी होऊन गेल्याकारणानें बनारस नगरीचा देखावा कार्तिक महिन्यांतील पुनवेच्या रात्रींच्या महासागरासारखा दिसूं लागला. हत्तीचा चीत्कार, घोड्यांच्या खिंकाळण्याचा खणखणाट, आणि गाड्यांचा घडघडाट, यांच्या योगानें बनारस नगरी वर्षाऋतूंतील मेघमंडळाप्रमाणें गजबजून गेली.

शत्रुजित्‌राजानें सर्व पाहुण्यांची व शहरच्या मोठमोठ्या लोकांची मोठी भव्य सभा भरविली व ती भरविण्याचा उद्देश जाहीर केला. ते वेळीं दुसरे दिवशीं सूर्योदय होतांच विद्यामंदिरांत सर्वांनीं जमावें असें ठरवून सभा विसर्जन झाली. तेथें आलेल्या राजेरजवाड्यांनीं व प्रतिष्ठित लोकांनीं भागीरथीच्या पाण्यांत स्नान केलें, विश्वेश्वराचें पूजन केलें, खाणें पिणें आटपलें, आपापल्या सैन्याला व बरोबरच्या लोकांस मोठ्या पहाटेला तयार असण्याविषयीं हुकूम केला; इतकें झाल्यावर ते आपापल्या नेमल्या ठिकाणावर निद्रासुख घेण्यास निघून गेले. शत्रुजित्‌सुद्धां, विद्यामंदिरास जाण्याची, सभासदांस आणि विद्यामंदिराच्या आचार्यांस मान देण्याची आणि विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्याची वगैरे तजवीज करण्यांत कांहीं वेळ घालवून व नेहमींच्या नियमाप्रमाणें भोजन करून, मनोरमेच्या विलासगृहामध्यें गेला. पलंगावर निजलीं असतांही पुत्राचा महोदय पाहण्याच्या उत्सुकतेमुळें त्या दंपतीस झोंप मुळींच आली नाहीं. आनंदाच्या गोष्टी आणि विलासक्रीडा ह्या समाप्त न होतां रात्र मात्र समाप्त होण्याचा सुमार आला.

पहाटेची एक प्रहर रात्र उरली असतां उदय पावलेल्या चंद्राच्या किरणांनीं पूर्वदिशेला शृंगारण्यास आरंभ केला; अंधकारामुळें मंदिरास आलेल्या शामलतेला पुसून काढून त्याच्या ठिकाणीं श्वेतपणाचा हात देण्याला सुरवात केली; अंधकाराचा नाश करण्यास असमर्थ असल्याकारणानें तान्यांवर रागावून त्यांस एकामागून एक कैद करण्यास आरंभ केला; आणि अंधकारास लपवून ठेवल्याच्या भ्रांतीमुळें आकाशाची जणों झडती घेत आहेत अशा रीतीनें वर्तणूक चालविली. मानवतीच्या हृदयाला विंधून टाकण्यासाठीं चंद्रमंडळावरून जणों फेंकलेल्या या बरच्याच आहेत अशा रितीनें ते किरण दिसूं लागले. चंद्राचे किरण चहोंकडे फैलावल्यामुळें दिशा जणों चंदनाच्या आणि कापुराच्या चूर्णानें घासण्यांत येत

आहेत आणि रात्र जणों अमृतमय यौवनानें भरपूर भरून गेली आहे अशी दिसूं लागली. जार पुरुषांच्या घरांतून सावलींत चालत जाणाऱ्या व आपापल्या घरीं पोंचण्यास उत्सुक झालेल्या अभिसारिका चंद्राच्या प्रकाशाचा स्पर्श सुद्धां चांडाळाच्या स्पर्शाप्रमाणें गणूं लागल्या. भागीरथीच्या प्रवाहांत प्राप्त झालेला प्रकाश, उत्तम कुळांत प्राप्त झालेल्या वैभवाप्रमाणें, शोभूं लागला. आणि प्रकाशामुळें शुभ्र झालेल्या पानांनीं युक्त आणि दंवाचे बिंदु पाझरणारे वृक्ष गलत्कुष्ठी रोग्यांसारखे भासूं लागले. वृक्षांवर निजलेले पक्षी वाऱ्याचा शीतल स्पर्श लागल्यानें जागे होऊन किलबिल करूं लागले. जसा व्यापारी दुसऱ्याच्या धनाच्या आश्रयानें आपली संपत्ति वाढवितो तसा समुद्र चंद्राच्या प्रकाशाच्या आश्रयानें आपलें पाणी वाढवूं लागला. खंडचंद्र, जणों विरही लोकांच्या वधासाठीं कामदेवानें बाण लाविल्यामुळें वांकविलेलें धनुष्यच होय, जणों कल्लोळाच्या तडाक्यामुळें दोहोंबाजूला वाकलेला आकाशगंगेंतील कमलाचा देंठ होय, जणों मानवतीच्या हृदयांतला मान खेंचून बाहेर काढण्यासाठीं कामदेवानें तयार केलेलें दोनही टोंकाला तीक्ष्ण धार दिलेलें रुप्याचें संदंशयंत्रच होय, आणि त्रैलोक्याला जिंकण्याची सिद्धि मिळविण्यासाठीं कामदेवानें जणों पूजण्याकरतां मांडलेल्या ॐकार मंत्राच्या वरलें चंदनमय अनुनासिक चिन्ह होय, असा दिसूं लागला.

थोड्या वेळानंतर हा चंद्र, जणों पाठी मागून भोसकणारे अरुणाचे किरण हेच भाले त्यांनीं पीडित झाला असावा अशा रीतीनें आकाशांत दूर दूर पळूं लागला; विरही जनांस व्यथित करण्याच्या पापानें जणों पश्चात्ताप पावत आहे अशा रीतीनें निस्तेज दिसूं लागला; अरुणाच्या लाल किरणांच्या स्पर्शानें आपल्या उज्वल किरणांस जणों डाग पडेल अशी शंका मनांत आणून आपल्या किरणांस आंखडून घेऊं लागला; आपल्या आवडत्या प्रिय पूर्वदिशेला अरुणाच्या रागांत लंपट झालेली

पाहून जणों खेद पावला आहे अशा रीतीनें निस्तेज होऊं लागला; आणि सूर्यरूपी शत्रु आपल्या पाठीमागें चालून येत आहे असें जाणून, जणों भय पावूनच, आपल्या रात्रिरूप स्त्रीला बरोबर घेऊन आकाशरूपी गहन वनांत लपण्यास पाहत आहे असा भासूं लागला. कोंबडे जणों आपल्या तुऱ्यांच्या लालीबरोबर अरुणाची लाली मिळवून पाहतां जणों खुश होऊन गेले आहेत अशा प्रकारें आरवूं लागले; आणि त्या कोंबड्याच्या या आरवण्यानें, कामिजनांच्या कुशींत शिरलेल्या कामिनींस उठून जाण्याविषयीं खोटे चाळ्यांच्या रूपानें स्त्रीचरित्राची प्रतीति येऊं लागली. पूर्वदिशा, अरुणाच्या प्रकाशावरून सूर्यरूप पतीच्या आगमनाची सूचना मिळतांच, जणों माणिक्यांचा शृंगार करूं लागली काय अशी झळकूं लागली. तारका, निरुद्योगी मनुष्यांप्रमाणें क्षीण होऊं लागल्या. ताऱ्यांच्या क्षीणपणामुळें धर्मकृत्यांस प्रवर्तविणाऱ्या सूर्यनारायणाच्या आगमनाची सूचना मिळाल्यानें उत्पन्न झालेल्या आनंदामुळें गृहस्थांच्या घरांमध्यें जणो मृदंगच वाजत आहेत अशा रीतीनें दहीं घुसळण्याचा शब्द होऊं लागला. वायु, प्रफुल्लित होऊं लागलेल्या कमळांच्या सुगंधानें युक्त आणि तुषारबिंदूंच्या संसर्गानें अति शीतल असतांही, कामी पुरुषांच्या वक्षःस्थळावर निजलेल्या प्रियतमांच्या हृदयांमध्यें दाहज्वर उत्पन्न करूं लागला. प्राणवल्लभांनीं केलेल्या अनेक प्रकारच्या मनधरणीनें व चरणपातांनीं सुद्धां सैल न झालेला, कामदेवाच्या शस्त्रांनीं सुद्धां न कापला जाणारा, स्वपतींनीं केलेल्या प्रतिमानानें सुद्धां न ढळलेला, चंद्राच्या किरणांच्या शीतलतेनें सुद्धां कांपित न झालेला, यौवनाच्या भेडसावण्यानेंही भयभीत न झालेला आणि सख्यांच्या प्रपंचानेंही न हटलेला, मानवतींचा मान, प्रभातसमयींच्या वायूच्या मंदलहरीनेंच, क्षणार्धांत लोपूं लागला. जणों स-काळचे प्रहरीं विष्णुसहस्रनामाचा जप करण्याऐवजीं, त्याचा पुत्र जो कामदेव त्याच्या असंख्य नांवाचा जप करीत आहे काय अशा प्रकारें कोयाळ

कूजितध्वनि करूं लागली. सूर्यरूप पतीला वरण्याला तयार झालेली पूर्व दिशा हीच कन्या, जणों गृहशांति करण्याला बसली आहे काय अशा प्रकारें, संधिप्रकाशाची लाली हाच अग्नि त्यामध्यें, तारकारूप तांदुळाचा होम करूं लागली. कमळें, प्रभातसमय प्राप्त झाल्याचा महोत्सव जणों करीत आहेत काय अशा प्रकारें प्रसन्नांतःकरण होत्साती भ्रमररूप कैद्यांची मुक्तता करूं लागलीं. चंद्र मधमाशाशिवायच्या मोहाळाप्रमाणें दिसूं लागला. विरहपावलेल्या चक्रवाक पक्ष्यांस आश्वासन मिळूं लागलें. कमलिनी महोत्सवाची सिद्धता करूं लागल्या. चकोरी चिंतेनें घेरून जाऊं लागली. पक्षी मौनव्रत सोडून देऊं लागले. पूर्वदिशा वासकसज्जानायिकेप्रमाणें दिसूं लागली. कुमुदिनी मूर्छित होऊं लागल्या. वेश्या, आपल्या सुटून गेलेल्या केशकलापांस व वस्त्रांस सांवरीत सांवरीत, कामिजनांच्या मंदिरांतून बाहेर येऊं लागल्या. भ्रमर कुमुदिनीस लाथ मारून कमलिनीकडे जाऊं लागले. कामदेव धनुष्याच्या दोरीचा टणत्कार गप्प करूं लागला. कवींच्या काव्यांतील चमत्कार प्रतिभात होऊं लागले. हत्ती सांखळ्यांस खळखळावूं लागले. घोडे पायांच्या खुरांनीं डोळ्यांचे कोपरे खाजवूं लागले. अंधकार जणों समाधि लावण्यास इच्छितो आहे अशा प्रकारें गुहांत शिरूं लागला. आकाश शरद् ऋतूंतील जलाशयाप्रमाणें प्रसन्न होऊं लागलें. परिश्रमांनीं थकून गेलेल्या युवती अगाशीवर उपवनाच्या पवनाचें सेवन करूं लागल्या. राजद्वारीं प्रभातकाळचा चौघडा झडूं लागला. देवळांतून घंटांचे ध्वनि होऊं लागले. वैदिक ब्राह्मणांच्या घरीं वेदघोष ऐकूं येऊं लागला. आणि बंदिजन दरबारांत येऊन शयनमंदिराखालीं वीणा मृदंग इत्यादिकांनीं **शत्रुजित्** राजाला जागृत करण्यासाठीं गायन करूं लागले.

**शत्रुजित्**राजानें नित्याच्या नियमाप्रमाणें जागा होऊन विश्वेश्वराचें स्मरण केलें, आणि शयनगृहांतून बाहेर येऊन शारीरिक विधि आटोपला; नंतर उष्णोदकानें स्नान केलें; प्रभातकाळचें शिवपूजन केलें;

वाजीकरणाचीं औषधें सेवन केलीं; आलेल्या मंत्र्याबरोबर विद्यामंदिरांत जाण्याच्या प्रसंगासंबंधी व्यवस्था लावून दिली; आणि गंभीर व प्रौढ पोशाकाचें अंगावर परिधान करीत करीत, आपल्या सैन्याला तसेंच सर्व पाहुणे मंडळीला सूचना देण्यासाठीं मोठा शंखनाद करविला. त्या शंख-नादानें राजमार्ग, गल्ल्या, बगीचे, देवळें, तंबू, शहरच्या बाहेरील छा-वण्या, वगैरे एकूणएक ठिकाणीं, विश्वरूपाची उपासना करणाऱ्या यो-ग्याप्रमाणें, एकाच वेळीं पोंचून, सर्व लोकांस सूचना दिली. सूचना मिळ-तांच राजेरजवाडे, मंत्रीजन, व्यापारी लोक आणि दुसरे संभावित गृहस्थ तयार होऊन, निरनिराळ्या वहनांवर आरूढ होऊन, शत्रुजित्‌राजाच्या दरबारांत येऊन दाखल झाले. कित्येकांनीं तर परभारेंच विद्यामंदिरांत जाण्याचा निश्चय केला होता. पाहुणे मंडळीच्या स्त्रिया मनोरमेच्या बसाउठाच्या मंदिरांत येऊन, तिला नमस्कार करून व आपापल्याला योग्य तो मान पावून, तिच्या शेजारीं बसल्या. मनोरमेच्या रूपाला, सौकुमार्याला, सौभाग्याला, औदार्याला, गांभीर्याला, विवेकाला आणि त्या मंदिराच्या वैभवाला पाहून, स्त्रिया, जणों विस्मयाच्या पूरांमध्यें पोहत आहेत, आनंद समुद्रामध्यें जाणों बुड्या मारीत आहेत, इंद्राणीच्या मं-दिरांतच जणों बसल्या आहेत, आणि जगदंबेकडून मान पावल्या जात आहेत, अशा प्रकारें भासूं लागल्या. राजेरजवाड्यांच्या तयारींत अस-लेल्या, सैन्यांमध्यें उठलेल्या, उठणाऱ्या, खेंचून धरलेल्या, खेंचलीं जा-णाऱ्या, शृंगारलेल्या, शृंगारलीं जाणाऱ्या, जोडलेल्या, जोडलीं जाणाऱ्या, घेऊन येणाऱ्या, घेऊन जाणाऱ्या, एके बाजूला सारलेल्या, सारलीं जा-णाऱ्या, येणाऱ्या, आलेल्या, स्थिर उभीं राहिलेल्या, मस्ती करणाऱ्या, स्वारांची वाट न पाहणाऱ्या, स्वार वर बसलेल्या, पुढें सरणाऱ्या, मागें हटणाऱ्या, भडकणाऱ्या, नेमक्या जागेंत न सामावणाऱ्या, गर्दींत चाल-विण्याची चिंता उत्पन्न करणाऱ्या, स्वारांस ओढून नेणाऱ्या, रक्षकांस

घाबरविणाऱ्या, स्वारांच्या हातीं न राहणाऱ्या, गर्जना करणाऱ्या, खणखणाट करणाऱ्या, आणि एकमेकांशीं चढाओढी करणाऱ्या अनेक प्रकारच्या वाहनामुळें आश्चर्यकारक देखावा दृष्टीस पडूं लागला. शिपायांचे तांबडे, पिंवळे, काळे, पांढरे, हिरवे, भुरे, वगैरे जातजातीच्या रंगाचे लष्करी सोनेरी पोषाक, आणि तरवार, खंजीर, भाले, बर्च्या वगैरे अनेक प्रकारचीं आयुधें अपूर्व चकचकाट करूं लागलीं. प्रत्येक बिऱ्हाडांतून सैन्य बाहेर निघूं लागतांच, सगळी नगरी, जणों गजमय, अश्वमय, गवयमय, रथमय, सैनिकमय, आयुधमय, शृंखलामय, रश्मिमय, खुरमय, पर्वतमय, गरुडमय, सुवर्णमय, कोलाहलमय, गतिमय, लोहमय, मणिमय, आणि ब्रह्मांडमय असावी अशी दिसूं लागली.

शत्रुजित् राज्यानें सुद्धां आपल्या अद्भुत सैन्याला तयार केलें, व आपण स्वतः हत्तीच्या अंबारीमध्यें बसला. मग राणीची पालखी आणि पाहुण्या स्त्रियांचीं वाहनें यांची व्यवस्था सैन्याच्या मध्यभागीं केली. फिरत्या चौकीचा बंदोबस्त करून घोडेस्वार झालेल्या राजांस व मंत्र्यांस आपल्या हत्तीच्या आसपास ठेवलें. सैन्याच्या बंदोबस्तासाठीं अनेक छडीदारांस चहोंकडें फिरतें राहण्यास सांगिलें. सैन्यासहित कांहीं दूर पुढें जाऊन दुसऱ्या राजांच्या सैन्याला बरोबर मिळवून घेतलें. याप्रमाणें शहरच्या दरवाजाकडे मोठ्या धामधुमीनें तो चालू झाला. कित्येक राजे, राजकुमार, आणि थोर गृहस्थ ज्यांस सवड न मिळाल्यामुळें शत्रुजितराजास दरबारांत भेटण्याची संधि मिळाली नव्हती ते या समयीं जसजशी संधि मिळत गेली तसतसे चहोंकडून शत्रुजितराजाच्या हत्तीच्या पुढें येऊन प्रणाम करूं लागले आणि मुख्य छडीदार त्या सर्वांचीं नांवें उच्चारून त्यांचे प्रणामांचा स्वीकार करूं लागला. ही अद्भुत स्वारी पाहण्याच्या उत्सुकतेनें राजमार्गामध्यें दोहोंबाजूनें उभीं राहिलेल्या नगरच्या माणसांची

एवढी पुष्कळ गर्दी जमली होती कीं वायूला सुद्धां त्या सर्वांच्या मस्तकावरून आपली गति करण्याची जरूर पडत होती. शहरच्या कुलीन स्त्रिया मंदिराच्या अगाशीवर व वलभींतून उभ्या राहून सैन्यांचा थाट डोकावून पाहूं लागल्या आणि शत्रुजिताची अंबारी पुष्पांच्या वृष्टीनें पुष्पमय करून सोडूं लागल्या. पर्वतांच्या गुहांस तसेंच ब्रह्मांडाला सुद्धां भेदून जाण्याची उमेद धरणारा दुंदुभीचा नाद, जसा सूर्याचा प्रकाश दुसऱ्या प्रकाशास अंतर्हित करून टाकतो तसा, दुसऱ्या सर्व प्रकारच्या शब्दांस दाबून टाकून स्वतःच सर्वत्र गाजून राहूं लागला. या सेनेच्या भारानें, जणों शेषसर्पाचें शिर नमेल कीं काय, कांसवाची पाठ लचकेल कीं काय, आणि महावराहाची दाढ मोडेल कीं काय अशी शंका सर्वांच्या मनांत उभी राहिली! त्याप्रमाणें सर्व गुण संतोषाच्या पाठीमागून येतात, क्रियांचें फळ न्यायाच्या मागून येतें, सर्व ज्ञान व्याकरणाच्या बोधामागून येतें आणि सर्व वाक्यें अर्थाच्या पाठीमागून चालतात त्याप्रमाणें सर्व सैन्यें शत्रुजितराजाच्या मागून चाललीं होतीं.

शत्रुजितराजाचा हत्ती शहरच्या दरवाज्यापाशीं येऊन ठाकला, त्या-वेळीं कौस्तुभमण्याच्या सारखी, अग्नीच्या योगानें द्रवीभूत झालेल्या सुवर्णासारखी, खैराच्या निखाऱ्यांसारखी, वडवानलाच्या ज्वाळांसारखी, अशोकपल्लवांच्या गुच्छांसारखी, आणि केशराच्या कल्कासारखी कांति धारण करून झळकणारा सूर्य क्षितिजावर उदय पावला. पूर्वदिशा, जणों सूर्यरूप पति प्राप्त होतांच, केशराच्या पिचकाऱ्या उडविण्याचा महोत्सव करीत आहे काय अशी दिसूं लागली. प्रफुल्लित होणाऱ्या कमलिनींमधून बाहेर निघूं लागलेले भ्रमर, जणों प्रभातरूपीं आपल्या भाग्योदयाचा समय प्राप्त होतांच दुर्भाग्याचीं अक्षरेंच निघून चाललीं आहेत काय असे भासूं लागले. सर्व रात्रभर दुसरे ठिकाणीं राहून प्रभात समयीं आलेल्या सूर्यास अवलोकन करून, कमलिनी जणों खेद पा-

वली आहे अशा प्रकारें, पाकळ्या हेच नेत्र त्यांतून तुषार बिंदुरूप आंसवें गाळूं लागली. सेनेमधले दिवे, अस्तसमयीं सूर्यानें हवालीं केलेल्या तेजोरूप ठेवीचा स्वतःच उपयोग केल्यामुळें अपराधास जणों पात्र झाले आहेत अशा प्रकारें अंधक होऊं लागले. चंद्राची रात्रिरूप पतिव्रता स्त्री, जणों सूर्याच्या स्पर्शाला पापरूप मानीत आहे अशा प्रकारें घाईघाईनें धांवत चालली असतां, तिची प्रभातवेलारूप मुलगीसुद्धां तिच्या मागोमाग धावून जाऊं लागली. सूर्याचा उदय होतांच दिशांच्या ठिकाणची सगळी मलिनता निघून जाऊन त्या शुद्ध झाल्या. कमळांचा खेद दूर झाला. धर्मकृत्यांस आरंभ होऊं लागला. लोकांचे स्वेच्छाचार बंद झाले. पक्षी निर्भयपणें अरण्यांत संचार करूं लागले. चक्रवाक पक्ष्यांचा विरह टळला. भ्रमर कमळाच्या कोशरूप कारागृहांतून मुक्त झाले. आणि सर्व भूमंडळांत प्रकाश भरून गेला.

ज्याप्रमाणें कारंजाच्या तोंडांतून जलाची धारा, महाकवीच्या मुखांतून सरस्वतीचा प्रवाह, सूर्यमंडलापासून किरणांचा लोट आणि परब्रह्मांमधून प्रजांची परंपरा, हीं निघतात त्याप्रमाणें त्या दरवाजांतून सेना बाहेर पडूं लागली. अतिशय गर्दीमुळें, स्वारांचे गुढघे दुसऱ्या स्वारांच्या गुढघ्यांशीं घासूं लागले, गाड्यांचीं चाकें दुसऱ्या गाड्यांच्या चाकांत भरून जाऊं लागलीं, पालखी पालखीमध्यें अडकून जाऊं लागल्या, आणि पायदळें पायदळांशीं लगटून जाऊं लागली. ज्याप्रमाणें संकटसमयीं मंत्र्याची, संनिपाताच्या वेळीं वैद्याची, शास्त्रासारख्या गंभीर विषयाची चर्चा करतांना विद्वानांची, युद्धप्रसंगीं शूर वीरांची, दारिद्र्याच्या समयीं स्त्रियांची, जातीनें अडविलें असतां भाऊबंदांची, विपत्तीच्या प्रसंगीं वगवशेल्याची, आणि म्हातारपणीं पुत्राची परीक्षा होते त्याप्रमाणें गर्दीमध्यें दरवाजापाशीं उंचावरून वाहनांस खालीं उतरविण्याच्या वेळीं माहूतांची, स्वारांची, आणि सारथ्यांची परीक्षा होऊं लागली. कठिण विषय आक्रमून बाहेर आलेली

बुद्धि जशी सुलभतेनें सोप्या विषयांत संचार करूं शकते, यौवनदशेंतून पलीकडे गेलेली स्त्री जशी जनसमुदायांत मोकळेपणानें फिरूं शकते, आणि जलाशयांतून बाहेर निघालेली जलधारा जशी पृथ्वीवर आकाशांत अप्रतिबंधपणें उडते तशी दरवाजांतून बाहेर पडलेली सेना, रुंद रस्त्यावर स्वच्छंदपणें चालू लागली. जणों पृथ्वीची दया येत आहे अशा प्रकारें मंद मंद चालणारे; घोड्यांस उसळतांना पाहून सुद्धां आपल्या गंभीर चालींत जरासुद्धां फेरबदल न करण्यानें, हलक्या लोकांस दिमाखानें मिरवतांना पाहूनही आपल्या साध्या सभ्य चालींत बिलकुल फेरफार न करणाऱ्या कुलीन लोकांची पद्धति जणों दाखवीत आहेत असे दिसणारे; धिप्पाडपणामुळें पर्वताची छटा धारण करणारे; सोंडेंतील पाण्याच्या वृष्टीनें आपल्या भारानें मूर्छित झालेल्या पृथ्वीला शीतोपचार करीत आहेत काय असे दिसणारे; सोन्याच्या हौद्यांची आणि सोनेरी झुली वगैरेची कांति सूर्याच्या प्रकाशामुळें दुप्पट चमकत होती तीमुळें विजांनीं युक्त अशा मेघघटांची बरोबरी करणारे; हिकडे तिकडे झुलण्यानें, माहूतांच्या प्रवीणतेची वाखाणणी करीत आहेत असें जाणविणारे; पायीं बांधलेल्या साखळीला ओढीत असतांही निर्विकार राहण्यानें, ब्रह्मवेत्यांस व्यवहारांमध्यें वागण्याच्या पद्धतीचा उपदेश करीत आहेत असे दिसणारे; चहूंकडून भाल्यांनीं वेढलेले असतां डोळे उघडले नसल्या कारणानें, रोगादिक मृत्युपाशांनीं घेरलेले असतांही बिलकुल विचार न करणाऱ्या ज्ञानी आणि अज्ञानी लोकांची बतावणी करूं पाहात आहेत असे भासणारे; भाल्यांनीं टोंचले जात असतांहीं वाटेंत आलेल्या वृक्षांच्या शाखा आड आल्यामुळें, राजकीय शिक्षा पावले असतांही आपली वाईट चाल न सोडणाऱ्या उद्धट लोकांचें अनुकरण करीत आहेत काय असें दाखविणारे; सूर्य प्रकाशत असतांही दिशांस अंधकाराचा स्वाद चाखविणारे; मदाच्या धारांनीं पृथ्वीला वर्षाकाळचें स्मरण देणारे; सगर्व

गर्जनांनीं, आपणास संतप्त करणाऱ्या सूर्याला दूर ठेवण्याच्या उद्देशानें त्याच्या रथाच्या घोड्यांस धावडावीत आहेत असें भासविणारे; आणि घंटांच्या प्रबळ घणघणाटानें दिग्गजांस आपल्या शक्तीची सूचना देत आहेत असें दाखविणारे, हजारो हत्ती या सेनेला अपार शोभा देऊं लागले.

जणों आडवे आलेल्या हत्तींस थडक मारण्यास जाऊं पाहात आहेत आणि सूर्याच्या रथाच्या घोड्यांशीं भिडूं पाहात आहेत अशा प्रकारें पुढील दोन पाय वर करून उभे राहणारे; हरिणांसही वेगामध्यें हटविणारे; ज्ञानी जनांच्या अंतःकरणाप्रमाणें समजाविलें असतां त्वरित शांत होणारे; जणों पृथ्वीला तप्त झालेली समजूनच त्वरित त्वरित पाय उचलणारे; वायु व मन यांस सुद्धां वेग संपादनाची खुबी शिकविण्याचा अभिमान धारण करणारे; खुऱ्यांच्या अवाजानें पृथ्वीला गिलावा करण्याच्या हेतूनें चोपणीच ठोकीत आहेत असें दिसणारे; दुसऱ्याच्या मनांतला अभिप्राय जाणण्याची सिद्धि प्राप्त करून घेतली आहे अशा प्रकारें स्वारांच्या मर्जीप्रमाणें वर्तणारे; खणखणाटानें दिशांस बाधिरत्व आणणारे; आपल्या बरोबर चालत येणाऱ्या आपल्याच सावलीशीं प्रतिस्पर्धा करणारे; आंत न सामावणाऱ्या गर्वाच्या प्रवाहाचा पाटच वहात आहे काय अशा प्रकारें घर्मबिंदूंनीं व्याप्त झालेले; उच्चैःश्रव्याचा अंशावतारच अशी सुंदर कांति धरणारे; केसाकेसांच्या ठिकाणीं स्वारांवर स्नेहानें युक्त आहेत अशा प्रकारें स्निग्ध रोमावली धारण करणारे; संपूर्ण शरीरें बनविल्यावर मागाहून सुधारणा करण्याची युक्ति मनांत येतांच, विधात्यानें तोंडावरलें आणि पायांच्या नळकंडींतलें मांस काढून घेऊन तेंच मांस त्यांच्या छातींत भरून दिलें असावें अशा प्रकारें रुंदावल्या आहेत छात्या ज्यांच्या असे; आणि सडपातळ तोंडाचे व सडपातळ नळकंडीचे, सैन्यांत असलेले असंख्य घोडे, पाहणारांच्या चित्ताचें आकर्षण करूं लागले.

काळे पोशाक घातलेले; एकसारखी संख्या व एकसारखी रचना अशा अनेक पंक्ति तयार केल्यामुळें, वर्षाकाळच्या अखेरीस आकाशांत दिसून येणाऱ्या कुंझ पक्ष्यांच्या ओळींचें अनुकरण करणारे; रासक्रीडेंतील गायनांत पडणाऱ्या टाळ्यांप्रमाणें एकसारख्या प्रमाणानें उचलणाऱ्या व पडणाऱ्या पावलांच्या धडधडाटानें व त्यांच्या प्रतिध्वनीनें दशदिशांस गजबजून सोडणारे; आणि सूर्याच्या किरणांच्या संपर्कानें द्विगुणित चकचकाट करणाऱ्या शस्त्रांनीं लखलखणारे सेनेंतील शिपायी, जणों पाताळ-लोक दाबल्यावर त्यांतून वर आलेले दैत्य होत, आणि दुंदुभीच्या अवजानें लंकेंतील सगळीं घरें पडून गेलीं असतां तींतून बाहेर पडलेले राक्षस होत असे दिसूं लागले. ज्याप्रमाणें प्रलयकाळच्या निर्घातानें भूमंडळ, उत्पा-तकाळच्या वायूच्या अभिघातांनीं महासागर, विजांच्या आघातांनीं मेघमंडळ, तोफांच्या एकत्र अवाजांनीं गगनमंडळ, महादेवाच्या अट्टहासानें कैला-सपर्वत, आणि नृसिंहाच्या गर्जनेनें दैत्यपुर गाजावें त्याप्रमाणें दुंदुभीच्या ध्वनीनें दिशांचे मंडळ गजबजून गेलें. दुंदुभीच्या अवाजानें जणों पर्व-तांचीं शिखरें गडगडून पडतात काय, आकाश आणि पृथ्वी दुभंगून जातात काय, दिशांचे संधिप्रदेश उखळून जातात काय, समुद्राचें मंथन दुसऱ्यांदा होऊं लागलें काय, ब्रह्मांडाचीं आवरणें तुटून पडूं लागलीं काय, आणि ज्वालामुखी पर्वत फुटूं लागले काय असें वाटूं लागलें. लोकांच्या कलकलाटानें, हत्तींच्या गर्जनांनीं, घोड्यांच्या खणखणाटानें, हत्तींच्या घंटांच्या ध्वनीनें, नगाऱ्यांच्या अवाजानें, गाड्यांच्या चाकांच्या घडघडा-टानें, पायदळाच्या पावलांच्या धडधडाटानें, आणि बंदुकीच्या धडाक्यानें सर्व प्राण्यांचे कान बहिरे होऊन जाऊं लागले.

सेनेच्या चालण्यानें उडालेल्या धूळीचा लोट, जणों भाराचें सहन न करूं शकल्यामुळें, आकाशांत वर जाणारी पृथ्वीच असावी, अकाळीं ज-मलेल्या मेघांची घटा असावी, आणि कलकलाटामुळें पीडित झालेल्या दि-

शांची मूर्छा असावी असा दिसूं लागला. धूळीचा लोट, दिवस असतांही मध्यरात्रीचा देखावा दाखवूं लागला; आकाशगंगेला चिखलानें युक्त होण्याची धास्ती उत्पन्न करूं लागला; लोकांच्या दृष्टिपाताला आडवून धरूं लागला; सूर्याच्या किरणांस कधींही प्राप्त न झालेला अंधकाराचा त्रास उपजवूं लागला; चक्रवाक पक्षांस विरहातुर करूं लागला; सगळ्या सेनेला गर्भवासासारखा जाणवूं लागला; आणि दिशास लहान लहान करून सोडूं लागला.



# प्रकरण १० वें.

## परीक्षा.

अद्भुत प्रभावाच्या त्या सैन्यासहित शत्रुजित् राजा विद्यामंदिरानजीक येऊन पोंचला. विद्यामंदिरांत बैठकींची वगैरे व्यवस्था सर्व प्रकारें करून ठेवलेली होती. आचार्य मंडळ येणाऱ्या लोकांचा आदरसत्कार करण्यासाठीं तयार होऊन अनुक्रमाप्रमाणें दरवाजांत उभें राहिलें होतें आणि विद्यार्थ्यांस वारंवार आपापल्या अभ्यासाच्या गंभीर विषयाचें मनन करण्याविषयीं सुचवीत होतें. विद्यामंदिराच्या खात्यापैकीं एकंदर माणसें, जणों योग साधूं पाहात आहेत अशा प्रकारें आपापल्या कामांमध्यें एकाग्र होऊन गेलीं. कुमार कुसुमायुध, परीक्षा देण्याच्या या दिवसाला विवाहाच्या दिवसाप्रमाणें, युवराज पदवी मिळण्याच्या दिवसाप्रमाणें, अमृतपान करण्याच्या दिवसाप्रमाणें आणि जन्माचें साफल्य करण्याच्या दिवसाप्रमाणें समजून, अत्यंत उत्साहयुक्त झालेला दिसत होता. दुसरे विद्यार्थी विद्या आणि कळा इत्यादि विषयांची उजळणी मनांतले मनांत करीत होते व त्या त्या विषयांचा संपूर्णपणें अभ्यास झाला असतांही, मनुष्याच्या अंतःकरणांत स्वाभाविकपणेंच वास करणाऱ्या शंकेमुळें इष्टदेवतांस नवस करीत होते.

जणों हा अद्भुत समारंभ पाहण्याच्या हेतूनें स्वर्गभूमीवरून उतरून पृथ्वीवर आलेला चंद्रलोकच असावा; सरस्वतीचें सेवन करण्यासाठीं ब्रह्मलोकींहून आलेला सरस्वतीचा सभामंडप असावा; मंदविमंद वायूनें चलायमान होणाऱ्या धज्वारूप हातांनीं आंत येण्याविषयीं साऱ्या राजमंडळाला जणों बोलावीत आहे आणि लक्ष्मीच्या माहिम्याहून सरस्वतीचा

महिमा अधिक आहे असें सिद्ध करून दाखविण्याच्या हेतूनें आपल्या विस्तीर्णतेनें सगळ्या सेनेला जणों गिळून जाऊं पाहात आहे; अशा त्या विद्यामंदिराकडे वळलेलीं सर्व लोकांचीं नेत्रें, जणों आपल्या जन्माचें साफल्य झालें ह्मणून समजत असावीं आणि इतर इंद्रियांहून आपण अधिक भाग्यशाली आहों असेंच मानीत असावीं असें वाटूं लागलें.

शत्रूजित् तसेच दुसरे राजे, आपापल्या वाहनांवरून उतरून, सन्मानपूर्वक पुरत्या अदबशीरपणानें प्रथम स्त्री समुदायाला आंत प्रविष्ट करवून, जसजसे दरवाजाशीं येत चालले तसतसे तोफांचे बार होऊं लागले, फार मधुर स्वरांनीं सन्मानार्थ वाद्यें वाजूं लागलीं, पुष्पांची वृष्टि होऊं लागली, आणि आचार्य अनुक्रमानें त्या त्या राजांचे हात धरून आंत नेऊन त्यांस बसवूं लागले. मंत्री, व्यापारी आणि इतर गृहस्थ यांसही यथायोग्य मान देऊन आंत घेऊन जाऊन जागचे जागीं बसविण्यांत आलें.

प्रथमपासूनच योजून ठेवलेल्या नांवनिशीवार बैठकीवर सर्व लोक बसल्यावर, सुगंधि गुलाबपाणी, पुष्पांच्या माळा आणि अत्तर वगैरे देऊन सर्वांची आराधना करण्यांत आली. या वेळीं दिशा आभरणांच्या प्रकाशानें युक्त, वायु सुगंधमय, बैठकी राजमूर्तिमय, आकाश जयजयशब्दमय, अंतःकरणें आनंदमय, नेत्रें उत्कंठामय, भापणें प्रशंसामय, कंठ पुष्पहारमय, क्रिया गांभीर्यमय, आचार्य आधिपत्यमय, आणि विद्यार्थी उत्साहमय दिसूं लागले.

कोणाही पुरुषाची दृष्टि न पडेल अशा प्रकारें योजलेल्या निराळ्या बैठकींवर विराजमान झालेली मनोरमा, अन्य राजांच्या राण्या आणि मंत्री वगैरे लोकांच्या स्त्रिया, प्राण्यांच्या इंद्रियाप्रमाणें स्वतः पाहण्यांत न येतां, सर्वांस पाहूं लागल्या, आणि आशेप्रमाणें अदृश्य असूनही, पुरुषांच्या अंतःकरणांस खेंचूं लागल्या. महाराणी मनोरमेनें सुद्धां माल-

तीच्या करवीं स्त्रीमंडळाचें अशा प्रकारें आराधन करविलें कीं त्या सर्व स्त्रिया एकाच वेळीं आश्चर्य, आनंद आणि प्रेम यांस वश होऊन गेल्या.

पुरुषांच्या व स्त्रियांच्या आराधनेचें काम पुरें झाल्यावर सभासदांच्या अनुमतानें त्या त्या विषयांच्या परीक्षेचे प्रश्न कायम करून, सगळ्यांच्या अंतःकरणांस एकाग्र करण्यासाठीं सर्व आचार्यांच्या तर्फेनें मुख्य आचार्यांनीं उभें राहून पुढील प्रमाणें भाषण केलें.

" राजांनो आणि सभासदांनो ! विद्यांच्या आणि कळांच्या ठिकाणीं पूर्ण प्रेम धरणारा राजा शत्रुजित् यांनीं, आज पंधरा वर्षें झालीं, मोठ्या औदार्यानें हें विद्यामंदिर स्थापन केलें आहे. जरी युवराज कुमार कुसुमायुधासच विद्या आणि कळा यांत प्रवीण करण्याचें महाराजांचें कर्तव्य कर्म होतें तरी त्यांनीं सर्वांच्याच हितार्थ, आपल्या कुमाराबरोबर इतर राजकुमारांस व त्यांच्या अंगीं दुसऱ्या गृहस्थांच्या मुलांस सुद्धां विद्यामंदिरांत घेऊन सर्व विद्यांचें व कळांचें शिक्षण मिळेल असें केलें. राजकुमार हे भावी राजेच आहेत आणि त्यांचें मन सुधारलें असतां प्रजेचें व राज्याचें केवढें कल्याण होईल तें आनुभविक लोकांच्या लक्षांत असेलच. ह्मणून त्याविषयीं या ठिकाणीं जास्ती व्याख्यान देऊन सांगण्याची गरज दिसत नाहीं. महाराज शत्रुजितांनीं हें सार्वजनिक आणि अखंड टिकणारें असें लोकोपकाराचें कृत्य करून महाशय पुरुषांच्या पंक्तींत पहिलें नांव मिळविलें आहे. आणि तुमच्या आमच्या बालकांस विद्वान व कलाभिज्ञ करून आपणा सर्वांस तर विशेषच उपकृत केलें आहे. या विद्यामंदिरांत अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांची जरी साहा साहा महिन्यांस परीक्षा घेण्यांत आलेली आहे आणि प्रत्येक परीक्षेंत त्या त्या वेळेप्रमाणें त्यांस उत्तम गुण मिळालेले आहेत तरी सर्व परीक्षांचा शेवटचा परिणाम पाहण्याचा आजचा दिवस आहे आणि यात्र

हेतूनें महाराजांनीं प्रेमपूर्वक आमंत्रण पाठवून आपणा सर्वांस आज एथें बोलाविलें आहे. बाळकांच्या अंतःकरणांमध्यें आमच्या उपदेशांचीं प्रतिबिंबें कशीं पडलीं आहेत तें दाखविण्याचा प्रसंग आज आह्मास प्राप्त झाला आहे. ह्मणूनच आजचा दिवस ह्मणजे महोत्सवाचा दिवस आणि आमच्या विद्या, कळा आणि आजपर्यंतचे परिश्रम या सर्वांचें साफल्य होण्याचा दिवस आहे असें आह्मी समजतों. आज ज्याप्रमाणें विद्यार्थ्यांस आपल्या अभ्यासाच्या विषयांत सभेकडून किती गुण मिळतात हें पाहावयाचें आहे त्याचप्रमाणें आह्मासही आपल्या उपदेशाच्या चातुर्यामध्यें सभेकडून किती गुण मिळतात हेंही दिसून येणार आहे. एखाद्या विषयावर कितीही अत्यंत परिश्रम केले असले तरी जोंवर त्या विषयाच्या प्रयोगानें विद्वानांस संतोषित केलें नाहीं तोंवर विचक्षण मनुष्यास तो विषय पुरा समजला असा पक्का भरंवसा पटत नाहीं. हा साधारण नियम जसा विद्यार्थ्यांस लागू आहे तसाच तो आह्मासही लागू आहे. यास्तव, तुह्मी सकल विद्वान सभासदहो, विद्यार्थ्यांची परीक्षा घेऊन, आपला संतोष प्रदर्शित कराल तेव्हांच त्यांचें व आमचें मन विश्रांतीचें सुख अनुभविण्यास योग्य होईल. ज्यानें संपूर्ण अभ्यास केला आहे तशीच ज्याची मेधा प्रज्वलित आहे, तो सुद्धां विद्वानांच्या सभेंत परीक्षा देतांना सभाक्षोभादि कारणांस वश होऊन वेळेनुसार कुंठित होऊन जातो, हीही गोष्ट आपणा सर्वांच्या ध्यानांत येईल अशी आमची आशा आहे. शेवटीं आह्मी इतकेंच मागतों कीं हे दीनदयाळ कृपानिधान प्रभो! या शेवटल्या परीक्षेचे वेळींही आमच्या विद्यार्थ्यांस व आह्मास यश दे."

**या** प्रमाणें मुख्य आचार्यानें भाषण केल्यावर सर्व लोकांनीं केलेल्या अभिनंदनाच्या कोलाहलसहित ते स्वस्थानीं बसले असतां सर्व लोकांची अंतःकरणें सुद्धां परीक्षेच्या विषयांच्या पद्धतीप्रमाणेंच नियमित झालीं आणि विद्यार्थ्यांच्या परीक्षेस प्रारंभ झाला.

प्रथम व्याकरणशास्त्रांत परीक्षा घेण्यास आरंभ झाला. तींत उत्सर्ग आणि अपवाद, प्रातिपदिक आणि धातु यांच्या अर्थाप्रमाणें विकार पावणारीं रूपें, परिभाषांची प्रवृत्ति, पातंजल महाभाष्यांपैकी अमुक विषयाचें लापन, आणि सुप् व तिङ् यांच्या अर्थाविषयीं नैय्यायिक लोकांच्या मतांचे खंडण वगैरे विषयांवरील प्रश्न होते. नंतर न्यायशास्त्र आलें; त्यांत पदार्थांचीं लक्षणें, अव्याप्ति आणि अतिव्याप्ति वगैरे दोषांचे निराकरण, अनुमान प्रमाणास असत्य भासविणारे हेत्वाभास वगैरे, शब्दखंडाच्या संबंधीं परमताचा वाद आणि न्यायभाष्यांतील अमुक विषयाचें लापन इत्यादिकासंबंधी प्रश्न होते. त्यापुढें मीमांसाशास्त्र आलें; त्यांत वैदिक वाक्याचा अर्थ लावण्याची पद्धति, वेदांच्या अपौरुषेयत्वाचा निर्णय, कर्मकारण वादाच्या युक्ति, आणि शाबरभाष्यांतील अमुक विषयाचें लापन इत्यादि विषयांवरील प्रश्न होते. त्यानंतर वेदांतशास्त्रांत परीक्षा घेण्यांत आली; त्यांत श्रुतीचा समन्वय, सांख्य व न्याय इत्यादि मतांचें खंडन, जगांत अनिर्वचनीयत्वाचा सिद्धांत, ब्रह्म आणि जीवात्मा यांच्या ऐक्याविषयीं युक्ति, आणि शारीरिक भाष्यांतील अमुक एक विषयाची लापनिका इत्यादि विषयावरील प्रश्न होते. पुढें साहित्यशास्त्र आलें; त्यांत काव्यांचे गुणदोष, रस, अलंकार, ध्वनि, नाट्यप्रकरण, आणि व्यंजना नामक तिसरी वृत्ति स्वीकारण्याचीं कारणें इत्यादि विषयांवरील प्रश्न होते. यानंतर सांख्यशास्त्रांतील प्रकृति आणि पुरुष यांचें नित्यत्व स्थापण्याच्या युक्ति, निरीश्वरवाद आणि तत्वविवेचन इत्यादि विषयांवर प्रश्न विचारण्यांत आले. पुढें योगशास्त्रांतील योगाचीं आठ अंगें, सिद्धींचें विवेचन आणि आत्म्याची स्थिति याविषयीं परीक्षा घेण्यांत आली. या पुढें आयुर्वेद आला; त्यांत शारीर, पदार्थांचे गुणदोष, औषधें बनविण्याचे प्रकार, धातु वगैरेचें शोधन व मारण, पंचकर्में, रोगांचीं निदानें, लक्षणें, तशीच चिकित्सा, शस्त्रक्रिया, वाजीकरणें आणि रसायनें या संबंधानें प्रश्न घाल-

ण्यांत आले. याप्रमाणें या सर्व विषयांची परीक्षा घेण्यांत पुष्कळ वेळ निघून गेल्याकारणानें दुसऱ्या शास्त्रांतील विषयांची परीक्षा स्थालिपुलाक-न्यायानें करून, नंतर लगेच कलांच्या परीक्षेस सुरवात झाली. दुसऱ्या साऱ्या कलांची परीक्षा घेतल्यावर शेवटीं लश्करी कवायतींत परीक्षा घे-ण्यास सुरवात झाली. सर्व राजकुमारांनीं लश्करी पोशाक चढविले, बंदुका वगैरे आयुधें घेतलीं, आयुधें वापरण्याच्या युक्ति दाखविल्या, घोडे फिर-विण्याचे अनेक चमत्कार दाखविले, एका घोड्यावर व दोन घोड्यांवर उभें राहून धांवून दाखविलें, लढाई चालू असतां जेवण करून तैयार रा-हण्याची तत्परता दाखविली, व्यूह रचून दाखविले, क्षणार्धांत व्यूह मोडून फिरून त्वरित रचून देण्याची शैली दाखविली, थोड्या मनुष्यांसहित पुष्कळ मनुष्यांबरोबर लढण्याची क्रिया दाखविली, आणि तोफखान्यासंबंधी सुद्धां अपूर्व आणि आश्चर्य वाटण्यासारखे कित्येक चमत्कार दाखविण्यांत आले.

या समयीं सृष्टि जणों दैत्यमय असावी, वायु जणों दारूच्या गंधानें युक्त असावा, आकाश तोफांच्या अवाजांनीं युक्त असावें, दिशा धुरानें युक्त असाव्या, दृष्टि शस्त्रांच्या झगझगाटानें युक्त असाव्या, भूमंडल अश्वमय अ-सावें, जगत् युद्धमय असावें, अंतःकरणें उत्साहमय असावीं, शस्त्रांचा तडाका चालला असावा, धरित्री दुभंग होऊन पडत असावी, आकाश कोसळून पडत असावें, पर्वतांचीं शिखरें धडाधड उडूं लागलीं असावीं, प्रलयकाळचे मेघ एकाचवेळीं कोसळूं लागले असावे, कालिका कोलाहल करूं लागली असावी, आणि ब्रह्मांड डोलूं लागलें असावें असा देखावा दिसूं लागला. सर्व विधि परीक्षेच्या विषयांबरोबर समाप्त झाला. सभासदांच्या अंतःक-रणांमध्यें परितोषाबरोबरच आश्चर्य व्यापून राहिलें. वाद्यांचे शब्द सगळ्या दिशांच्या मंडळास घेरून टाकूं लागले. टाळ्यांचा गजर जय जय शब्दाबरोबरच प्रवृत्त होऊं लागला. विद्यामंदिर पुष्पांच्या वृष्टींनीं वसंतमय दिसूं लागलें. आचार्यांस उत्कर्ष प्राप्त होऊं लागला. विद्यार्थी

विजयरूप रसायनानें पुष्ट झालेले दिसूं लागले. विद्यार्थ्यांच्या माता रत्नप्रसूपणाची पदवी मिळाल्याकारणानें प्रफुल्लित होऊं लागल्या. राजाच्या अति गंभीर हृदयांतून सुद्धां आनंदाचें भरतें बाहेर येऊं लागलें. विद्यामंदिर अत्यंत विस्तीर्ण असतांही सुगंधाला सामावून धरण्यास असमर्थ झालें. कुसुमायुधानें सर्व विषयांत मिळविलेले पूर्ण गुण, ज्ञातारपणाप्रमाणें, सर्व सभाजनांचीं मस्तकें कांपवूं लागले. शत्रुजित् आणि मनोरमा यांची दृष्टि, कुसुमायुधाचें निरीक्षण करून, चंद्राच्या निरीक्षणाचें फळ पावूं लागली. आणि विधात्यानें कुसुमायुधाला निर्माण कर्तव्य असतां बृहस्पतीलाच निर्माण केलें काय असें सारे लोक बोलूं लागले.

या वेळीं सूर्य आकाशाच्या मध्यभागीं आल्यामुळें सभा विसर्जन करण्याची तयारी चालली. त्याबरोबर वाद्यें वाजूं लागतांच सर्व लोक गप्प झाले. गोंगाट शांत होतांच महाराज शत्रुजितानें सिंहासनावरून उठून, उभें राहून, खालीं लिहिल्याप्रमाणें भाषण केलें.

"राजे आणि सभाजनहो! ज्या उद्देशानें तुह्माला आमंत्रण करून बोलाविलें होतें तो उद्देश आज पूर्णतेला पावला; इतकेंच नाहीं तर इच्छिलेल्या फळाची ही प्राप्ति झाली आहे. यास्तव श्री विश्वेश्वराच्या या अनुग्रहाबद्दल, आचार्यांच्या परिश्रमाबद्दल, आणि माझ्या वरील तुमच्या स्नेहाबद्दल, तुह्मा सगळ्यांचे जेवढे आभार मानावे तेवढे थोडे आहेत. आज आपल्या पुत्रांनीं विद्यांत व कळांत परीक्षा दिली आहे आणि त्यावरून या पुढें व्यवहाररूपी महासागरामध्यें सुद्धां सहज तरून जातां येईल अशी परीक्षा ते देऊं शकतील व आपल्या डोक्यावरील बोजा उतरण्याचें उत्कृष्ट साधन होतील हें कारण आपल्यास मोठा आनंद मानन्यासारखें आहे. या परीक्षेचा उद्देश तर सिद्धीस गेला. पण आतां दुसरा एक मनोरथ माझ्या मनांत उदय पावला आहे. आणि त्यांत तुमची सल्ला घेण्याची जरूर आहे. यास्तव ती सल्ला घेई तोंपर्यंत या शहरांत

राहण्याची मी तुह्मास विनंति करतों. हें विद्यामंदिर प्रस्तुत ज्या स्थितींत आहे त्याच स्थितींत तें चालू ठेवण्याची माझी इच्छा आहे. यासाठीं हल्लीं तुमचे जे दुसरे मुलगे असतील व जीं मुलें पुढें जन्मतील त्यां सर्वांस या मंदिरांत शिकण्यास घालून पुत्रासंबंधी तुमचें कर्तव्यकर्म तुह्मी बजावाल अशी आशा आहे. विद्यामंदिराच्या आचार्यांनीं आज दिनपर्यंत जे परिश्रम केले त्याबद्दल त्यांचे उतराई मला होतां येईल असें वाटत नाहीं. तथापि माझ्या मनाच्या समाधानासाठीं त्यांस अमुक अमुक पारितोषिकें मीं देण्याचें ठरविलें आहे. तीं ते स्वीकारतील अशी मला आशा आहे. आज प्रातःकाळापासून मध्यान्ह होई तोंपर्यंत माझ्यासाठीं जी तसदी तुह्मी सगळ्यांनीं घेतली तिजबद्दल मी क्षमा मागून सभा विसर्जन करूं इछितों."

हर्षाच्या टाळ्यांचा गजर करून सर्वांनीं जयजय शब्द उच्चारला. आणि सर्वांचेंही बोलणें येणें प्रमाणें पडलें.

"महाराज! आपण आपल्या अभ्युदयाबरोबर आपल्या सेवकजनांच्या अभ्युदयाचीही काळजी वाहतां हें पाहून निरभिमानानें आजपर्यंत आपण जें कांहीं केलें व आतांच्या भाषणांत जें कांहीं जाणविलें तें आपल्या महाशयपणाला शोभेल असेंच आहे असें आह्मी समजतों. उपकाराबद्दल उतराई होण्याची इच्छा करणें ह्मणजे प्रकारांतरानें उपकर्त्याला विपत्तींत पडलेला पाहण्याची इच्छा करण्यासारखेंच आहे; यासाठीं आह्मी तशी कांहीं इच्छा न करतां इतकेंच ह्मणतों कीं आपण केलेल्या आमच्या वरील उपकारांनींच आपण संतोषित रहावें. आणखीही एक विज्ञापि आह्मी करतों कीं आज भोजनादि शारीरक्रिया उरकण्यास फार उशीर झाला आहे, त्यापेक्षां कुमार कुसुमायुधाला व त्यांच्या सहाध्यायी यांस आजच्या आज शहरांत घेऊन जाण्याची धामधूम केली तर फार त्रास पडेल. ह्मणून उद्यां सकाळीं आजच्या सारखीच वैभवासहित

स्वारी येऊन, राजविद्यार्थ्यांस घेऊन जाण्याचा महोत्सव करावा हें योग्य दिसतें."

याप्रमाणें बोलून या बाबतींत शत्रुजिताची परवानगी त्यांनीं मिळविल्यावर व आपापल्या पुत्रांबरोबर दोन कुशल शब्द बोलून झाल्यावर, राजेरजवाडे, आपापल्या जनान्यास बरोबर घेऊन व स्वारीच्या लोकांस घाई घाईनें चालवून, शहरांतील आपआपल्या राहण्याच्या ठाण्यांत येऊन दाखल झाले. दुसरे सभाजनही आपापल्या घरोघर गेले. शत्रुजित् व मनोरमा यांणीं कुसुमायुधास आलिंगन देऊन, मांडीवर बसवून, हर्षाच्या अश्रूंनीं त्याच्या वस्त्रांस भिजवून टाकून, व उदयिक मोठ्या धामधुमीनें तुला राजवाड्यांत घेऊन जाऊं असें सांगून, सोडून जातेवेळीं, जणों निधीला सोडून जात आहेत, चिंतामणीपासून दूर होत आहेत, आणि प्राणांपासून वियोग पावत आहेत अशा प्रकारें विव्हळ होत्सातीं, आपल्या निवडक स्वारीसहित राजधानींत तीं निघून आलीं.



लेलें कुसुमायुधाचें स्वाभाविक तेज, ज्याप्रमाणें चंद्र समुद्राच्या पाण्याला आपल्याकडे ओढून घेतो, त्याप्रमाणें सर्व लोकांच्या नेत्रांस आपल्याकडे आकर्षून घेऊं लागलें. साऱ्या विद्यार्थ्यांनीं आचार्यांस प्रणाम करतांना, जणों औरस पुत्रांचाच वियोग पावत आहेत, प्रिय बांधवांपासून वेगळे होत आहेत, आणि आपल्या विद्यांच्या व कळांच्या प्रतिबिंबांस बिंबरूप समजून त्यांचा वियोग होत असल्याचें मानीत आहेत अशा प्रकारें त्यांनीं, अश्रूंनीं व्याप्त होऊन सद्गदित कंठानें, आशीर्वाद दिले. जिच्या तिनें आपापल्या कुमारावरून मातांनीं पेरें टचकन वाजत अशा प्रकारें बोटें मोडून लिंबलोण उतरलें. कोणाची दृष्ट न पडावी ह्मणून सर्वांच्या कपाळाला तिटा लाविल्या. सगळ्या राजकुमारांस घोडेस्वार करवून मोठ्या थोरल्या मिरवणुकीच्या मध्यभागीं घालून सुरेख ओळींनीं चालविण्याचें ठरविलें. अतिउत्तम शृंगारलेल्या, एका जातीच्या, व एका रंगाच्या घोड्यांवर राजकुमारांस बसविलें. शत्रुजित् हात्तीच्या अंबारींत विराजमान झाला. दुसरे राजेरजवाडे व गृहस्थ आपापल्या वाहनांत बसले. छडीदार शत्रुजिताच्या आज्ञेप्रमाणें बंदोबस्त ठेवूं लागले. सगळी सेना समुद्राच्या भरतीप्रमाणें चाललेली दिसूं लागली. भाले चकचकूं लागले. बंदुकींचे अवाज, जणों अमंगलाला तोडून टाकीत आहेत असें भासवूं लागले. दिग्विजयाच्या वेळे सारखे दुंदुभि वाजूं लागले. कुमारांच्या पांढऱ्या घोड्यांची सेना क्षीरसागराच्या भरतीची भ्रांति उत्पन्न करूं लागली. कुमार परस्परांच्या दाबामुळें खिजलेले घोड्यांस ताब्यांत ठेवण्याचें आपापलें चातुर्य दाखवूं लागले. फेणानें लपेटलेले घोड्यांचे चौकडे, गरुडांच्या तोंडांमध्यें सांपडलेल्या शेषनागांच्या पिलांची शंका उत्पन्न करूं लागले. उड्या मारणारे घोडे क्षीरसागराच्या उसळणाऱ्या कल्लोलांप्रमाणें भासूं लागले. कुसुमायुधाच्या मस्तकावर धरलेलें शुभ्र च्छत्र, नारायणाच्या मस्तकावर असलेल्या शे-

# प्रकरण ११ वें.

## आगमन.

दुसऱ्या दिवशीं करायचा भावी महोत्सव, काल्पनिक रूप धारण करून, सिद्ध योग्याप्रमाणें, सगळ्या दिशांमध्यें दृग्गोचर होऊं लागला; देवाचें वरदान पावल्याप्रमाणें, अंतःकरणामध्यें प्रविष्ट होऊन रमूं लागला; स्वप्नावस्थेंतील मनाप्रमाणें, अनेक आकार धारण करूं लागला; तृष्णेच्या विलसिताप्रमाणें, अंतःकरणाला उत्कंठित करूं लागला; ऐंद्रजालिकाप्रमाणें कुसुमायुधाला अंतःपुरांत आणून आनंद करीत आहे असें दर्शवूं लागला; मद्याच्या वगैरे कैफाप्रमाणें चाललेल्या क्रियांचें सुद्धां विस्मरण करवूं लागला; आणि जीवन्मुक्तीच्या आनंदाप्रमाणें, शरीराच्या भानाला सुद्धां संस्कारशेष करूं लागला. आणखी या सर्व गोष्टींमुळें शत्रुजित् राजा आणि मनोरमा राणी हीं उभयतां कांहीं विलक्षण प्रकारें शोभूं लागलीं.

दुसरे दिवशीं चंद्रोदय होतांच, शयनगृहांतून उठून, शारीरिक आणि शिवपूजन आदि करून विधि आटोपून घेऊन, मागच्या दिवसाप्रमाणें शत्रुजित् राजानें शंखनाद करवून सर्वांस सूचना दिली, आणि मागल्याप्रमाणेंच धामधूमीनें स्वारी काढून, राणी मनोरमेसहित सर्व मंडळीस बरोबर घेऊन विद्यामंदिरांत प्रवेश केला. सर्व राजेरजवाडे, मंत्री, व्यापारी, गृहस्थ आणि सेनापति हे कुसुमायुधाला शत्रुजिताप्रमाणेंच मान देऊं लागले. एकंदर राजकुमारांस रत्नमय आभरणांनीं शृंगारण्यांत आलें. ज्याप्रमाणें ताऱ्यांमध्यें चंद्र शोभतो त्याप्रमाणें राजकुमारांमध्यें कुसुमायुध शोभूं लागला. आभरणें आणि विद्या यांच्याशीं संमिश्र ज्ञा-

लेलें कुसुमायुधाचें स्वाभाविक तेज, ज्याप्रमाणें चंद्र समुद्राच्या पाण्याला आपल्याकडे ओढून घेतो, त्याप्रमाणें सर्व लोकांच्या नेत्रांस आपल्याकडे आकर्षून घेऊं लागलें. साऱ्या विद्यार्थ्यांनीं आचार्यांस प्रणाम करतांना, जणों औरस पुत्रांचाच वियोग पावत आहेत, प्रिय बांधवांपासून वेगळे होत आहेत, आणि आपल्या विद्यांच्या व कळांच्या प्रतिबिंबांस बिंबरूप समजून त्यांचा वियोग होत असल्याचें मानीत आहेत अशा प्रकारें त्यांनीं, अश्रूंनीं व्याप्त होऊन सद्गदित कंठानें, आशीर्वाद दिले. जिच्या तिनें आपापल्या कुमारावरून मातांनीं पेरें टचकन वाजत अशा प्रकारें बोटें मोडून लिंबलोण उतरलें. कोणाची दृष्ट न पडावी ह्मणून सर्वांच्या कपाळाला तिटा लाविल्या. सगळ्या राजकुमारांस घोडेस्वार करवून मोठ्या थोरल्या मिरवणुकीच्या मध्यभागीं घालून सुरेख ओळींनीं चालविण्याचें ठरविलें. अतिउत्तम शृंगारलेल्या, एका जातीच्या, व एका रंगाच्या घोड्यांवर राजकुमारांस बसविलें. शत्रुजित् हात्तीच्या अंबारींत विराजमान झाला. दुसरे राजेरजवाडे व गृहस्थ आपापल्या वाहनांत बसले. छडीदार शत्रुजिताच्या आज्ञेप्रमाणें बंदोबस्त ठेवूं लागले. सगळी सेना समुद्राच्या भरतीप्रमाणें चाललेली दिसूं लागली. भाले चकचकूं लागले. बंदुकींचे अवाज, जणों अमंगलाला तोडून टाकीत आहेत असें भासवूं लागले. दिग्विजयाच्या वेळे सारखे दुंदुभि वाजूं लागले. कुमारांच्या पांढऱ्या घोड्यांची सेना क्षीरसागराच्या भरतीची भ्रांति उत्पन्न करूं लागली. कुमार परस्परांच्या दाबामुळें खिजलेले घोड्यांस ताब्यांत ठेवण्याचें आपापलें चातुर्य दाखवूं लागले. फेणानें लपेटलेले घोड्यांचे चौकडे, गरुडांच्या तोंडांमध्यें सांपडलेल्या शेषनागांच्या पिलांची शंका उत्पन्न करूं लागले. उड्या मारणारे घोडे क्षीरसागराच्या उसळणाऱ्या कल्लोलांप्रमाणें भासूं लागले. कुसुमायुधाच्या मस्तकावर धरलेलें शुभ्र च्छत्र, नारायणाच्या मस्तकावर असलेल्या शे-

पाच्या फणांप्रमाणें, शोभूं लागलें. सर्व घोड्यांच्या मध्यभागीं चाललेला कुसुमायुधाचा सुरेख घोडा, मंथन करते वेळीं क्षीरसागराच्या मध्यभागीं तरंगत असलेल्या लोण्याच्या गोळ्याप्रमाणें, दिसूं लागला. चहूंबाजूंनीं राजकुमारांनीं वेष्टिलेला कुसुमायुध, देवकुमारांनीं वेढलेल्या जयंताप्रमाणें, शोभूं लागला. घोड्यांच्या टापा पृथ्वीला जर्जर करून टाकूं लागल्या. घोड्यांचा खणखणाट दुंदुभींच्या ध्वनीला सुद्धां दाबून टाकूं लागला. पृथ्वीवरून उडालेली धूळ जणों सूर्याच्या घोड्यांपाशीं कुमारांच्या घोड्याच्या गर्वाची चहाडी करण्यासाठीं जात आहे काय असें भासूं लागलें. विधात्यानें घोड्यांस, गरुड, वायु अथवा मन यांच्या परमाणूंनीं, बनविलें नसून, त्यांसच घोड्यांच्या परमाणूंनीं निर्माण केलें असावें असें वाटूं लागलें. मन, वायु आणि गरुड सुद्धां या घोड्यांचे शिष्य होत अशी कल्पना होऊं लागली. घोड्यांच्या शुभ्र कांतीमध्यें मिसळून गेलेले त्यांचे फेण पृथ्वीवर पडतांच ओळखून येऊं लागले. सगळे घोडे परस्परांच्या कांतीहून विशेष पांढरेपणा धरूं लागले. हे घोडे विद्यमान असतांना विष्णु गरुडावर कशासाठीं विराजमान होतो असें राजकुमारांच्या मनांत येऊं लागलें. त्यांच्या आभरणांच्या रत्नांची प्रभा पडल्यानें इंद्रधनुष्याप्रमाणें दिसूं लागलेलें कुसुमायुधाचें धवल छत्र घोड्यांच्या कांतीनें पुनः पूर्ववत् आपल्या रंगावर येऊं लागलें. धुळींच्या लोटांनीं अंधकार मातला असतां, जणों सूर्याचे किरण, आभरणांच्या रत्नामध्यें शिरून, प्रकाश करीत आहेत काय असें वाटूं लागलें. बंदिजन शत्रुजित् आणि मनोरमा यांच्या भाग्याची स्तुति करूं लागले. सारी सेना हळूहळू चालत राजधानीच्या समीप येऊन पोंचली आणि ज्याप्रमाणें भागीरथी समुद्रांत शिरते त्याप्रमाणें दरवाज्या वाटे आंत शिरूं लागली.

राज्यसुख भोगण्याच्या लालसेनें दुसरा देह धारण करून अवतरलेला कामदेवच असावा असा, बाल्यावस्थेंत पाहिलेल्या, मध्यंतरीं पंधरा वर्षें

पावेतों न पाहिलेल्या, आणि कामदेवाच्या विकारांचा अमल सुरू झाल्याची सूचनाच जणों देत आहे अशा रोमावलीनें सुशोभित झालेल्या कुसुमायुधाची स्वारी शहरांत येत आहे असें जाणून सर्व प्रजा आपापल्या एकंदर कामकाजांस सोडून, राजमार्गावर पाहण्यासाठीं उभी राहिली आणि त्यामुळें वाऱ्याला सुद्धां मधून फिरकण्याला फार त्रास पडेल इतकी गर्दी सर्वत्र होऊन गेली. मिरवणुकीच्या मध्यभागीं घोड्यावर स्वार झालेल्या राजकुमारांच्या मंडळानें वेष्टिलेला, घोड्याला खेळविणारा, शुभ्र च्छत्राच्या खुणेवरून ओळखतां येणारा, ही खूण नसली तरी शत्रुजिताच्या प्रतिबिंबासारखी आकृति पाहूनच ओळख पटविणारा, आणि प्रतापाधिक्यामुळें ज्याच्याकडे फार वेळ पाहवतही नाहीं अशा कुसुमायुधाकडे पाहून, सर्व लोक आपल्या जन्माचें सार्थक झालें असें मानूं लागले; पाहतांना आडव्या येणाऱ्या पापण्यांच्या निमेषाला सुद्धां लोक निंदूं लागले; दूर उभे असतांही प्रत्यक्ष अंगानें जणों आलिंगन करीत आहेत असे दिसूं लागले; हात जोडून पुनः पुनः प्रणाम करूं लागले; शत्रुजित् आणि मनोरमा यांच्या भाग्याबरोबर आपल्या स्वताच्या भाग्याचीही प्रशंसा करूं लागले; परिचयावाचूनही स्नेह उत्पन्न होऊं लागल्या कारणानें कुसुमायुधामध्यें कांहीं विलक्षण चमत्काराची शक्ति असावी असें मानूं लागले; आणि कुसुमायुध दूर गेला असतां, त्याच्याबरोबर गेलेल्या आपल्या हृदयांस परत ठिकाणावर आणण्यास ते असमर्थ होऊन गेले.

कुसुमायुध शिकून सवरून विद्यामंदिरांतून येत आहे अशी खबर कानीं येतांच पाहण्याच्या कौतुकानें नगरांतील कित्येक स्त्रियांनीं आपल्या तान्हे मुलांच्या तोंडातून स्तन सोडविले; कित्येकींनीं सैंपाक करण्याचें अर्धेंच टाकलें; कित्येक जणींनीं उलटीं लुगडीं नेसलीं; कित्येक जणींनीं एकांत काजळ घालून दुसरा डोळा तसाच ठेवून दिला; कांहींनीं एका अवयवावर घालण्याचीं भूषणें दुसऱ्याच अवयवावर घा-

तलीं; कांहीं जणींनीं सासूच्या आज्ञेची सुद्धां अपेक्षा केली नाहीं; कित्येकींनीं नणंदांस सुद्धां विचारलें नाहीं; कित्येकींनीं शृंगार घालणें अर्धेच सोडून दिलें; कित्येक जणी जोडीच्या भूषणांतून एकेकच घालून दुसरें घालण्याचें विसरल्या; आणि कित्येक जणी न्हाणें धूणें सुद्धां सोडून गेल्या. याप्रमाणें पाहण्याच्या कौतुकानें उतावीळ झालेल्या स्त्रिया मंदिरांमध्यें वर चढून जाऊं लागल्या असतां, पायाच्या दणक्यांनीं जिने दणदणूं लागले. प्रत्येक मंदिरामध्यें नूपुरादि भूषणांचा मनोहर शब्द व्यापून राहिला. गच्या, वलभी आणि खिडक्या हीं सर्व स्त्रीमय दिसूं लागलीं. स्त्रियांनीं बाहेर काढलेलीं मुखें आकाशांत अनेक चंद्र उगवल्याची भ्रांति उत्पन्न करूं लागलीं. चोळ्यांतून अर्धे उघडे दिसणारे स्त्रियांचे स्तन खालीं उभे राहिलेल्या पुरुषांच्या अंतःकरणाचें आकर्षण करून घेऊं लागले. लुगड्यांचे पदर सांवरून घेण्याची सावधगिरी न राहिल्यानें उघड्या दिसणाऱ्या स्त्रियांच्या खोल नाभींनीं हजारो लोकांच्या अंतःकरणांस स्वताचे आंत गडप करून देण्यास आरंभ केला. उन्हाचें निवारण करण्याच्या उद्देशानें हात ऊंच केल्यामुळें स्त्रियांचे उन्नत झालेले कुच, वाटोळे असतांही, बर्च्यांप्रमाणें पुरुषांच्या हृदयांस विंधून टाकूं लागले. गर्दीमध्यें सुटलेले स्त्रियांचे केशकलाप पुरुषांच्या अंतःकरणावर नागपाशाची प्रतीति दाखवूं लागले. सुटलेलीं लुगडीं नीट नेसूं लागलेल्या आणि घामानें थबथबलेल्या स्त्रिया सुरतांतसमयाचें स्मरण देऊं लागल्या. खिडक्यांत व वलभींत उभ्या राहिलेल्या स्त्रियांशीं दुसऱ्या पाहूं येणाऱ्या स्त्रिया जागेसाठीं भांडूं लागल्या. स्तन व उदर वगैरे शरीरावयवांचें भान न ठेवतां अस्ताव्यस्तपणें उभ्या राहिलेल्या सासुरवाशणींस त्यांच्या सासवा रागें भरूं लागल्या. कुसुमायुध येत असतां त्याजकडे बोटें करून दाखवूं लागणाऱ्या वहिनींस त्यांच्या

नणंदा टोंचून बोलूं लागल्या. वन्सें टक लावून एकाग्र दृष्टीनें कुसुमायुधाकडे पाहात असतां वहिनीबाई त्यांच्या चेष्टा करूं लागल्या. दुसरीकडे पाहण्याचें मिश करून कुसुमायुधाकडे पाहणाऱ्या युवती समानशील सखींच्या मंदहास्यानें लाजूं लागल्या. बुर्खा घेण्यास भाग पडत असल्यामुळें सासवा सुनांस विषलताप्रमाणें वाटूं लागल्या. सासुरवासणी, सासवांची दृष्टि चुकविण्याच्या हेतूनें, उन्हाचें मिश करून, पदर ताणून धरून, त्यांस संभ्रमांत सोडून देऊं लागल्या. स्त्रिया, वलभी, खिडक्या वगैरे मध्यें आडून उभ्या राहिलेल्या जावां भावजयांस आपल्या पयोधरांच्या भारानें ढकलून दूर सारूं लागल्या. परपस्परांमध्यें स्त्रियांच्या हास्यलीला स्वच्छंदपणें चालूं लागल्या. कुसुमायुधाचीं प्रतिबिंबें स्त्रियांच्या आभरणांमध्यें पडलीं तशीं तीं हृदयांतही पडूं लागलीं. नणंदाच्या वगैरे धाकानें कुसुमायुधाकडे नीटपणें पाहतां येत नसल्यामुळें कित्येक स्त्रिया घाईमध्यें आपल्या डाव्या हातांत राहून गेलेल्या आरशानें आपल्यावर मोठा उपकार केला असें मानूं लागल्या. कित्येक स्त्रिया, आपल्या आभरणांनीं कुसुमायुधाच्या प्रतिबिंबाचें ग्रहण केल्यामुळें त्यांस कृतार्थ मानून, चोळीच्या आड झांकून गेलेल्या हृदयाला भाग्यहीन समजूं लागल्या. सासवांच्या वगैरे धाकानें बुर्खा न काढूं शकणाऱ्या कित्येक स्त्रिया, एकाएकीं आलेल्या वाऱ्याच्या झुळुकीनें बुर्खा दूर सरल्यामुळें, वाऱ्याला आशीर्वाद देऊं लागल्या. सृष्टीच्या आरंभापासून जन्मलेल्या कामदेवाला म्हातारा झालेला समजून, स्त्रिया, कुसुमायुधाला पाहून तो तरुण झाला असें मानूं लागल्या. कित्येक स्त्रिया कुसुमायुधाच्या दर्शनानें उत्पन्न झालेल्या स्वेदोद्गमाला गर्दीमध्यें होणाऱ्या उष्णतेच्या बहाण्यानें छपवूं लागल्या. आणि कित्येक स्त्रिया आपआपसांत कुसुमायुधाच्या स्वरूपाविषयीं व गुणांविषयीं गोष्टी बोलतां बोलतां जांभया देऊं लागल्या व अंग मोडूं लागल्या.

मिरवणुकीच्या मध्यभागीं असणारा कुसुमायुध, घोड्याबरोबर सर्व लोकांच्या नेत्रांस सुद्धां खेळवूं लागला. जसा सगळ्या ताऱ्यांमध्यें चंद्रच एकटा समुद्राच्या पाण्याचें आकर्षण करूं शकतो तसा सगळ्या राजकुमारांमध्यें मुख्यत्वें कुसुमायुधच लोकांच्या चित्ताचें आकर्षण करूं लागला. कुसुमायुधाच्या मस्तकावर प्रत्येक मंदिरांतून होत असलेली पुष्पवृष्टि राजमार्गास सुगंधमय करून सोडूं लागली, आणि ती पाहून प्रशंसा करूं लागलेल्या सर्व लोकांचीं भाषणें शत्रुजित् राजाला आनंदमय, प्रीतिमय, आणि उत्कर्षमय करूं लागलीं. कुसुमायुधाच्या अप्रतिम कांतीची शोभा स्त्रियांच्या प्रथम कानावर आली होती, ती आतां मिरवणुकीच्या वेळीं नेत्रांवर आली, पण येथें आल्यावर ती हृदयांत अशी कांहीं भरली कीं त्यामुळें तें घुसूं लागलें. अपार राजलक्ष्मीनें आणि शेकडो राजांनीं शोभत असलेली ती स्वारी हळुहळू दरबारांत येऊन पोंचली. नद्यांचे सगळे प्रवाह जसे समुद्रांत सामावतात, सगळे आनंद ब्रह्मानंदांत येऊन जातात, सर्व गुण संतोषामध्यें सामावतात, सर्व ब्रह्माण्डें नारायणामध्यें सामावतात, आणि सर्वही संकल्प मनामध्यें सामावतात तशीं सर्व सैन्यें आणि सर्व लोक दरबारामध्यें गडप झाले.

दरबारांत आल्यावर माहुतानें हत्तीला बसवितांच, शत्रुजित् अंबारींतून खालीं उतरला. दुसरे राजे, रजवाडे, राजकुमार, मंत्री, गृहस्थ वगैरे हेही आपापल्या वाहनांवरून उतरून, शत्रुजिताला प्रणाम करूं लागले. शत्रुजितानें सर्वांच्या प्रणामांचा स्वीकार करून, उचित भाषणानें मान देऊन, सर्वांस जाण्याला परवानगी दिली. ज्या प्रमाणें विद्वानांच्या मुखांतून सरस्वतीचा प्रवाह निघावा, आणि महादेवाच्या जटाजूटांतून भागीरथीचा प्रवाह निघावा, त्याप्रमाणेंच सर्व राजे रजवाडे, राजकुमार, सैन्यें आणि इतर लोक हे दरबाराच्या दरवाज्यांतून बाहेर निघूं लागले. राजाच्या व गृहस्थांच्या स्त्रिया मनोरमा राणीला तिच्या आवासगृहापावेतों

बरोबर जाऊन, यथोचित सन्मान देऊन व तिचा निरोप घेऊन, आपापल्या पतींबरोबर पूर्ण बंदोबस्तानें पालखींत बसून आपापल्या ठिकाणीं चालत्या झाल्या.



# प्रकरण १२ वें.

## गुप्त मसलत.

सर्व लोक जिकडे तिकडे निघून जाऊन सामसूम झाल्यावर, इंद्र जसा जयंताचा, आणि कुबेर जसा नळकूवराचा हात धरून, आपल्या अंतःपुरांत जातो तसा कुसुमायुधाचा हात धरून शत्रुजित् अंतःपुरामध्यें गेला. जसा चंद्र आकाशास शोभा देतो, वसंत वनाला, विवेक व्यवहाराला, आणि अभ्यास अध्ययनाला शोभा देतो त्याप्रमाणें कुसुमायुध अंतःपुराला शोभवूं लागला. शत्रुजित् कुसुमायुधाला मालती वगैरे प्रमुख सेवकजनांची ओळख करून देत देत आणि अंतःपुर वगैरे स्थळांची शोभा दाखवीत दाखवीत भोजनशाळेंत गेला. तेथें नित्याच्या नेमाप्रमाणें भोजनविधि अटपून व थोडा वेळ पावेतों आराम करून, राजकीय प्रकरणांचा निकाल करण्यासाठीं कुसुमायुधाला बरोबर घेऊन शत्रुजित् दरबाराला गेला. जशी विनयानें विद्या, सदाचारानें लक्ष्मी, सुविचारानें बुद्धि, प्रभावानें राजनीति, विवेकानें उदारता, आत्मबोधानें शांति, प्रेमानें मैत्री, भावानें भक्ति, न्यायानें क्रिया, अलंकारानें कविता, संतोषानें महत्ता, तर्कानें भाषणशक्ति, आणि पराक्रमानें धैर्यवृत्ति शोभते त्याचप्रमाणें कुसुमायुधामुळें सर्व सभा शोभूं लागली. ज्याप्रमाणें विद्या अभ्युदयामध्यें उपयोगी पडते, नीति व्यवहारामध्यें, मैत्री संकटामध्यें, लक्ष्मी उद्योगामध्यें, दृढता परिणामामध्यें, तर्कशक्ति विचारामध्यें, नौका समुद्रामध्यें, रसक्रिया औषधामध्यें, आणि कीर्ति प्रवासामध्यें उपयोगी पडते तशी कुसुमायुधाची मसलत सभेमध्यें चाल-

बरोबर सगळ्या राज्यकार्यांमध्यें उपयोगी पडूं लागली. कुसुमायुधानें आपल्या चातुर्यानें लोकांस [illegible]य, शत्रुजितास संतोष, मंत्रिमंडळाला विस्मय, लबाडांस त्रास, सत्याला प्रकाश, उगाच पाल्हाळाच्या लिहिण्याला संकोच, रिकाम्या खर्चाला प्रतिबंध, उत्पन्नाच्या युक्तींला उत्कर्ष, आणि विद्वानांस विशेष आश्रय दिला.

राजकीय कामांच्या निकालामध्यें कुसुमायुधाच्या चलाखीमुळें आपला मनोरथ योग्य कक्षेवर आला असें समजणारा, आणि ज्यामुळें आपल्या स्वतांवरील भार बऱ्याच अंशानें हलका होईल अशी सहायता मिळाल्यानें आपल्या आत्म्याला कृतार्थ मानणारा, शत्रुजित् सभेंतून उठून, कुसुमायुधाला बरोबर ठेवून घेऊन, नित्याच्या नेमाप्रमाणें हवा खाण्याला आणि व्यायाम करण्याला शहराच्या बाहेर फिरावयास गेला. तेव्हां सुद्धां कुसुमायुधाच्या घोडे फिरावण्याच्या चातुर्यानें चित्तांत परमविस्मय पावून, चाललेले दिवस हे सगळ्या जन्माच्या साफल्याचा समय असेंच तो मानूं लागला. बाहेरून फिरून आल्यावर कुसुमायुधाला मनोरमेकडे पाठवून, शत्रुजित् राजानें मंत्रिमंडळास बोलाविलें व त्यांच्याशीं एकांत स्थळीं विचार केला. तो ह्मणाला :—

" मंत्रिहो ! माझ्या मनांत जे विचार उंचबळत आहेत त्यांचें स्वरूप जरी मी काल विद्यामंदिरांत केलेल्या भाषणावरून तुमच्या ध्यानांत आलें असेल तरी त्या विचारांस आळा घालून स्थिर करण्यासाठीं, पुनरुक्त होत असतांहीं ते तुह्मांस कळवितों. कुसुमायुधानें कालरोजीं आजच्या सभेंमध्यें आणि आह्मी बाहेर फिरावयास गेलों होतों तेव्हांही आपल्या गुणांची जी परीक्षा दिली ती त्याची युवराज पद्वी पावण्याविषयीं योग्यता सिद्ध करून देत आहे. तथापि एवढ्या मोठ्या कामासंबंधें माझ्या विचारांशीं तुमचें ऐकमत्य होण्याची फार आवश्यकता आहे. मनोरमेबरोबर या बाबतींत विचारपूस तर करून

ठेवलीच आहे. तरी मातापित्यांचे विचार, ते स्नेहाला वश्य असल्या-कारणानें, मुळींच कामास येत नाहींत; पण मध्यस्थांचे विचार स्वतंत्र असल्या कारणानें पाहिजे त्या बाबतींत अप्रतिबद्ध रीतीनें चालून गुण-दोषाचें बरोबर विवेचन करूं शकतात. अनुभवी मनुष्यें विद्वानांपेक्षांही आपापल्या कामांत विशेष त्वरेनें निष्णात असतात असें दिसून येतें, आणि विद्वान लोक अनुभव नसतांहीं, उत्तम संस्कार पावलेल्या आपल्या बुद्धीच्या प्रभावानें अनुभवी मनुष्यांच्या कामांमध्यें, कबूल करणें भाग असे दोष दाखवूं शकतात असें आढळतें. यास्तव प्रत्येक कामांत विद्या आणि अनुभव या दोहोंचीही अत्यंत आवश्यकता आहे, हा विचार मनांत आणला असतां, कुसुमायुधाला आतांच युवराज पदवी देण्याविषयींचा माझा मनोरथ मला उतावळ्या लोकांच्या पंक्तीस बसवीत आहे. तरी माझी अशी समजूत आहे कीं, आज राज्य प्रकरणीं काम-काजांत त्याची दिसून आलेली हुशारी मला उतावळ्या मनुष्यांच्या पंक्तीस बसवूं देणार नाहीं. राजाचें भाषण अनिवार्य आहे असें लवमात्र मनांत न आणतां, सभेमध्यें सर्वांचा अभिप्राय कसा आहे हें जाणण्याकरतांच हा एक प्रश्नच तुमच्या पुढें मुद्दाम आणला आहे असें समजलें पाहिजे. या साठीं या बाबतींत तुह्मी आपापला विचार स्पष्टपणें मला जाणवावा एवढीच माझी इच्छा आहे. प्रश्नांतील तत्वाच्या विरुद्ध पक्षाचें ह्मणणें काट्यांत ठेवल्यानें मध्यस्थांचे अभिप्राय काट्याच्या सुईचें काम करतात."

"महाराज! कुमाराच्या बुद्धीनें विद्या व कळा यांच्या संबंधी दुर्भेद्य विषयाचेंही, प्रजांच्या हृदयासहित, भेदन करून टाकलें आहे; लहान वयाला सुद्धां, गुणांबरोबर, गौरव दिलें आहे; लक्ष्मीच्या मदाला सुद्धां, विषयांच्या मोहाबरोबर, दूर केलें आहे; यौवनाच्या अंधकाराला सुद्धां, दुर्गुणांबरोबर प्रवेश करूं दिला नाहीं; आणि विद्वानांच्या हृदयाला सुद्धां, विद्यांबरोबरच वश करून घेतलें आहे. त्याला राज्यप्रकरणीं

गोष्टींचा अनुभव संपादन करणें ह्मणजे काय मोठी कठिण गोष्ट आहे ? ज्याप्रमाणें चंद्राच्या किरणांस शीतलतेचें संपादन करावें लागत नाहीं; सूर्याच्या किरणांस उष्णतेविषयीं उपदेश घ्यावा लागत नाहीं; यौवनाच्या विकारांस अनर्थांचा शोध करावा लागत नाहीं; दुःसंगाला विपत्तीस आमंत्रण द्यावें लागत नाहीं; अन्यायाला विपरीत परिणामाची वाट पाहावी लागत नाहीं; सद्गुणांस प्रतिष्ठेची पर्वा करावी लागत नाहीं; सदाचाराला शुभ फल प्राप्त होण्याची व्यवस्था करून ठेवण्याची गरज पडत नाहीं; चंदनाला सुगंधाचा अभ्यास करण्याची जरूर पडत नाहीं; तरुणांस विषयप्रसंग शिकण्याची जरूर पडत नाहीं; महाशयांस उदारता मिळविण्याची जरूर पडत नाहीं; खळ मनुष्यांस द्वाड पद्धति खरेदी करून आणावी लागत नाहीं; आणि ब्रह्मवेत्यांस मोक्षाची मागणी करावी लागत नाहीं; त्याचप्रमाणें तीव्रबुद्धीच्या पुरुषांस कामकाजांत कसून पाहण्याची विशेष अपेक्षा राहत नाहीं. महाराज! आह्मी ज्या कामाची विज्ञाप्ति करूं इच्छित होतों त्याच कामाचा आपण मनोरथ धरला, त्यामुळें जसा धनासाठीं उद्योग करूं इच्छिलें असतां निधीचा लाभ व्हावा; सोइरकीचा यत्न करूं निघालें असतां विवाहाचा योग जमून यावा; आणि तप करण्याचा विचार होतांच वरदानाची प्राप्ति व्हावी; तसेंच आह्मासही झालें आहे. या कामाच्या योग्यतेच्या बाबतींत आमच्या अंतःकरणांत कोणत्याही प्रकारें शंका उत्पन्न होत नाहीं; एवढेंच नाहीं तर आह्मीं हें कृत्य सिद्धीस जाईल केव्हां याचीच वाट पाहात आहों. आणि मांडलिक राजांच्या व प्रजाजनांच्या अंतःकरणांत सुद्धां अशीच अभिरुचि असली पाहिजे. असें अनेक चिन्हांवरून अनुमान होतें. जरी असें आहे तरी प्राचीन संप्रदायाला अनुसरून एक जाहीर सभा बोलवावी, तिच्यापुढें विचारासाठीं ह्मणून असा प्रश्नच ठेवावा, आणि त्यावर सर्वांचे अभिप्राय घ्यावे हें आह्मास योग्य दिसतें. ज्याप्र-

माणें मणि दीपकाच्या किरणांच्या समागमानें अधिकच चकचकीत दिसूं लागतो ; समुद्र चंद्राच्या प्रकाशाचे संसर्गानें अधिक भरपूर होतो ; कुलीन-पणा सद्गुणांच्या योगानें अधिकच शोभा पावतो; आणि आम्रवृक्ष मंजरींच्या प्रादुर्भावानें अधिक रमणीय होतो ; त्याच प्रमाणें योग्य विचारही, लोकांच्या ऐकमत्याच्या प्राप्तीनें अधिक चकचकीत होतो, अधिक भरपूर होतो, अधिक शोभायुक्त होतो, आणि अधिक रमणीय होतो."

" मंत्रिमंडलहो ! ज्याप्रमाणें घरांत संपत्ति, संपत्तींत आयुष्य, आयुष्यांत आरोग्य, आरोग्यांत विद्या, विद्येंत संतोष, संतोषांत सुशीलता, सुशीलतेमध्यें शांति, शांतीत वैराग्य, आणि वैराग्यांत ब्रह्मज्ञान मिळाल्यानें मोठा आनंद होतो; त्याप्रमाणें माझ्या मनोरथांत तुमची ही मसलत सामील झाल्यानें मोठा आनंद मला वाटत आहे. जाहीरसभा भरवून, तीपुढें आपला अभिप्राय प्रश्नाच्या रूपानें ठेवावा आणि त्यावर सर्वांचा अभिप्राय पडेल त्याप्रमाणेंच करण्याची माझी इच्छा आहे आणि तशी इच्छा असल्याकारणानेंच मी सर्व पाहुणे मंडळीस अझून थोपवून धरलें आहे. मंत्रिमंडळहो ! उद्यां मध्यान्ह समयानंतर ही सभा बोलवावी अशी माझी इच्छा आहे. ह्मणून यासंबंधें जी जी तजवीज करणें जरूर असेल ती करण्याला बिलकुल कमी करूं नये. "

याप्रमाणें वागण्याविषयीं मंत्र्यांस शिफारस करून त्यांस घरोवर जाण्यास निरोप दिला. मग तें एकांत स्थळ सोडून शत्रुजित् राजानें, जसा चंद्र अभ्रपुंजांत प्रवेश करतो, सदाशिव कैलासामध्यें, नारायण योग्यांच्या अंतःकरणांत, कामदेव तरुणांच्या हृदयांत, वसंत वनमंडळामध्यें, वायु चंदनवनामध्यें, उत्कर्ष नीतिमानाच्या घरांत, आणि आत्मबोध मुमुक्षूच्या हृदयांत प्रवेश करतो, तसा मनोरमेच्या विलासगृहामध्यें प्रवेश केला. शत्रुजिताच्या तोंडून उदयिक काय काय व्यवस्था व्हावयाची ती ऐकून मनोरमा, जशी कांहीं पावसानें पृथ्वी, वसंतानें वनराजि,

चंद्रानें चकोरी, सूर्यानें कमलिनी आणि बोधानें मनोवृत्ति आनंद पावते तशी आनंद पावून बोलली कीं—"आज मला गुरुजनांच्या आशीर्वादाचें, अनेक जन्मांतरींच्या पुण्याईचें, देवांच्या प्रसादाचें, फार दिवसपर्यंत धरलेल्या आशेचें, आणि पातिव्रत्यानें केलेल्या आपल्या सेवेचें फळ मिळालें."

याप्रमाणें गोष्टी बोलतां बोलतां निद्रेच्या अज्ञानामध्यें नव्हे तर आनंदांतल्या आनंदांत त्यांची सारी रात्र मात्र सरली.



# प्रकरण १३ वें.

## शिकवणी.

दुसरे दिवशीं सकाळींच उठून शत्रुजित् राजानें शारीरिक विधि आटोपला, शिवपूजन उरकून घेतलें, पूजनगृहांतच कुसुमायुधाला बोलावून आणविलें, आणि समजून सांगितलें कीं :—"पुत्रा! माझ्यावरील राज्यरक्षणाचा भार हलका करण्याच्या इच्छेनें आज मी मोठी सभा भरवून तींत तुह्माला युवराज पदवी देण्याविषयीं प्रश्न ठेवण्याचा विचार मनांत आणला आहे. तुह्मी स्वभावानेंच विनययुक्त आहां आणि सर्व विद्यांचें संपूर्ण शिक्षण पावलेले आहां, यास्तव तुह्माला कांहीं उपदेश किंवा शिफारस सांगण्याची जरूर आहे असें मला वाटत नाहीं. तथापि तुमच्या वरील स्नेह, पितृभाव आणि इष्टकार्याचें महत्व हीं मला दोन शब्द बोलण्यास भाग पाडतात. प्राचीन काळीं सगळे वैदिक धर्म नष्ट होऊन गेले होते पण राजधर्माच्या उदयाबरोबर फिरून ते वृद्धि पावले. ज्याप्रमाणें सर्व सद्गुण संतोषामध्यें सामावले आहेत, सगळी विद्या आत्मविद्येंत येऊन जाते, सगळीं वशीकरणें विनयांत राहिलीं आहेत, सर्व मद धनमदामध्यें वसले आहेत आणि सगळीं दानें अभयदानामध्यें येऊन जातात; त्याप्रमाणें सगळे धर्म राजधर्मांत येऊन जातात. ह्मणून राजधर्म पाळण्यांत तत्पर राहा. राजधर्माचे जे अधिकारी असतील त्यांनीं मुमुक्षूंप्रमाणें जितेंद्रिय राहिलें पाहिजे, प्रिय आणि अप्रिय वस्तूंवर समदृष्टि ठेवली पाहिजे, अभिमानाचा समूळ त्याग केला पाहिजे, दुर्जनांच्या संगतीला भ्यालें पाहिजे, कोशांचा विचार केला पाहिजे आणि सर्वदा ससंग असूनही मनानें निःसंग राहिलें पाहिजे.

राज्यलक्ष्मी मदिरेप्रमाणें चित्ताला भ्रष्ट करून टाकते, डोळसाला सुद्धां अंध करून टाकते, विवेकी मनुष्याला सुद्धां मूर्ख बनवून सोडते, समजूतदाराला सुद्धां अन्यवस्थित भाषणें करण्यास लाविते, प्रकृतीला पार बदलून टाकते, डोळ्यांस लालभडक करून सोडते, हातां-तल्या हातांत कोणतेही गोष्टींचें विस्मरण पाडते, अयोग्य विषयांमध्यें सुद्धां व्यासंग करविते, मनांत अनेक कुकल्पना लावते, अनेक अनर्थांस उत्पन्न करते, हसें होईल या गोष्टीचें भान राहूं देत नाहीं, गुरुजनांचें सुद्धां स्मरण होऊं देत नाहीं, आणि थोडक्यांत समज कीं लुच्चे लफं-ग्यांच्या सोबतींत आणून सोडते. या साठींच राज्यलक्ष्मीच्या कचाटी विषयीं सावध राहून, जीवन्मुक्ताप्रमाणें, व्यवहार चालले असतांही, त्यांत निःसंग राहावें. राजा मऊ असला तर लोक त्याचा आंवाका तेव्हांच जा-णतात आणि उग्र असला तर त्याला लौकरच कंटाळतात. तेव्हां ज्याप्रमाणें वसंतऋतु समशीतोष्णपणानें आपल्या आर्तव आधिपत्याची पदवी शोभ-वितो, त्याच प्रमाणें राजानेंही, कोमळता आणि उग्रता या दोहोंसही धरून, आपल्या स्वतांच्या पदाला गौरव येईल, असें वागलें पाहिजे. जशी लहान बाळकाची आई आपल्यास आवडत्या पदार्थाचें ग्रहण न करतां बाळकाच्याच एकट्या हिताकडे लक्ष ठेवते, तसें राजानेंही, आपल्यास प्रिय अशा विषयांचाही त्याग करून नित्य प्रजांच्या हिता-वरच लक्ष देऊन राहिलें पाहिजे. कोणत्याही कामाच्या सिद्धीसाठीं दैव आणि उद्योग या दोहोंचाही योग सारखाच उपयोगाचा आहे, तरी दैवाचा निश्चय, फळ प्राप्त झाल्यावरच होतो, यासाठीं उद्योगाला त्याच्या अगोदर आदरलें पाहिजे, व त्यासच उत्तम मानलें पाहिजे. दैव दिसतें कोठें? पण उद्योग दिसतो, इतकेंच नव्हें तर उद्योग केल्या-वरही जर त्याचें फळ न मिळालें तर न करत्याच्या दोषांतून तरी आपणास मुक्त होण्याची सवड असते, आणि फळ मिळालें

ह्मणजे दुःखांतून मुक्तता होते हें तर सिद्धच आहे. विद्वान आणि कुलीन मनुष्यें, धनमय नसूनही, मोठ्या भांडाराचें कार्य करतात; पाषाणमय नसूनही, किल्याचें काम करतात; लोहमय नसूनही आयुधांचें काम करतात; धातुमय नसूनही चिलखताचें काम करतात; प्रकाशमय नसूनही, अंधकाराचें निवारण करतात; तपोरूप नसूनही संकटांतून उद्धार करतात; नेत्ररूप नसूनही चांगला रस्ता दाखवितात; थोडे असूनही मोठ्या सैन्याचें कार्य करतात; अंतःकरणरूप नसूनही गुह्य गोष्टी गुप्त ठेवतात, आणि औषधमय नसूनही उपद्रवाला दूर करतात. या साठीं, हे पुत्रा! राज्यामध्यें अशा माणसाचा नित्य संग्रह करावा. हलक्या लोकांच्या संगतींत पडलेला राजा, त्यांनीं केलेल्या खोट्या स्तुतीला भुलून, वाऱ्यानें फुगलेल्या रबरी चेंडूप्रमाणें, त्वरितच नाश पावतो. असे राजे मृगयेंत आसक्त होऊन निरपराध प्राण्यांचे प्राण हरण करण्याला पुरुषार्थ समजतात; मद्यपान करण्यांत आणि अफूचा कुसुंबा पिण्यांत तर्र होऊन आयुष्याचा काळ अनेक चुका करण्यांत व आळसांतच घालवितात; सारिपाट खेळण्यांतच सर्वकाळ गर्क होऊन सोंगट्या मारण्यानेंच शत्रूला मारलें असें मानतात; परस्त्रियांच्या ठिकाणीं लंपट होऊन स्वस्त्रिया चांडाळीप्रमाणें अस्पृश्य होत असें लेखतात; गवैये व नटनर्तक यांच्या संगतीला लागून मंत्र्यांच्या समागमाला यमदूतांच्या समागमाप्रमाणेंच मानतात; लफंगेपणाच्या उडाऊ खर्चामध्यें उदारता धरून, प्रजांचें कंठपान करण्यांत अमृतपानाचा आस्वाद धरतात; थट्टा मस्करी वगैरे ठोलेपणा करण्यांतच आनंद मानून राज्यप्रकरणीं कागदपत्र वाचणें ह्मणजे मरणसमाचाराचा कागद वाचणें असें समजतात. उत्पन्न किती, खर्च किती, या विचाराला मरणसमयीं मृत्युपत्र करण्याच्या विचाराप्रमाणें मानतात; आपल्या भाऊबंदांस, माळ जमीन होऊन गेलेल्या शेतांप्रमाणें, ते भाजून जाळून टाकण्यालाच योग्य होत असें लेखतात; हांजी हांजी

करणाऱ्या खुशामती मनुष्यांसच धर्मशास्त्रांत सांगीतलेलीं दानपात्रें म्हणून समजतात; विद्वज्जनांस मुतक्याप्रमाणें समजून, दूर दूरच वागवितात; मनांतून हसणारे पण तोंडावर स्तुति करणारे चारण भाट वगैरे लोकांच्या असंबद्ध कवितांनीं आपली कीर्ति दिगंतांपर्यंत पोंचली असें मानतात; आपल्या स्वतांस बुद्धिमान समजून प्रामाणिक लोकांच्या गोष्टीची टवाळी करून त्या मोडून काढतात; मनास वाटेल त्याप्रमाणें वागणें यांतच राजेपणा आहे असें मानतात; खऱ्या धर्मस्थितीचा लोप करण्यांतच सुधारणा आहे असें समजतात; वेश्यांच्या गोष्टी ऐकणें म्हणजे वेदांच्या श्रुति ऐकण्यासारखेंच आहे असें मानतात; आपमतलबी लोकांनीं केलेल्या खोट्या स्तुतींनीं फसून जाऊन स्वतांला ईश्वररूप समजतात; हितेच्छु लोकांच्या उपदेशाला कानांत सळसळणाऱ्या तेलाप्रमाणें मानतात; परक्याची निंदा करणें म्हणजे भगवद्गीतेचा पाठ करण्याप्रमाणें गणतात; व्यभिचारिणी स्त्रियांनीं ठसवून दिलेल्या गोष्टीला उपनिषदांच्या अर्थाप्रमाणें समजतात; ज्याप्रमाणें डोळे-दुखरे लोक प्रकाशाला प्रतिकूळ मानतात तसेच हेही खऱ्या गोष्टीच्या प्रकाशाला प्रतिकूळ मानतात; शास्त्राच्या चर्चेला पातकाच्या चर्चेप्रमाणें लेखतात; वायूच्या रोगानें घेरलेल्याप्रमाणें स्तब्ध होऊन बसतात; पृथ्वीवर पाय दिल्यानेंही पृथ्वीला मान दिला असें धरतात; क्षयरोगानें ग्रस्त झालेल्याप्रमाणें मांसाच्या आहारावरच निर्वाह करतात; शिव्यांच्या आवृत्तीला विष्णुसहस्रनामाच्या आवर्तनाप्रमाणें मानतात; चाहाडी करणाऱ्या लोकांच्या वचनांस धर्मशास्त्राच्या वचनाप्रमाणें लेखतात; मार देऊन वसूल उत्पन्न करण्याची संवय आपल्या धनीपणाला अलंकाररूप होय म्हणून समजतात; ईर्षेला अनुचरीप्रमाणें नित्य आपल्या बरोबरच वागवितात; साहसाला आपल्या जन्माचें फळ ह्मणून मानतात; द्रोहाला परमप्रिय मित्र समजून क्षणमात्र विसरत नाहींत; आपल्या आवडत्या नीच लोकांनीं

केलेल्या मस्करीनें खुश होतात; नीच लोकांच्या हातांत दोरीनें पाय बांधलेल्या पक्ष्यांप्रमाणें ते नाचवितील तसे नाचतात; अंत:पुरांत निजण्याला स्मशानभूमीवर निजण्याप्रमाणें समजतात; विश्वासघाताच्या कृत्याला मोठ्या चातुर्याच्या महाकृत्याप्रमाणें समजतात; नास्तिकपणाला तत्वज्ञानाप्रमाणें लेखतात; आणि चपळ राज्यलक्ष्मीला सुद्धां अचळ समजून निश्चिंत राहतात; ह्मणून या लोकींचें आणि परलोकींचें कल्याण इच्छिणाऱ्या राजानें अथवा राजकुमारानें नीच मनुष्यांस दुर्दैवाचे दूत होत ह्मणून समजून त्यांपासून दूरच राहावें. कुमार कुसुमायुधा! राज्याचे शत्रूंस जिंकण्यापेक्षां मनाला जिंकण्याची पहिल्यानें फार जरूर आहे. ज्या राजानें मनाला जिंकलें नाहीं त्याला शत्रूला कधींही जिंकतां यावयाचें नाहीं. द्यावें पण अपात्रीं दान कधीं करूं नये. धन मिळवावें पण कठोरपणानें नव्हे. प्रिय बोलावें पण त्यांत दीनपणा नसावा. सुख भोगावें पण जेणेंकरून धर्म आणि अर्थ यांचा नाश होईल अशा प्रकारें नव्हे. मनचें गुज सांगावें पण तें नीच लोकांपाशीं नव्हे. शत्रूंस वश करण्यासाठीं त्यांवर स्वारी करावी पण अपराध पाहिल्यावांचून नव्हे. तसेंच कांहींही घ्यावें पण तें अधर्मानें घेऊं नये. शूर व्हावें पण स्वताची स्तुति करूं नये. दृढ निश्चयानें वागावें पण दया सोडूं नये. मैत्री करावी पण ती नीच लोकांबरोबर नसावी. गुण गावे पण ते स्वताचे नव्हत. विग्रह करावा पण तो बंधूंबरोबर नसावा. कार्य साधावें पण अपकीर्ति होईल असें करूं नये. दंड करावा पण न्यायान्यायाची परीक्षा केल्यावांचून नव्हे. क्रोध धरावा पण अपराध पाहिल्यावांचून नव्हे. वडिल माणसांची सेवा करावी पण तींत कपट नसावें. स्वादिष्ट भोजन करावें पण तें अपथ्यकर नसावें. कोमळता ठेवावी पण अपकार करणावर नव्हे. चापल्य दाखवावें पण समय जाणल्यावांचून नव्हे. प्रसाद दाखवावा पण सुकासुकी नव्हे. जासूद ठेवावे पण खऱ्या भक्तीवाचून नसावे. आश्रय

धरावा पण दुर्जनाचा नव्हे. स्त्रियांशीं प्रसंग करावा पण अति न करावा. देवपूजन करावें पण दांभिकपणानें नव्हे. उदार व्हावें पण उद्धटपणानें नव्हे. स्त्रियांबरोबर ईर्षा न धरावी पण त्यांचा बंदोबस्त ठेवण्यास चुकूं नये. लक्ष्मीची इच्छा करावी पण नीच कृत्यांनीं नव्हे. आणि शत्रूंचीं राज्यें हरवून घ्यावीं पण त्यांच्या बंधुजनांचे शांतवन करण्यांत व समाचार घेण्यांत कमीपणा करूं नये. लहानसान काम सुद्धां एकट्याच्यानें सिद्धीस नेववत नाहीं मग राज्यसंरक्षणासारखें जोखिमाचें मोठें कृत्य कोणाच्याही साहाय्यावांचून कसें तडीस नेतां येईल? ह्मणून राजानें सहाय अवश्य ठेवावे. पण विश्वास आणि अविश्वास हे दोनही वेळेनुसार अकाळ मृत्यूप्रमाणें होत; या साठीं जसा वैद्य आहाराच्या व विहाराच्या हीन, मिथ्या, आणि अति योग यांवर लक्ष देत असतो तसेंच राजानेंही विश्वास आणि अविश्वास याच्या या तीनही योगांवर सूक्ष्म लक्ष द्यावें हें अत्यंत जरूरीचें आहे. राजाला भाऊबंदांचें भय धरण्याची जरूरी आहे तशीच त्यांचें रक्षण करण्याचीही अवश्यकता आहे. भल्या राजाचा विनाश झाला असतां भाऊबंदांवाचून दुसरे कोणालाही बरें वाटत नाहीं. ज्याला भाऊबंद नाहींत अशा राजाचा शत्रूंकडून जसा सहज पराभव होतो तसा ज्याला भाऊबंद आहेत अशा राजाचा एकाएकीं होत नाहीं. या साठीं भाऊबंदांच्या गुणदोषाकडे फारसें न पाहतां त्यांच्यांशीं विश्वासूक मनुष्यांप्रमाणें रहावें पण आंतून त्यांचा बिलकूल विश्वास न धरतां जपून असावें. भाऊबंदकीच्या भांडणांमध्यें एकमेकाविरूद्ध जुगार खेळूं लागलेल्या दोन मुलग्यांच्या आईप्रमाणें एकाचा जय व एकाचा पराजय होवो असेंही इच्छितां कामा नये. भलेपणानें वागविलें असतांही भाऊबंद कुरकुर केल्यावांचून राहावयाचे नाहींत, ह्मणून तिरव्याशिवायचें कोमळ शस्त्र फिरवून त्यांची जीभ तोडून घ्यावी ह्मणजे ते आपोआपच गप्प

बसतील. त्यांच्या शक्तिप्रमाणें त्यांस जेऊं घालावें, योग्य रीतीनें त्यांचा सन्मान करावा; त्यांचे अपराध पोटांत घालणें आणि त्यांच्याशीं सरळपणानें वागणें हेंच तिच्या शिवायचें कोमळ शस्त्र आहे. सर्पयुक्त घरांत राहणें, शूर पुरुषाच्या स्त्रीच्या घरांत बसणें, आणि राज्य रक्षण करणें हीं तीनही सारखींच होत. बरेच नोकर लोक राज्याच्या वैभवाला नुकसान करण्यास प्रवृत्त झाले आहेत असें जेव्हां आढळेल तेव्हां सर्वांसच एकदम न पकडतां एकेकास अनुक्रमानें दुर्बळ करावें व त्यांस शिक्षा करावी, म्हणजे एक अनर्थ टाळण्याचा यत्न करूं जातां दुसरी अडचण उत्पन्न होते ती होणार नाहीं. अविद्वान कुलीन असला तरी निरुपयोगी आहे, अकुलीन विद्वान असला तरीही निरुपयोगीच आहे; कुलीन आणि विद्वानही आहे पण तो दृढ विचाराचा नाहीं तर निरुपयोगी समजावा; आणि कुलीन, विद्वान आणि दृढविचारी असला तरी त्याच्या ठिकाणीं खरी भक्ति जर नाहीं तर तो सेवकही केवळ निरुपयोगीच होय. यासाठीं राजानें त्याच्या सर्व गुणांची परीक्षा करूनच मंत्र्यांच्या वगैरे नेमणुका केल्या पाहिजेत. राजानें यशाबरोबर भांडार आणि सैन्याबरोबरच मित्रांची वृद्धि करण्याचा यत्न केला पाहिजे, दुर्गुणांबरोबर दुष्ट लोकांचा त्याग केला पाहिजे, प्रजेबरोबर उत्तम वृक्षांसही वाढविलें पाहिजे, रत्नांबरोबरच विद्वानांचा संग्रह केला पाहिजे, विचाराबरोबरच रस्त्यांची सुधारणा केली पाहिजे, न्यायाबरोबर धर्मास वाढविलें पाहिजे, स्त्रियांबरोबर लक्ष्मीचें वारंवार निरीक्षण केलें पाहिजे, आणि मनाच्या वृत्तिप्रमाणें खजिना आणि सैन्य यांस आपल्याच हतांत ठेवावें. कामविहार आणि राज्यकारणी मंत्र हीं एकांतांतच केलीं पाहिजेत. कर आणि भाषण हीं कोमळच ठेविलीं पाहिजेत. मन आणि सैन्य यांस मजबूतच ठेवलीं पाहिजेत. नीच लोक आणि दुर्गुण यांस वर्जच केलें पाहिजे. गुरुजन आणि मंत्री यांचें बोलणें ऐकलेंच पाहिजे. प्रजा आणि सत्य यांचें पालनच केलें पाहिजे.

चांगल्या माणसांचा तसाच धनाचा संग्रहच केला पाहिजे. उद्योग आणि धैर्य यांस सोडतां कामा नये. इंद्रियांस आणि शत्रूंस वश्य करूनच ठेवलें पाहिजे. छिद्र आणि विचार यांस गुप्तच ठेविलें पाहिजे. व्यसनी आणि कपटी लोकांपासून दूरच राहिलें पाहिजे. नीति आणि दया यांचा विसर पडूंच देतां कामा नये. अन्याय आणि खुशामती लोकांचीं भाषणें यांनीं आपली थोरवी मानतां कामा नये. आळस आणि अधर्म यांचा लाग साधेल असे होऊंच देतां कामा नये. विश्वास आणि अविश्वास यांच्या मधोमधच राहिलें पाहिजे. शत्रूंच्या व आपल्याही छिद्रांचे निरीक्षण करीतच असलें पाहिजे. मन आणि धन यांस कुमार्गी जाऊं देतां कामा नये. राज्यकृत्यें आणि शास्त्रविचारणा यांस कधींही कंटाळतां कामा नये. वेळ आणि धन यांस निरर्थक वापरतां कामा नये. विद्वानांच्या मसलतीची तशीच शत्रूंच्या खटपटीची उपेक्षा कधींही करतां कामा नये. लक्ष्मी आणि कीर्ति यांस नित्य वाढवीतच गेलें पाहिजे. शरीर आणि देश यांच्या रक्षणांत तत्परच राहिलें पाहिजे. देशांत रोग आणि भिकार यांचा वाढवा कधीं होऊंच देऊं नये. महात्मे आणि बलवत्तर लोकांस नित्य नमलें पाहिजे. धर्माचें आणि स्वताच्या आज्ञेचें उल्लंघन होऊंच देतां कामा नये. भाऊबंद आणि स्त्रिया यांचा अतिविश्वास धरतांच कामा नये. मंत्र्यांच्या आणि मंत्र्यांचे अपराध दाखवि- णाराच्या भाषणांतील हकीगत चौकसून पाहिलीच पाहिजे. अपराध्यांस आणि राजकीय हक्काच्या थोडक्याही धनास सुटून जाऊंच देतां कामा नये. प्रमादा- विषयीं व राज्यातील ज्या अधिकाऱ्यांचे अधिकार काढून घेतले असतील त्यांच्या विषयीं शंकितच असलें पाहिजे. धर्म आणि देशकाल यांचे चिंतन हंमेश करीतच गेलें पाहिजे. लोभास्तव अथवा दुसऱ्या कोणत्याही कारणास्तव अन्याय करतांच कामा नये. परक्यांचे गुण आणि दुर्गुण विसरतां कामा नये. मनुष्याची जाण जाण्यांत आणि भगवद्भजन करण्यांत चुकतां कामा नये.

व्यवहार आणि नोकर निर्मळच ठेवला पाहिजे. रत्नांची आणि मनुष्यांची परीक्षा केल्यावरच त्यांस आपलेंसें केलें पाहिजे. हीन मंत्र्यापासून आणि हीन विचारांपासून अहितच होईल असें पक्कें लक्षांत वागविलें पाहिजे.

नव्या माणसांचा तसाच नव्या औषधांचा उपयोग सहसा एकदम करूं नये. मधुरवचन आणि प्रामाणिकपणा यांस कधींही वेगळीं वेगळीं करतां कामा नये. जेणेंकरून हृदयाला पीडा जाळीत मात्र राहील आणि परलोकसाधनही नष्ट होईल तें कधीं करूं नये. जेणेंकरून अपराधी सुटून जाणार नाहीं आणि निरपराधी दुःखी होणार नाहीं अशीच पद्धति स्वीकारली पाहिजे. प्रजांचा विश्वास बसेल आणि विश्वास उत्पन्न पण होणार नाहीं असेंच वागलें पाहिजे. शास्त्रांतल्या आणि हेराकडून कळलेल्या सगळ्या गोष्टींचें रहस्य जाणलें पाहिजे. अनाथ लोकांस आणि जिंकलेल्या शत्रूंस आजीविका दिलीच पाहिजे. दुःखावर लाविलेल्या जळूप्रमाणें आणि पुष्पावर बसलेल्या भ्रमराप्रमाणें कोमळ उपायांनींच स्वार्थ चोखून घेतला पाहिजे. शीत काळाप्रमाणें आणि रोगाप्रमाणें हळु-हळूच स्वतांचा प्रभाव दाखवीत व वाढवीत गेलें पाहिजे. उत्पन्नाच्या प्रतिबंधाला आणि वेश्यांच्या वगैरे अखाड्यांला तोडूनच टाकलें पाहिजे. भिकारी आणि लफंगे लोक यांस देशाचा उच्छेद करणारेच समजले पाहिजेत. शेतकरी आणि व्यापारी हे राज्याचे आधारस्तंभच गणले पाहिजेत. धनाढ्य आणि शूर लोकांस अत्यंत उपयोगी ह्मणूनच लेखलें पाहिजे. कर्ज आणि दर्द यांस सारखेंच गणलें पाहिजे. हिशोब आणि हकीगत यांचा स्वीकार तपासल्यावाचून कधींही करतां कामा नये. दुर्ज-नाचें निवारण आणि सज्जनाचें संरक्षण यांवरून राज्याची सुस्थिति लक्षांत आणली पाहिजे. ईर्षा आणि अभिमान यांचें फळ वाईट असा निश्चयच जाणला पाहिजे. दंड भोगलेल्या कारभाऱ्यांपासून आणि नीच लोकांच्या परिचयापासून दूरच राहिलें पाहिजे. अनीतीनें पीडलेल्या गरीब लोकांचे

आणि काठीनें मारलेल्या काळ्या कुळकुळीत नागाचे निश्वास सारखेंच फळ देणारे आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. सत्कर्म आणि कुकर्म यांचें फळ कालांतरानें मिळाल्यावांचून राहणार नाहीं हें विसरतां नये. न्यायाचे कामांत व स्त्रियांच्या खटपटींत पक्षपात धरून चालतां कामा नये. मी बुद्धीनें आणि धनानें समृद्ध आहें अशी घमेंडी कधींही मारूं नये. अतिलोभ आणि अतिसाहस हीं विनाशाचीं मुळेंच समजलीं पाहिजेत. प्रश्नांचीं उत्तरें देण्यांत कठोरता आणि उतावळेपणा धरतां कामा नये. जो मनुष्य योग्य दिसेल त्याचें मागीतल्याशिवाय आणि सुचविल्याशिवायच प्रिय करावें. आपल्याला प्रिय अशी गोष्ट घडल्यानें अतिहर्ष आणि अप्रिय घडल्यानें अतिसंताप कधींही मानतां कामा नये. उत्तम मनुष्यांची उत्तम कामामध्यें आणि हलक्या मनुष्यांची हलक्या कामामध्येंच योजना केली पाहिजे. बुद्धीनें मिळविलेला जय उत्तम होय तसाच युद्धानें मिळविलेला जय अधम होय ही गोष्ट कधींही विसरतां कामा नये. मूळ जेव्हां अतिदृढ नसेल तेव्हां नवीन लाभाची इच्छा धरणें आणि मूळ अतिदृढ असेल तेव्हां संतोष मानणें या दोनही गोष्टी सोडूनच दिल्या पाहिजेत. देश संपत्तियुक्त आणि लोक भक्तियुक्त असल्यानें राज्याची मुळें सुदृढ आहेत असें समजलें पाहिजे. चांगलेपणानें चालणाऱ्या आपल्या मनुष्यांशीं वाईट रीतीनें वागणें ह्मणजे आपल्याच हातानें आपल्या पायावर धोंडा टाकण्याप्रमाणें किंवा आपल्याच हातानें आपलें मूळ कापण्याप्रमाणेंच आहे असें पूर्णपणें समजलें पाहिजे. शत्रूनें ठेवलेल्या विश्वासाचा व चुक्यांचा लाभ घेण्यास कधींही चुकूं नये. ज्यांचा स्वतः तिरस्कार केला असेल त्यांच्या मधुर वचनांनीं व मधुर कृत्यांनीं कधींही भुलतां उपयोगी नाहीं. इंद्रियांस आणि अस्थिर मनाच्या लोकांस लगामीं राखण्यांतच खरें चातुर्य आहे असेंच समजलें पाहिजे. राज्यकारभारांत चूक उत्पन्न होणें आणि कांठोकांठ भरलेल्या जलाशयाचा बांध फुटणें हीं दोनही सारख्याच

योग्यतेचीं मानलीं पाहिजेत. तोंडावर अनुकूळ वचन आणि पाठीमागें उदासीनपणा या लक्षणांवरून लबाड दुर्जनाला तेव्हांच ओळखून ठेविलें पाहिजे. धीर धरून आणि सर्व कांहीं अनित्य आहे हा सिद्धांत ध्यानांत ठेवून सुखाच्या अथवा दुःखाच्या समयीं कधींहीं गडबडतां कामा नये. संकटसमयीं शत्रूशीं सुद्धां अगदीं कसें मिळून जावें आणि मिळून जाऊनही त्याच्या खजिन्याचा क्षय कसा करून टाकावा याविषयींची युक्ति हंमेश ध्यानांत वागविलीच पाहिजे. लोभ आणि मत्सर हे दोनही दुर्गुण ऐक्याचा नाश करणारे आहेत हा आपला सिद्धांतच मानला पाहिजे. ऐक्याला आणि प्रामाणिकपणाला कधींच सोडतां कामा नये. राजपुत्रांस स्वच्छंद न राहूं देण्याची तशीच त्यांस शिक्षण देण्याची काळजी हंमेश धरलीच पाहिजे. आपल्या कुळांत व आपल्या मंडळींत उद्भवलेला तंटा बखेडा त्वरितच दडपून टाकला पाहिजे. आईबाप आणि गुरु यांच्या सेवेंत तत्पर राहिलेंच पाहिजे. पापी लोकांचें निर्दालन करण्यांत व कपटी लोकांजवळ खोटें बोलण्यांत बिलकूल पाप नाहीं असेंच समजलें पाहिजे. सुरत संततीसाठीं आणि धन प्रजेच्या कल्याणासाठींच आहे असें गणलें पाहिजे. लोभी मनुष्यें उदार पुरुषांचा द्वेष करतात आणि मूर्ख लोक विद्वानांचा द्वेष करतात ही गोष्ट आठवणींतून जाऊं देतां कामा नये. कोणालाही एकदम मान देण्यानें आणि कोणाचाही एकदम अपमान करण्यानें स्वतः आपलाच नीचपणा उघड करण्याप्रमाणें होतें. चांगले व भले सोबती बाळगल्यानें आणि विचारपूस करून काम करण्यानेंच आपल्या पदवीचा उत्कर्ष राखला जातो. प्रबळ शत्रूचा पहिला जोर सहन केल्यानें आणि हलक्या माणसांच्या दुर्वचनाकडे दुर्लक्ष केल्यानेंच सुखाची स्थिति प्राप्त होते. खजिन्याच्या वृद्धीमध्यें आणि देशाच्या सुखसंपन्नतेमध्येंच राज्याचें फळ राहिलेलें आहे. गतगोष्टीचा शोक न करण्यामध्यें आणि पुढील

व्यवस्था नीटपणें लावण्यामध्येंच खरें कल्याण आहे. जर सोबती भले असतील तरच सुख मिळवितां येईल आणि तें मिळविल्यावर त्याचें रक्षणही करतां येईल हा सिद्धांतच समजून लक्षांत ठेवला पाहिजे. वरिष्ठ अधिकारावर नीच मनुष्याची योजना केल्यानें आणि विद्वान लोकांचें ह्मणणें न ऐकल्यानें अपकर्ष हटकून द्वारींच येऊन ठेपला ह्मणून समजावें. भला मंत्री ठेविला असतां आणि त्याच्या भाषणाची अवज्ञा कधींही केली नसतां राज्याचा विस्तार वाढत जाणार ह्मणून समजावें. खजिना आणि कोठारें हीं भरलेलींच नित्य ठेवलीं पाहिजेत. प्रजेचें उत्पन्न व तिचा खर्च यांचा व तिच्या एकंदर स्थितीचा अंदाज पाहूनच तिच्यावर करांची योजना केली पाहिजे. जसें तापलेलें लोखंड पाण्यांत पडल्यानें ताबडतोब थंड होऊन जातें तसा आलेला रागही भल्या माणसांच्या सांगण्यानेंच शांत होतो. जशी विण्याची तार आपल्या संबंधाच्या सगळ्या स्वरांस अनुसरते तशी आपल्या संबंधाच्या सगळ्या मनुष्यांस अनुसरून वागण्याची संवय लावून घेतली पाहिजे. मोर जसा चित्रविचित्र रंगाचा पिसारा शरीरावर बाळगून त्यांतून अयोग्य दिसेल त्या पिसास निवडून नेमका काढून टाकतो, त्याचप्रमाणें विचित्र स्वभावाच्या मनुष्यांस जवळ बाळगून त्यांतून अयोग्य वाटेल त्याला हुडकून काढून दूर केलें पाहिजे. उंदीर जसा फुंकून फुंकून लोकांच्या पायांचें मांस कुरतडून भक्षण करतो त्याचप्रमाणें शांत राहून करद्वारा लोकांच्या धनाचें ग्रहण करण्याची हातोटी ठेवली पाहिजे. सूर्य जसा चांगल्या अथवा वाईट पदार्थांवर सारखाच प्रकाश फेंकतो त्याचप्रमाणें उत्तम अथवा अधम लोकांस सारखाच न्याय देण्याची व्यवस्था ठेवली पाहिजे. वासरें जशीं गाईचा अचूळ न चावतां त्यांतील दुधाचेंच मात्र ग्रहण करतात त्याचप्रमाणें प्रजेच्या मिळकतीचा नाश न होऊं देतां तिच्यावर कोमळ कर ठेवून धनाचें मात्र ग्रहण केलें

पाहिजे. मधमाशी जशी सर्व फुलांमधून थोडथोडा रस घेऊन मोहोळाची भरती करते त्याचप्रमाणें सर्व लोकांच्या उद्योगधंद्यानें उत्पन्न केलेल्या धनांतून थोडथोडा अंश घेऊन खजिना भरून ठेविला पाहिजे. गौळी जसा गाईंस दररोज दोहीत असून त्यांस हृष्टपुष्ट ठेवितो त्याचप्रमाणें प्रजांसहीं नेहमीं दोहून त्यांस हृष्टपुष्ट ठेवण्याची रीत स्वीकारली पाहिजे. जें धन नेमलेल्या खजिन्याच्या स्थितीपेक्षां जास्ती होईल तें धर्ममार्गामध्यें, आणि शारीर सुखोपभोगामध्यें वेचण्यास नड नाहीं. तथापि नेमलेल्या खजिन्याच्या स्थितींत सबळ कारणावाचून किंचितही न्यून राहूं देऊं नये. आपला क्रोध अथवा प्रसाद जेणेंकरून सफळ होतील असेंच करण्यास नेहमीं तत्पर असलें पाहिजे. सेनेचें आणि राज्यप्रकरणीं कामकाजाचें जातीनेंच अवेक्षण केलें पाहिजे. शूरपणाचा आणि जमाखर्चाचा संभाळ ठेवण्याचा कधींही विसर पडूं देऊं नये. बुद्धीनें बळ वाढतें आणि बळ वाढलें असतां प्रबळ शत्रूचाही पराभव सहज करतां येतो. म्हणून बुद्धीला नेहमीं प्रदीप्तच ठेवली पाहिजे. लोभ्यांचा आणि मूर्खांचा कधीं संग्रह पदरीं ठेवूं नये. राज्यरक्षणाच्या अनेक उपायांची योजना करण्यांत जे मोठा बोजा उचलूं शकतील अशांचेच साहाय्य घेण्यांत तत्पर राहिलें पाहिजे.

कुमार कुसुमायुधा! शील गेलें तर त्याच्या मागें धर्मही जातो, धर्माच्या मागोमाग सत्य, सत्याच्या मागोमाग सदाचार आणि सदाचाराचा लोप झाला म्हणजे लक्ष्मीनेंही आपला पाय उचललाच म्हणून समजावें; यासाठीं होतां होईतों शीलाचा भंग कधीं होणार नाहीं अशाविषयीं नेहमीं दक्षता ठेवीत जा. ससाण्याच्या भयानें जसे सगळे पक्षी पळून जातात त्याचप्रमाणें दुःशील राजाच्या भयानें सर्व लोक त्यास सोडून जातात. सुकाणावाचून जसें तारूं गोते खातें त्याचप्रमाणें दुःशील राजाच्या राज्यलक्ष्मीलाही अनेक गोते खावे लागतात. ज्याप्रमाणें मधुर वचना-

वांचून दान, आणि शाकभाजीवांचून भोजन रुचिकर होत नाहीं त्याच प्रमाणें सच्छीलपणावांचून राजेपणही रुचिकर वाटत नाहीं. कुळ, रूप यौवन, धन, विद्या, आणि राज्य यांतून एकेकही ज्यापेक्षां अनर्थास पुरेशीं आहेत त्यापेक्षां या सर्वांचाच समुदाय जर एकत्र मिळाला तर मग काय बोलायचें आहे? ज्याप्रमाणें वर्षाकाळची नदी मोठ्या पुलाला तोडून वाहून नेते आणि ब्रह्मविद्या ज्याप्रमाणें प्रबळ द्वैतालाही झुगारून देते त्याचप्रमाणें यौवन समयाची प्रकृति बळकट विवेकालाही तोडून दूर सारते. वावटळ जशी सुकलेल्या पाचोळ्याला, नदींतील भोंवरे जसे आंत सांपड-लेल्या किड्याला आणि अविद्या जशी मूढ जीवाला चक्राकार फिरविते त्याचप्रमाणें यौवन समयींची भोगतृष्णा मनाला गरगर फिरवूं लागते. ज्याप्र-माणें निर्मळ नदी वर्षाऋतूमध्यें, निर्मळ चंद्रिका जशी ग्रहणाचे वेळीं, आणि निर्मळ पैठणी जशी घामाच्या स्पर्शानें मलिन होते त्याचप्रमाणें निर्मळ बुद्धि सुद्धां यौवनाचे विकारांनीं मलिन होते. यौवनाचा अंधकार सूर्याच्या प्रकाशानें लोपत नाहीं, दिव्याच्या प्रकाशांत त्याला अधिकच्च जोर येतो, मण्यांच्या प्रकाशानें तर तो जास्तच चेतला जातो, चंद्राच्या प्रकाशानें फारच पुष्ट होत जातो, आणि विजेच्या चकचकाटानें तर इतका प्रबळ माजतो कीं त्याचें वर्णनही करतां येत नाहीं. यौवन हें अभिमानरूपी मोठ्या हत्तीला बांधून ठेवण्याचा खुंटा आहे, चित्तरूपी गलबताला गरगर फिरविणारा तुफानी वारा आहे, कामदेवरूपी पिशाचाचें नाचण्याचें अरण्य आहे, दोषरूप विषारी सर्पांचें राहण्याचें बीळ आहे, चितारूपी भ्रमरीचें भ्रमण करण्याचें कमळवन आहे, आधिव्याधिरूपी विचित्र पक्ष्यांचें राहण्याचें घरटें आहे, आणि कल्पनारूपी कल्लोलमालांस उसळण्यासाठीं महासमुद्र आहे. जे यौवनविकारांस वश्य होत नाहींत ते कोणासही वश्य होणार नाहींत; तेच पूज्य आणि तेच खरे महात्मे होत. लक्ष्मीचा मद थंड पाण्यानें मंदावत नाहीं, घी शक्कर घसघशीत खाल्यानें वाढत मात्र जातो आणि यौवनरूपी

आंबटपणानें तर तो उलटा जोरावतच जातो. लक्ष्मी धुळीच्या वृष्टी-प्रमाणें निर्मळ माणसाला सुद्धां कलुषित करून सोडते, पाण्याच्या लाटे-प्रमाणें कोणत्याही एकाच ठिकाणीं ह्मणून स्थिर राहत नाहीं, दुष्ट स्त्री प्रमाणें नीच लोकांच्या ठिकाणीं आसक्त होऊन राहते, विजेप्रमाणें अति चंचळ आहे, थंडीप्रमाणें रूक्षता उत्पन्न करणारी आहे, मदिरे-प्रमाणें जल्पना करविणारी आहे, अनेक प्रयत्नांनीं सुद्धां थोपवून धरूं जातां कृतघ्नपणा केल्याशिवाय राहणारी नाहीं, विखारी वनस्पती-प्रमाणें मेंदूला भ्रम उत्पन्न करणारी आहे, सरस्वतीला चांडाळीप्रमाणें अस्पृश्य मानणारी आहे, पिशाचिकेप्रमाणें वारंवार अतर्कित भय उपजविणारी आहे, विचक्षण मनुष्यास सुद्धां उन्मत्त करून टाक-णारी आहे, दयेला डाकिणीप्रमाणें गणावयास लावणारी आहे, अन्नाच्या अजीर्णाप्रमाणें अनेक विकारांस उत्पन्न करणारी आहे, विषूचिकेप्रमाणें भान भूलविणारी आहे, कफग्रहणीप्रमाणें आलस्याला वाढविणारी आहे, क्ष-त पडून उद्भवलेल्या खोकल्याप्रमाणें तहानेनें व्याकूळ करून सोडणारी आहे, यमला नामक उचकीप्रमाणें प्रलाप, मोह वगैरे उत्पन्न करणारी आहे, सामान्य उचकीप्रमाणें दुसऱ्या लोकांस तिरस्कार करविणारी आहे, अरुचिप्रमाणें भक्तद्वेष उत्पन्न करणारी आहे, छर्दीप्रमाणें निद्रा व भ्रम यांचें आधिक्य करते, रसाच्या क्षयानें उद्भवलेल्या तृषेप्रमाणें हृदयांत पीडा आणि जडता उत्पन्न करते, मूर्च्छेप्रमाणें भ्रमित आणि स्तब्ध करून टाकते, उन्मादावस्थेप्रमाणें असंबद्ध भाषण करण्यास लाविते आणि बुद्धीला भ्रंश करते, अपस्माराप्रमाणें अतिशय अंधकार करून सोडते आणि डोळ्यांचे वगैरे चाळे करविते, चांगल्या व्यवहाराचा लोप करून टाकते, सर्व वाईट चालींस बोलाविते, सत्यवाद्यांस अपशकुनाप्रमाणें लेखिते आणि नदीप्रमाणें नीच मार्गाचेंच अवलंबन करते.

पुत्रा ! राज्यलक्ष्मी भोगीत असतां तिच्या दुर्गुणांपासून अलग राह-

णारे राजे फारच थोडे; पण अशा प्रकारें अलग राहतात तेच कीर्तीला आणि प्रजेच्या आशीर्वादाला पात्र होतात. मसीच्या खोलींत राहूनही मस अंगाला न लागूं देणें ह्मणजे कांहीं लहानसान चातुर्याचें काम नव्हे. राजांस खरा उपदेश करणारे अगोदर कोणी भेटत नाहींत आणि कोणी भेटलेच तर त्यांचें ते ऐकत नाहींत. राजे अभिमानानें आणि उपदेशक धनाच्या लालसेनें घेरलेले आढळतात. राजांचे कान चांगले धड असतां ते उपदेशकाच्या भाषणाचा अनादर करतात, आणि उपदेशकाची जीभ चांगली लांब असतां, त्यांची वाचा भीतीनें बंद पडते. राजे लक्ष्मीनें मस्त असतात आणि उपदेशक दारिद्र्यानें ग्रासलेले असतात. राजे खरा उपदेश ऐकण्याला आणि उपदेशक तो करण्याला कंटाळतात. राजे उपदेशकाला आणि उपदेशक राजाला मूर्ख ह्मणून समजतात. राजे हलक्या मनुष्यांच्या सांगीनें उपदेशकांस आणि उपदेशक अनुभवी मनुष्यांच्या सांगण्यानें राजांस सोडून देऊं पाहातात. राजांस चांगल्या मार्गानें जाणें कठिण वाटतें आणि उपदेशकांस राजांचें कल्याण होणें कठिण वाटूं लागतें. राजांस थट्टा मस्करी आवडते आणि उपदेशकांस मुकाट्यानें बसणें आवडतें. राजांस कुमार्गानें वागून कीर्ति मिळविण्याची इच्छा असते आणि उपदेशकांस कांहींएक परिश्रम न पडतां पगार मिळावा अशी इच्छा असते. मुला! राजे मूर्ख असतात आणि त्यांस मूर्खच ठेवण्यांत त्यांच्या आजूबाजूंच्या माणसांस आनंद वाटतो. राजे आपलेंच म्हणणें खरें करून देण्याला इच्छितात आणि आजूबाजूंचीं माणसें प्रतिध्वनीप्रमाणेंच होस हो करतात. राजे आत्मस्तुतिपाठक असतात आणि आजूबाजूचीं माणसें हांजी हांजी करणारीं असतात. राजे स्वदेशीं व परदेशीं होणाऱ्या आपल्या अपकीर्तीच्या वाटावाटींविषयीं गैरमाहित असतात आणि आजूबाजूंचीं माणसें, त्यांस तिच्या विषयीं माहितगार करण्यांत आपला तोटा आहे, असें समजत असतात. राजे आपली प्रशंसा

ऐकण्याला तत्पर असतात आणि आजूबाजूंचीं माणसें प्रशंसापर शब्द व वाक्यें निवडून काढण्यांतच गुंतलेलीं असतात. राजांस निश्चित राहणें आवडतें आणि आजूबाजूंच्या माणसांस स्वतंत्रतेनें अधिकार गाजवावा हें आवडतें. राजे मद्यपान आणि मौजमजा यांत आसक्त असतात आणि आजूबाजूंचीं माणसें आपापला स्वार्थ साधण्यांत आसक्त झालेलीं असतात. राजे आपल्या सभोंवतालच्या माणसांस विद्वान म्हणून समजत असतात आणि तीं राजांस मूर्खांत गणीत असतात. कुमारा! राज्यावर येण्यापूर्वी राजकुमारांमध्यें जे सद्गुण वसत असलेले आढळतात तेच राज्य मिळतांच राज्यलक्ष्मीच्या दुर्गुणांस भिऊनच पळून जातात काय असें वाटतें. राजे चांगले डोळस असूनही राज्यक्ष्मीच्या उज्वल प्रकाशानें दिपावून गेले असावे अशा प्रकारें आंधळे बनतात; त्यांचे कान चांगले शाबूत असतांही नगाऱ्यांच्या अवाजानें बहिरे झाले असावे अशा प्रकारें खऱ्या गोष्टी ऐकत नाहींत; चांगले सुशिक्षित असूनही जणों राज्यलक्ष्मीरूपी मदिरेनें मत्त होऊन गेले असावे अशा प्रकारें यशोरूप वस्त्राचें पांघरूण दूर झाल्याचेंही त्यांचे लक्षांत येत नाहीं; जणों राज्यलक्ष्मीरूपी पिशाचिकेच्या सोबतीनें रक्ताचा आस्वाद घेण्यांत लंपट झाले असावे अशा प्रकारें सगळ्या प्रजेच्या गळ्यांतील रक्त चोखून घेण्याचीच ते नेहमीं योजना करीत असतात; हृष्टपुष्ट असूनही मत्सररूपी ज्वरानें व्यापिल्यामुळेंच शिथिल अंगानें युक्त होतात; जणों हत्तींच्या पायांनीं उधळलेल्या धुळीनें ग्रासले असावे अशा प्रकारें खरा मार्ग त्यांस दिसेनासा होतो; जणों राज्याभिषेकाचें शीतळ जळ अंगावर पडल्यामुळेंच जड होऊन गेले असावे ह्मणूनच क्रोधरूपी अग्नीचें सेवन ते नेहमीं करीत असतात ; मणिमय आभरणांनीं झगझगीत असतांहीं अंधकारमय बनतात; जणों चवरीच्या वारण्यानेंच उडून गेलेल्या विवेकानें त्यांस सोडून दिल्यामुळें आपलें हिताहित ते पाहूं शकत नाहींत; नृत्य गायनांत वगैरे वेश्यांच्या झालेल्या चुका शोधून काढून दाखविण्यांतच

विचक्षणपणाचें सर्वस्व राहिलें आहे असें मानतात; लग्नाच्या बायकोस सोडून देऊन वेश्यांच्या समागमांतच आपल्या आंगच्या रसज्ञतेचा चमत्कार आहे असें कल्पितात; आणि आपल्या जोडीदारांस सर्व अनर्थ टाळणारे समजून दुर्गुणांच्या परिणामांचें भय धरीत नाहींत.

कुमारा! जणों अनेक वीरपुरुषांच्या खड्गांच्या धारेमध्येंच विहार केल्यामुळें राज्यलक्ष्मी पायांत जखमी झाली असावी व ह्मणूनच कोणत्याही स्थळीं बळकटपणें ठांसून पाऊल ठेवीत नाहीं असें दिसतें. युद्धभूमी व कमलवनांतील चिखल यांत फिरत असल्याकारणानें मळिण पाय झाल्यामुळें राजकुमारांपाशीं येऊन त्यांस लागलाच डाग लावण्यांत ती माघार घेत नाहीं. आतां तुह्माला युवराज पदवी मिळाल्यावर व पुढें राज्यपद मिळाल्यावरही सर्व लोक आश्चर्य पावून तोंडांत बोटें घालतील असेंच वागा; कोणत्याही प्रकारच्या दुर्गुणांनीं कलंकित होऊं नका; ठक लोकांकडून फसले जाऊं नका; नोकरांकडून लुटलें जाऊं नका; परस्त्रीच्या ठिकाणीं लंपट होऊं नका; व्यसनांत आसक्त होऊं नका; स्त्रियांस जित होऊन राहूं नका; गुरुजनांचा उपदेश ग्रहण करीत जा; गुरुजनांच्या सेवेंत तत्पर रहात जा; आवक व खर्च याची नीट काळजी धरीत जा; पंडितांच्या हंशाला पात्र होऊं नका; आणि सर्व प्रकारें राज्याला लायक व्हा, हेंच मी इच्छितों. तुह्मी विद्वान, वीर आणि सुशील आहां. यासाठीं तुह्माला बोध करण्याची फारशी गरज नसतांही केवळ पितृभावामुळेंच व स्वाभाविक स्नेहाच्या बलवत्तेमुळें इतके उपदेशाचे शब्द माझ्या तोंडावाटे निघाले. तुह्माला विद्वान तरुण झालेले पाहून मी सगळ्या गुरुजनांच्या आशीर्वादांची कृतकृत्यता झाली असेंच समजतों, कुळदेवता तशाच पितृदेवता प्रसन्न झाल्या असें मानतों, जन्मांतरींचीं पुण्यें सुफलित झालेलीं गणतों, व पूर्वजांची पुण्याईच बळकट ह्मणून लेखतों. याचप्रमाणें सर्व प्रजेलाही मी भाग्यशाली ह्मणून समजतों;

कुळाची मर्यादा अचळ झाली असेंच धरून चालतों, राज्यलक्ष्मीला उत्तम आधार मिळाल्यानें ती अखंडित नांदेल असें मानतों, तुमच्या मातुश्रीला रत्नप्रसूंमध्यें पहिल्या प्रतीला पोंचली असें गणतों, पृथ्वीला पुण्यवान समजतों, शत्रूस निराश झालेले पाहतों, आणि माझ्या या जीविताला कृतार्थ झालों ह्मणून समजतों. चंद्राचे किरण जसे स्वच्छ निर्मळ मण्यांत शिरून जास्तच चकाकूं लागतात त्याप्रमाणें माझे उपदेशशब्द तुमच्या निर्मळ अंतःकरणांत प्रवेश करून अधिक चकचकीत दिसोत. तुमचें वैभव दिवसेंदिवस जास्ती जास्ती वृद्धि पावो, सर्व विघ्नें नष्ट होवोत, श्री विश्वेश्वर तशीच ती आदिमाया जगदंबा तुमचें कल्याण करो आणि सर्व प्रकारें मंत्री व प्रजा यांस संतुष्ट करणारे व्हा."

याप्रमाणें पित्याचीं उपदेशवचनें व आशीर्वचनें ऐकून, कुसुमायुध, जणों अमृताच्या धारांनीं सेचन केला असावा, आनंदाच्या पुरांत मग्न झाला असावा, विनयसमूहानें भरपूर झाला असावा, आपल्या गुणवर्णनाच्या श्रवणाच्या लज्जेने लवला झाला असावा, पित्याच्या प्रीतिनें प्रफुल्लित झाला असावा, पित्याला विश्वेश्वराहूनही अधिक लेखीत असावा, सगळ्या उपदेशवचनांची आवृत्ति करीत असावा आणि पित्यानें उपदेशलेल्या राज्यनीतीची पद्धति मनांत कोरून ठेवीत असावा अशा प्रकारें दिसूं लागला.

"बाबा! आपण एवढे वर्णिलेल्या गुणांतून एकही गुण माझ्या ठिकाणीं आहे असें मला वाटत नाहीं, तसेंच राज्यविषयक कार्याचा भार झेंपण्यासही मी समर्थ आहें असें माझें मन मला सांगत नाहीं, तथापि माझी खात्री आहे कीं आपली कृपाच या सर्व गोष्टी मजकडून घडवील! चुंबकमणि अचेतन लोखंडाच्या तुकड्याला सुद्धां चेतना देतो; चंद्राची प्रभा अतिकठिण चंद्रकांत मण्याला सुद्धां स्रवण्याचा गुण देते; आणि वसंत खुंटासारख्या वृक्षांला सुद्धां पल्लवित करतो; या गोष्टी प्रसिद्धच आहेत."

कुसुमायुधाच्या थोडक्याच पण विनययुक्त भाषणानें संतुष्ट होऊन, जणों आंतून वृद्धि पावलेल्या आनंदाच्या पुरानें सिंचित झाल्यामुळें अंकुरित झाली असावी, अशा रोमराजीनें व्याप्त झालेला ; जणों कुसुमायुधाच्या मुखरूप चंद्राच्या दर्शनानें उसळूं लागलेल्या आनंदसमुद्राच्या लहरी होत अशा मंद हास्याच्या किरणांनीं त्या पूजनगृहाला चंद्रिकामय करून सोडणारा; जणों जवळच बसलेल्या कुसुमायुधाच्या मधल्या अंतराला सुद्धां कित्येक योजनांप्रमाणें लांब समजत असावा अशा प्रकारें त्याला आपल्या उराशीं ओढून ओढून दाबून धरणारा; आणि जणों त्याच्या मुखाच्या दर्शनांत अंतर आणणाऱ्या आनंदाश्रूंची, अरुचि धरणाऱ्याप्रमाणें, धोतराच्या पदरानें अश्रुबिंदु वारंवार टिपून काढणारा; असा शत्रुजित् राजा पुत्राचा हात धरून पूजनगृहांतून उठून विनोदमंडपांत प्राप्त झाला. तेथें मंत्र्यांस भेटून व पाहुण्या राजांस आणि इतर गृहस्थांसही सभेंत येण्याविषयींच्या आमंत्रणपात्रिका पाठविण्याविषयीं आणि आपापले विचारांचें मनन करून येता यावें, ह्मणून सभेच्या उद्देशासंबंधी पत्रिका पाठविण्याविषयीं सांगून, तो पुत्रास बरोबर घेऊनच मनोरमेच्या मंदिरांत गेला. तेथें अमृताहूनही मधुर लागणारी, प्राणांहूनही प्रिय वाटणारी, रत्नांच्या समूहाहूनही मौल्यवान् भासणारी, आणि चंद्राच्या किरणांहूनही अधिक आल्हाद देणारी मनोरमा राणी त्यास दिसली. तिच्याशीं पुत्राच्या अभ्युदयासंबंधी गोष्टी बोलतां बोलतां फार वेळ निघून गेल्यामुळें शत्रुजितानें भोजनशाळेंत न जातां, तेथेंच पानें वाढून मागवून, भोजन उरकलें. मनोरमेनें व कुसुमायुधानें ही त्याच्या बरोबरच भोजन केलें. त्यानंतर थोडीशी झोंप घेण्याच्या इच्छेनें शत्रुजितानें मनोरमेच्या पलंगावर आढे घेतली; पण कुसुमायुधाच्या अभ्युदयाच्या गोष्टी ऐकण्यांतच जणों निद्रा सुद्धां आनंद मानीत असावी ह्मणून ती शत्रुजिताच्या डोळ्यांपासून दूर दूरच राहिली.

# प्रकरण १४ वें.

## प्रजामत.

सभा भरण्याच्या नेमिलेल्या वेळीं, सभेला शोभणारा प्रौढ पोशाक करून व बेताचीं माणसें बरोबर घेऊन, शत्रुजित् सभेस आला. ते वेळीं सभासदही येऊं लागले होते. मंत्री सभासदांस सामोरे जाऊन, मोठ्या सन्मानानें सभेंत आणून बसवूं लागले. थोड्याच वेळांत सभागृह भरगच्च भरून गेलें. राजे व दुसरे सभासद परस्परांचे अभिप्राय विचारून, मिळवून पाहूं लागले. सर्वांचेच अभिप्राय एकमेकांशीं मिळते आलेले पाहून ते सर्वजण आल्हादयुक्त झाले. थोड्या वेळानें शत्रुजिताच्या सूचनेवरून सर्व गोंगाट बंद झाला. सर्वजण, पापण्या न मिटतां, टक लावून, एकसारखे शत्रुजिताच्या तोंडाकडे पाहूं लागले. या वेळीं सभेचा देखावा, वारा नसतां महासागराचा देखावा जसा शांत दिसतो आणि शरदृतूमध्यें चंद्र आणि तारागण यांनीं शोभणारें आकाश जसें रमणीय दिसतें, तसा दिसूं लागला.

सर्वांचें लक्ष एकाग्र झाल्यावर, सिंहासनावरून उठून, दुंदुभीच्या स्वराप्रमाणें गंभीर, राजलक्षणास सुचविणाऱ्या, सभेला गर्जवून सोडणाऱ्या, आणि मधुरतेनें भरलेल्या अशा वाणीनें, शत्रुजितानें भाषण केलें.

" राजे, अधिकारी, आणि सद्गृहस्थहो ! या राज्यांतील प्रजेला माझ्या वडिलांनीं पुत्राप्रमाणें लेखून पाळलें; आणि मीही, पूर्वजांनीं लावून दिलेल्या मार्गाला अनुसरून व आळस वगैरे दोषांचा त्याग करून, माझ्या सामर्थ्याप्रमाणें पाळिलें हें तुह्मा सर्वांस माहितच आहे. माझ्या पूर्वजांच्या वेळेपासून पुत्राप्रमाणेंच ज्यांचे लाड होत आले आहेत आणि यापुढें

ज्यांस आणखीही विशेष सुख देणेंच योग्य होय अशा या राज्यांतील प्रजेला कुसुमायुधाचा यौवराज्याभिषेक करून तद्वारा सुखित करूं इछितों. सगळ्या प्रजेचें हित करून आणि अजितेंद्रिय लोकांस उचलतां न येणारा व ज्यांत सर्व प्रकारच्या प्रभावाची गरज पडते अशा या राज्यरूपी मोठ्या बोजाला वाहून, या माझ्या देहाला मीं जीर्ण केलें आहे. आतां प्रजेचें कल्याण करण्याच्या कार्यांत कुसुमायुधाची योजना करून या जीर्ण झालेल्या शरीराला कांहीं विश्रांति द्यावी असें इच्छितों. कुसुमायुधानें विद्यांचा व कळांचा संपूर्ण अभ्यास केला आहे हें तुम्हीं समक्ष पाहिलेंच आहे. परंतु राज्यकारणांतला अनुभव मिळविण्याचें अझून बाकी राहिलें आहे. आणि याच कारणास्तव जरी माझें मन या कामांत गंभीरपणा सोडून देऊन उतावळेपणांत शिरलें असें तुह्मांस भासेल तरी त्याची सुशीलता आणि त्याची चपलता, हा आभास दूर करून, मला दूरदर्शी लोकांच्या पंक्तीस बसवतील अशी आशा उत्पन्न करतात. हल्लीं मी पूर्वींच्या काळच्या महात्मेराजांच्या पद्धतीप्रमाणें राज्यकारभार सोडून देऊन अरण्यांत जाऊं इच्छित नाहीं, तर राज्यविषयक बोजा उचलण्यांत फक्त कुसुमायुधाची सहायता घेऊं इच्छितों. मला त्याची सहायता मिळेल व त्यालाही राज्य वल्हावण्याचे कामीं अनुभव संपादन करण्याला माझी सहायता मिळेल. हा कांहीं माझा निश्चय ठरलेला आहे किंवा ही माझी आज्ञा आहे असें नाहीं, तर माझ्या मनांत जे विचार उत्पन्न झाले आहेत ते एका प्रकारें प्रश्न ह्मणून माझ्या कारणांसहित आपल्या पुढें मी ठेवतों. त्यांचा मननपूर्वक निर्णय ठरविणें हें आपलें काम आहे. जर हे माझे विचार तुह्माला योग्य आणि अनुकूळ वाटले तर त्यांस तुह्मीं आपली अनुमति द्यावी आणि तसें न वाटलें तर मी कसें करावें तो मार्ग तुह्मीं दाखवून द्यावा. हे विचार माझ्या आवडीच्या बाबतींत आहेत, यासाठीं त्यांच्या कारणामध्यें कांहीं शिथिलपणा अस-

ण्याचा संभव आहे. तरी माझ्या हिताचा जर दुसरा एखादा मार्ग तुमच्या ध्यानांत येईल तर तोही तुह्मी सुचवावा ह्मणजे त्याचाही विचार करतां येईल. रागद्वेषविरहित तिराहित लोकांचे विचार, रागद्वेषांनीं घेरलेल्या लोकांच्या विचाराहून फार निर्दोष आणि निर्मळ असतात. आणखी एकमेकांच्या विरुद्ध पक्षाच्या चर्चेनें तर त्याचा तपास फार सूक्ष्मपणें होतो. विद्यामंदिरांतल्या सभेमध्यें केलेल्या सूचना आणि आजच्या सभेविषयीं पाठविलेल्या आमंत्रणपत्रिकेंतील जाणविलेले उद्देश यांवरून सर्वांसही या गोष्टीचा विचार करण्याला पुरेसा वेळ मिळालेला आहे. आणि याहूनही जास्त वेळ पाहिजे असल्यास तसें करण्यासही माझी ना नाहीं.

या प्रमाणें भाषण करून शत्रुजित् खालीं बसल्यावर सर्व सभाजनांनीं एकमत करून खालीं लिहिल्याप्रमाणें लेखी जबाब दिला.

"महाराज! कुसुमायुधाला युवराज पदवी देण्याचा आपला जो विचार झाला आहे तो सर्वप्रकारें आह्मांस संमत आहे. कुसुमायुधानें आपली विद्या, कळा, सद्गुण आणि चपळता ह्यांहीं करून आमच्या चित्ताला वश्य करून घेतलें आहे. यासाठीं आपला विचार लौकरच सिद्धीस नेलेला पाहण्यास आह्मीं उद्युक्त झालों आहों. कुमाराची बुद्धि गंभीरपणामुळें समुद्राची सखी बहिण असून, मधुरपणामुळें समुद्राचा तिरस्कार करणारी आहे; यश उज्वळतेमुळें चंद्राचा मित्र असतांही निष्कलंकपणानें त्याचा तिरस्कार करणारें आहे; आणि त्याचें शील त्याच्याच ठिकाणीं वसत असूनही परक्याचें चित्त हरण करणारें आहे. त्याचा प्रताप तीव्र असूनही आमच्या मनाला आल्हाद देत आहे. विद्या आणि कळा अति प्राचीन असूनही, त्याच्याशीं संयुक्त झाल्या-कारणानें तरुणपणा पावल्या आहेत. आणखी त्या विद्या आणि कळा अनंत आणि अपार असूनही त्या सगळ्या त्याच्या हृदयांत सामावल्या

आहेत, आणि तेणेंकरून त्याच्या हृदयाचें अलौकिक महत्व दर्शवीत आहेत. कुसुमायुधाची वाणी थंड असतां लोकांच्या अंतःकरणाला वितळवून टाकीत आहे. त्याचें हृदय कोमळ खरें तरी दुर्गुणांला दुर्भेद्य होऊन बसलें आहे. पूर्वीच्या राजाच्या गुणाचें विस्मरण पाडण्याशिवाय दुसरा कोणताही दुर्गुण त्याच्या ठिकाणीं दिसून येत नाहीं. विधात्यानें त्याचें शरीर प्रजेच्या सौभाग्याच्या परिमाणूंनींच बनविलें असावें असें वाटतें. त्याच्याकडून बिचाऱ्या एकट्या अपकीर्तीचाच अपमान होत आहे. त्याचा जन्म दुराचरणाच्या द्वेषासाठींच झाला आहे. ज्यामुळें इतर लोक उन्मत्त होतात ते कुळ, रूप, वय, विद्या आणि लक्ष्मी हे गुण कुमाराच्या ठिकाणीं विनयपणाचे अलंकारच होऊन बसले आहेत."

असा जबाब सभेंत वाचून दाखविल्यावर जयजय शब्दानें आणि वाद्यांच्या नादानें सर्व दिशा दणदणून गेल्या, पुष्पांची वृष्टि होऊं लागली, राजा स्वतःला कृतार्थ मानूं लागला, मंत्र्यांची प्रशंसा होऊं लागली, सगळ्या शहरामध्यें सर्वत्र हर्षच हर्ष व्यापून राहिला, आणि सर्व लोक मनोरमा आणि शत्रुजित् यांचें भाग्य वाखाणूं लागले.

सर्व काम आटोपल्यावर राजाच्या हुकुमानें सभा विसर्जन होतांच लोक एकदम उठले. त्यामुळें तेथें मोठी गडबड उडून गेली. छडीदारांचें ललकारणें आणि सभासदांच्या पायांचा ध्वनि यांनीं तो सभामंडप गजबजून गेला. सभासदांचीं प्रतिबिंबें अनुक्रमानें मणिमय स्तंभामध्यें पडत जाऊन थोड्याच वेळांत अदृश्य होऊं लागलीं. चेंगराचेंगरींत आभरणामधून निखळून भूमीवर पडणाऱ्या रत्नांच्या वाटोळ्या पडणाऱ्या प्रभांनीं लोकांचीं मुखें व्याप्त होऊं लागलीं. इतर लोकांच्या पायांनीं दाबलीं गेलेल्या आणि त्याचमुळें ओढावीं लागणाऱ्या उत्तरीय वस्त्रांचे पदर पूर्वीच पुढें चालून गेलेल्यास सुद्धां मागें रेंगळत राहण्यास भाग पाडूं लागले. पुढें चालून गेलेले परंतु आपल्या मित्रांची वाट पाहण्यासाठीं म-

ध्येंच उभे राहिलेले लोक इतर लोकांच्या बोलाचालीस पात्र होऊं लागले. सभेचें द्वार, त्यांतून बाहेर पडणाऱ्या राजांसही अतिशय गर्दीमुळें मित्र मंडळीस सोडून एकट्यानेंच बाहेर पडण्याचें भाग पाडूं लागलें. थोड्याच वेळामध्यें लोक निघून गेले आणि सभामंडप शुष्क झाला. सभासद मंडळी बाहेर आल्यावर उभीं असलेल्या आपापल्या वाहनांत बसून स्वस्थानीं निघून गेली. आनंदामुळें ज्याचें मुख दुप्पट प्रफुल्लित झालें आहे असा शत्रुजित्राजा कुमारास बरोबर घेऊन अभिनंदन करण्यासाठीं मनोरमेच्या मंदिरामध्यें गेला.

मनोरमेला सभेंत घडलेल्या वृत्तांताची खबर पहिल्यानेंच मिळाली होती. परंतु ती खबर आनंदाची असल्याकारणानें पुनरुक्त होत असतांही कंटाळवाणी न लागतां शत्रुजिताच्या तोंडांतून ऐकते वेळीं, ती आपला आनंदमयपणा सोडून देऊन आनंदरूपच वाटूं लागली. अंतःपुरांत सर्वत्र महोत्सव व्यापून राहिला. मनोरमा आणि शत्रुजित् हीं कुमारास आलिंगनाबरोबरच जवळ बसवून घेऊन राजनीतीचा बोध करूं लागलीं.

या वेळीं संध्याकाळचा समय जवळ आल्यामुळें उन्हाची तीव्रता मंद होऊं लागली. सूर्याचे किरण अरूड अरूड होऊं लागले. उंच उंच वृक्षांच्या आणि घरांच्या शिखरांवर उन्हाचे तुटक तुटक भाग दिसूं लागले. सूर्य पश्चिम दिशेच्या मुखाचें चुंबन घेऊं लागला. पक्षी आपापला संचार समाप्त करून आपल्या घरट्याकडे येऊं लागले. क्षितिजावर अर्धें खालीं गेलेलें व अर्धें बाहेर दिसणारें सूर्यबिंब सोन्याच्या ताटाच्या अर्ध्या तुकड्या प्रमाणें शोभूं लागलें. सूर्यरूप त्रैलोक्याचा दिवा शांत होतां क्षणींच, जणों त्याच्या धुराचा समूहच असावा असा अंधकार चहूंकडे व्यापून गेला. दिशा जणों इंद्रनीलमण्यांनींच घडल्या असाव्या, काजळाच्या समूहानें बनविल्या असाव्या, आणि मिटूं लागलेल्या कमळांतून उडालेल्या भ्रमरांच्या समुदायानें व्यापून गेल्या असा-

त्या अशा प्रकारें काळ्या ठिक्कर दिसूं लागल्या. आणि पाजळलेल्या दिव्याची प्रभा अंधकाररूप हत्तींच्या गंडस्थळावर अंकुशाची क्रिया करूं लागली.

आनंदाच्या गोष्टींतच पुष्कळ वेळ गेल्याकारणानें शत्रुजित राजानें त्या दिवशीं बाहेर फिरावयास जावयाचें तहकुब केलें आणि रातच्या रात्र तेथेंच काढण्याचें ठरविलें.



## प्रकरण १८ वें.

### यौवराज्याभिषेक.

रात्रीचा समय थोडाच अवशिष्ट राहिला असतां ताऱ्यांची प्रभा कोमेजूं लागली; चंद्र आपल्या आवडत्या रात्रीच्या वियोगाचा समय प्राप्त झाल्यामुळें खेद पावत आहे अशा प्रकारें फिकट दिसूं लागला; पिंजऱ्यांतील पक्षी मनोहर स्वरांनीं किलबिल करूं लागले; दिवे जुगारांमध्यें हरलेल्या मनुष्याप्रमाणें निःस्तेज होऊं लागले; कमळांतील सुगंधाची चोरी करणारा वायु जणों प्रकाशाला भीत असावा अशा प्रकारें मंद मंद मंदिरामध्यें प्रवेश करूं लागला; जागे झाल्यावर जमीनीवरून उठूं लागलेल्या हत्तींचे साखळदंड खणखणूं लागले; घोडे निद्रा उडाल्याची सूचना देणारा खिंकाळण्याचा आवाज करूं लागले; राज्यलक्ष्मीला सुचविणारा प्रभात समयींचा नौबदींचा आवाज दुमदुमूं लागला; अंधकार अरुणाच्या प्रकाशापुढें पळून जाऊन पश्चिम दिशेंत लपून बसूं लागला; आणि पुन्हा तो सूर्याच्या त्रासामुळें आकाशांतून निसटून पश्चिम समुद्रांत बुडून मरण पावला असावा अशा प्रकारें थोड्याच वेळांत अदृश्य झाला; बंदिजन राजवाड्यापुढें येऊन मधुर वाद्यांच्या साथीवर विभास आणि भैरवी गाऊं लागले; आणि जणों सोन्याचें ताटच असावा आणि पूर्वदिशेचा माणिक्यमय कुंकुमतिलक असावा असा सूर्य उदयाचलाप्रत प्राप्त झाला. त्यावेळीं शत्रूजित् राजा मनोरमेच्या मंदिरांतून उठून, आवश्यक विधि आटोपून घेऊन, आपले विचार राणीच्या विचाराशीं मिळते करून, कुमारासहित विनोदमंडपामध्यें आला.

प्रथमच तेथें येऊन बसलेल्या मंत्र्यांनीं उभे राहून राजाला आणि

कुमाराला प्रणाम केले. शत्रुजित्राजा एका रमणीय उच्चासनावर बसला आणि भुईवर कुमार बसत होता त्याचा हात धरून आपल्या बाजूसच बसावयास घेऊन मंत्र्यांबरोबर विचारपूस करूं लागला. राजपुरोहित आणि विद्वान जोतिषी यांस बोलावून आणून कुमारास राज्याभिषेक करण्याचा शुभ मुहूर्त पाहण्यास सांगितलें आणि अभिषेकाची सामुग्री जमा करण्यास आज्ञा केली. राजपुरोहित आणि जोतीषी यांस मधुर वचनपूर्वक दक्षिणा देऊन प्रसन्न केलें व त्यांची बोळवण केली. मंत्र्यांच्या सल्लयानें कुसुमायुधासाठीं स्वतंत्र मंदिर, स्वतंत्र दासदासी आणि स्वतंत्र वहनें वगैरे पृथक् व्यवस्था करून देऊन, नित्याच्या नियमाप्रमाणें तो द-रबारास निघून गेला आणि राजकीय कार्यें पाहूं लागला.

मंत्र्यांनीं पुरोहित आणि विद्वान ब्राह्मण यांचीं संमति घेऊन अभि-षेकाची सामुग्री जुळविण्यास सुरवात केली. उंबराच्या लाकडाचें सिंहासन, सुवर्ण, रत्न, पूजेचे पदार्थ, साळीच्या लाह्या, मध, तूप, कोरीं वस्त्रें, रथ, सर्व प्रकारचीं आयुधें, धवल छत्र, चामराची जोडी, सुवर्णाचे कलश, अ-खंड व्याघ्रचर्म, सर्व प्रकारच्या औषधी, सर्व तीर्थांचीं जलें, सर्व समुद्रांचीं जलें, सर्व नद्यांची जलें, सर्व ठिकाणच्या मृत्तिका, आणि या शिवाय आणखीही अनेक प्रकारची अपेक्षित सामुग्री तयार करण्यांत आली.

मुहूर्ताचा दिवस प्रसिद्ध होतांच शहरच्या सर्व लोकांनीं आपापलीं घरें शृंगारण्यास आरंभ केला. राजवाड्यांतही सर्व महालांची व मंदिरांची दुरुस्ती करून त्यांस रंगविण्याची आणि उत्सवसंबंधी दुसरींही कित्येक कृत्यें करण्याची एकच धांदल उडून गेली. मंदिरावर व राजमार्गावर फडकणाऱ्या ध्वजा व पताका ह्या जणों अभिषेकाचा दिवस लौकर आण-ण्याविषयीं सूर्याला सूचनाच करीत असाव्या असें वाटूं लागलें. मंदिरांच्या शिखरांवर चकचकणारी सुवर्णाच्या कलशांची पंक्ति ही जणों अभिषेकाचा महोत्सव पाहूं येणाऱ्या देवतांसाठीं पाणी पिण्यासाठीं पाणपोईच होय असें

दिसूं लागलें. पताकादिकांच्या उभारण्यानें मंदमंद वाहणारा वायु ठिकठिकाणीं सिद्ध होत असलेल्या भोजनाच्या पदार्थांचा सुगंध घेण्यांत लंपट झाला असावा असें भासूं लागलें. अनेक अमूल्य रत्नानीं आणि दुसऱ्याही शेंकडों दिव्यपदार्थांनीं शोभिवंत दिसणारा बाजार, प्रामाणिक व्यवहारानें युक्त असतांही, लोकांच्या चित्ताची चोरी करूं लागला. गुलाबपाण्याचा सडा घातला असल्यामुळें आणि पुष्पांचे हार तुरे सर्वत्र लटकावून दिले असल्यामुळें राजमार्गांतील सुगंध आकाशांत पोंहोचून इंद्रादिक देवतांस महोत्सव पाहाण्यास येण्याविषयीं आमंत्रण देण्यासाठीं इंद्रपुरीकडे जात असावा असें वाटूं लागलें. चवाठे आणि चावड्या यामध्यें आणि घरोघरही अग्निमित्रसंबंधी आनंदाच्याच गोष्टी ऐकूं येऊं लागल्या. “महात्मा शत्रुजित् राजा दिर्घायुषी होवो; त्याच्याच कृपेनें आपण आज कुमाराच्या यौवराज्याभिषेकाचा महोत्सव पाहणार आहों” याप्रमाणें सर्व प्रजा उघड उघड बोलूं लागली. घराच्या पुढील अंगणामध्यें टोळ्या टोळ्या मिळून खेळणारीं मुलें सुद्धां आपापल्यांत त्याच प्रसंगाच्या गोष्टी बोलूं लागलीं; विद्यामंदिरांतील विद्यार्थ्यांच्या मोठ्या परिक्षेच्या वेळीं आलेले आणि शत्रुजित राजाच्या आज्ञेनें काशींतच आजपर्यंत राहवून घेतलेले राजेरजवाडे, व्यापारी, आणि इतर सद्गृहस्थ इत्यादि पाहुणी मंडळी परीक्षेच्या समारंभापेक्षांही हा समारंभ अधिक मानून अतिशय हर्षित झाली. महोत्सव पाहण्यासाठीं आलेले व येणारे देशी विदेशी लोक, शहरचे लोक, आणि पाहुणे आलेले लोक यांचा येवढा मोठा समुदाय पाहून शत्रूजितराजा सुद्धां अद्भुत रसांत अगदीं निमग्न होऊन गेला. चोंहोंकडे हिंडणाऱ्या फिरणाऱ्या लोकांचा गोंगाट कार्तिकी पुनवेला मध्यरात्रींच्या महासागराच्या गोंगाटाप्रमाणें ऐकूं येऊं लागला. अंधकार, रात्रीस पेटवण्यांत येणाऱ्या दीपमाळांच्या प्रभेनें दिपून जाऊन जणों आंधळा झाला असावा अशा प्रकारें त्या नगरींतील

स्थळांस पाहण्याला असमर्थ झाला. रत्नांमध्यें प्रतिबिंबित झालेल्या दिव्याच्या जोती, प्रत्येक रत्नाच्या पोटींही आणखी एकेक रत्न असल्याची भ्रांति उत्पन्न करूं लागल्या. दिव्यांच्या प्रभांनीं रात्रि या पिंवळ्या वर्णाच्याच आहेत काय असा संशय येऊं लागला. मणि दिव्य दृष्टि पावले आहेत काय असे भासूं लागले. सर्व नगरी सुवर्णानेंच रचली आहे काय अशी दिसूं लागली. आकाश संध्याकाळच्या मेघांनींच व्याप्त झालें आहे काय असें दिसूं लागलें. आणि दिशा महामांगलिक उत्सवा निमित्त केशरी रंगाचीं वस्त्रें परिधान करून बसल्या आहेत काय अशा दिसूं लागल्या.

अभिषेकाच्या मुहूर्ताचा दिवस प्राप्त होतांच, एक लक्ष ब्रा[illegible]ांस इच्छा भोजनाविषयीं निमंत्रणें देण्यांत आलीं. दहीं, दूध, दूर्वा आणि पुष्पें वगैरे सामुग्री दरबाराच्या महालामध्यें येऊन पडूं लागली. दरबारांत आसनांची योजना करण्यांत येऊं लागली. रमणीय लक्षणांनीं युक्त हत्ती आणि सोन्याच्या शिंगाचा पोळ यास आणून उभें करण्यांत आलें. चार अंगांनीं युक्त अशी सेना मोठ्या वैभवानें येऊन हजर झाली. लोकांस येण्याविषयीं सुचविणारीं वाद्यें वाजूं लागलीं. राजेरजवाडे, मंत्री, आणि व्यापारी लोक, उत्तमोत्तम पोशाख चढवून, शृंगारलेल्या वहनांवर आरूढ होऊन, राजवाड्यांत येऊं लागले. वेश्या, गवैय्ये, नट, आणि दुसरे तमासगीरलोक आपापल्या उपकरणसामग्रीसहित येऊन नेमलेल्या जागांवर बसले. राण्या वगैरे प्रतिष्ठित स्त्रियांचा मोठा समाज मनोरमेच्या मंदिरामध्यें जमा झाला. मांगलिक गाणीं गाण्यांत येऊं लागलीं आणि वाद्यें वाजूं लागलीं. ब्राह्मण स्वस्तिवाचनाची योजना करूं लागले. तमाम राजवाडा जणों तेजोमय, सौंदर्यमय, आश्चर्यमय, पुण्यमय, प्रेममय, आनंदमय, आणि कौतुकमय असावा असा दिसूं लागला. सभेंत बसलेले राजे वगैरे सभासद

वरखालीं आणि चहूंकडे दिसून येणारीं आपलीं प्रतिबिंबें पाहून जणों कुसुमायुधाच्या ठिकाणीं पृथ्वीचें धारण, पोषण आणि पालन करण्याची शक्ति दिसूं लागल्यामुळें शेषसर्पास विश्रांति घेण्याचा वेळ प्राप्त झाला म्हणून त्याचें अभिनंदन करण्याकरितां, जणों पाताळांतच जात असावे; मेघमडंळाला सुद्धां पोषण करण्याच्या कामीं निश्चित होण्याचा समय प्राप्त झाला म्हणून त्याचेंही अभिनंदन करण्यासाठीं आकाशांत वर चढून जात असावे; आणि दिक्पालांस पालन करण्याचे श्रमांतून सुटण्याचा वेळ येऊन ठेपला म्हणून त्याचेंही अभिनंदन करण्यासाठीं दिशांच्या ठिकाणीं जाऊन पोहोंचले असावे अशा प्रकारें शोभूं लागले. पांढऱ्या पुष्पांच्या समूहामुळें जणों फेनमय होय अशी दिसणारी, सभासदांच्या आभरणांमुळें रत्नमय होय अशी भासणारी, आंत अनेक लोक इकडे तिकडे फिरत असल्यामुळें कल्लोलमय होय अशी गमणारी, छडीदारांच्या ललकारण्यांनीं गर्जनामय होय अशी वाटणारी, आणि शुभ्र पताकांमुळें गलबतांच्या शिडांनीं गर्द झाली असावी अशी दिसणारी ती सभा महासागराचें अनुकरण करूं लागली. सर्व सभासद छतांच्या रत्नांमध्यें दिसणाऱ्या प्रतिबिंबांच्या योगानें लोकांची फारच गर्दी झाल्यामुळें अभिषेकाचा समारंभ बरोबर पाहतां येणार नाहीं असें समजून अप्रतिबंधपणें पाहण्यासाठीं आकाशांत चढले आहेत काय असें भासूं लागलें. सभेमध्यें विराजमान झालेले राजे आपापल्या प्रतिस्पर्ध्यांचा वरचढपणा सहन न करणारे असूनही आपल्या मस्तकांवरील मुगुटांच्या रत्नांमध्यें प्रतिबिंबाच्या रूपानें चढून बसलेल्या प्रतिस्पर्ध्यांचें निवारण करण्याचे कामीं ते केवळ असमर्थ होऊन गेले. उंची प्रकारच्या उंच लटकावलेल्या हांड्यांमध्यें राजांच्या प्रतिबिंबांच्या पंक्ति दिसत असल्या कारणानें पुष्पवृष्टि करण्यासाठीं आकाशांत देवसमुदाय येऊन उभा राहिला असावा असें वाटूं लागलें. आणखी हजारों सभासद आणि त्यांचीं अगणित प्रतिबिंबें

यांच्या योगानें ही सभा केवळ ब्रह्मांडमयच होय अशी भासूं लागली. सभासदांनीं सभास्थान भरगच्च भरल्यावर अभिषेकाची मुहूर्तघटिका येऊन ठेपतांच राजा शत्रुजित् बरोबर कुमार कुसुमायुधाला घेऊन सभेस आला. ज्याप्रमाणें आकाशांत चंद्राचा उदय होऊन तो चढूं लागतां महासागर त्याला अभ्युत्थान देतो त्याप्रमाणें सगळ्या सभेनें शत्रुजित् राजाला अभ्युत्थान दिलें. मोरांची पंक्ति जशी आकाशांत समोर दिसणाऱ्या मेघाकडे टवकारून पाहून त्याचें अभिनंदन करते त्याप्रमाणें सभेनें शत्रुजित् राजाचें जय जय शब्दांनीं अभिनंदन केलें आणि वनराजि जशी वृद्धि पावणाऱ्या वसंताला पल्लवांनीं आणि फुलांनीं शोभणाऱ्या शाखांच्या योगानें प्रणाम करते त्याप्रमाणें मुकुटांनीं शोभणाऱ्या मस्तकांच्या योगें सभेंत बसलेल्या राजांनीं शत्रुजित्राजाला प्रणाम केले. सन्मानार्थ वाजविण्यांत येणाऱ्या वाद्यांच्या शब्दांनीं आकाशमंडळ दुमदुमून गेलें. पुष्पांच्या वृष्टींनीं दशदिशा सुगंधमय करून टाकिल्या. राजहंस जसा जलतरंगांच्या पंक्तीवरून कमलावर चढून बसतो त्याप्रमाणें शत्रुजित्राजा पायऱ्या वरून चढून जाऊन सिंहासनावर बसला. कुसुमायुधाला सभास्थानाच्या मध्यभागीं स्नानपीठावर बसविलें. ताऱ्यांच्या मध्यभागीं शुभ्र मेघमंडळावर जसा चंद्र शोभतो तसा राजांच्या मध्यभागीं स्फटिकाच्या स्नानपीठावर बसलेला कुसुमायुध शोभूं लागला. पुरोहित आणि दुसरे विद्वान ब्राह्मण यांनीं शास्त्रोक्त विधीला अनुसरून साऱ्या मांगलिक क्रिया केल्या. सगळ्या राजे लोकांसहित शत्रुजित् राजानें सिंहासनावरून उठून सुवर्णकलशांतील जलांनीं कुसुमायुधाला मंत्रोच्चारपूर्वक अभिषेक करण्यास आरंभ केला. कलशांतील जलाच्या धारा शत्रुजिताच्या आनंदाश्रूंच्या धारांबरोबरच कुसुमायुधावर पडूं लागल्या. दुंदुभीचे शब्द कुसुमायुधाच्या कीर्तीबरोबरच दशदिशांप्रत जाऊन पोंहोंचूं लागले. ब्राह्मणांचा मंत्रोच्चार शत्रुजिताच्या भाग्याच्या प्रशंसेबरोबरच ऐकूं

येऊं लागला. पुष्पांच्या वृष्टि सर्व लोकांच्या नेत्रकिरणासहित कुसुमायुधा-वर पडूं लागल्या. समुद्राची भरती ज्याप्रमाणें एका द्वीपाला न सोडतांही दुसऱ्या द्वीपाला प्राप्त होते त्याप्रमाणें राज्यलक्ष्मी शत्रुजिताला न सोड-तांही कुसुमायुधाला प्राप्त झाली. महासागर जसा चंद्रिकेच्या समा-गमानें कांहीं अपूर्व उल्हास पावतो त्याप्रमाणें कुसुमायुध राज्यलक्ष्मीच्या समागमानें कांहीं विलक्षणच उल्हास पावला.

अभिषेकविधि समाप्त झाल्यावर अति रमणीय पोशाक करून आणि मणिमय आभरणें आंगावर घालून कुसुमायुधाला सिंहासनावर नेऊन बसविलें. ब्राह्मणांच्या सुवासिनी स्त्रियांनीं युवराजाचें वर्धापण केलें. ब्राह्मणांचें दरिद्र विच्छिन्न होईल अशी दक्षणा राजाकडून त्यांस मिळाली. सर्व राजे रजवाडे आणि सभासद यांनीं युवराजाच्या पायांशीं अनेक प्रकारच्या भेटी अर्पण केल्या. आणि युवराजानींही त्या समाजाला साजणारा असा सगळ्या राजेरजवाड्यांचा आणि सभासदांचा सन्मान केला; तसेंच पिता आणि गुरुजन यांच्या पायांस प्रणाम करून त्यांचे शुभ आशीर्वाद घेतले. सर्व विधि आटोपल्यावर सूर्य जसा उदया-चलाच्या शिखरावरून उतरतो तसा सिंहासनावरून उठून युवराज कुसुमायुध यानें खालीं लिहिल्याप्रमाणें भाषण केलें.

"राजेहो आणि इतर सभासदहो ! पित्याच्या कृपेनें, इष्ट देवतांच्या अनुग्रहानें, गुरुजनांच्या आशीर्वादानें आणि आपल्या सर्वांच्या प्रेमपूर्वक अनुमतीनें मी आज युवराज पदवीला पोंचलों. माझ्या ठिकाणीं या श्रेष्ट पदवीला उचित असे गुण जरी वसत नाहींत तरी मी आशा करितों कीं स्पर्शमणि जसा लोखंडालाही सुवर्ण करून सोडतो, आत्म्याचें प्रतिबिंब जसें अचेतन शरीराला सुद्धां चेतना देतें आणि चंद्राची प्रभा जशी जड चंद्रकांतमण्याला सुद्धां द्रवीभूत करिते त्याचप्रमाणें आपणा सज्जनांचा समा-गम मलाही या पदवीला उचित अशा गुणांनीं संपन्न करील. ज्या-

प्रमाणें नांगरणी वगैरे संस्कार पावलेल्या जमीनीला आपली योग्यता अथवा अयोग्यता दाखविण्याचा समय शरदृतूंमध्येंच येतो; ज्याप्रमाणें शब्द आणि अर्थ यांनीं संस्कार पावलेल्या कवितेची योग्यता किंवा अयोग्यता दिसून येण्याचा समय विद्वानांच्या सभेमध्येंच येतो; ज्याप्रमाणें अनेक द्रव्यांनीं संस्कार पावलेल्या रसायनक्रियेची योग्यता किंवा अयोग्यता जाणण्याचा समय वृद्धपणांतच प्राप्त होतो; आणि ज्या प्रमाणें आईबापांच्या बोधानें संस्कार पावलेल्या कन्येची योग्यता किंवा अयोग्यता समजण्याचा समय सासुरवासांतच येतो त्याच प्रमाणें गुरुजनांच्या उपदेशानें संस्कार पावलेल्या राजकुमारांच्या बुद्धीची योग्यता अथवा अयोग्यता दिसून येण्याचा समय ह्मटला ह्मणजे राजकीय कामांचे प्रसंगच होत. चंद्राच्या स्वच्छ प्रभेलाही शरदृतूची पूर्ण मदत असण्याची पूर्ण जरूर आहे; उत्तम फुलबागेलाही वसंताच्या मदतीची अत्यंत आवश्यकता आहे; दिव्याच्या उज्वल प्रकाशाच्या जोतीलाही रात्रीच्या मदतीची अत्यंत गरज आहे; आणि भोजनाच्या पथ्यकर क्रियेलाही जठराग्नीच्या मदतीची जरूर आहे; यासाठीं विद्याभ्यास करावेते वेळीं माझ्या आईबापांनीं आणि यावेळीं प्रजाजनांनीं माझ्या विषयीं ज्या आशा धरल्या असतील त्या सफल व्हाव्या ह्मणून आपण सारे लोक मला आपली मदत द्याल अशी मी आशा करतों. विश्वाच्या ईश्वरानें मला सुबुद्धि द्यावी, व्यसनांपासून दूर ठेवावें आणि माझ्यावरील प्रजाजनांच्या अनुग्रहाची वृद्धि करावी अशी माझी त्याजपाशीं प्रार्थना आहे."

या प्रमाणें बोलून कुसुमायुध खालीं बसल्यावर साऱ्या सभासदांच्या मुखांतून एकच जयजयकार होऊं लागला आणि आनंदाच्या टाळ्यांवर टाळ्या पडूं लागल्या. हर्षानें प्रफुल्लित झालेल्या सभासदांच्या मुखचर्येनेंच, कांहींही न बोलतां, युवराजाच्या भाषणाला योग्य उत्तर जरी दिलें

तरी सभेच्या तर्फेनें एका शंकरमिश्र नांवाच्या प्रतिष्ठित पंडितानें उठून पुढील प्रमाणें भाषण केलें.

" युवराज कुसुमायुध! आपण जें भाषण केलें तें आपल्या योग्यतेला साजेल असेंच आहे. प्रजेकडून आपल्यास मदत मिळावयाची ह्मणजे सूर्याला दिव्याकडून मदत मिळण्याप्रमाणें आणि समुद्राला नद्यांकडून मदत मिळण्याप्रमाणेंच आहे. तथापि सगळ्या पृथ्वीच्या कारभाराचा बोजा उचलावा लागत असल्याकारणानें राज्य चालविणें ही गोष्ट अति दुर्धर आहे; अतिशय काट्यांकुट्यांनीं पसरलेलें असल्याकारणानें स्वच्छंद गतीला प्रतिबंध करणारी आहे; आपल्या काल्पनिक मनोरथांना आडकाठी पडत असल्याकारणानें अनेक प्रकारच्या शंका उत्पन्न करणारी आहे; सर्वांहून उंच पदवी प्राप्त होत असल्यामुळें पडण्याचें भय उपजविणारी आहे; कुटिल योजनांनीं युक्त असल्याकारणानें विश्वास धरून बसण्यास योग्य अशी नाहीं; आणि फार सूक्ष्म असल्याकारणानें जबऱ्या बुद्धीचाही प्रवेश न होऊं देणारी अशी आहे; यास्तव प्रजेकडून मदत मिळण्याची तुह्मी अपेक्षा करावी हें स्वाभाविकच आहे. जसें आपलें प्रजेवर प्रेम आहे तसेंच प्रजेचेंही आपल्यावर असल्या कारणानें आपले सर्व मनोरथ सिद्धीस गेले असेंच समजा. आह्मींही इष्टदेवतांपाशीं एवढीच प्रार्थना करितों कीं, सर्वदा तुमच्या आमच्या मधील संबंध अबाधित राहावा आणि तुमची आणि आमची चित्तवृत्ति आपापल्या धर्माप्रमाणें आचण करण्यांत तत्पर राहावी. "

याप्रमाणें आपलें भाषण संपवून तो पंडित आपल्या जागेवर बसतांच शत्रुजितानें सभासदांचे आभार मानिले आणि ज्यांस पोषाक वगैरे द्यावयाचे त्यास ते देऊन सभा विसर्जन केली.



# प्रकरण १६ वें.

## मातृप्रेम-राज्यभवन.

ओहोटीच्या समयीं समुद्राच्या किनाऱ्यावरील प्रदेशाप्रमाणें सभागृह रिकामें झाल्यावर शत्रुजित्‌राजा विनोदशाळेंत गेला आणि कुसुमायुध मनोरमेकडे गेला. तिकडे मनोरमा सुद्धां आपल्या सभोंवतीं जमलेल्या स्त्रीसमाजाचें मानपूर्वक विसर्जन करून पुत्राच्या दर्शनाची वाटच पाहत होती. वस्त्र, आभरण, पुष्प, तांबूल आणि पंखा वगैरे उपभोग सामुग्री घेऊन अनेक दासी उभ्या असतांही मनोरमेनें आनंदाच्या संभ्रमामध्यें स्वतांच उठून मान देऊन पुत्राचें लिंबलोण उतरिलें. यावेळीं कुसुमायुधानें मातेच्या चरणीं प्रणाम करितांच मनोरमेच्या नेत्रांतून आनंदाश्रूंच्या, स्तनांतून दुधाच्या, आणि मुखांतून आशीर्वादाच्या धारा चालू झाल्या. यथोचित उपचारासहित वारंवार उराशीं आवळून धरून तिनें त्यास आलिंगिलें; नंतर रमणीय आसनावर आपल्या शेजारीं बसविलें. मस्तक, गाल वगैरे भागांवर आपला कोमल हात फिरवीत फिरवीत मनोरमा ह्मणाली कीं "मुला कुसुमायुधा! इष्ट देवतांच्या अनुग्रहानें आणि गुरुजनांच्या आशीर्वादानें मला आज अपूर्व आनंदाचा लाभ प्राप्त झाला आहे. तुमच्या पित्यानें तुमची विद्या, तुमचें धैर्य, तुमची सुशीलता आणि गुरुजनविषयक भक्ति यांची पूर्णपणें जाण राखली असें ह्मणावयास चिंता नाहीं. तुह्मीं सर्व विद्यांनीं आणि कलांनीं संपन्न झालेले पाहून आणि आज आणखी तुमच्या पित्याच्या कृपेनें राजलक्ष्मीचा योगही तुह्मास प्राप्त झालेला पाहून माझ्या हृदयामध्यें हर्ष मावेनासा झाला आहे. ज्या प्रमाणें तुमच्या पित्यानें तुह्माला राज्यलक्ष्मीचा योग

घडवून दिला त्याप्रमाणें कोणीतरी उत्तम क्षत्रिय कुललामभूत अशा कन्यालक्ष्मीचा योग तुह्मास करवून मी केव्हां कृतकृत्य होऊं?"

लज्या आणि मंदहास्य यांच्या मिश्रणामुळें ज्याचे नेत्र खालीं नमले आहेत व ज्याचे गाल प्रफुल्लित झाले आहेत अशा कुसुमायुधाचें मुख मनोरमेच्या आणि दासींच्या अंतःकरणामध्यें कांहीं विलक्षण कौतुक उपजवूं लागलें. हृदयाप्रमाणेंच आपल्या मुखाच्या प्रतिबिंबाचें ग्रहण करणाऱ्या कुसुमायुधाच्या मुखाचें अकृत्रिम प्रेमभरानें चुंबन करून मनोरमा पुन्हा बोलूं लागली कीं "पुत्रा! तुमच्या सारख्या विद्वानाला बोध करणें ह्मणजे शुक, विदुर इत्यादि नीतिज्ञ पुरुषांस नीतीचा बोध करण्या सारखें होय हें मी समजतें. तथापि पुत्रस्नेह मला बलात्कारानें बोलावयास लावितो कीं तुमच्या पित्यास, मला आणि सर्व प्रजाजनांला तुमच्या विषयीं जी मोठी आशा वाटत आहे, ती आशा सफळ होईल अशा प्रकारें तुह्मी वागा. यौवन प्राप्त होतांच प्रायः धीर पुरुषांचेंही मन स्थिरतेला आणि त्याच्याच बरोबर आईबापांवरील स्नेहाला शिथिल करतें, विषयवांच्छेच्या वेगाला आणि त्याच्याच बरोबर मदाच्या वेगालाही वाढवितें, शीलाला आणि त्याच्याच बरोबर लज्जे-लाही सोडून देऊं लागतें, दुराचराणाला आणि त्याच्याच बरोबर अविवेकालाही आदरितें, इंद्रियाला आणि त्याच्याच बरोबर मोहालाही उच्छृंखल करून टाकतें, शास्त्राभ्यासाचा आणि त्याच्याच बरोबर फार दिवसांच्या जुन्या प्रीतीचाही विसर पाडतें, कान धड असतांही त्यांत वडिलांच्या उपदेशाचा प्रवेश होऊं देत नाहीं, नेत्राला कांहींएक रोग जडला नसतांही अल्पदृष्टि करून टाकितें, विनयाला निराधार करून टाकितें, स्थैर्याला अस्थिर करून सोडतें, कुमार्गामध्यें उडी घेतें, व्यसनांत लंपट होतें, विकारांच्या आधीन होऊन बसतें आणि कीर्तीला सर्व प्रकारें मलिन करून टाकतें. यास्तव, मुला! तुह्मी आपल्या युवावस्थेमध्यें

दुःसंग आणि दुर्गुण यांपासून अलग राहून सज्जनसंगतीची आणि सद्गुणांची वृद्धि करीत जा, शील आणि शरणागत यांचें रक्षण करीत जा, विद्वान आणि रत्न यांस पदरीं बाळगीत जा, यश आणि पराक्रम यांचा विस्तार करीत जा, शत्रु आणि नीच विचार यांचा उच्छेद करीत जा, पुरुषार्थ आणि परक्याचे गुण हे प्रकाशित करीत जा, धन आणि प्रजेचें प्रेम संपादन करीत जा, शास्त्राचें आणि वडिलांचें सेवन करीत जा, गाई आणि ब्राह्मण यांचें पालन करीत जा, व्यसनें आणि अपकीर्ति यांची भीति धरीत जा, संबंधी आणि गुणी जन यांचा सत्कार करीत जा, परस्त्री आणि विपत्ति यांस समान लेखीत जा, ढोंगी आणि तोंडपुजे यांस सारखेंच मानीत जा, इंद्रियें आणि सेवकजन यांस वश्य ठेवीत जा, शत्रु आणि ठकवे यांस सावध राहत जा, संपत्ति आणि सेना यांचा संभाळ ठेवीत जा, त्याच प्रमाणें धर्मापासून आणि प्रजेच्या आशीर्वादांपासून राज्याचा उत्कर्ष होतो हे लक्षांत ठेवीत जा.

मनोरमेच्या भाषणानें जणों स्वच्छ झाला असावा, पवित्र झाला असावा, दैवी संपत्ति पावला असावा, इतिकर्तव्यतेला पोंचला असावा, सगळ्या विद्येचें फळ पावला असावा, अमृतानें न्हाला असावा, जाणावयाचें तें जाणून चुकला असावा आणि आपल्या जन्माला सफल करून चुकला असावा अशा प्रकारें आनंदित झालेला कुसुमायुध, “ आई, तुमची कृपाच मला सर्व गोष्टींत सुमार्ग दाखवील” इतकेंच बोलून आणि नमस्कार करून निघाला तो स्वतःसाठीं नेमून ठेवलेल्या निराळ्यात्र एका महालांत गेला.

कुसुमायुधाच्या महालाची शोभा शत्रुजिताच्या महालासारखीच होती. मदाच्या जलधारांनीं मलिन आहेत गंडस्थळें ज्यांचीं असे; जणों आपल्या भारानें वांकणाऱ्या पृथ्वीला स्थिर करण्याच्या उपायांचें चिंतनच करीत आहेत अशा प्रकारें डोळे मिटणारे; राजलक्ष्मीच्या सिं-

हासनाप्रमाणें दंतांचे सुळे आहेत ज्यांचे असे; जणों कांति आणि घटा या संबंधानें आपल्याशीं स्पर्धा करूं जाणाऱ्या मेघमालेला पकडून चुराडा करून टाकूं पाहत आहेत अशा प्रकारें, सोंडेला आकाशांत उंच करणारे; आणि फूत्कार करते वेळीं उडणाऱ्या जलबिंदूंच्या वृष्टीनें आणि त्याच्या गर्जनेनें मेघमंडळाचें अनुकरण करणारे; असे अनेक हत्ती या महालांत झुलत होते. जणों सगळी पृथ्वी आपल्या वेगाला पुरेशी नाहीं असें जाणूनच खिंकाळण्यानें विधात्यास दोष देत असावे असे; वर बसलेल्या स्वाराच्या ताब्यांत राहणारे; ज्यांचे केश कोमल आहेत असे; कोंबड्या प्रमाणें उंच मानेचे; आंखुड कानसुलाचे; सडपातळ तोंडाचे; आणि तेजस्वी पाठीवर सूर्याचीं प्रतिबिंबें पडल्यामुळें जणों सूर्यच आपल्या रथाला जोडण्यासाठीं स्वार होऊन परीक्षा करीत आहे असे दिसणारे; असे हजारों घोडे ह्या महालांत बांधिले होते. या महालाचे सौध जणों चंद्रलोकाहून मागविलेल्या पाषाणांनीं रचले असावे; क्षीरसागरांतील शिंप्यांच्या चुन्यानें त्यास गिलावा केला असावा; आणि आकाशगंगेच्या तरंगावरील फेणानें सारविले असावे असे दिसत होते. या महालासभोंवतालचे बगीचे जणों नंदनवनांतून रोपे आणवून बनविले असावे; जणों अंधकाराला सूर्याच्या किरणांच्या तडाक्यांतून वांचवून आपल्या आश्रयाखालीं निर्भयपणें ठेवण्यांत मोठी प्रतिष्ठा मानित असावे; जणों विधात्यानें भावी सृष्टि निर्माण करण्यासाठीं एके ठिकाणीं जमवून ठेवलेलें असंख्य वसंतऋतूंतील सौंदर्याचें भांडारच असावें; जणों महादेवाच्या नेत्राग्नीच्या भयानें त्रस्त झालेल्या कामदेवाची येथें लपून बसण्याची दाट राईच असावी; आणि जणों चंद्राची शीतलता खुटली ह्मणजे तीची भर करून देण्याची हिंमत धरीत असावे असें वाटत होतें.

कुसुमायुधाच्या तनख्याला नेमलेले सेवकजनही फार प्रामाणिक; स्वामीनें अपमान केला तर त्याबद्दल स्वामीला दोष न देतां आपलेच

ठिकाणीं दोष पाहाणारे; स्वामी अधिक स्नेह दाखवूं लागला तर तें आपल्या गुणाचें नव्हे पण स्वामीच्या औदार्याचें फळ होय असें मानणारे; आपल्यास स्वामी मित्रासमान लेखून विचारपूस करीत असला तरी मित्रतेला नव्हे पण आपल्या नोकरीच्या पेशाला उचित अशी भाषणाची रीत स्वीकारणारे; मोठा पराक्रम केला तरी तें आपल्या चातुर्याचें नव्हे पण स्वामीच्या प्रभावाचेंच फळ होय असें समजून त्याची प्रशंसा करणारे; स्वामीच्या सांगण्यावांचूनच स्वामीचें हित केलें असेल तर आपल्या स्वामीला नव्हे तर आपल्या मनांत उत्पन्न झालेल्या बोलून दाखविण्याच्या इच्छेलाच दबविणारे; स्वामी आज्ञा करील त्या वेळेस चांगल्या वाईटाचा नव्हे तर स्वामीची आज्ञा सिद्धीस कशी नेतां येईल याचाच विचार करणारे; लढाईच्या वेळीं मागें नव्हे तर स्वामीच्या पुढेंच पाऊल टाकणारे; स्वामी इनाम देऊं लागेल तेव्हां पुढें नव्हे तर स्वामीच्या पाठीमागें दडून जाऊन उभे राहणारे; रणभूमीवर जीविताला नव्हे तर मरणाला अधिक मानणारे जों स्वामीच्या धनाची नव्हे तर त्याची सेवा कशी होईल हीच तृष्णा धरणारे; व्यसनांत नव्हे तर स्वामीच्या कार्यांतच आसक्त असणारे; स्वामीला नव्हे तर आपल्याच इंद्रियांस स्वाधीन ठेवण्यांत पुरुषार्थ समजणारे; स्वामिकार्यें करण्यांत स्वामीच्या इच्छेला नव्हे तर भूक, ताहान, ऊन, थंडी यांस न जुमानणारे; राज्यप्रकर्णीं कामांत श्रमाचें नव्हे तर आपल्या नालायकीचेंच भय धरणारे; अपकीर्तीला आणि मरणाला समान लेखणारे; स्वामीच्या धनाला आणि स्वतांच्या प्राणाला तुल्य समजणारे; शास्त्राचा अभ्यास करण्यांत व्यसनी, सज्जनांचा संग्रह करण्यांत लोभी, रहस्याचा प्रकाश करण्यांत मुके, खलजनांच्या गोष्टी ऐकण्यांत बहिरे, परस्त्रियांकडे वाईट दृष्टीनें पाहाण्यांत अंध, चांगल्या चालीचा परित्याग करण्यांत कृपण, दुराचरणाचे द्वेषी, सारांश कुसुमायुधाला इष्ट देवतेप्रमाणें समजणारे असे होते.

कुसुमायुधाचा महाल अश्वशाळांमुळें वरुणनगरा सारखा, भांडारानें कुबेरपुरासारखा, योध्यांनीं दैत्यपुरीसारखा, शोभेनें इंद्रपुरीसारखा, गांभीर्यानें नागनगरासारखा, स्वच्छतेनें चंद्रलोकासारखा, आणि विद्येनें ब्रह्मलोकासारखा होता.

कुसुमायुधानें या महालांत आल्यावर राजकुमार आणि विद्वान लोक यांच्याशीं बोलण्या चालण्यांत कांहीं वेळ घालविला, अवश्यक कामकाजाचा बंदोबस्त केला आणि सांज पडतांच सायंकाळचें शिवपूजन केल्यावर व मातापितरांस प्रणाम केल्यावर रात्रीस अल्प आणि पथ्य असें भोजन करून शयनगृहांत जाऊन शयनसुख घेतलें.



# प्रकरण १७ वें.

## मृगया.

प्रभातसमयीं बंदीजनांच्या मधुर आलापांनीं जागा होऊन युवराज कुसुमायुधानें शारीरिक विधि आटपून घेतला, नंतर उष्णोदकानें स्नान केलें, श्रीविश्वेश्वराची देवळास जाऊन पूजा केली, व्यायाम करण्याविषयीं पित्याची अनुमति आणवून शिकारीस जाण्याची तयारी करण्याविषयीं आज्ञा केली. त्याबरोबर ऊंचीला लहानशा तट्टूच्या आकाराचे, सोन्याच्या सांखळ्यांनीं शोभणारे, चित्रविचित्र वर्णांचे, काळपाशाप्रमाणें जबडे आहेत ज्यांचे असे, बिळांत फिरणाऱ्या सर्पाप्रमाणें लळलळणाऱ्या जिव्हा ज्यांच्या तोंडांत आहेत असे, प्रलय करण्यास तयार झालेल्या कालिकेचे जणों क्रोधमय कटाक्षच होत असे, आणि मृगांस यम दूतांप्रमाणें भासणारे असे अनेक शिकारी कुत्रे तयार केले. शिकारीस जाते वेळीं बरोबर नेण्यासाठीं तयार झालेल्या सेनेचा कोलाहल होऊं लागला. बंदुका, तलवारी, भाले, आणि दुसरीं अनेक प्रकारचीं आयुधें, सूर्याच्या किरणांनीं चकचकूं लागल्याकारणानें जणों जंगली पशूंचें रक्त पिण्याच्या लालसेनें सेना लांबलांब जिव्हा काढीत असावी अशी दिसूं लागली. झापांसारखी दाढी आहे ज्यांची असे; नेहमीच्या कसरतींमुळें पाषाणाहूनही कठिण अवयव आहेत ज्यांचे असे; जणों सूर्याच्या किरणांचा अपमान करून त्याच्यावर चाल करून जाण्यास निघालेले, अनेक अंधकार समूहच होत असे दिसणारे; कारणावांचूनही ललाटांत वर चढलेल्या भयंकर भिवयांनीं आणि अग्नीच्या ठिणग्यांसारख्या बाहुल्यांनीं युक्त अशा नेत्रांनीं काळालाही भेदरून सोड-

णारे; जणों विधात्यानें सर्व ब्रह्मांडामधून बीभत्स रसाला जमा करून त्याच्या परिमाणूंनींच निर्माण केले असावे असे दिसणारे; जणों महापापाची मनुष्याच्या आकाराची एक नवीच सृष्टि उत्पन्न झाली असावी असें भासविणारे; दयेच्या शत्रूसारखे; क्रोधकुळाच्या मूळ पुरुषासारखे; जंगली प्राण्यांना प्रत्यक्ष काळासारखे; प्राण्यांच्या रक्ताच्या सुकलेल्या डागांनीं जणों काळ्या नायट्यानें व्याप्त झाले असावे असे दिसणारे; जणो भूलोकाचें अवलोकन करण्यासाठीं आलेले यमलोकचे देसाईच असावे असे भासणारे; कलियुग किंवा कल्पांत काळ यांचे अंशावतार असावे असे दिसणारे; पशुपक्ष्यांच्या दुर्भाग्याचा समूहच असे; विजेच्या झपाट्यानें फुटून खालीं आलेले काळे कुळकुळीत मेघच होत असे; जणों नरदेह धारण करून फिरावयास निघालेली यमराजाच्या रेड्याची ही प्रजाच होय असे; जणों हनुमंतानें केलेल्या लंकेच्या होळीचे समयीं तेथून पळून आलेले लंकेंतील गृहस्थच होत असे; जणों पशुपक्ष्यांच्या जळून जाऊं लागलेल्या भाग्याचा धूरच होय असे; पशूंच्या प्राणवायूची मेजवानी करण्यासाठीं पाताळांतून रूपांतर धरून बाहेर निघालेले काळसर्पच होत असे; जणों जंगलामध्यें कलियुगाचें राज्य स्थापण्यासाठीं एकत्र झालेले कलियुगाचे काकेच लागले असावे असे; गुडघ्यांपर्यंत पोंचतील अशा लांब लांब शेंड्या धारण करणारे; डोळ्यांच्या कोणांपर्यंत पोंचणाऱ्या मिशा आहेत ज्यांच्या असे; पावलांवरून सिंहाचा वगैरे पत्ता लावण्यांत मोठी विद्वता मिरवणारे; काळ्या कुळकुळीत सर्पाला सुद्धां एका सपाट्यांत परवश करून टाकणारे; मोठमोठ्या खोल नद्यांतून सुद्धां मगरीस पकडून खेचून आणण्यांत एकवीरपणा दर्शविणारे; आपल्या शरीराच्या दुर्गंधीनेंच मगर वगैरे प्राण्यांस भेदरवून टाकणारे; शृंखला आणि मोरपिसें यांचीं आभरणें आंगावर धारण करणारे; कुत्रे आणि ससाणा पक्षी यांस शिकारीचें शि-

क्षण देण्यांत महोपाध्यायाची पदवी पावलेले; काळ्या कुळकुळीत शिळे-प्रमाणें विस्तीर्ण छातीचे; शिकारी कुत्रे वाढविण्यासंबंधी आयुर्वेद शास्त्रार्थामध्यें अश्विनीकुमार आणि धन्वंतरी यांसही हटविणारे; जणों हिंसादेवीच्या मंदिराचे आधारस्थंभच होत अशा आहेत जांघा ज्यांच्या असे; आयुधांच्या घट्यांनीं संकीर्ण आहेत भुजा ज्यांच्या असे; एकेक कोसावरूनही जनावरांस वासानें ओळखून काढणारे; मद्यमांसाला अमृताहूनही अधिक मानणारे; हिंसेलाच आपल्या जन्माची इतिकर्तव्यता समजणारे; जनावरांची शब्दावरून परीक्षा करण्यामध्यें अपूर्व व्याकरणाची पद्धति जाणणारे; आयुधें हेच आपले परम मित्र होत असें लेखणारे; हरिणांस भूल पाडणाऱ्या गायनाचा अभ्यास केलेले; जनावरांस पकडण्याची फांस वगैरे सामुग्री वारंवार साफ करीत असणारे; हिंसा ही एक प्रकारची मौज आहे असें समजणारे; क्रूर जनावरांच्या नखांनीं नाक कान वगैरे अवयवांच्या ठिकाणीं खंडित झालेले; मोहोळावरील मधमाशांच्या दंशांनीं चट्टे पडले आहेत ज्यांच्या आंगावर असे; काळ्या सापानें शेंकडों वेळां दंश केलेले; डोक्यामध्यें धोंडे वगैरे लागल्यामुळें टेंगळें आलीं आहेत ज्यांच्या असे; आणि राजास एखाद दिवस तरी आपला खप पडला इतक्याच विचारानें मोठा उत्कर्ष मानून घेणारे; अशा प्रकारचे भिल्ल आणि कोळी वगैरे शिकारी लोक यांसही अघाडीला चालविण्यांत आलें. आणखी दरिद्री असतांही मोठमोठ्या अभिमानाच्या गप्पा सांगणारे; मिथ्या अभिमान धरून आंग मुरडीत मुरडीत अकडीनें चालणारे; घरांतल्या बहुतेक कपड्यांचा कंबरबंधांतच समावेश करणारे; यःकश्चित गोष्टींतही चिरडीस जाणारे; यत्किंचितही क्रोधाचें कारण मिळालें असतां लागलीच हातापिटीस येऊन हत्याराचा उपयोग करण्याला तयार होणारे; जवळ कवडी नसतांही दारू पिणें, चिलीम ओ-

ढणें वगैरे खराब व्यसनांमध्यें आसक्त होऊन राहिलेले; एकतारी वाद्य वाजवून गचाळ गाणीं गाण्यांतच चैन भोगणारे; आणि चालतां चालतांही उन्मत्ताप्रमाणें कांहींतरी गात जाणारे; अशा प्रकारच्या कित्येक शिपायी लोकांसही पुढें लावून देण्यांत आलें.

कुसुमायुधानें शिकारीला साजणारा पोशाक चढवून काळें चिलखत आंगावर घातलें आणि तो घोड्यावर स्वार झाला. ज्याप्रमाणें काळा मेघ आपल्यावर असलेल्या नक्षत्र मंडळानें शोभतो त्याप्रमाणें त्याचें काळें चिलखत वर धारण केलेल्या रत्नमय हारानें शोभूं लागलें. त्याचा घोडा आपल्या वेगामुळें पृथ्वीलाही अल्पावकाश समजून आकाशमार्गेंच चालण्यास इच्छित असावा अशा प्रकारें आपले पुढील दोन पायांवर उभा राहूं लागला. तो आपल्या वेगापुढें पवनाला पांगळा, गरुडाला गांजलेला, विजेला निर्जीव आणि चित्ताला निस्तेज समजत असावा, असेंच वाटत होतें. कुसुमायुध सेनेसहित अरण्यांत पोंचतांच रानटी जनावरांमध्यें मोठी गडबड उडून गेली. मारा मारा; पकडा पकडा; अडवा अडवा; इकडे इकडेहो; जा जा लवकर; कोठें गेला कोठें गेला; रस्ता सोडा, रस्ता सोडा; गप राहा, गप राहा; कानोसा घ्या, कानोसा घ्या; हुडकून काढा, हुडकून काढा; अशा प्रकारचा एकच कल्होळ होऊन गेला. बंदुकांचे बार उडूं लागले, गोळ्या आरपार जाऊं लागल्या, तलवारी चालूं लागल्या, बाण सुरसुरूं लागले, आणि बर्च्या भोसकूं लागल्या. एके बाजूस वाघांचा वध होऊं लागला; दुसऱ्या बाजूस डुकरांचा सूड घेण्यांत येऊं लागला; तिसरे बाजूस हरिणांचे हाल हाल होऊं लागले; चवथे ठिकाणीं रानरेडे बळी पडूं लागले; पांचवे ठिकाणीं गेंडे गोंधळत पळूं लागले; आणि साहाव्या ठिकाणीं पक्षी मोक्षपंथ धरूं लागले. सिंहाच्या गर्जना, रेड्यांचें रेंकणें, डुकरांचा भुरभुराट, हरिणांचा चित्कार, गेंड्याची ओरड, पक्ष्यांचा चिलबिलाट, यांनीं सर्वारण्य जणों त्रास-

मय असावें, नरकमय असावें, कंपमय असावें, पीडामय असावें, कोलाहलमय असावें आणि खेदमय असावें असें वाटूं लागलें.

कित्येक सिंह कुसुमायुधानें टाकलेल्या गोळ्यांबरोबरच मरून पडूं लागले, कित्येक गोळ्यांसहित लांबवर पळून गेले, आणि कित्येक गोळ्यांच्या भयानेंच बुजून जाऊन बिकट स्थळीं फिरूं लागले. कित्येक हरिणी बाणांच्या सपाट्यांतून निघून गेल्या असतांही, हरिण मागें अडकून राहिलेले पाहून, स्नेहामुळें, बाण पडण्याच्या जागींच फिरूं लागल्या. कित्येक मृगी, मागें राहून गेलेल्या आपल्या पाडसांची वाट पाहून थोडा वेळ उभ्या राहिल्या असतां कुत्र्यांच्या कालपाशासारख्या जबड्यांत सांपडूं लागल्या. कुसुमायुध बाणांची भयंकर वृष्टि करीत असतां, कित्येक मृग जणों सप्तऋषींच्या आश्रमांत शिरून निर्भय स्थळ मिळेल अशी आशा धरूनच किं काय आकाशांतूनच उड्या मारूं लागले. शिंगांनीं उकरलेल्या धुळीवरून रेड्यांचा, पृथ्वीवर पडलेल्या तोंडांतल्या फेनावरून हरिणांचा, किलबिल शब्दावरून भिन्न भिन्न पक्ष्यांचा, आणि रक्ताच्या धारांवरून जखमी झाल्यावर पळून गेलेल्या प्राण्यांचा पत्ता काढूं लागले. हमेशा सर्व सामुग्रीसहित तयार असलेल्या कुसुमायुधाच्या बंदुकीचा धडाका, काळमेघाच्या कडाक्याची, हनुमानाच्या भुभुक्काराची, पर्वताच्या फाटण्याची, आकाश कोसळण्याची, ज्वाळामुखी उद्भवण्याची, आणि त्रैलोक्याची उलाढाल होण्याची भ्रांति उत्पन्न करूं लागला. योगिनीसारखी प्रबळ, कालिकेसारखी क्रूर आणि माहामारीसारखी तत्काळ घातक अशी कुसुमायुधाची बंदुक सिंहाचा संहार करीत होती, हरिणांचे प्राण हरण करीत होती, अस्वलांस असुविरहित करित होती, गेंड्यांचे प्राण गुंडाळून घेत होती, लांडग्यास लंगडे करून टाकीत होती, चित्त्यास अचेतन करून टाकीत होती, डुकरांचीं डोकीं मारीत होती, चितळांस चित करून टाकीत होती, आणि पक्ष्यांस मोक्षगति

देत होती; त्याचा घोडा हरणास थकवूं लागला, सिंहास पाहून किंकाळूं लागला, चित्त्यांस दबाऊं लागला, रीसास चिडवूं लागला, रेड्यास दरडावूं लागला, वानराप्रमाणें अवसान मारूं लागला, पृथ्वीला खुरांनीं खडखडवूं लागला, आणि वायूसारखा वेग धरूं लागला; ससे शिकारी कुत्रे पाठीस लागलेले पाहून सैरावैरा धावूं लागले, जवळ आलेले पाहून उड्या मारूं लागले, आपल्यास अगदीं गांठलें असें पाहून झुडपांच्या जाळ्यांतून दडून बसूं लागले, जाळ्यांतून हुडकून काढूं लागले असतां डोळ्यांआड कान करून जागचे जागीं थबकून बसूं लागले, आणि शेवटीं त्यांच्या तोंडांत येऊन पडतांच श्राद्धाच्या पिंडाप्रमाणें दिसूं लागले. बाणांचा वर्षाव होत असतांही पोरांस पाजण्यासाठीं अडकून राहणाऱ्या; त्रासानें पळत असतांही ठोकर खाणाऱ्या; आपल्या पिलांस बचावणाऱ्या; अज्ञान पोरांस घेरून टाकून अडवून धरीत असतां स्नेहाच्या आधीन होणाऱ्या; बाणाच्या रोखांत आलेल्या आपल्या पोरांस पाहून त्यांस बचावण्यासाठीं आपल्या शरीराला आड धरण्याला आणि शेवटीं सर्व उपाय हरले असें पाहून अश्रूंनीं घेरलेल्या दृष्टीनें टक लावून पाहत राहणाऱ्या; हरिणींची क्रूर शिकारी लोकांसही दया येऊं लागली. नुकत्याच व्यालेल्या असल्याकारणानें रुधिरस्राव करणाऱ्या, पळूं लागल्या असतांही चुकून वेगळ्या पडलेल्या बच्चांस शोधणाऱ्या, आणि गेंड्यांस कापून काढलेले पाहून जिवंत राहण्याची आशा सोडून देणाऱ्या गेंड्या, कंठ मोकळे करून, आर्तस्वरानें ओरडूं लागल्या. घेरा देऊन ओरड केल्यामुळें गुहांतून उठून बाहेर येऊन आंगावर येणारे; अग्नीच्या ज्वाळांसारखे लाल नेत्र आहेत ज्यांचे असे; तोंडें वासलेले; विक्राळ दाढीचे; काळ्या मानेचे; आणि हत्तींच्या मदाला शुष्क करून टाकणारे कित्येक सिंह बरोबर रोख धरून मध्यरात्रीं तुटणाऱ्या ताऱ्यांप्रमाणें जलदीनें टिपण टाकून येत असतां

कुसुमायुधानें आपल्या घोड्याचा बचाव करून कांहीं विलक्षण चपलतेनें लागलाच वितीच्या बाणांनीं त्यांचीं तोंडें भरून टाकिलीं; चिखलानें युक्त ढोभणांत पडून मस्ती करणारे; ओरडा ओरडी ऐकून बाहेर निघालेले; चिखलांत लोळल्याकारणानें शाम वर्णाची पुनरुक्ति पावलेले; तीक्ष्ण, शुभ्र आणि चकचकणाऱ्या दातांच्या पंक्ति पाहून अर्ध्या चंद्रालाच जणों तोंडांत पकडणारे राहूच होत असे दिसणारे; त्रैकोक्याचें पालन करणाऱ्या नारायणानेंही एकवेळ आपल्या जातीमध्यें अवतार घेतला होता असें जाणून मोठेपणाचा जणों अभिमान वाहत असावे अशा प्रकारें घुरघुरणारे; आणि पृथ्वीला महावराहानें वर आणिली असें जाणून पृथ्वीपतिपणाचा हक्क घेऊं पाहत असावे अशा प्रकारें लढाईला तयार झालेले मोठे मोठे डुकरांस बाणांनीं विंधून टाकून कुसुमायुधानें पतिशब्दाचा दुसरा अर्थ घेऊन त्यांची इच्छा पूर्ण करण्याचेंच मनांत आणलें असावें अशा प्रकारें त्यांस पृथ्वीचें आलिंगन करावयास लाविलें. पक्ष्यांच्या करुणाकर कोलाहलानें, पशूंच्या आर्तस्वरांनीं, धनुष्यांच्या दोऱ्यांच्या भयंकर टंकारांनीं, जनावरांस मारण्यासाठीं इकडे तिकडे धांवत असलेल्या शिकारी लोकांच्या पायांच्या दणदणाटानें, रानरेड्यांच्या गळ्यांवर तरवारीचे घाव पडल्यामुळें होणाऱ्या कडकडाटानें, पळून जाणाऱ्या पशूंच्या गडबडाटानें, घोड्यांच्या खुरांच्या खडखडाटानें, शिकारी कुत्र्यांच्या कर्णकठोर भोंकण्यानें, बंदुकीच्या भयंकर धडाक्यानें, बाणांच्या सणसणाटानें, शिकारी लोकांच्या सिंहनादानें, त्रासाच्या समयीं सुद्धां कामीपणासंबंधी विकृत चेष्टा करणारे डुकरांच्या घडघडाटानें, रेड्यांच्या धसकटपणाच्या मस्तीनें, चित्यांच्या लुच्चेगिरीचे डावपेच लक्षांत आले असतां शिकारी लोकांनीं रचलेल्या निरनिराळ्या तजविजींनीं, पशूंचीं रक्त आणि मांस इत्यादिकानीं भरलेलीं आंतडीं पाहण्यांत आल्यानें आणि कुसुमायुध जणों अनेक शरीरें धारण कर-

णारा असावा अशा प्रकारें सर्वत्र पाहण्यांत येत असल्यानें तें अ-रण्य करुण रसमय असावें, वीररसमय असावें, हास्यरसमय अ-सावें, भयानकरसमय असावें, रौद्ररसमय असावें, बीभत्स रसमय असावें, आणि अद्भुत रसमय असावें असें दिसूं लागलें. पोरांस तोंडांत धरून पळूं लागलेल्या लांडग्या मार्गांतच जखमी झाल्यामुळें पोरांस टाकून तडफडूं लागल्या. गोळ्यांच्या प्रहारांनीं आंतडीं बाहेर पडतांच पृथ्वीवर गडबड गडबड लोळूं लागले असतां चित्ते आपल्या आंतड्यांनीं बंधन पावूं लागले. अवसानसमयीं कावळ्यांच्या कठिण चोंचींनीं भोंसकल्यामुळें सिंह जणों आपल्या या जन्मांतील दुष्टकृत्यांचें फळ भोगीत असावे असें वाटूं लागलें. वेदनांनीं तडफडत असतां तोंड वांसून उताणे पडलेले आणि शिंगें तसेच चारी पाय झुडपांत अडकून गेल्या कारणानें निश्चेष्ट झालेले रेडे जणों बडवण्यासाठीं पाडले असावे असें दिसूं लागलें. मागल्या पायांला विंधून वृक्षांत खोंचून राहिलेल्या बाणांमुळें चालण्याला असमर्थ झालेले डुकर, मागल्या पायांनीं खुंट्यास बांधलेल्या हत्तींप्रमाणें दिसूं लागले. रस्त्यांत पडलेल्या आपल्या तीक्ष्ण सळ्यांनीं पत्ता सांगून देऊन मारलेल्या साळी जणों "विपत्तीच्या समयीं मित्र देखील शत्रू होतात" असें दाखवीत असाव्या असें भासूं लागलें. पळून जाऊं लाग-लेले आणि पाठीवर बाणांच्या प्रहरांनीं घाबरून गेलेले आस्वल कांटेरी झुडुपांमध्यें गुरफाटून गेल्यामुळें पळून जाण्यांत विघ्न करणाऱ्या आपल्या लांब लांब केसांत शत्रूसारखे लेखूं लागले. कुऱ्हाडीनें तोडले असतांही मरण पावण्यास विलंब लावणारे गेंडे आपल्या आंगाच्याच बळकटीनें दुःखी होऊं लागले. मरण पावणाऱ्या गेंड्यांच्या ढाली सुद्धां शिकारी कु-त्र्यांस बोथरखंडे करून टाकून आपला सूड उगवूं लागल्या. भक्षाच्या आस्वादांत लंपट झालेले कुत्रे दांतांच्या मोडण्याचीही पर्वा करीत नव्हते. यमदूतांप्रमाणें आकाशांत उडत्या पक्ष्यांस झडप घालूं पाहणारे ससाणे पक्षी

सर्व लोकांस "भाऊबंधांच्याच हातानें जसें नुकसान होतें तसें दुसऱ्या कोणत्याही कारणानें होणार नाहीं" या विषयीं खात्री पटवूं लागले.

कित्येक जनावरांवर पाश टाकून कित्येकांस डावपेंच वापरून आणि कित्येकांस दुसऱ्याच कांहीं युक्तिप्रयुक्ति करून, शिकार करतां करतां मध्यान्हींचा समय झाला. त्यामुळें घोडे आणि त्यावरील स्वार थकून जाऊन घामानें व्यास होऊं लागले. झाडांची छाया सुद्धां जणों थकून गेली असावी अशा प्रकारें वृक्षांच्या तळांशीं दडून बसलेली दिसूं लागली. ज्याप्रमाणें तरुण, नवोढांस सोडीत नाहींत त्यांजप्रमाणें वृक्ष आपल्या पायांशीं आलेल्या शीतल छायांस सोडण्यास नाखुश दिसूं लागले. जणों शिकारीनें पीडा पावलेल्या पशूंचा निःश्वासच असावा, असा उन्हुन वारा वाहूं लागला. मनुष्यांची सावली जणों उष्णतेमुळें दूर न जाण्याविषयीं प्रार्थना करीत आहे अशा प्रकारें त्यांच्या पायांवर पडूं लागली. कृपण मनुष्यांच्या हृदयाप्रमाणें जलाशय संतप्त होऊं लागले. घरट्यांतून बसलेले पक्षी दमेकऱ्याप्रमाणें श्वास टाकूं लागले. सूर्य जणों गर्द झाडीमध्यें लपलेल्या अंधकाराला शोधून काढण्यास इच्छित असावा ह्मणून आकाशाच्या मध्यभागीं आला आणि ऊन जणों लोकांच्या शरीराला भेदून आंत शिरूं पाहत आहे असें वाटूं लागलें.

या समयीं कुसुमायुधाच्या मनामध्यें या प्रमाणें विचार आले. मृगयेंत व्यायामानें मेदाचा ऱ्हास झाल्याकारणानें शरीर हलकें आणि उद्योग करण्याला उत्साह देणारें असें होतें. राजे आणि राजकुमार यांस रक्त आणि मांस पाहून उद्वेग अथवा ग्लानि प्राप्त न होण्याची संवय लागते आणि तेणेंकरून शत्रूचा वध करण्याची पर्वा न वाटतां राज्याचें रक्षण उत्तम प्रकारें करतां येतें. अस्थिर निशाणावर अचुक गोळी अथवा बाण मारून त्यास हाणून पाडण्याची कसरत होते आणि प्राण्यांच्या चित्ताची क्रोधाच्या आणि भयाच्या समयीं कशी स्थिति

होते आणि त्यांच्या चित्तांत कसकसे विकार उत्पन्न होतात या संबंधें बरेंच ज्ञान प्राप्त होतें. याच कारणास्तव धर्मशास्त्रकारांनीं आणि आपल्या राजर्षींनीं मृगयेस पापरूप मानिलें नाहीं. तथापि मोठी हानि करणाऱ्या व्यसनांमध्यें गाणिलें आहे. पूर्वीच्या महात्म्यांच्या मताला अनुसरून मीं हें काम केलें पण सूक्ष्म विचारानें पाहतां निरपराध प्राण्याचा वध करणें हें पाप नव्हे असें ह्मणणें योग्य दिसत नाहीं. सर्व धर्माचें मूळ दया होय असें ह्मणतात. तिचें उच्छेदन या मौजेंत होत नाहीं असें कोणाच्यानेंही ह्मणवणार नाहीं. राज्यरक्षणाच्या वगैरे व्यवहारामध्यें मृगया फार उपयोगाची आहे असें जाणून तिला पापाच्या पंक्तीस न बसवतां श्रेष्ठ लोकांनीं व्यसनांच्या यादींत घातलें आहे. तेव्हां यावरूनच स्पष्ट दिसून येतें कीं, या लोकांनीं वाणीनें जरी नाहीं तरी निःपक्षपात मनोवृत्तीनें मृगया दोषरूप ह्मणूनच गणिली आहे. प्राण्यांची हिंसा, मद्यपान, परस्त्रीगमन ह्या गोष्टी फार करून लक्ष्मीच्या मदतीनेंच होतात ह्मणून लक्ष्मीचा मदच सर्व अनर्थांचें मूळ आहे. मला युवराज पदवी मिळाल्याला आजचा हा दुसराच दिवस आहे, इतक्यांत लक्ष्मीच्या मदानें माझ्या मनावर केवढा तरी अम्मल चालवून या नीच कृत्यामध्यें त्याची प्रवृत्ति केली. मी विद्यामंदिरांत अभ्यास करीत होतों त्या वेळच्या माझ्या मनोवृत्तीमध्यें केवढा तरी फेर पडला. थोड्या वेळांतच एवढा फेर पडला त्यापेक्षां या पुढें काय होईल त्याचें अनुमान सहज करितां येण्यासारखें आहे. मी युवराज पदवीला चढल्यापासून शत्रूंचा, घातकी प्राण्यांचा आणि तसाच अधर्मी लोकांचा वध करण्याचा मजकडे अधिकार आला; परंतु या प्रमाणें सिंहादिक घातकी प्राण्यांच्या बरोबरच निरपराध प्राण्यांचा वध करण्याचा अधिकार मला नाहीं. अरेरे, जें झालें तें झालें. थोडा एकतर्फी विचार केला तर माझ्या आयुधविद्येच्या ज्ञानाची मला खात्री करावयाची होती ती या योगें सहज होऊन गेली. म्हणून या एक वेळच्या मृगयेसाठीं

मला एवढा पश्चात्ताप करणें योग्य नाहीं. शरीराला हलकें आणि उत्साहयुक्त ठेवण्याला दुसरे पुष्कळ उपाय आहेत. प्राण्यांच्या मनोवृत्ति दुसऱ्या अनेक प्रकारांनीं जाणतां येतात. माझी आयुधविद्या पूर्ण अभ्यासांतली असल्याकारणानें कधींतरी गंजेल हे स्वप्नींही आणावयास नको. आणि शत्रूंचा, घातकी प्राण्यांचा, व अधर्मी लोकांचा वध करण्यास माझें मन माघार घेईल अशीही गोष्ट नाहीं. यास्तव अशा फंदांत पुढें न शिरण्याचा मी निश्चय करतों; आणि या निश्चयामुळें राज्यरक्षणाच्या कामीं यत्किंचितही हरकत येणार नाहीं."

याप्रमाणें विचार करून व एकंदर सर्व शिकारी लोकांस थांबवून, कुसुमायुधानें आपल्या मनाबरोबरच घोड्यालाही लवकरच राजधानीकडे वळविलें. भागीरथीचे कांठीं आल्यावर घोड्याला धुऊन पाठीवर हात फिरवून, खरारा करून, रुमालानें त्यांस पुसिलें. आणि भागीरथीचें पाणी शीतळ असूनही पापाचें भस्म करून टाकणारें आहे, मधूर असूनही संसाररूपी रोगाचें शमन करण्याला क्षाररूप आहे, हजारों पापी लोकांची संगति घडत असतांही निर्मळच राहणारें आहे, निर्मळ असूनही पापी लोकांस स्वर्गांत पाठवून देण्याचें साहस करणारें आहे. वेगयुक्त असूनही परम विश्रांति देणारें आहे, पापाच्या अपार भाराला नेहमीं वाहत असूनही कधींही थकत म्हणून नाहीं, अशा पवित्र जलांत स्नान करून निर्मळ वस्त्रें परिधान केलीं. इतक्यांत घोडेवाल्यानें जीन घालून, सोन्याचा साज करून, तंग आंवळून, लगाम देऊन, घोडा आणून उभा केल्यावर, कुसुमायुध त्यावर स्वार होऊन शहरास निघून आला.



# प्रकरण १८ वें.

## दिग्विजय.

दिवसेंदिवस कुसुमायुधाचा प्रभाव शरीराच्या आकाराबरोबर वाढूं लागला; औदार्य यौवनाबरोबर उन्नति पावूं लागलें; विवेक मांड्याबरोबर दृढ होऊं लागला; कीर्ति छातीबरोबर विस्तीर्ण होऊं लागली; उत्साह भुजांबरोबर सुदृढ होऊं लागला; आणि न्याय बळाबरोबर प्रगल्भ होऊं लागला. शत्रुजिताच्या हाताखालीं कुसुमायुधाचा अधिकार जमतां जमतां प्रजा आणि नीति यांस निर्भयता प्राप्त झाली; विद्वानांचें दारिद्र्य आणि राज्याचे शत्रु यांचा लोप होऊं लागला; लक्ष्मी आणि कीर्ति वृद्धिंगत होऊं लागल्या; राज्याचें उत्पन्न आणि न्याय हीं उत्कर्ष पावूं लागलीं; न्याय आणि वसतीचीं घरें निर्भयपणें उघडीं होऊं लागलीं; चोर आणि रोग हे नामावशेष होऊन बसले; दान आणि पर्जन्यवृष्टि हीं वेळचेवेळीं होऊं लागलीं; तसेंच सैन्य आणि प्रजाप्रेम उत्कर्ष धरूं लागलीं.

जरी शत्रुजितानेंच दशदिशा जिंकून वश्य करून ठेविल्या होत्या, सगळ्या शत्रूंस आपल्या आधीन करून ठेविलें होतें, सर्व प्रकारचीं रत्नें मिळवून संग्रह करून ठेविला होता, एकंदर राजांस नमवून ठेविलें होतें आणि एकंदर किल्ले सर करून टाकले होते; त्यामुळें या बाबतींत कुसुमायुधाला कांहीं करण्यासारखें उरलेंच नव्हतें. तरी "युवराज पदवी घेतल्यावर दिग्विजयाची ग्वाही फिरविलीच पाहिजे" या प्राचीन संप्रदायाला अनुसरून पित्याची संमति मिळवून त्यानें दिग्विजयाची यात्रा करण्याची तयारी चालविली. कित्येक मंत्री व एक मोठी सेना त्याच्या

बरोबर जाण्यास सिद्ध झाली. माहुतांनीं हत्तींस हो बापा, हो बापा असें बोलून धुतलें, तेल व आंवळकटी हीं घासून घासून त्यास काजळाच्या पर्वताप्रमाणें बनविलें, सोंडेवर शेंदूर फांसून गणपतीसारखें सुशोभित केलें, व झुली घालून व वीरघंटा बांधून जयध्वनिसहित विजय लक्ष्मीला बसण्यास योग्य असें स्थळ केलें. हत्ती, आपल्या काळ्या व धिप्पाड शरीरांनीं, सोंडांनीं फेकलेल्या जलतुषारांनीं, आभरणांच्या चकचकणाऱ्या प्रभारूप विजांनीं, अद्भुत गर्जनांनीं, पायांमध्यें बांधलेल्या घांगुरांच्या झणत्कार शब्दांनीं, आणि शरीरावर फासलेल्या तांबड्या, पिवळ्या वगैरे रंगांच्या इंद्र धनुष्याच्या सारख्या छटांनीं, वर्षाकाळच्या आडंबराचा देखावा दाखवूं लागले. पागोट्यावर बांधलेल्या शिरपेंचानीं, दंडावर बांधलेल्या मंत्रयंत्रांनीं, दाढीवर बांधलेल्या चित्रविचित्र रुमालांनीं आणि कमरेवर बांधलेल्या मोठमोठ्या कमरबंधांनीं सुशोभित झालेले माहात मस्त हत्तींची नजर चुकवून मानेवर उडी मारून बसून गंडस्थळें थोपटूं लागले आणि निरनिराळ्या विशेषणांनीं त्यांस चुचकारूं लागले. निर्मळ जळांनीं धुतलेले, खरारा करून स्वच्छ केलेले, हात फिरवून प्रसन्न केलेले, दोन दोन तंगांचे रत्नांचे साज आहेत ज्यांचे असे, आभरणांनीं ओथंबलेले दिसणारे, नागिणीप्रमाणें ज्यांच्या मानेवर लांब लांब केश आहेत असे, केवड्याच्या नुकत्या फुटणाऱ्या कोंबासारख्या कानसुलाचे, डोळ्यांवर आडवी डोळझांकणी बांधलेले, पलंगासारख्या पाठीचे, आपल्या छायेला पाहूनच भडकणारे, पळत्या हरणांसही मागें टाकणारे; वज्रघातासारख्या खुरांच्या निष्ठुर प्रहारांनीं पाहाडांसही फोडून टाकणारे; जणों आपला पुत्र उच्चैःश्रवा याच्या भ्रांतीनें आलेल्या क्षीरसागरानें चुंबिले जात असावेत अशा प्रकारें फेणानें व्याप्त झालीं आहेत मुखें ज्यांचीं असे; जणों आपल्या वेगापुढें सारें भूमंडळही थोडें असें समजून विधात्यावर रागावत असावे, अशा प्रकारें दांतांनीं चौकड्याला करकरां चाव-

णारे; आणि जणों समुद्राला सुद्धां बुजवून टाकून वेगाची हौस पुरवून घेऊं पाहत असावे अशा प्रकारें खुरांनीं पृथ्वीच्या धुळीला दिगंतपर्यंत उडविणारे; असे हजारों घोडे सज्ज झाले. स्वामिकार्यासाठीं आपलें शिर देण्यास यत्किंचितही विलंब करणार नाहींत असे, छातीवर धारण केलेल्या रत्नमय आभरणांमध्यें पडलेल्या आपल्याच मस्तकांच्या प्रतिबिंबांवरून जणों युद्धांत मरण्याचें भय सोडून आपल्या मस्तकांस छातीवर धरूनच फिरत असावे असे दिसणारे, फिरून फिरून बळकट भुजाच्या बळानें महासंग्रामरूपी समुद्राला पोहून निर्भयतीरास येऊन पोंचलेले, जणों वीर रस भरून ठेविण्याचे हौदच होत असे भासणारे, शेंकडों जखमांच्या चट्यांनीं आंगाचे निरनिराळे भाग व्याप्त झाले आहेत असे, रणभूमीवर चाललेल्या रक्ताच्या प्रवाहामध्यें प्रतिबिंबित झालेल्याही आपल्या मस्तकांवर जर शत्रूचे पाय आलेले दिसले तर तेवढ्यानें सुद्धां आपला अपमान झाला असें मानणारे, शत्रूंच्या सेनारूप समुद्राचें शोषण करण्यामध्यें वाडवाग्नीची उपमा धरणारे, खड्ग धारांच्या वृष्टीनें यशोरूप अमूल्य विजांचें पोषण करणारे, रणामध्यें स्वामींच्या आड उभे राहून लोखंडाच्या किल्ल्याचें काम करणारे, पृथ्वीला शत्रूंच्या मस्तकांनीं आणि स्वर्गाला यशाच्या मंडलांनीं व्याप्त करून सोडणारे, जीविताच्या लाभाहूनही यशाच्या लाभाची योग्यता अधिक लेखणारे, आभरणांमध्यें दिसणाऱ्या अयुधांच्या प्रतिबिंबांनीं जणों, स्वतः आयुधमयच असावे असे भासणारे, आणि रणभूमीवर पाठ दाखवून नव्हे पण प्राण देऊनही आपली सुटका झाली असें न मानणारे; असे शेंकडो योद्धे बरोबर जाण्यास तयार झाले. जणों पृथ्वीवर आपल्याच मदानें उत्पन्न झालेल्या चिखलांमध्यें पाय निसरून जाण्याच्या भयानें डरत असावे अशा प्रकारें हळूहळू पावलें टाकणाऱ्या हत्तींनीं, स्वारांच्या आभारणांतून पृथ्वीवर गळून पडलेल्या तेजस्वी रत्नांस पाहून निखाऱ्याचीच भ्रांति पावत अ-

सावे अशा प्रकारें तुरक तुरक चालीनें चालणाऱ्या घोड्यांनीं, आणि रण-भूमीवर शत्रूंच्या मस्तकाला चेंगरून टाकण्याची कसरत पहिल्यापासून करण्यास आरंभ करीत असावे अशा प्रकारें सारख्या ओळींनीं धबाधब जोरानें पावलें टाकणाऱ्या पायदळानें, ही सेना खवळलेल्या महासागराची उपमा धरूं लागली.

**या** समयीं फुरफुरूं लागलेल्या आपल्या उजव्या भुजाकडे मोठ्या डौलानें पाहणारा; फुरफुरूं लागलेल्या उजव्या डोळ्याला जयलक्ष्मीचा दूत होय असें समजणारा; मंदहास्यानें जणों शत्रूंच्या मुखकमळाला ग्लानि आणण्यासाठींच चंद्रिकेला जमा करीत असावा असें दर्शविणारा; जणों विजयलक्ष्मीरूप अभिसारिकेला जवळ आलेली पाहून कामातुर झाला असावा अशा प्रकारें रोमांचित झालेला; जणों शत्रूंची गर्वरूप उष्णता शांत करण्यासाठीं आपल्याबरोबर पाणी राखण्याची आवश्यकता मानीत असावा अशा प्रकारें गळ्यांमध्यें अपार पाण्याच्या मोत्यांच्या हाराला धारण करणारा; जणों भुजरूप नळींतून भडकणाऱ्या बळाचा प्रवाह वेळेवर वापरतां यावा ह्मणून जमवून ठेवण्याच्या उद्देशानें फिरते रत्नमय बांधच जणों घातले असावे अशा प्रकारें मणिबंध व सलकडीं घातल्यानें शोभणारा; जणों जयलक्ष्मी वरण्यासाठीं नवरदेवच बनला असावा अशा प्रकारें पगडींत लटकावलेल्या शिरपेंचानें आणि कलगीतुऱ्यानें शोभणारा; आभरणांमध्यें पडलेल्या प्रतिबिंबांमुळें भुज चार संख्येला प्राप्त होऊन चतुर्भुज पदवी मिळाल्यामुळें जणों जयलक्ष्मीला वरण्यासाठीं विष्णूच्या आवेशानें युक्त झाला असावा असा भासणारा; पायांत घातलेल्या जडावाच्या तोड्यानें पायांत बांधलेल्या रत्नमय सांखळदंडाला तोडून घेऊन सुटलेला दिग्गजच असावा असा भासणारा; नानादेश पाहण्यासाठीं बरोबर येणाऱ्या प्रजेच्या अनुरागानें घेरला असावा अशा प्रकारें कमरेवर बांधलेल्या जरीच्या कुसंबी कांच्यानें

शोभणारा; वर पडलेल्या स्वस्तिवाचनाच्या अक्षतांनीं जणों वरल्या भागांत नक्षत्रांनीं शोभत असलेल्या संध्याकाळचें अभ्र होय अशा चमकणाऱ्या लालभडक रंगाच्या पगडीनें लोकांच्या अंतःकरणाचें हरण करणारा; आणि आराधना करण्यासाठीं आजुबाजूला उभे राहिलेल्या देवांनीं जसा इंद्र शोभतो त्याचप्रमाणें सेवेसाठीं दोहोंबाजूंस उभे असलेल्या मंत्र्यांनीं व सेनापतींनीं शोभणारा; असा कुसुमायुध तयार होऊन निघते वेळचा नमस्कार करण्यासाठीं आईबापांजवळ गेला. कुसुमायुधानें मनोरमा आणि शत्रूजित् यांचे चरण कल्याणाला कारणभूत, धर्माला आधारभूत, संपत्तीला साधनभूत, आणि विजयाला जनकभूत होत असें समजून त्यांस आपल्या ललाटस्थळच्या चंदनाक्षतांनीं अलंकृत करून, कमळासारख्या कोमळ हातांनीं कुरवाळून, नखांमध्यें मुखरूपी चंद्राचीं प्रतिबिंबें उमटवून आणि हात जोडून, इष्टदेवतांप्रमाणें पुजून, स्वतांला कृतार्थ मानिलें असतां, मनोरमा आणि शत्रुजित् यांनीं त्याची पाठ थोपटली; अश्रूंनीं त्याच्या पगडीला भिजवून टाकिलें; प्रेमाच्या पूरानें ओल्या चिंब झालेल्या उराशीं धरून आलिंगन केलें; आणि मुखांतून अर्ध्या अस्पष्ट निघणाऱ्या शब्दांनीं "हळू या, लवकर लवकर परत या; सर्व प्रकारें आपल्या जिवाला जपा, जेवणाच्या वेळाचें कधींही उल्लंघन करूं नका. उतरण्याच्या ठिकाणची पुरी चौकशी केल्याशिवाय इथें तिथें उतरूं नका, अनोळखी माणसाचा विश्वास धरूं नका, शत्रु दगा करतील याची सावधगिरी ठेवा, बरोबरच्या लोकांचें आपल्या जिवाप्रमाणेंच रक्षण करीत जा. आमच्या जीविताचा आधार तुमच्यावर आहे, तुह्माला जा ह्मणून ह्मणण्यास आमची जीभ उचलत नाहीं परंतु परंपरागत चालत आलेला राजधर्म आह्माला निरुपाय करीत आहे." असें बोलून निधीहूनही अधिक, अमृतवृष्टीहून उत्कृष्ट, आणि वरदानाहूनही वरिष्ठ असे आशीर्वाद दिले कीं "ज्या धर्मावर तुह्मी प्रेम ठेवितां तो धर्म तुमचें

रक्षण करो; ज्या सत्यावर तुह्मी आसक्ति धरतां तें सत्य तुह्मास साहाय्य करो; ज्या देवाचें तुह्मी आराधन करितां तो देव तुमच्यावर कृपादृष्टि ठेवो; ज्या शास्त्राचें तुह्मीं परिशीलन करितां तीं शास्त्रें तुह्माला सुबुद्धि देवोत आणि आमची सेवा तुमच्या मनोरथाला सफळ करो."

पित्यानें अनुज्ञा दिल्यावर आणि मातेनें शुभ्रपुष्पांचा हार गळ्यांत घालून, कुंकुमाक्षता लावून, पाठीवर हात फिरवून, रक्षाबंधन करून, आणि पुनः पुन्हां आलिंगन घेऊन, अश्रूंनीं गद्गद स्वरांनीं आणि मौनानेंच विसर्जन केल्यावर, कुसुमायुधानें आपल्या दरबारांत येऊन ब्राह्मण आणि याचक यांस दक्षिणेनें वगैरे संतुष्ट करून, सूर्य जसा आकाशांत चढतो तसा हत्तीच्या अंबारींत चढून बसून, तुफानी समुद्राच्या किंवा औत्पातिक मेघांच्या घोषाप्रमाणें प्रयाणदुंदुभीचा डंका करविला. ज्याप्रमाणें विजेच्या अभिघातानें मेघ, कल्लोलांच्या अभिघातानें समुद्र, तोफांच्या आवाजाच्या अभिघातानें आकाश, आणि रेल्गाडीचा रस्ता खोदतांना उडविण्यांत येणाऱ्या सुरंगांच्या अभिघातांनीं पर्वत दणदणून जातो त्याचप्रमाणें टिपऱ्यांच्या अभिघातांनीं दुंदुभि दुमदुमूं लागला. जणों दुंदुभीच्या ध्वनीनें चवताळून जाऊन शेषनागानें आपल्या मस्तकावरून टाकून दिली असावी आणि दिग्जजांनीं सोडून दिली असावी अशा प्रकारें पृथ्वी डळमळूं लागली. जणों स्वर्गांत ऐरावत, दिशांच्या ठिकाणीं दिग्गज, कैलासांत नंदी, पाताळांत आदिवराह, आकाशांत सूर्याचे घोडे, यमलोकांत यमराजाचा रेडा आणि मणिद्वीपामध्यें जगदंबेचा सिंह, चवताळून जाऊन गर्जना करूं लागले असावे, अशा प्रकारें चोंहोंकडून दुंदुभीचे प्रतिध्वनि ऐकूं येऊं लागले. कुसुमायुधाची भयंकर सेना चालूं लागतांच उडालेल्या धुळीच्या लोटानें दिवस रात्रीसारखा वाटूं लागला, सूर्याचे घोडे हत्तींच्या थटांनीं चिडून जाऊन सूर्याच्या रथाला दुसऱ्याच रस्त्यानें खेचून घेऊन गेले असावे अशा प्रकारें आकाश सूर्यविरहित दिसूं लागलें; दिशा जणों दुंदुभीच्या

ध्वनीनें तुटून पडल्या असाव्या अशा प्रकारें अदृश्य होऊन गेल्या; पृथ्वी जणों सेनेच्या भारानें उत्पन्न झालेला परिश्रम दूर करण्यासाठीं आकाश-गंगेमध्यें आंगधुण्यास जात असावी असा देखावा दिसूं लागला. जणों सेनेच्या भारानें पीडित झालेल्या शेषनागाची मूर्च्छा पाताळाला फोडून बाहेर देखाव करीत असावीसें वाटूं लागलें; जणों शत्रूंच्या राज्यावर पडण्यासाठीं काळरात्रच उत्पन्न झाली असावी असें मनांत येऊं लागलें; आणि सगळ्या दिशा जणों रजोरूपानें परिणाम पावल्या असाव्या असा देखावा दृष्टीस पडूं लागला. जणों हत्तींच्या कानांच्या तडाक्यांनीं पसरून नाहींशी झाली असावी; घोड्यांच्या घामानें बसून गेली असावी; हत्तींच्या सोंडांतून फूत्कारलेल्या जलबिंदूंनीं शांत होऊन गेली असावी; आणि पताकांच्या वायूनें नष्ट झाली असावी; अशा रीतीनें त्या धुळीचा लोट थोड्याच वेळांत अदृश्य झाला. ती सेना ज्या ज्या नद्या ओलांडून गेली त्यामध्यें पुढें चालणारांना प्रवाह, मध्यें चालणारांना चिखल, आणि मागाहून येणारांना सुकें ठणठणीत वाळवंट याप्रमाणें प्रकार नजरेस येऊं लागला. याप्रमाणें चालतां चालतां मुक्कामा मुक्कामाला सर्वांच्या पुढें जाऊन आपापल्याकरितां चांगल्या जागा अडवून ठेवण्यासाठीं सैन्यांतील लोकांची नेहमीं धांवाधांव होत असे; आपापल्या बरोबरीच्या दर्ज्यांच्या लोकांस लांबलांबून बोलावण्याकरितां ते उंच स्वरानें हाका मारूं लागत, तेव्हां इतर लोक त्यांच्यावर रागावत असत. सेनेंत शांतता झाल्यामुळें धुळीचा लोट नाहींसा झाला असतांही लोक स्वतांसाठीं चौका तयार करण्याकरितां झाडांच्या खालच्या भागांना झाडून साफ करीत तेव्हां फिरून धूळ उडूं लागे. शिपायी आपला पोशाक उतरून ज्या ज्या वृक्षांवर तो अडकवून ठेवीत असत ते ते वृक्ष पामर लोकांनीं मानलेल्या ह्मसोबाप्रमाणें दिसूं लागत. रस्त्याच्या श्रमांनीं आणि उन्हाच्या तापानें तप्त झालेल्या लोकांस कांटेरी वृक्षसुद्धां सुखदायी वाटूं लागले.

ज्या ज्या वृक्षाखालीं हत्तींस बांधीत असत ते ते वृक्ष क्षणार्धांत बदलून दिगंबर लोकांच्या सांप्रदायांत जणों शिरले असावे असे दिसूं लागत. साफ केलेल्या जागांवरील धूळ झाडली असतां ती नाकातोंडांत जाईल या धास्तीनें तोंडावर वस्त्र धरण्याची जरूर पडूं लागल्यामुळें आणि घामानें भिजलेलीं शरीरें आणि वस्त्रें घाणेरडीं होऊन गेल्यामुळें वेदधर्ममार्गी लोकांस सुद्धां क्षणमात्र जैनजतींची दुर्दशा अनुभवावी लागत असे. हत्तींनीं आपल्या मदधारांच्या संसर्गानें मळकट झालेल्या, गंडस्थळें घांसल्यानें खरवडून गेलेल्या, आणि त्याच्या मदाच्या माधुर्याला लंपट झालेल्या मधुकरांच्या गुंजारवांनीं व्याप्त असलेल्या वृक्षांच्या शाखा शंखचक्रादिकांचे ताजे डाम दिलेल्या रामानुजपंथी लोकांच्या भुजदंडाप्रमाणें दिसूं लागल्या. फूत्कार करणारे मस्त हत्ती जणों नष्ट होऊन गेलेल्या वृक्षांस काकबळी टाकण्यासाठीं पाणी उडवीत असावे असे भासूं लागले. ज्या ज्या ठिकाणीं हत्ती बांधीत असत तेथें प्रवासी लोकांस छायेचा दुष्काळच पडत असे. आपल्या कांट्यांस पानांनीं झांकून घेऊन प्रवासी लोकांस फसविणाऱ्या वृक्षांवर जणों क्रोधायमान होऊन उंट त्यांस अस्थिपंजरशेष करून टाकीत असत. चांगल्या चांगल्या लतांकडे न पाहतां कांटेरी लतांमध्यें तोंड घालणारे उंट, कुलीन स्त्रियांचा अनादर करून कुलटांच्या ठिकाणीं आसक्त होणाऱ्या कामी लोकांस दृष्टांताप्रमाणें होत असत. आंगीं वक्रता धरणारे उंट "कांट्यांत तोंड घालून विनाकारण वक्रता धरणारे लोक अशा हाल अपेष्टांसच योग्य होत" असें दाखवीत असावे असें वाटत असे. ओबड धोबड आणि जाडीं गालफडें फिरवणारे, आणि लांब लांब ओठ हालवून हालवून पृथ्वीवर फेंसाचा ढीग पाडणारे उंट, जणों नष्ट करून टाकलेल्या लतांस मंत्रोच्चारपूर्वक पिंडदान देत असावे असें दिसत होतें. बांधलेल्या उंटांचे मजबूत, सडसडीत, आणि उंच उंच पाय आगगाडीच्या

इंजिनांत पाणी भरण्याकरितां बांधलेल्या टाकीचे खांबच होत असे दिसत होते. धुण्याकरितां पाण्यांत उतरविलेल्या कुसुमायुधाच्या घोड्यानें गढळून टाकलेल्या मोठमोठ्या नद्या, जणों हा घोडा ह्मणजे आपला अनौरस पुत्र उच्चैःश्रवा होय असें समजून, त्याचें अंग धुऊन आपला पति जो समुद्र त्याची विशेष प्रीति प्राप्त व्हावी ह्मणून इच्छा करीत असाव्या अशा प्रकारें क्षणार्धांत त्याची सर्व ग्लानि हरण करीत असत. मार्ग चालण्याचा शीण उतरावा ह्मणून जमिनीवर बसविण्यांत येणारे घोडे फिरून एकदम उभे राहून, जणों आपल्यास बिलकूल शीण झालाच नाहीं असें जाणवीत असावे अशा रीतीनें खिंकाळत असत. घोडे, जणों आपल्या खुरांनीं पीडित झालेल्या पृथ्वीची क्षमा मागूं इच्छित असावे अशा रीतीनें खालीं डोकीं करून पृथ्वीला हुंगूं लागले असतां तीवरील उडणारी बारीक धूळ जणों खुश झालेल्या पृथ्वीची रोमावलीच उभी राहिली असावी अशी दिसूं लागली. कित्येक घोडे दुसऱ्या घोड्यांस घोड्या समजून खुंटे उपटून त्यांच्या पाठीमागें धावूं लागले असतां सैन्यांत हाशा पिकून मोठा गोंगाट होत असे. तोंडावर बांधलेल्या काळ्या चामड्याच्या तोबऱ्यांत लगाम चावीत असलेले शुभ्र घोडे, राहूनें कित्येक आंगळें ग्रासलेल्या चंद्रबिंबासारखे दिसत होते. सैनिकांच्या उतरण्याच्या जागेची व्यवस्था होण्याच्या अगोदरच, योग्य ठिकाणीं बाजार भरून गेल्यामुळें शहरासारखी शोभा दिसत होती. सर्व जण नदीवर स्नान करून उतरण्याच्या जागीं येऊन, भोजन उरकून घेऊन, नेमलेल्या आपापल्या कामांत प्रत्येक जण तत्पर राहत असत. आणि कुसुमायुध शरदृतूच्या मेघाप्रमाणें तंबूमध्यें येऊन पथ्यकर भोजन मंत्र्यांच्या समुदायाबरोबर त्या त्या प्रसंगाला उचित अशा गोष्टी बोलत, जेवीत असे आणि मातापितरांच्या कृपेचें स्मरण करून रोमांचित होत होत रमणीय पलंगावर निद्रासुख घेत असे.

याप्रमाणें ठिकठिकाणीं मुक्काम करीत, सैन्याच्या भारानें पृथ्वीला हलवून सोडीत, निर्जल स्थलीं जलाशयादिक बांधण्याची योजना करीत, फार किर्र जंगलाला कापून टाकीत, मोठ्या नद्यांवर पूल बांधीत, वांकड्या तिकड्या खडबडीत रस्त्यांवर सुंदर सडका बांधून देत, वृक्षरहित प्रदेशीं वृक्ष लावीत, प्रजेची प्रीति पूर्णपणें मिळवीत, महात्म्यांचा सत्कार करीत, देवतांचें आराधन करीत, विद्वानांस आश्रय देत, नीच लोकांचा उच्छेद करीत, त्या त्या स्थळीं आपल्या आगमनाच्या खाणाखुणा ठिकठिकाणीं ठेवून जात, दुःखितांचे दुःख हरण करीत, धन आणि कीर्ति संपादित, आणि अनाथलोकांच्या रक्षणाची तजवीज करून देत, कुसुमायुध अनेक देश हिंडला. ज्या ज्या दिशांस गेला त्या त्या ठिकाणीं राजे नम्र होऊन त्यास भेटी अर्पण करूं लागले, आज्ञा शिरसा मान्य करूं लागले, साहाय्यासाठीं सैन्य देण्याची विज्ञाप्ति करूं लागले, आणि धाकट्या भावाप्रमाणें वर्तूं लागले. कुसुमायुधाची दृष्टि ज्या ज्या ठिकाणीं पडे तेथें तेथें सर्व लोक प्रणाम करीत असलेले दिसत. धन, रत्न, आणि वहनें यांच्या भेटी प्राप्त होऊं लागल्या. ताब्यांतील सैन्याची वृद्धि झालेलीच आढळून येऊं लागली. शत्रुजिताची आज्ञा अखंड पसरलेली दिसूं लागली आणि लोकांच्या प्रीतीला भरती आलेली दिसून आली. कुसुमायुधाचा उदयरूपी पूर वृद्धि पावला असतां शत्रु वेतस वृक्षांची वृत्ति स्वीकारून आपला बचाव करून घेऊं लागले. अनीति साधारण लतेप्रमाणें उफळून वाहून जाऊं लागली. मित्रत्वांतील राजांची संमृद्धि मोठमोठ्या शिलांप्रमाणें स्थिर होऊं लागली. शत्रूंचे अभिमान किनाऱ्याप्रमाणें तुटून जाऊं लागले आणि न्यायमार्गानें चालणारे लोक पुलावरून चालणाऱ्यांप्रमाणें निश्चिंत वावरूं लागले. त्याचा प्रताप अग्निसमान असतांही सज्जनांच्या हृदयास शांत करूं लागला, शत्रूंच्या स्त्रियांच्या नेत्रांस ओलसर करूं लागला, समुद्र उल्लंघन करून द्विपांतरासही जाऊं

लागला, मित्रांच्या आशारूप लतांस सफळ करूं लागला, आणि कीर्तिरूप भागीरथीप्रवाहामुळें वृद्धि पावूं लागला. त्याची कीर्ति सदाशिवाला सगळ्या पर्वतांमध्यें कैलासाची, इंद्राला सगळ्याही हत्तींमध्यें ऐरावताची, विष्णूला सगळ्या समुद्रांत क्षीरसागराची, ब्रह्माला सगळ्या पक्ष्यांमध्यें हंसाची, आणि पाताळवासी लोकांस सगळ्याही नागांत शेषनागाची भ्रांति देऊं लागली.

कुसुमायुधानें सर्व दिशांच्या ठायीं दिग्पालदेवतांचींच नगरें जिंकल्यावांचून ठेविलीं, समुद्रच प्रतिगर्जना करणारे असतांही त्यांस सोडलें, पर्वतच अगम्य असे राहून गेले, दिग्गजच मदोन्मत्त राहिले, युवतींचे स्तनच कठोर राहिले, कामदेवच स्वतंत्र शक्ति धरून राहिला, समुद्राच्या आंतील रत्नेंच मिळवण्यावांचून राहून गेलीं, आरशांतील प्रतिबिंबेंच तोंडास तोंड देऊन राहिलीं, कामिनींच्या भृकुटीच वक्र राहिल्या, पशुच हात जोडल्यावांचून उरले, पक्षी स्वच्छंदाचरणी राहिले आणि वृक्षांचे कंटकच उपटून टाकण्यावांचून राहिले.

कुसुमायुधानें याप्रमाणें दिग्विजय करण्याचें काम समाप्त करून, ज्याप्रमाणें योगी इंद्रियांस जिंकून घेण्याचें काम समाप्त करून ब्रह्मविद्येकडे वळतो तसा तो पित्याच्या राजधानीस येण्यास निघाला.



# प्रकरण १९ वें.

## विवाहविचार.

कुसुमायुध दिग्विजय करून सैन्यासहवर्तमान राजधानीजवळ येतांच शत्रुजित्राजानें मोठी धामधूम करून सामोरे जाण्याची तयारी केली. घरोघर आनंदचआनंद मातला. सगळी प्रजा युवराजाचें मुख पहाण्याला उत्कंठित झाली. शहर शृंगारण्यांत आलें. राजमार्गावर सुगंधि पाण्याचे सडे घालण्यांत आले. स्वारीचा समारंभ पाहण्यासाठीं रस्त्यामध्यें मनुष्यांची भारी गर्दी जमली. स्वारी शहरांत शिरतांच मंदिरांच्या माड्यांवर उभ्या राहिलेल्या स्त्रिया पुष्पें आणि कटाक्ष यांहींकरून आदरबुद्धि दर्शवूं लागल्या. खिडक्यांच्या जाळींतून पाहात उभ्या राहणाऱ्या स्त्रियांच्या अंतःकरणाला कामदेव आपल्या बाणांनीं विंधून सच्छिद्र करून टाकूं लागला. सौधतलावर उभ्या राहून पाहूं लागणाऱ्या स्त्रिया युवराजाच्या चित्ताला बाण मारण्याविषयीं कामदेवाची प्रार्थना करूं लागल्या. राजमार्गांत पाहण्यासाठीं उभ्या राहिलेल्या स्त्रिया जणों उंचावरून त्याच्या मुखाचें बरोबर अवलोकन करितां यावें ह्मणून कामदेवरूपी हत्तीवर चढूं लागल्या. कित्येक स्त्रिया कुसुमायुधाच्या आंगावरून खालीं पडणाऱ्या पुष्पांचा स्पर्श मिळाल्यामुळें स्वतांचा उद्योग सफळ झाला असें मानूं लागल्या. नितंबावर डावा हात ठेवून उभ्या राहिलेल्या कित्येक स्त्रिया जणों कामदेवासाठीं धनुष्यें तयार करून उभीं ठेविलीं असावीं अशा दिसूं लागल्या. सुटलेले केशपाश दोनही हातांनीं बांधूं लागलेल्या स्त्रिया जणों स्तनरूपी भाल्यांनीं युवराजाला विंधून टाकूं पाहात असाव्या असें वाटूं

लागलें. कित्येक स्त्रिया त्याची दृष्टि आपल्याकडे आकर्षण केली जावी या हेतूनें जाणून बुजून हातांतील कांकणांना शब्दायमान करूं लागल्या. कित्येक जणी आपल्यावर सहजगतीनें त्याची दृष्टि पडली असतांही स्वतःच्या चातुर्याला वाखाणूं लागल्या. कांहीं जणी चातुर्यानें त्याच्याकडे पाहण्यांत गुंतलेल्या सखींचे अभिप्राय हास्यवचनांनीं उघडकीस आणूं लागल्या. सर्व लोकांचे डोळे जसे पौर्णिमेच्या चंद्राकडे पाहून आल्हादित होतात त्याचप्रमाणें त्याचें मुख पाहून आल्हादित होऊं लागले. आणि दैत्यास जिंकून जयंताच्या आगमनानें अमरावतीमध्यें जसा उत्सवसमारंभ माजावा तसा दिग्विजय करून कुसुमायुधाच्या परत येण्यानें काशीमध्यें मोठी उत्सवाची गर्दी उडाली.

सर्वांस यथायोग्य मान देत देत आणि नगरच्या स्त्रियांच्या कटाक्षरूपी जाळ्यांचीं बंधनें तोडीत तोडीत, कुसुमायुध पित्याच्या दरबारांत प्राप्त झाला. तेथें आल्यावर हत्तीस बसवून अंबारींतून खालीं उतरला आणि मंत्र्यांसहित पित्याजवळ जाऊन त्यानें त्यास प्रणाम केला. शत्रुजितानें आपल्या हातांनीं त्याला ओढून छातीशीं वट्ट आवळून आलिंगन दिलें, आणि आपल्या शेजारीं बसवून प्रवासांत रस्त्याच्या धुळीनें मळकट झालेलें त्याचें आंग रुमालानें झाडीत झाडीत आणि आनंदाच्या आश्रूंनीं भिजवून टाकीत दिग्विजयाची सारी हकीगत तो विचारूं लागला. जरी वरचेवर नेहमीं पत्रें आणि जासूद येत जात असल्याकारणानें दिग्विजयासंबंधी बहुतेक हकीगत या पूर्वींच समजत आली होती तरी पण पोपटाच्या तोंडांतून पडलेले उच्छिष्टही फळ जसें विशेष रुचकर वाटतें त्याचप्रमाणें कुमाराच्या तोंडून निघणारी तीच हकीगत फिरून ऐकत असतां शत्रुजिताला अननुभूतपूर्व आनंद वाटूं लागला. यानंतर पित्याजवळून उठून कुसुमायुध

मनोरमेच्या आवासगृहांत गेला. तेथें सगळ्या दासी जणों फार दिवसांच्या उपवासी असल्याकारणानें निमेषव्यापार करण्याला अगदीं अशक्त होऊन गेल्या असाव्या अशा प्रकारें आपल्या डोळ्यांनीं टक लावून त्याच्या मुखाचें अवलोकन करूं लागल्या. त्यास पायऱ्यांवरून चढत येतांना पाहून, ज्याप्रमाणें चंद्राला आकाशांत चढतांना पाहून समुद्राची भरती सामोरी येते त्याचप्रमाणें मनोरमेनें सामोरी येऊन त्याचें मुख पाहिलें. ज्याप्रमाणें कमलिनीच्या पत्रांतून जळाचे बिंदु पडावे तसे मनोरमेच्या नेत्रांतून हर्षाचे बिंदु गळूं लागले. कुसुमायुधानें पूर्णभक्तीनें मस्तक लववून मनोरमेच्या चरणीं प्रणिपात केला. त्याबरोबर तिनें बोटांचीं पेरें मोडतील अशा प्रकारें त्याजवरून लिंबलोण उतरलें. कुसुमायुधाच्या स्फटिकासारख्या स्वच्छ कपोलाचें चुंबन घेतांना त्यांत प्रतिबिंबित झालेल्या मनोरमेच्या मुखानेंही मनोरमेच्या मुखाचें चुंबन घेतलें. परस्परांच्या गोष्टी चालल्या असतां मायलेकांच्या दंतप्रभेनेंही सखींच्याप्रमाणें परस्पराच्या आलिंगनाचें सुख अनुभविलें. मायलेकांच्या अपार ममतेच्या गोष्टींच्या संयोगानें स्निग्ध होऊन गेल्याकारणानें फार वेळ सुद्धां, आणखी लवकर लवकर चालण्याची शक्ति असावी अशाप्रकारें लवकरच निवून गेला. पुत्राच्या शरीरांत तारुण्यानें प्रवेश केलेला पाहून मातेचें मन जणों योग्य राजकन्येचा शोध करण्याच्या मिषानें दिग्विजय करून पुत्रानें वश्य केलेल्या सगळ्या राज्यांचें अवलोकन करण्याची इच्छा धरीत असावें अशा प्रकारें त्या त्या स्थळीं फिरूं लागलें.

दिग्विजयाचा इत्थंभूत वृत्तांत मातेस ऐकविल्यावर कुसुमायुध जाण्याची आज्ञा मागूं लागला असतां मनोरमेनें त्यास तेथें राहवून घेऊन आपल्या मंदिरांतच त्यास जेवावयास घातलें. जननीच्या हातानें वाढलेले पदार्थ स्वादिष्टाहूनही अधिक स्वादिष्ट त्यास लागले. अ[illegible] प्रकारें

भोजन उरकल्यावर तो आपल्या महालांत गेला आणि एक दिवस विश्रांति घेऊन दुसऱ्याच दिवसापासून यौवराज्याच्या अधिकाराचीं राज्यकारणी कामें पूर्वीप्रमाणें पाहूं लागला. पुत्रवधूचें मुख पाहण्याला उत्कंठित झालेल्या मनोरमेनें एक दिवस एकांतांत शत्रुजिताजवळ गोष्ट काढिली कीं, " महाराज, आपले सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत पण माझा आतांपर्यंत पुत्रवधूचें मुख पाहण्याचा मनोरथ अपूर्ण राहिला आहे, तो आपल्या कृपेनें आतां परिपूर्ण झाला पाहिजे. कुसुमायुध जसा विद्येनें, कलांनीं, आणि कीर्तीनें अलंकृत झाला आहे त्याचप्रमाणें हल्लीं तो तारुण्यानेंही शोभत आहे. जणों कामदेवाच्या राज्यारंभाची इंद्रनील मणिमय छडी होय, प्रदीप्त होऊं लागलेल्या कामाग्नीच्या धुराची रेखाच होय, यौवनरूप वर्षाकाळची काळी कुळकुळीत मेघावलीच होय, आणि मनांत न मावणाऱ्या तामस मदनविकाराच्या अंधकाराची जरा जरा बाहेर दिसूं लागलेली श्रेणीच होय, अशी कुसुमायुधाची रोमराजि (मिसरूट) आपल्यास त्याचा विवाह लवकरच करून देण्याची आज्ञा करीत आहे. बाल्यावस्थेंत लग्न केल्यानें स्त्री पुरुषांचीं शरीरें अशक्त होतात, शक्तीबरोबरच आयुष्यही हीन होतें, जी संतति होते तीही प्रौढ माणसांची नव्हे तर मुलांची प्रजा असल्याकारणानें शक्तीहीन आणि रोगग्रस्त अशीच होते. दुर्बळ आणि रोगग्रस्त मनुष्यांच्या हातून कोणताही पुरुषार्थ होऊं शकत नाहीं असें आपण प्रत्येक वेळीं मला सांगत आलां आणि वैद्यशास्त्र व धर्मशास्त्र यांचें जें कांहीं अवलोकन मला झालें आहे त्यावरूनही या बाबतींत माझी खात्री झाली आहे. याच कारणास्तव आजमितीपर्यंत मीं आपल्याला पुत्राचा विवाह करण्याची विज्ञप्ति केली नव्हती आणि स्त्रीस्वभावामुळें होणारी वधुमुख पाहाण्याची उत्कंठा मनांतले मनांतच दाबून ठेविली होती. बालविवाह करण्यानें विद्यांचा किंवा कलांचा व्हावा तसा अभ्यास करतां येत नाहीं,

भावी दंपतीचे स्वभाव परस्परांस मिळते येत नाहींत, परस्पराविषयीं अभिरुचि नसतां लाविलेला जोडप्यांचा विवाह त्यांच्यावर एक प्रकारची वेठ लादल्याप्रमाणें होतो, पुरुषास स्त्री आवडत नाहीं आणि स्त्रीस पुरुष आवडत नाहीं, विवाहाच्या समयीं मंत्रोच्चारपूर्वक परस्परांशीं जे करार होतात त्यांचें तत्व समजलें नसल्याकारणानें ते करार पुरोहित लोकांच्या तोंडांतच राहून जातात, आवडीशिवाय केवळ व्यवहाराच्या आणि वडील माणसांच्या दाबाला अनुसरून करण्यांत येणाऱ्या संबंधानें गृहसौख्य मिळावें तसें न मिळतां जी संतति होते तीही खराबच होते. या सर्व कारणांचे परिणाम सर्व प्रकारें वाईटच होतात, म्हणून या सर्व गोष्टी मनांत आणून धर्मशास्त्राच्या आणि वैद्यकशास्त्राच्या कर्त्यांनीं जगाचें हित करण्याच्या उद्देशानें पुरुषांस पंचवीस वर्षांची आणि स्त्रियांस ऋतु प्राप्त होण्याच्या समयाची लग्नाची जी मर्यादा करून ठेविली आहे तेथपर्यंत कुसुमायुधाची मजल येऊन ठेपली आहे आणि त्याप्रमाणें कित्येक राजांच्या कन्याही त्या मर्यादेला येऊन पोंचल्या असतील. पुष्कळ राजांच्या घरीं उपवर मुली आहेत; तरी, धर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, जें कुळ क्रियाहीन, ज्यांत पुत्रांची उत्पत्ति नाहीं, विद्याभ्यास करण्याची रूढि नाहीं, अर्श, क्षय, अपस्मार, कोड, अथवा दुसरे कोणतेही रोग वास करितात, त्या कुळांतील कन्या करूं नये. तसेंच जी मुलगी कपिलवर्णाची, न्यूनाधिक शरीरावयवाची, रोगट, कमी केसांची, त्याचप्रमाणें अतिशय केसाळ, तोंडाळ अथवा तोतरी, पिंगट वर्णाची व अभद्र नांवाची, अशा मुलीशींही लग्न लावूं नये. कुळ निर्दोष आणि कन्याही निर्दोष शोधून काढण्याची तजवीज करणें हें आपलें काम आहे. वैद्यक शास्त्रांतही सांगितलें आहे कीं, प्रवाहिक नावाचा रोग शिवाय करून बाकी सर्व रोग संचारी आहेत. या वचनाचा धर्मशास्त्राच्या वचनाशीं पुरा मेळ आहे. 'धर्मशास्त्राच्या आज्ञा शिरसा मान्य कराव्या. परंतु त्याच्या

कारणांचा शोध लावीत बसूं नये' असें जें पुरातन मत आहे तें अल्पविचारी आणि उद्धटपणानें वागणाऱ्या लोकांवर अंकुश ठेवण्याला ठीक आहे, पण गंभीरपणें आणि सूक्ष्म बुद्धीनें पाहिलें असतां धर्मशास्त्राच्या बहुतेक आज्ञा मनुष्यांस केवळ परलोकच्या सुखासाठींच केलेल्या नव्हत; तर या लोकींच्या आरोग्यादि सुखांसाठींही केल्या आहेत असें मानिलें असतां चूक नाहीं. एवढी प्रस्तावना करण्यामध्यें मला सांगावयाचें ह्मणून एवढेंच कीं, केवळ मुलगी निर्दोष कुलींची आणि निर्दोष शरीरावयवाची असावी, एवढेंच नव्हे पण त्याबरोबर रूपवती, कोमलांगी, आणि विद्या वगैरे सद्‌गुणांनीं युक्त अशी शोधून काढण्याची तजवीज झाली पाहिजे. ह्मणून मी ह्मणतें आपल्याकडून कन्येचा शोध करण्याकरितां विश्वासु ब्राह्मण, मंत्री, आणि दासी यांस निरनिराळ्या राज्यांत पाठवावें. जरी पुष्कळ राजांकडून कुसुमायुधाला मुली सांगून आल्या आहेत आणि कन्येबरोबर पुष्कळ पुष्कळ हुंडा देऊं ह्मणून विज्ञप्ति आलेल्या आहेत तरी आज मितीपर्यंत मी एकाही विज्ञप्तीकडे लक्ष दिलें नाहीं. कुसुमायुधाला त्याच्या सारखीच वधू मिळावी असा माझा फार मनोरथ आहे. जर कांहीं अडचण नसेल तर आपण हा माझा मनोरथ पूर्ण करण्याची तजवीज करावी."

"प्रिये! तुह्मी जें सांगत आहां तें विचारणीय आणि समयोचित आहे. तथापि कुसुमायुधाची जन्मपत्रिका करणाऱ्या विद्वान जोतिषांनीं माझ्यापाशीं जें भाकीत सांगितलें आहे व ज्या संबंधानें मी तुह्मापाशीं ही गोष्ट बोललों आहें त्याची वाट पाहत आहें. आणखी या कारणास अनुसरूनच कन्येच्या शोधास्तव मी विशेष खटपट करीत नाहीं. तसेंच राजांकडून येणाऱ्या सांगीकडेही फारसें लक्ष्य देत नाहीं. दैवयोगानें जसें घडून येईल तसें आपल्या प्रयत्नांनींही व्हावयाचें नाहीं. प्रस्तुत वर्षाऋतु सुरू होण्याचा वेळ आहे. वर्षाऋतूंत लग्नासारख्या मांगलिक कृत्यांची खटपट

करण्याविषयीं शास्त्रानें निषेध केला आहे. दोन महिन्यांनंतर जसें योग्य दिसेल व तुमची सल्ला मिळेल तसें करूं."

याप्रमाणें गोष्टी झाल्यावर राजानें मनोरमेच्या मनाला आश्वासन देऊन शांत केलें. नंतर तो सभेस गेला आणि जीं जीं कामें कुसुमायुधाबरोबर करावयाचीं होतीं तीं व दुसरीं कित्येक करूं लागला.



# प्रकरण २० वें.

## वर्षा.

थोड्या दिवसांत वर्षाऋतु प्राप्त झाला. आकाशांत हत्तींच्या यूथांप्रमाणें मेघांचे संघ इकडे तिकडे फिरत असलेले दिसूं लागले. कदंब आणि मालती वगैरे पुष्पांनीं सुवासिक झालेला वायु वाहूं लागला. मेघांची गर्जना ऐकून आनंद पावलेले मयूर टाहो फोडून निरनिराळ्या कला दाखवीत नाचूं लागले. विरही लोकांचीं हृदयें शिवाय करून इतरत्र शीतलता पसरली; अंधकाराच्या निबिडतेमुळें सर्व दिशा तोकड्या होऊन गेल्या; आकाश जणों पावसाच्या थंडीनें व्याकुळ होऊन विजेच्या अग्नीनें आपल्या शरीराला शेकून गरम करीत आहे असें भासूं लागलें; मेघ जणों विजेच्या चमकाटाच्या रूपानें, चाबुकाच्या प्रहारांनीं घाबरून गेले आहेत अशा प्रकारें आरोळ्या देऊं लागले; मेघांची गर्जना जणों मानवतींस मान सोडून देण्याची सूचना देण्यासाठीं कामदेवाच्या तर्फेनेंही जणों दवंडीच पिटविण्यांत येत आहे अशी वाटूं लागली. पावसाच्या धारा जणों पृथ्वींत असलेल्या उष्णतेवर बरच्याच भोंसकीत असाव्या अशा दिसूं लागल्या; मेघमालेनें ग्रासलेला सूर्य जणों पावसाच्या थंड वाऱ्यापासून रक्षण करण्यासाठीं काळी लोकरीची घावळी पांघरून बसला असावा असा दिसूं लागला; काळ्या मेघमालेमध्यें झांकून गेलेला चंद्रमा आकाशांत फिरत असतां, जणों अंधकाररूपी पासोडी पांघरून मानवती स्त्रियांच्या माजूरीपणाचें अवलोकन करण्यास निघाला असावा असा दिसूं लागला; जलधारांचा वर्षाव करणारी मेघमाला जणों आपली उज्वलता निघून जाऊन मलिनता प्राप्त झाल्याकारणानें खेद पावून अश्रुधारा

टाकीत असावी अशी भासूं लागली. केव्हां पांढऱ्या दिसणाऱ्या ढगांचे तुकडे जणों आकाशानें, विजेच्या प्रहारांनीं जखमी झालेल्या आपल्या अवयवांवर पटे बांधले असावे असे दिसूं लागले. चमकणाऱ्या विजा जणों वर्षाकाळीं विरही लोकांचा वध करण्यासाठीं मेघमालारूप डांबलेल्या तोफांच्या कान्यांतून पेटलेल्या दारूच्या ज्वाळा बाहेर निघत असाव्या अशा दिसूं लागल्या. मेघमालेच्या तोंडांतून मधुर होऊन निघणारें समुद्राचें पाणी, कवीच्या मुखांतून मधुर होऊन निघणाऱ्या युद्धादिकाच्या हकीगतीला उत्तम दृष्टांत होऊं लागलें. विरही लोकांस वर्षाऋतूचे दिवस, मुंबईहून निघालेल्या ट्रेनीला जबलपूरच्या मैलांप्रमाणें, मुसलमान लोकांस रोजा महिन्याच्या दिवसांप्रमाणें, जैन लोकांस पजोसणाच्या दिवसांप्रमाणें आणि घामानें घाण येऊं लागलेल्या कपड्यानें ढुंढिया साधूंना उन्हाळ्याच्या दिवसांप्रमाणें लांब लांब होऊन कंटाळवाणे वाटूं लागले. आणि मेघमालेचा गडगडाट जणों थंडीच्या प्रभावानें निद्रावश झालेल्या कामी जनांस जागें करण्यासाठीं कामदेवाच्या नौबदीचा ध्वनि होत असावा असा भासूं लागला. जळाच्या धारा विरही लोकांच्या अश्रुधारांबरोबरच गळूं लागल्या. नद्यांचे पूर कामव्यथेबरोबर प्रबळ होऊं लागले. केवड्याचीं कणसें मदनाच्या विकाराबरोबर प्रफुल्लित होऊं लागलीं. कदंब वृक्षांवरून आलेला वायु विरही लोकांच्या उन्हुन उन्हुन निःश्वासांबरोबर पसरूं लागला. जवस विरही लोकांच्या शरीरांबरोबरच सुकूं लागला. चिखल मूर्च्छेबरोबर गोठूं लागला, आणि अंकुर रोमांचाबरोबर उत्पन्न होऊं लागले. नव्या चाऱ्यानें आच्छादिलेले माळ हींच जणों हिरवीं लुगडीं त्यांस परिधान करणारी आणि तांबड्या किड्यांनीं रंगलेली पृथ्वी आर्तव शोभेला प्राप्त झालेल्या तरुण स्त्रीप्रमाणें दिसूं लागली. जलधारा हेच ज्याचे निर्मळ बाण, इंद्रधनुष्य हेंच ज्याचें धनुष्य, मेघाचें आडंबर हेंच ज्याचें चिलखत आणि विजा ह्याच ज्याच्या चंचल तलवारी

असें आकाश जणों लढाई करण्याला सज्ज झालें असावें असें दिसूं लागलें. वारंवार विजा जणों कामदेवाचे बाण घांसून धार देण्यासाठीं चालू केलेल्या सहाणेवरून ठिणग्यांची पंक्तिच उडत असावी अशा दिसूं लागल्या. अस्थिर आणि अनेक रंगांचें इंद्रधनुष्य योग्य शिक्षण न पावलेल्या राजांच्या चित्ताच्या लीलांचें अनुकरण करूं लागलें. तारुण्य वर्षाऋतुला प्राप्त झालें, परंतु रजस्वलापण केतकीला आलें; विरही लोकांचा वध करण्याचें कामदेवानें सुरू केलें, परंतु कैदेची शिक्षा सूर्य आणि चंद्र यांस प्राप्त झाली; रजस्वलापण केतकीस प्राप्त झालें परंतु अस्पृश्य नद्या झाल्या; नाच विजा करूं लागल्या पण धर्मबिंदु विरहिणींस येऊं लागले; गर्जना मेघ करूं लागले, परंतु स्वरभंग युवतींच्या प्रार्थना करणाऱ्या कामीं पुरुषांचा होऊं लागला. नवीन नवीन रागाचे चमत्कारिक आलाफ कोकिला काढूं लागल्या पण चित्रविचित्र रंगांचे पोशाख चिमण्यांना मिळूं लागले. आणि व्यभिचार विजा करूं लागल्या पण गर्भधारण दिशांस झालें. जणों पर्जन्यरूपी राक्षसानें विरही लोकांस भक्षण करून त्याच्या हाडांच्या माळा आंगावर घातल्या असाव्या अशा बगळ्यांच्या पंक्ति आकाशांत दिसूं लागल्या. मेघमाला जणों कर्दमाचा पसारा पाहून आपले पाय बसरतील अशी धास्ती धरूनच किं काय ती पृथ्वीवर न उतरतां पर्वतांच्या शिखरांवर विश्राम घेत असलेली दिसूं लागली. विष्णु क्षीरसागरांमध्यें निजून राहत असतां बापाच्या घरीं, पतिसंनिध असल्यामुळें लाजून, विष्णूचें वक्षस्थळ सोडून देऊन आणि नेहमींचें राहण्याचें ठिकाण जीं कमळें तीं पाण्यांत बुडून गेल्यामुळें त्यासही सोडून देऊन, लक्ष्मी चहूंकडे फिरूं लागली असावी असें पर्वतांवर, अरण्यांमध्यें, वृक्षांवर, लतांवर, मेघांमध्यें आणि गांवच्या शिंवेवर तिचा संचार आढळूं लागला. अनेक प्रकारच्या वनस्पतींनीं, औ-

षधींनीं, आणि गवतांनीं, जळाच्या प्रवाहांनीं झांकून गेलेले रस्ते, पाखंडानें झांकून गेलेल्या वेदमार्गाप्रमाणें शोधनाला पात्र झाले. गर्जना करणाऱ्या जलधारांचा वर्षाव करणाऱ्या आणि अपरंपार दिसणाऱ्या मेघांनीं झांकून टाकिला असतांही त्या सर्वांस प्रकाश देणारा सूर्य निरनिराळ्या विक्रियांस पात्र झालेल्या आणि अपरंपार दिसणाऱ्या अन्नमय आदि पंच कोशांनीं व्याप्त असतांही त्यांस स्फुरण देणाऱ्या आत्म्याप्रमाणें वागवूं लागला. कांहीं स्थळीं हिरव्यागार चाऱ्यांनीं शोभणारीं, कांहीं ठिकाणीं सूर्यकिरणांच्या संपर्कामुळेंच चळकणाऱ्या धातूंनीं दिपवणारीं, कांहीं स्थळीं चित्रविचित्र रंगांच्या पुष्पांनीं वेढलेल्या अरण्यांतील वृक्षांनीं शृंगारलेलीं, खालच्या भागीं उगवलेल्या वृक्षांनीं जणों खांद्यावर घेतलीं असावीं अशीं दिसणारीं, आणि एकावर एक लागून गेलेलीं पर्वतांचीं चढतीं शिखरें, मुसलमान लोकांनीं थंडे करण्यासाठीं नेत असलेल्या ताबुतांप्रमाणें दिसूं लागलीं. तुफानी वायूच्या झपाट्यानें आकाशपर्यंत उसळणारा समुद्र, जणों आपणापासून मिळविलेल्या जळसमृद्धीचा उपयोग अयोग्य स्थळीं सुद्धां करूं निघालेल्या मेघांस आपल्या लाटांच्या तडाक्यांनीं मारायाला उठला असावा असा दिसूं लागला. जणों हत्तीसारख्या ढगांच्या गर्जनेनें बिचकूं लागलेले आणि मेघांच्या अंधकारानें उधळूं लागलेले घोडे वारंवार अडखळून अडखळून उभे राहिल्याकारणानें सूर्याच्या रथाला चालतांना विलंब होत. असावा असें, दिवसाचें मान मोठें झालें असल्यावरून, वाटूं लागलें. चहूंकडे फैलावलेल्या गवताचे माळ जणों मेघांतून पडणारें पाणी गाळून घेण्यासाठीं पृथ्वीनें हिरवें वस्त्रच आथरून ठेविलें असावें असे दिसूं लागले. आपला कर्णकठोर शब्द लोकांस अरुचि उत्पन्न करण्यास कारण होईल याचें यत्किंचितही भान न राखतां एकसारखा किर्र आवाज करणारे राळकिडे आणि बेडूक,

अशुद्ध व असंबद्ध भाषेची कविता गाऊन कंटाळा आणणारे, चारण लोकांची प्रचिती देऊं लागले. चिंतेनें दुर्बळ आणि रोडक्या झालेल्या विरहिणी स्त्रियांस मारण्यासाठीं अंधकाररूप मोठ्या फौजेनिशी चारी दिशांना घेरा देणारा आणि विजांच्या रूपानें जळणाऱ्या जोतींनीं युक्त अशा मेघरूपी मोठमोठ्या तोफांस आणून उभ्या करणारा वर्षाकाळ, ससांची शिकार करण्यासाठीं मोठा घेरा घालणारे आणि तोफा ओढून नेवविणारें मूर्ख राजकुमारांप्रमाणें दिसूं लागला. वीज थोडा वेळ सुद्धां हजर नसेल तर हाका मारणारा मेघ, स्त्रीचें ठायीं अत्यंत आसक्ति धरणाऱ्या विव्हळ कामी पुरुषाप्रमाणें दिसूं लागला. कठीण टेपाडांस सुद्धां दातांनीं खुडून खुडून तृणरहित करून टाकणारे रानटी पशु, चेल्यांच्या डोक्यावरील केंस उपटूं लागलेल्या जैनजतीप्रमाणें दिसूं लागले. चातक पक्ष्यांनीं पाण्याचे दोन चार बिंदु मागितले असतां अपार पाण्याचा वर्षाव करूं लागलेले मेघ, औदार्याची आणि दयेची जणों पराकाष्ठा करून सोडीत आहेत असे दिसूं लागले. जगाला पुष्टि देण्याऱ्या पर्जन्याच्या जळानें सुद्धां सुकून जाणाऱ्या, मोठा प्रकाश करून सोडणाऱ्या विजांनीं सुद्धां अंधकारमय होऊन गेलेल्या शीतळ वायूनेंही तळमळ पावणाऱ्या, कोकिलांच्या मधुर स्वरानेंही कर्णशूळाचें दुःख अनुभवणाऱ्या, कोमळ पल्लवांनीं सुद्धां विंधून जाणाऱ्या, आणि अंधकारानें सुद्धां पांडुवर्ण होणाऱ्या विरहिणी स्त्रिया, अवदशेच्या समयीं अनुकूळ वस्तुही प्रतिकूळ होतात याची प्रतीति घेऊन ठेवूं लागल्या. रात्र आणि दिवस हीं एकमेकांचीं तोंडेंही पाहात नसतांही जणों वर्षाकाळच्या प्रभावानें कामातुर होऊन संयुक्त झालीं असावीं अशीं दिसूं लागलीं. रात्र आणि दिवस तसेंच पूर्व आणि पश्चिम यांचें अद्वैत जें कधींही सिद्ध करून दाखवितां यावयाचें नाहीं त्याचीही प्रतीति अनुभवास आणून दिल्याकारणानें वर्षाकाळ एखाद्या मोठ्या अद्वैत वाद्याप्रमाणें वाटूं लागला. ताऱ्यांस कैद करून काजव्यांस प्रकाशित

करणारा, प्रकाशाला नष्ट करून अंधकाराचा उदय करणारा, हंसाला हद्दपार करून बगळ्यास आनंद देणारा, कमळवनास बुडवून नीलोत्पलाला प्रफुल्लित करणारा, विष्णूला निजवून कामदेवाला जागृत करणारा आणि सरळ रस्ता सोडून वेडावाकडा रस्ता धरण्याची जरूर पाडणारा, वर्षाऋतु अविवेकी राजाच्या राज्यनीतीच्या मार्गाप्रमाणें दिसूं लागला. वर्षाकाळ हा कामदेवाचें जीवित, उष्णतेचा अंतकाळ, मानवतींच्या मानज्वराला महाज्वरांकुश, विजांस नृत्यविद्येचा आचार्य, इंद्रगोप नांवाच्या तांबड्या किड्यांचा प्रजापति, भ्रमरांचा गाण्याचा वस्ताद, केतकीचा महोत्सव, वृक्षांचा वाजीकरणयोग, विरही लोकांच्या जीवनाचा अभिचारप्रयोग, चंद्रिकेला संन्निपातज्वर, अंधकाराला पौष्टिकप्रयोग, राळ किड्यांच्या स्वरभंगाला निदिग्धिकावलेह, इंद्राच्या धनुष्याचा कारागीर, आकाशाला अजीर्णविकार, मेघांच्या कुस्तीचा हेमंतकाळ, सूर्यप्रकाशाचा पैत्तिक पांडुरोग, चातकांच्या तृषारोगाची दिव्य चिकित्सा, कामी लोकांच्या प्रवासाचा अपशकुन, मालतीचा यौवनविलास, नद्यांचा उन्मादरोग, कमळांचा कल्पांत, दिशांची अद्वैतविद्या, तारामंडळाचा तुरुंग, ग्रीष्मऋतूचें वार्षिकश्राद्ध, अभिसारिकांची गुटिकाविद्या, समुद्राचा अपस्मार रोग, वायूचा शीतांग सन्निपात, बेडकांना प्रलापक संन्निपात, प्रवाशांचा ध्यानकाळ, आणि कोकिलांच्या कंठांतील कफाला दूर करण्यासाठीं जांभुळाचा मधुर रस पाजण्याची अपूर्व चिकित्सा करणारा, महावैद्य आहे. तो प्राप्त झाला असतां मयूरांचा समाधिभंग झाला; मेघांचीं उदरें आध्मान रोगानें पीडित झालेल्याप्रमाणें गडगडाट करूं लागलीं; गर्जना आणि विजांचा चकचकाट यांनीं भय पावणाऱ्या युवति कामी लोकांस स्वयंग्रह आलिंगनानें सुख देऊं लागल्या; भ्रमर पुष्पांचें मकरंदरूप रसायन मिळाल्यानें आनंद पावूं लागले; केवडे जणों आपल्यास प्रफुल्लित करणाऱ्या मे-

घांच्या आंगावर विजेच्या स्पर्शानें उठलेल्या फोडांवर बरे होण्याचें चूर्ण फेकूं लागले असावे अशा प्रकारें आपला पराग उधळून देऊं लागले; नद्या जणों मेघांनीं आपला पति समुद्र याजपासून घेतलेलें जळरूपी कर्ज चक्रवाढ व्याजासहित वसूल करण्यासाठीं आपल्या पूरांत उसळणाऱ्या लाटांच्या रूपानें हात लांब लांब करून भांडण करीत असाव्या अशा प्रकारें कोलाहल करूं लागल्या आणि मेघापासून कांहींच गहाण वगैरे घेतल्यावांचून आपली जळरूप संपत्ति भोळेपणानें देऊन बसलेल्या आपल्या समुद्ररूप पतीला, दुसऱ्या वेळीं तसें न करण्याविषयीं ठपका देत असाव्या अशा प्रकारें एकदम धांवत जाऊं लागल्या; वृक्षांच्या शाखांमध्यें उडणारे काजवे, जणों थंडीनें पीडित होऊन घरट्यांत बसलेल्या पक्ष्यांनीं उष्णता मिळावी ह्मणून पेटवलेल्या अग्नीच्या ठिणग्याच होत असे चकचकूं लागले; वृक्षांच्या पानांवर शोभणारे जलबिंदु जणों मेघांच्या एकावर एक घासाघासीमुळें आकाशांतून गळून पडणारे तारे होत असे दिसूं लागले; आकाशांतून जोरानें खालीं येऊन शेतांच्या जमिनींत शिरणाऱ्या लांब लांब जलधारा, जणों पृथ्वीच्या आंतील भाग किती किती भिजला आहे याचा निश्चय करण्यासाठीं मेघांनीं वरून खोंचलेले रुप्याचे गजच होत अशा दिसूं लागल्या; प्रफुल्लित झालेले इंद्रजवाचे वृक्ष जणों पुष्परूपी दांत दाखवून जवसांस हंसत असावे असे भासूं लागले; लतांच्या स्वयंग्रह आलिंगनाचें सुख पावलेले मोठमोठे वृक्ष वाऱ्यानें हलत असतां आपल्या शिखरप्रदेशांच्या रूपानें जणों मस्तकें हलवून हलवून वर्षाकाळाची प्रशंसा करीत सुटले असावे असे भासूं लागले; पृथ्वीवरील चिखल जणों विजेच्या उष्णतेनें विरघळून खालीं पडलेला आकाशाचा रसच होय असें भासूं लागलें; अंधकारानें काळ्या झालेल्या दिशा जणों प्रवासी लोकांस लागलेल्या कामरूपी दावानलाच्या धुरानें व्याप्त झाल्या असाव्या अशा दिसूं लागल्या; इंद्रगोप

नांवाचे तांबडे किडे जणों विजेच्या प्रहारानें जखमी झालेल्या मेघांच्या आंगांतून रक्ताचे बिंदु पडले असावे असे दिसूं लागले; मेघ जणों हातांत विद्युद्रूप दिवे घेऊन सांडलेल्या सूर्यचंद्रांचा शोध करण्यास निघाले असावे असें वाटूं लागलें; पर्जन्याचा अंधकार जणों विरही लोकांचे दुर्दैवच प्रगट झालें असावें असा दिसूं लागला; आणि प्रत्येक पुष्पावर उडणाऱ्या भ्रमराची पंक्ति जणों मेघांच्या गर्जनांनीं फुटलेल्या विरही लोकांच्या मस्तकांतून बाहेर पडलेली दुर्दैवाची अक्षरावलीच होय अशी दिसूं लागली.

यावेळीं सूर्यास्ताचा समय जाणण्याला घटीयंत्राशिवाय दुसरें कांहींच साधन राहिलें नाहीं. अरण्यांत रात्र आणि दिवस यांचा निराळेपणा चक्रवाक् पक्ष्यांच्या जोड्याच्या वियोगानें आणि समागमानेंच जाणवूं लागला. भ्रमरांचे गुंजारव विरही लोकांचा वध करण्यास तयार झालेल्या कामदेवाच्या धनुष्याच्या दोरीच्या टंकाराची भ्रांति उत्पन्न करूं लागले. राळकिड्यांचा किर्र शब्द कामदेवाच्या हत्तीच्या चीत्कार शब्दाची भ्रांति उत्पन्न करूं लागला. वर्षाकाळच्या वाऱ्याच्या झपाट्यानें दिवे मालवून जात असल्यामुळें सद्गृहस्थांचीं घरेंही जैन लोकांच्या अपासरांप्रमाणें दिसूं लागलीं. चुलींत घातलेलीं लांकडें काय कारणास्तव चांगलीं पेटत नाहींत या विषयीं कष्टी झालेल्या आणि वारंवार फुंकर घालून घालून चुलींतल्या उडालेल्या राखाडीनें भरलेल्या रानटी लोकांच्या स्त्रिया मुलांलेंकरांस भुकेनें कळवळून गेलेलीं पाहात असतांही गालावर हात ठेवून स्वस्थ बसूं लागल्या. डोक्यावर सुपें धरून आणि हातांत कौल घेऊन विस्तव मागण्यासाठीं या घरांतून त्या घरांत जाणाऱ्या खेडवळ स्त्रिया शेजारणींच्या दुर्भाषणांनीं तिरस्कार पावूं लागल्या. आणि पाऊस फार पडत असल्याकारणानें शेतांतलें कामकाज सोडून देऊन चावडीवर दोऱ्या वळीत बसलेले शेतकरी थंड वेळच्या गोष्टी सांगूं लागले. अरण्यें मत्त झालेल्या मयूरांच्या खरज स्वरानें, बैलांच्या ऋषभ स्वरानें, बकऱ्यांच्या गांधार स्वरानें, कुं-

झपक्ष्यांच्या मध्यम स्वरानें, कोकिलांच्या पंचम स्वरानें, प्रवासी लोकांच्या घोड्यांच्या धैवत स्वरानें, आणि गुहांमध्यें दडून बसलेल्या सिंहांच्या निशाद स्वरानें, आणि भ्रमरपंक्तीच्या विण्याच्या सारख्या स्वरानें, आणि मेघांच्या मृदंगासारख्या गंभीर शब्दानें, जणों गायनकलेचा जलसा चालला आहे असें भासूं लागलें. अभिसारिका विजांस दूतीसमान, राळकिड्यांच्या शब्दांस मांगलिक गाण्याप्रमाणें, अंधकाराला प्रकाशाप्रमाणें, रात्रीला सखीप्रमाणें, गल्ल्यांस राजमार्गाप्रमाणें, रात्रीच्या दुसऱ्या प्रहराला प्रयाणमुहूर्ताप्रमाणें, मनोरथाला रथाप्रमाणें आणि अंधाऱ्या खोलीला सुंदर मंदिराप्रमाणें, लेखूं लागल्या. अभिसारिकांच्या नेत्रांस सूर्यापासून, चंद्रापासून, दिव्यापासून, हड्यांच्या वगैरे रसाच्या सेचनापासून, त्रिफळाच्या वगैरे काढ्याच्या आश्चोतनापासून, निरनिराळ्या औषधींच्या पिंड्या ठेवण्यापासून, रसवंती वगैरे बिडालक करण्यापासून, तुपाच्या वगैरे तर्पणापासून, कुटपाकाचा रस घालण्यापासून, स्नेहन रोपण आणि लेखन या उपचारांपासून, चंद्रोदया वगैरे वर्तिकांच्या अंजनापासून, आणि त्रिफळाद्य वगैरे घृतापासून सुद्धां जसा प्रकाश मिळाला नसता तसा पर्जन्याच्या अंधकारापासूनही मिळूं लागला. अभिसारिका अंधकारापासून नव्हे, पण मंदहास्य करूं जातां दांतांच्या किरणांनीं होणाऱ्या अंधकाराच्या भेदनापासून भिऊं लागल्या; मेघांच्या गर्जनांनीं नव्हे पण पायांत घातलेल्या नूपुरां रवानें भिऊं लागल्या; विजांच्या चकचकाटांनीं नव्हे पण आभरणांच्याच चकचकाटानीं भिऊं लागल्या; राळ किड्याच्या शब्दांनीं नव्हे पण कंकणांच्या घागऱ्यांच्या झणत्कारानें भिऊं लागल्या; पावसाच्या प्रचंड वाऱ्यानें नव्हे पण केशपाशांच्या सुगंधी पवनानें भिऊं लागल्या; आणि गुरुजनांच्या आज्ञेच्या भंगानें नव्हे पण कामदेवाच्या आज्ञेच्या भंगानें भिऊं लागल्या. जलधारा लोकांच्या वस्त्राबरोबरच मानवतींच्या चित्ता-

लासुद्धां भिजवून टाकूं लागल्या; अंकुरांबरोबरच कामी लोकांच्या मनोविकारालांसुद्धां वाढवूं लागल्या; मयूरांबरोबरच युवतींच्या चित्तवृत्तीला सुद्धां नाचवूं लागल्या; अंधकाराबरोबरच कामदेवालाही समृद्धि देऊं लागल्या; लतांबरोबरच कामिनीजनांस सुद्धां स्वयंग्रह आलिंगनाची जरूर पाडूं लागल्या; थंडीबरोबरच कामी लोकांच्या आलिंगनास दृढता देऊं लागल्या; संग्रह करून ठेवलेल्या धान्यांतून लाभाची तृष्णा राखणाऱ्या वाण्याबरोबरच विरही लोकांसही रडवूं लागल्या; पक्ष्यांबरोबर जैन साधूंसही बंदीवानाप्रमाणें करूं लागल्या; नद्याबरोबरच विरक्त लोकांच्या बुद्धीसही मलिन करूं लागल्या; उष्णतेबरोबरच मनुष्यांच्या प्रवासाच्या इच्छेला सुद्धां शांत करूं लागल्या; आणि प्रमाणाच्या मुहूर्ताबरोबरच मुग्धांच्या लज्जेसही सोडून देवरवूं लागल्या. रात्रीच्या अंधकाराची प्रवृत्ति होतांच वासकसज्जा स्त्रिया सासवांस निजविण्याची तजवीज करूं लागल्या; मानवती स्त्रिया आपला मान नीटपणें संभाळून ठेवण्याचे कामीं निराश होऊं लागल्या; अभिसारिका स्त्रिया काळ्यारंगाचीं लुगडीं नेसूं लागल्या; व नीलमण्यांनीं खचित दागदागिने अंगावर घालूं लागल्या; उत्कंठिता स्त्रिया सवतींच्या घरीं प्राणेश्वर राहून गेल्याची शंका घेऊं लागल्या; स्वाधीनपतिका स्त्रिया सख्यांच्या फसवणुकीच्या गोष्टी ऐकून त्यांचा उपहास करूं लागल्या; कलहांतरिता स्त्रिया प्राणेश्वरास कामातुर करून परत लाविणाऱ्या मेघांच्या गर्जनेचे उपकार मानूं लागल्या; विप्रलब्धा स्त्रिया निःश्वासाच्या पवनांनीं निकुंजभवनाच्या पुष्पांस कोमेजून टाकूं लागल्या; आणि प्रोषितभर्तृका स्त्रिया अश्रूंच्या धारांनीं वस्त्रें भिजवून टाकूं लागल्या; परपुरुषांनीं केलेल्या नखक्षत वगैरे चिन्हांचें गोपन करूं पाहणाऱ्या युवती उपवनांत प्रफुल्लित झालेल्या केतकीला आशीर्वाद देऊं लागल्या; भाषणाच्या चातुर्यानें पथिक जनांस थोपवून धरूं इच्छिणाऱ्या का-

मिंनी मेघांच्या आडंबराचे उपकार मानूं लागल्या; कर्तव्यचातुर्यानें घरच्या माणसांस ठकवूं पाहणाऱ्या वनिता घरासभोंवतालच्या परसांतील लतांचे निबिड मंडप करूं लागल्या; परसमागमानें प्राप्त झालेल्या नखक्षतांवर चंदनादिकांचा लेप देऊन फिरणाऱ्या स्त्रिया पावसाच्या धारांनीं तो लेप धुपून गेला असतांही सखींच्या उपहासाला पात्र होऊं लागल्या; कित्येक स्त्रिया तीरावरील निकुंजभवनें नद्यांच्या पूरांनीं वाहून गेलीं असतां डोळ्यांतून आंसवाच्या धारा गाळूं लागल्या; कित्येक जणी सासरच्या गांवचे निकुंज नदीच्या पूराच्या वेगानें मोडून गेलेले ऐकून खेद पावूं लागल्या; कित्येक युवती कदंबाच्या उपवनांतून कदंबपुष्पांच्या माळा घालून अंगण्यापुढून जाणाऱ्या येणाऱ्या तरुणांस पाहून विवर्ण होऊं लागल्या; कित्येक स्त्रिया घरीं आलेल्या तरुण पाहुण्यापाशीं आपल्या लहान बालकांस आजीच्या आजन्म बहिरेपणाविषयीं, पित्याच्या प्रवासाविषयीं, आणि पावसाच्या थंडीमुळें मातेस फार पीडा होते अशा प्रकारच्या गोष्टी बोलतांना पाहून रोमांचित होऊं लागल्या. कित्येक मोठ्या वाढलेल्या मुली सुद्धां पाऊस पडत असतां पाणी भरण्यास जाण्याच्या मिषानें घराबाहेर जाऊन तरुणलोकांच्या दृष्टीसमोर भिजलेलीं वस्त्रें साफ सारूं लागल्या. कित्येक स्त्रिया जळबिंदूंच्या बदलीं पुरुषांची वृष्टि करीत नसल्याकारणावरून मेघांस वृथाभारवाहक गणूं लागल्या; कित्येक जणीं पावसाच्या गळण्यानें बिघडून गेलेल्या सामानसुमानाची व्यवस्था लावण्यांत गुंतल्या असतांही धनवान आणि उदार लोकांकडून दूती येतांच आपापलीं कामें तशींच सोडून देऊं लागल्या; कित्येक स्त्रिया घामानें भिजून आलेल्या खऱ्या तरी पावसानें भिजल्याची सबब सांगणाऱ्या दूतींस मार्मिक वचनांनीं लावून बोलूं लागल्या; कित्येक स्त्रिया भरपावसांत केतकीचीं फुलें आणण्यासाठीं गेलेल्या आपल्या

कांतांची वाखाणणी करणाऱ्या सखींजवळ पुष्कळ वेळपर्यंत आपल्यां-पाशींच गुंतून राहणाऱ्या आपल्या कांतांची व्याजस्तुति करूं लागल्या; आणि कित्येक स्त्रिया आपल्या अंगकांतीला विजेची उपमा देणाऱ्या सखींपाशीं विजेच्या चांचल्यानें आपल्यास फार भय वाटतें असें बोलं लागल्या; परस्त्रियांचा समागम करून आले असतांही स्वतांच्या स्त्रियां-पाशीं त्या समागमाच्या चिन्हांचीं दुसरीं कारणें दाखवूं इच्छिणाऱ्या कामी पुरुषांना, पावसाच्या जलधारा, अंधकार, मत्त झालेले भ्रमर, केतकी, आणि कांटेरी लता यांची अपूर्व मदत मिळूं लागली.

वर्षाॠतु अंकुरांबरोबरच विरहीणीच्या चोळ्यांस आणि बांगड्यांसही मोठ्या करूं लागला; लोकांच्या वस्त्रांबरोबरच विरहिणींच्या नेत्रांसही भिजवून टाकूं लागला; सूर्याच्या किरणांबरोबर विरहिणीच्या जीवित सु-चविणाऱ्या नाड्यांसही अदृश्य करूं लागला; जवसाबरोबरच विरहि-णीच्या आंगावरील चंदनादिकांच्या लेपालाही सुकवून टाकूं लागला; अंधकाराबरोबर त्यांच्या मूर्च्छेलाही वाढवूं लागला; आणि लतां-बरोबरच त्यांच्या व्यथेलाही पल्लवित करूं लागला. जर चात-कपक्षी कवि होतील तरच जलधारांपासून होणाऱ्या आनंदाचें वर्णन बरोबर उतरूं शकेल; जर मयूर कवि होईल तरच मेघांच्या गर्जने-पासून होणाऱ्या आनंदाचें बरोबर वर्णन उतरूं शकेल; जर वनस्पती कवि होतील तरच पर्जन्यापासून मिळणाऱ्या पुष्टीचें यथास्थित वर्णन आपल्यास मिळेल; जर अंधकार कवि झाला तरच अभिसारिकांच्या संचारसुखाचें यथास्थित वर्णन होऊं शकेल; जर आकाश कवि होईल तरच मेघांच्या गडबडीचें चांगलें वर्णन होऊं शकेल; जर अभिसारि-कांचे डोळे कवि होतील तरच विजेच्या चंचळतेचें बरोबर वर्णन होऊं शकेल; जर काजवे कवि होतील तरच अंधकाराच्या महिम्याचें पूर्ण वर्णन होऊं शकेल; जर वायु कवि होईल तरच दंपतींच्या सुरतांतील स्वेदो-

द्रुमाचें माहात्म्य बरोबर वर्णूं शकेल. जर कुचमंडल कवि होतील तरच दंपतींनीं एकमेकांस दिलेल्या आलिंगनाच्या दृढतेला ते बरोबर वर्णूं शकतील आणि जर कामदेवच कवि झाला तरच युवतींच्या मनोविकारांचें यथास्थित वर्णन होऊं शकेल असें वाटूं लागलें. वर्षाऋतूच्या प्रभावामुळें पळून जाऊन उष्णतेनें कामिनींच्या कुचमंडळाचा, रजांनीं केतकीच्या पुष्पांचा, चांदण्यानें युवतींच्या मंदहास्याचा, प्रकाशानें विद्वानांच्या चित्ताचा, दावानलानें विरहिणींच्या अंतःकरणाचा आणि दुर्भिक्षानें कमळांचा आश्रय केला असावा असें दिसूं लागलें.

प्रबळ पूरानें भागीरथी लोकांच्या पापाबरोबरच कांठांवरील वृक्षांचें उन्मूळन करूं लागली; जणों पापी लोकांच्या संसर्गानें प्राप्त झालेल्या पापाला पळवूं पाहात असावी अशा प्रकारें तीरावरील देवमंदिरांमध्यें विराजमान झालेल्या देवांच्या चरणाचा स्पर्श करूं लागली; जणों मोठमोठ्या पापांचा क्षय केल्यामुळें गर्व पावली असावी अशा प्रकारें अद्भुत अवडंबरानें गर्जना करूं लागली; जणों त्रैलोक्याला सुद्धां कुंभीपाकांत लोटण्याचा गर्व करणाऱ्या महान महान पापांची तिरस्कारानें हसून हसून पर्वा उडवीत असावी अशा प्रकारें फेंसाच्या राशीच्या राशि बाहेर टाकूं लागली; जणों आपला स्वामी जो समुद्र त्याच्या पाण्याची चोरी करणाऱ्या मेघांस कल्लोलरूपी हातांनीं थपडाच मारीत असावी अशी दिसूं लागली; कांठाशीं जमलेल्या फेंसाच्या गोळ्यांमुळें जणों आपलें सेवन करणाऱ्या लोकांसाठीं ब्रह्मलोकाहून विमानावर विमानें आणून कांठांवर उतरून ठेवीत असावी असें वाटूं लागलें; आणि वाहून जाणाऱ्या मोठमोठ्या वृक्षांवरून जणों कुसुमायुधाच्या कीर्तीला द्वीपांतरासही जाण्यासाठीं सोय करून द्यावी ह्मणून समुद्रामध्यें पूल बांधावयाची तयारी करीत अ[illegible]ी असें वाटूं लागलें.

**या** समयीं **शत्रुजित्**, **म**नोरमा आणि कुसुमायुध यांनीं मोठ्या बडेजावीनें **भा**गीरथीच्या तीरीं येऊन चंदन, पुष्प, धूप, दीप आणि महानैवेद्य अर्पण करून मोठ्या भक्तिभावानें **भा**गीरथीची पूजा केली आणि **वि**श्वेश्वरादि देवांच्या मंदिरांमध्येंही महापूजा अर्पण करविली. सर्व देशभर आनंदच आनंद होऊन गेला. श्रावण महिन्याचे अनेक उत्सव सुरू झाले. मेघ जणों पाण्याचा मोठा बोजा उचलून, धरून धरून थकून गेले असावे अशा रीतीनें पर्वतांच्या शिखरांवर थोड थोडा वेळ विश्रांति घेऊं लागले. वनें आणि उपवनें अपराण्हकाळीं कांहीं विचित्रच शोभा दाखवूं लागलीं. आकाशांत उडणाऱ्या बगळ्यांच्या पंक्ति जणों मेघांनीं आपल्यास पाण्याची सोय करून देणाऱ्या सूर्यनारायणाचें पूजन करण्यासाठीं पांढऱ्या कमळांची ही माळ तयार केली असावी असें भासूं लागलें. मधून मधून इकडे तिकडे फिरणाऱ्या लाल किड्यांमुळें चित्रविचित्र दिसणाऱ्या हिरव्यागार चाऱ्यांच्या माळांनीं पृथ्वी जणों तांबड्या ठिपक्यांची हिरवी पैठणी नेसली असावी असें वाटूं लागलें. मेघांनीं जणों समुद्रांतून पाण्याबरोबर अनेक रंगांचीं रत्नेंही उचलून आणून त्यांनींच बनविलें असावें असें इंद्रधनुष्य लोकांच्या चित्ताचें आकर्षण करूं लागलें. क्षुद्र नद्या ज्यांस स्वप्नांतही आपला पति जो समुद्र त्याचा समागम होण्याची आशा नव्हती त्यांसही आपल्याबरोबर घेऊन समुद्राचा समागम करून देणाऱ्या मोठ्या नद्या महाशय पतिव्रतांना दृष्टांतरूप झाल्या. वृष्टि होत असतां आंतून फुरफुरणारी आणि फारच पुष्ट दिसणारी मेघांची पंक्ति प्रसवसमयीं कष्ट पावणाऱ्या पहिलटकरणीप्रमाणें भासूं लागली. कित्येक वेळां वरचेवर दिसणाऱ्या पांढऱ्या पांढऱ्या सफेत मेघावली कामदेवानें इंद्रलोकांतून उतरण्यासाठीं स्फटिकमण्यांच्या पायऱ्या केल्या असाव्या अशा दिसूं लागल्या. केव्हां केव्हां मेघांच्या काळ्या कुळकुळित घटेच्या आंत

दिसणाऱ्या दुसऱ्या मेघांचे पांढरे ठिपके जणों लक्ष्मीनें पावसाळ्याच्या चिखलानें व्यापलेल्या आकाशांत चालतां येण्यासाठीं पांढऱ्या दगडांचे तुकडे पाय देण्यासाठीं मांडले असावे असे शोभूं लागले. प्रफुल्लित झालेल्या बोलसरी जणों विरही लोकांसाठीं पेटलेल्या कामरूपी अग्नीच्या ठिणग्यांनीं भरलेल्या होत; सुगंधाच्या सर्वस्वाची तिजोरीच होत; विजय पावलेल्या कामदेवापासून पारितोषिकरूपानें मिळालेल्या सुवर्णाच्या पुतळ्यांनीं सुशोभित होत; आणि जणों वारंवार मागण्यासाठीं येणाऱ्या वायूला ओंजळ भरण्यासाठीं सुगंधाच्या सोन्याच्या मोहरा तयार करून उभी राहिल्या असाव्या अशा दिसूं लागल्या; केव्हां केव्हां सर्व गडबडींतून मुक्त होऊन संध्येच्या रागानें रंगून जाऊन थोडा वेळ स्थिर झालेले मेघ जणों विरही लोकांचा वध करण्याच्या पापापासून मुक्त होण्यासाठीं संन्यास घेऊन बसले असावे असे दिसूं लागले; पर्जन्याच्या पाण्यानें धुपून गेल्यामुळें अति काळेकुळकुळीत दिसणारे आणि वाऱ्यानें डोलूं लागणारे वेळूच्या नियमित शब्दांनीं युक्त असे पर्वत घनपाठ ह्मणणाऱ्या तैलंग ब्राह्मणांप्रमाणें दिसूं लागले; सायंकाळ प्राप्त होतांच आपापल्या घरट्यांमध्यें शिरूं लागलेले पक्षी प्रवासी लोकांचें घड्याळाचें काम बजावूं लागले; मर्यादेचें उल्लंघन करून स्वच्छंद चालू लागलेल्या नद्या गुरुजनांचें उल्लंघन करून यथेच्छ वर्तूं लागलेल्या उद्धट स्त्रियांचें अनुकरण करूं लागल्या. ज्याप्रमाणें उदार राजे आपल्या आश्रितजनांची द्रव्यानें भर करितात त्याचप्रमाणें मेघ नद्यांस, तलावांस, विहिरींस आणि दुसऱ्याही असल्याच जलाशयांस पाण्यानें परिपूर्ण करूं लागले. पर्वतांच्या शिखरांवरून मोठमोठ्या शिलांवर पडून तुकडे तुकडे होणाऱ्या पाण्याचे धोधाटे मोत्यांनीं खचलेल्या दागिन्यांची भ्रांति देऊं लागले; आणि “आपल्यावर अपार अपकार करणाऱ्या वर्षाकाळानें जर आपल्या सर्व आयुष्या-

मध्यें आपल्यावर एखादा उपकार केला असेल तर तो चंद्राला कैद करून ठेवण्याशिवाय दुसरा कोणताही नाहीं " असें विरहिणी बोलूं लागल्या.

कुसुमायुध नित्य राज्यकारणी कामकाज आटपून टाकल्यावर, केव्हां केव्हां कवितांवर टीका करून, केव्हां केव्हां गायन ऐकून, केव्हां केव्हां नाटकें पाहून, केव्हां केव्हां प्रिय मित्रांबरोबर गोष्टी बोलून, केव्हां केव्हां मातापितरांच्या सेवेमध्यें गुंतून, केव्हां केव्हां व्यायाम करून, केव्हां केव्हां पवित्र कथा ऐकून, केव्हां केव्हां वहनास शिकवण्यास गुंतून, आणि केव्हां केव्हां तर विद्येचा परिचय करून वर्षाऋतुचे दिवस आनंदानें घालवूं लागला. मनोरमा आणि शत्रुजित् हीं दोघें कुसुमायुधाची बाळबोध पद्धति पाहून प्रसन्न होऊं लागलीं, प्रजाजनांमध्यें आनंदच आनंद होऊन गेला, पाऊस हळू हळू कमी होत गेला, शेतांत उत्पन्न झालेल्या धान्याचे निमतानें घेण्यांत येऊं लागले, शुभ्र झालेल्या मेघमाळारूप केश वर्षाकालाची वृद्धावस्था झाली असें जाणवूं लागले, आणि पृथ्वीवर आणि आकाशांत शरदृऋतूचीं पावलें पडलेलीं दिसून येऊं लागलीं.



# प्रकरण २१ वें.

## शरत्.

शरदृतूची मंगलदायक पावलें पडतांच दिशा, आकाश, जलाशय आणि चंद्राचे किरण हीं सर्व स्वच्छ होऊं लागलीं. मेघ जणों मोठें बंड चालवून चालवून थकून गेले असावे म्हणून शांत होऊं लागले. ज्याप्रमाणें जैन साधु केसांचा लोंच करितात त्याप्रमाणें मयूर आपलीं पिसें उपटून काढूं लागले. कैदेंतून मुक्त झालेला चंद्र अंधकारानें मलिन होऊन गेलेल्या आकाशरूपीं सदरेला किरणरूपी कळीच्या चुन्याचा दाट रस फासून स्वच्छ करूं लागला. मोठ्या नद्या जणों आपला पति जो समुद्र त्याला क्षुद्र नद्यांच्या समागमानें रहित असा पाहून संतुष्ट झाल्या असाव्या अशा रीतीनें निर्मळ दिसूं लागल्या. मेघ जणों विरही जनांच्या दहनानें पडलेल्या राखाडींनें लिप्त झाले असावे अशा प्रकारें पांढरे दिसूं लागले. विरही लोकांस विजांनीं होणारा ताप आश्चर्यकारक वाटत नव्हता पण चंद्राच्या किरणांपासून उत्पन्न झालेला ताप एवढा दुःसह व्हावयाचें बरीक आश्चर्य वाटूं लागलें. वर्षाकाळामध्यें मदोन्मत्त होऊन आपलें अंग उघडें करून दाखवून नाचणारे मयूर जणों आपल्या ह्या कृत्यानें पस्तावा पावले असून उद्विग्न झाले असावे अशा प्रकारें मौनव्रत धरून फिरूं लागले. आकाश जणों लुप्त झालेल्या विद्युद्रूप दिवटीच्या शेवटल्या शेवटल्या धुरानें व्याप्त झाले असावे अशा प्रकारें निळें दिसूं लागलें. नद्या, मेघ, वायु, मयूर, बेडूक आणि रातकिडे यांचे शब्द लुप्त झाले. अंधकार जणों चंद्राच्या किरणांपासून भय पावून विरहिणींच्या मनामध्यें शिरून बसला असावा असें

वाटूं लागलें. योगाभ्यास करणारांच्या अंतःकरणांतील सारा कुभाव जसा हळुहळू शांत होत होत नाहींसा होतो, त्याच प्रमाणें पृथ्वी-वरील कर्दमाचा पसाराही हळुहळू नाहींसा होऊं लागला. सूर्याच्या किरणांनीं सुकून घट्ट होऊन भेगा पडल्यामुळें पसरलेल्या जाळ्याप्रमाणें दिसणारा चिखल जणों सूर्यरूपी वैद्यानें पृथ्वीच्या आंगांत पावसाच्या थंडीमुळें तसेंच घाणीमुळें उत्पन्न झालेला ज्वर शमविण्यासाठीं रस-पर्पटी ढाळली असावी असें भासूं लागलें. कमळें जणों पुष्कळ वेळ-पर्यंत पाण्यांत बुडून राहिल्याचें तप केल्यामुळें त्याचें फळ पावलीं अ-सावीं अशा प्रकारें प्रफुल्लित होऊं लागलीं. चंद्रिका दुधाच्या धारांप्र-माणें ओंजळींत घेऊन प्यावयाची असेल तर पितां येईल अशी निबिड दिसूं लागली. सूर्याचीं किरणें जणों पुष्कळ दिवसपर्यंत सहन करावी लागलेल्या विजेच्या उष्णतेमुळें दुप्पट उष्ण झालीं असावीं अशा प्रकारें अंगास झोंबूं लागलीं. कामिनींस मानामुळें मलिन झालेल्या पा-हून निराशेनें निघून जाण्यास तयार झालेले कामी पुरुष जसे त्यांचीं अंतःकरणें स्वच्छ झालीं असें जाणून पुन्हा त्यांचें सेवन करूं लाग-तात, त्याच प्रमाणें नद्या वर्षाकाळानें मलिन झालेल्या पाहून निराशेनें निघून जाऊं लागलेले हंस नद्यांचीं जलें फिरून स्वच्छ झालेलीं पाहून पुन्हा त्यांचें सेवन करूं लागले. जगाचें रक्षण करण्यासाठीं प्याल्यावर जें विष सदाशिवाच्या गळ्यामध्यें राहून गेलें तें जसें त्याच्या दर्पणा-सारख्या कंठांतून स्पष्ट उमटलेलें दिसतें त्याच प्रमाणें चंद्रानें जगाला प्रकाशित करण्यासाठीं जो अंधःकार पिऊन गेल्यावर त्याच्या पोटांत जमून राहिला तो जणों आतां स्फटिकासारख्या त्याच्या उदरांतून कलं-करूपानें दिसूं लागला असावा असें भासूं लागलें. विरहिणी स्त्रिया विजेच्या अपरंपार उष्णतेनें सुद्धां चंद्र वितळून गेला नाहीं असें पाहून आपल्या पापामुळेंच चंद्राचा टिकाव निघत असावा असें समजूं ला-

गल्या. चंद्र जणों नक्षत्ररूप मण्यांनीं खचित अशा आभरणांनीं चकाकणाऱ्या रात्रीला पाहून तिला आलिंगन देण्यासाठीं उत्कंठित झाला असावा अशा प्रकारें आपले कर लांबवून लांबवून तिची अंधकाररूप चोळी काढून टाकीत असावा असें वाटूं लागलें. चंद्राचे किरण अंधकाराबरोबरच मानवतीच्या मानालाही दूर करूं लागले; कुमुदांबरोबरच युवतींच्या मनोविकारालाही प्रफुल्लित करूं लागले; समुद्राच्या भरतीबरोबरच विरहिणीच्या व्यथेलाही वाढवूं लागले; चकोरींबरोबरच गच्चीवर विनोद करण्याऱ्या दंपतीलाही परम सुख देऊं लागले; समुद्राबरोबरच कामदेवालाही अमर्याद करूं लागले; आणि संतापाबरोबरच अभिसारिकांच्या धैर्यालाही हरवूं लागले. उत्साह टाकून देऊन ध्यानस्थ बसलेले मयूर जुगारांत हरलेल्या जुगारी लोकांप्रमाणें दिसूं लागले; निर्बळ होत चाललेले नद्यांचे प्रवाह प्रोषितपतिकांच्या शरीरांप्रमाणें दिसूं लागले; मलिनतेपासून मुक्त झालेलीं जलें विद्वानांच्या चित्ताप्रमाणें दिसूं लागलीं; मुके होऊन बसलेले बेडूक कोडतांत हरलेल्या वकिलांप्रमाणें दिसूं लागले; चांदणें ब्रम्हांडांतही समावत नसावें असें वाटूं लागलें; मानवतीच्या चित्ताला बाणांच्या प्रहारांनीं घायाळ करूं इच्छिणाऱ्या कामदेवाचें इष्ट कार्य चांदण्यानेंच तडीस जाऊं लागलें; विरहिणीच्या मनगटांतील चुडे बाजुबंदाचें काम करूं लागले; चंद्र विरहिणीस पीडा देण्यासाठीं स्वाधीनपतिकांस सुख देऊं लागला; विरहिणीस चंद्राच्या प्रभेपासून उत्पन्न होणारा ताप चंद्राला सूर्यापासूनच प्रकाश मिळवा या सिद्धांताची प्रचीति आणून देऊं लागला; चांदणें शांति देणारें आहे असें जाणून त्यांत बसण्यास जाणाऱ्या विरहिणी फसून जाऊं लागल्या; चांदणें, कुमुदें आणि वायु हीं शीतळ असतांही जाळून टाकूं लागलीं असतां विरहिणी स्त्रिया आपल्याच भाग्याचा हा दोष समजूं लागल्या; चंद्र दिशांस शीतल करण्यासाठीं प्रवर्तला असतांही

विरहिणींच्या निःश्वासांनीं त्यांस उष्ण करून टाकूं लागला; आणि कामदेवास जागृत करून सावध ठेवण्यासाठीं प्रवर्तला असतांही विरहिणीनांच जागृत करून ठेवूं लागला. चांदणें पडल्यावर सुद्धां असतांही चंदनादिकांचे उपचार सतत चालू असतांही विरहिणींची मूर्च्छा अखंडित राहूं लागली; चंद्रबिंबांतून चंद्रिकारूप क्षीरसागर उत्पन्न होऊं लागला; आणि चंद्रिकारूप क्षीरसागर मानवती स्त्रियांच्या मानीपणाला सुकवून टाकूं लागला. आकाश निर्लेप असतांही चंद्रप्रकशानें लिप्त होऊं लागलें; चांदणें रात्रीस आणि रात्रि चांदण्याला शोभा देऊं लागली. प्रवासास जाण्याची अनुज्ञा मागितली असतां प्राणेश्वरांस युवती "आम्हांस हें चांदणें फार दिवस विरहाचें दुःख भोगूं देणार नाहीं, यासाठीं निश्चित चित्तानें जा" असें म्हणून जाण्यास अनुमति देऊं लागल्या. आणि विरहिणी स्त्रिया चंद्राला मेघांच्या कैदखान्यांतून सोडविणाऱ्या शरत् कालास धिक्कारूं लागल्या.

**या** वेळीं नद्यांच्या कांठीं चिखलास शिंगांनीं उकरूं लागलेल्या मस्त रेड्यांस चिखलच योग्य आहे आणि घट्ट झालेल्या चिखलास मस्त झालेले खुंटच योग्य होत असे भासूं लागलें. "विरहानें रोड झालेल्या सुकुमार युवती कोठें आणि त्यांच्यावर फेंकण्यांत येणारे तीव्र बाण कोठें!" असा कांहीं एक विचार कामदेवाच्या मनांत आला नाहीं. शरत्काळच्या साम्राज्यांतील मामला चालू असतां मस्ती युवतींचे नेत्र करूं लागले आणि मर्दन त्यांच्या कुचांचें होऊं लागलें. चंद्राच्या कोमळ किरणांनीं मानवतींच्या दृढ मानीपणाचें मोडणें आणि सदाशिवाच्या कोपाग्नीनें भस्म होऊन गेलेल्या कामदेवाचें युवतींच्या भ्रुकुटींच्या केवळ चाळ्यांनींच संजीवन होणें या दोन्ही गोष्टी असंभाव्य असतांही अनुभवास येऊं लागल्या. युवतींच्या कपोलमंडलांमध्यें प्रतिबिंबित झालेलीं चंद्रबिंबें विलासी लोकांच्या चित्तामध्यें कामरूपी अग्नीला उत्पन्न करूं लागलीं.

दिशा रजांनीं रहित असतांही शुभ्र मेघांच्या रूपानें गर्भाचें ग्रहण करीत असावी अशा दिसूं लागल्या. चंद्र आपल्या किरणरूपी कोमळ भाल्यांनीं सुद्धां झाडींत लपलेल्या अंधकाररूपी शत्रूला भोसकूं लागला. निबिड निकुंजांच्या आंतल्या भागीं चंद्राचा प्रकाश बिलकूल नसतांही अभिसारिका तो प्रकाशमय देखूं लागल्या. नद्यांची चाल प्रभात काळीं सासऱ्याहून माहेरीं येणाऱ्या कामिनींच्या चालीप्रमाणें मंदपणानें शोभूं लागली. पांढऱ्या फुलांच्या गुच्छांस हालविणारें कास गवत पट्टाभिषेक पावलेल्या कामदेवरूपी राजावर चवरी ढाळीत असावें असें दिसूं लागलें. पुष्पांतील मकरंद पिऊन व मत्त होऊन गुंजारव करूं लागलेले भ्रमर मद्य पिऊन मत्त झालेल्या व गाणीं म्हणणाऱ्या पामर लोकांप्रमाणें भासूं लागले. नद्या जणों शरत्कालच्या नवीन समागमानें लाजत असाव्या अशा प्रकारें आपलीं अंगें हळुहळू उघडीं टाकूं लागल्या. देव जसे भक्तजनांस वांच्छित वरदानें देऊन अंतरधान पावतात त्याच प्रमाणें मेघही सर्व लोकांस संतुष्ट करून अंतर्हित होऊं लागले. सकाळच्या समयीं दोहणाऱ्या गाईंच्या दुधाच्या धारांचा, रवी फिरत असल्याकारणानें घुसळणाऱ्या दह्याच्या माथण्यांचा, दधिमंथन करतांना सुस्वर गीतें गाऊं लागलेल्या स्त्रियांचा, आणि भाताच्या शेतांत जाण्यासाठीं आकाशांत ओळीनें उडणाऱ्या कुंझ पक्ष्यांचा शब्द लोकांस आनंद देऊं लागला. उद्धतपणा सोडून देऊन शांत झालेल्या नद्या, यौवनभर येऊन निघून गेल्यावर शांत झालेल्या प्रौढ स्त्रियांप्रमाणें दिसूं लागल्या. अत्यंत पुष्ट झालेले, चिखलानें माखलेले, मोठमोठ्यानें रेंकणारे, आणि एकमेकांशीं लढाई चालविणारे रेडे, धनमदानें ग्रासलेल्या अविवेकी लोकांप्रमाणें दिसूं लागले. मलिन मेघ जसे पर्वतांवर, समुद्रांत, रानांत, उपवनांत, शहरांत आणि खेड्यापाड्यांत सारख्याच दृष्टीनें वृष्टि करून आपला अविवेक दाखवीत होते त्याच प्रमाणें निर्मळ चांदणेंही सर्वत्र सारखाच प्रकाश पसरून स्वतांचा

अविवेक प्रकट करूं लागले. वृष्टीनें सर्व दिशांस ज्याप्रमाणें अंधकारमय करून टाकिलें होतें त्याच प्रमाणें आतां चांदण्यानें सर्व प्रकाशमय करून टाकिलें. वर्षाकाळीं चंद्राला ज्याप्रमाणें कैदी केलें होतें त्याच प्रमाणें शरत्कालीं त्यास फिरून स्वातंत्र्य मिळालें. वर्षाकाळीं रिकाम्या जागच्या बैठकी प्रतिकूळ वाटत होत्या त्याच प्रमाणें शरत्काळीं त्या अनुकूळ वाटूं लागल्या. अभिसारिका जशा वर्षाकाळीं श्याम वस्त्र, श्याम आभरणें, आणि श्याम लेपन यांचा उपयोग करून आपलें कार्य साधून घेत होत्या त्याच प्रमाणें शरत्काळामध्यें शुभ्र वस्त्रें, शुभ्र आभरणें आणि शुभ्र विलेपन इत्यादिकांचा उपयोग करून आतांही आपले हेतु सिद्धीस नेऊं लागल्या. वर्षाकाळीं जी लक्ष्मी केतकींच्या ठिकाणीं, कदंबांच्या ठिकाणीं, बोलसरी आणि इंद्रजवांच्या ठिकाणीं दिसून येत होती तीच आतां शरत्काल प्राप्त झाला असतां कमळें, कुमुदें, सप्तपर्णी आणि अर्जुनवृक्ष यांच्या ठिकाणीं दिसूं लागली. स्वार्थतत्पर भ्रमर जसे वर्षाऋतूमध्यें कदंब वगैरे पुष्पांचें यश गात होते त्याच प्रमाणें शरत्कालामध्यें ते आतां कमळ वगैरे पुष्पांची कीर्ति गाऊं लागले. मयूर मेघास दूर गेलेला पाहून निरुत्साह झाल्यामुळें आपलीं पिसाऱ्याच्या रूपानें आभरणें आणि प्राणप्रियांचे समागमप्रसंगही सोडून देऊन केवळ ध्यानस्थ होऊन बसले. लक्ष्मी मयूरांस सोडून देऊन हंसांच्या ठिकाणीं, इंद्रजवाचा त्याग करून कमळांचे ठिकाणीं, काजव्यांस सोडून देऊन ताऱ्यांच्या ठिकाणीं, ओढ्यांस टाकून देऊन नद्यांच्या ठिकाणीं, जलधारांचा त्याग करून चंद्राच्या किरणांच्या ठिकाणीं आणि मेघांस टाकून देऊन हत्तीच्या ठिकाणीं संचार करीत असलेली दिसून येऊं लागली. आकाशांत प्रकाशणारे तारे जणों सुरतसमयीं मर्दनानें तुटून गेलेल्या देवांगनांच्या गळ्यांतील हारांतले हिरे असावे; चंद्राच्या किरणांविरुद्ध उसळलेल्या महासागरामध्यें चंद्राचा आदरसत्कार करण्यासाठीं कल्लोलरूपी हस्तांनीं फेंकलेलीं रत्नेंच असावीं; आणि

मेघांनीं पाणी घेतेवेळीं समुद्रांतून चोरून घेतलेला तो आपल्या पित्याचा माल समजून चंद्रानें झडती घेऊन त्यांच्या पासून मुद्देमाल ह्मणून काढून घेतलेलीं मोत्येंच होत असे भासूं लागले. चंद्रानें रात्रीं जमा केलेल्या शीतळतेला हरून नेणारा सूर्य आणि सूर्यानें दिवसास जमविलेला ताप हरून नेणारा चंद्र हे परस्परांचे खजिने लुटणाऱ्या जिगीषु राजांप्रमाणें दिसूं लागले. शरत्काळची शोभा चंद्राच्या किरणांच्या ठिकाणीं, ताऱ्यांच्या चकचकाटामध्यें, मदोन्मत्त हत्तींच्या झुलण्यामध्यें, पुष्ट झालेल्या रेड्यांच्या मस्तीमध्यें, निर्मळ झालेल्या जलाशयांच्या ठिकाणीं, प्रफुल्लित झालेल्या कमळांच्या ठिकाणीं, रजांशिवाय शोभणाऱ्या दिशांच्या ठिकाणीं, मजबूत जमलेल्या पांढऱ्या उंसाच्या मळ्याच्या ठिकाणीं, लांब आणि पुष्ट झालेल्या धान्याच्या पेरांच्या ठिकाणीं, चिखल जाऊन थोडी थोडी धूळ उत्पन्न होऊन तिनें व्यापिलेल्या पृथ्वीचे ठिकाणीं, जलाशयामध्यें विहार करणाऱ्या हंसांच्या जोडप्यांमध्यें, वृद्धि पावलेल्या गायींच्या आणि ह्मशींच्या दुधांमध्यें, नीळवीच्या रसाप्रमाणें दिसणाऱ्या आकाशांच्या ठिकाणीं, आणि शेतांची राखण करण्यासाठीं रात्रंदिवस तत्पर असलेल्या शेतकऱ्यांच्या गांवठी गाण्यांमध्यें, विभागलेली दिसूं लागली. पांढरे ऊंस जणों शरत्कालीं वर्षाकाळाचा पराजय करून पृथ्वीमध्यें पुरलेलें विजयस्तंभच होत; वनचर लोकांसही आपल्या आज्ञेंत राखण्यासाठीं कामदेवरूपी राजाचे त्याचे अधिकारदंडच होत; आणि अमृताच्या भारामुळें चंद्रमंडलावरून खालीं पडून गोठलेले किरणच होत असे दिसूं लागले. तारे हींच मोत्यें त्यांनीं जडलेलीं आभरणें आंगावर घालणारी, चंद्रिकारूपी शुभ्र पातळ नेसलेली, चंद्ररूपी प्रफुल्लित मुखानें शोभणारी, आणि मालतीचीं शुभ्र पुष्पें परिधान करणारी, अशी रात्र शुक्लाभिसारिकेसारखी दिसूं लागली. सुरतोत्सवानें थकून जाऊन निजलेल्या कामिनींच्या उघडे पडलेल्या कुचमंडलावर पडणारे चंद्राचे किरण जणों कामातुर होऊन

आकाशांतून खालीं उतरून येऊं इच्छिणाऱ्या चंद्रानें टेक्यासाठीं सोडलेले दोरखंडच होत असे दिसूं लागले. युवतींच्या कपोलांमध्यें पडलेलीं चंद्रबिंबाचीं प्रतिबिंबें रुप्याच्या पिंजऱ्यांत घालून ठेवलेल्या हंसाप्रमाणें शोभूं लागलीं. गच्चीवर निजलेल्या वनितांच्या स्तनमंडलामध्यें प्रतिबिंबित चंद्रच जणों त्यांच्या हृदयांत प्रवेश करण्यासाठीं कैलास पर्वतावर तपश्चर्या करण्याकरितां बसला असावा असें भासवूं लागलें; आपल्या जवळचा अमृताचा सांठा लुटल्यामुळें तें आणखी अमृत मिळविण्यासाठीं चंद्र आला असावा आणि राहूच्या भयानें निबिडाच्छादित स्थळीं छपून बसला असावा असें वाटूं लागलें. निजलेल्या नवोढांच्या वस्त्रांस अनिवार्यपणें उडविणारा आणि स्वच्छंदपणें त्यांच्या आंगास स्पर्श करणारा वायु तरुणांच्या मत्सरास पात्र होऊं लागला. हळुहळू वाहणारा प्रदोषकाळचा वायु जणों कामिनींच्या रमणीय आंगाच्या स्पर्शसुखांत लंपट होऊन समजून उमजूनच आपल्या गतींत विलंब करीत असावा असें भासूं लागलें. उपवनांतील पुष्पपरागानें ग्रहण करून मानवतींच्या आंगावर त्यास उधळणारा वायु जणों त्यानें चित्त स्ववश करण्यासाठीं कामदेवाच्या मंत्रानें मंतरलेली रांगोळी निमटीनें फुंकीत असावा असें वाटूं लागलें. रात्रीच्या प्रहरीं गुप्त रीतीनें कामिनींच्या शयनगृहांत प्रवेश करून मानवतींच्या मानीपणाची चोरी करण्यासाठींच तर नसेल ? अशा प्रकारें वायु दिव्यक्षा मानून वाहूं लागला. कामी जनांच्या आंगावर सुरतयुद्धामुळें उत्पन्न झालेल्या घामाचें हरण करणारा प्रदोपकाळचा वायु, परस्पर कुस्ती करूं लागलेल्या आपल्या शिष्यांच्या आंगावरील घाम पुसून काढणाऱ्या वस्तादजीमारखा दिसूं लागला. मानवती स्त्रिया आपल्या मानीपणाची मजबूत गांठ प्रदोपकाळच्या वायूच्या कोमळ लहरीनें तुटून जात असलेली पाहून विस्मय पावूं लागल्या. प्रदोपकाळचा मंद वायु मानवती स्त्रियांनी सम-

जावणी करण्यांत गुंतलेल्या सखींस साहाय करूं लागला; सुरतेच्छु पाहून गुंतलेल्या कामी जनांस दुप्पट उत्साह देऊं लागला; अभिसारिकांस जोशा प्रमाणें प्रयाणाचा शुभ मुहूर्त सांगूं लागला; सुरतक्रीडा संपविलेल्या कामी जनांस वाजीकरणाचा अर्थ फोडून सांगूं लागला; थकून गेलेल्या युवतींस सुरतयुद्धांस पुन्हा सज्ज करण्याविषयीं त्याजपासून मानपत्र मिळवूं लागला; दंपतींच्या विपरीत रतीच्या क्रीडा सामाजिक करूं लागला; आपला सत्कार करणाऱ्या कामी जनांस खुष करण्याकरितां उपवनांतून भिक्षा मागून मागून सुगंध आणून देऊं लागला; सुगंधाच्या भारानें थकून गेला असावा आणि कामिनींच्या केशपाशास पाहून आपल्यास भक्षण करणाऱ्या सर्पाच्या भ्रांतीनें भयभीत झाला असावा अशा प्रकारें मंद मंद वाहूं लागला; सुगंध आणि शीतलता यांनीं पूर्णपणें युक्त असतांही विरहिणींस संतप्त करूं लागला; मुग्धा स्त्रिया आपण होऊन चोळ्या काढून मान देऊं लागल्या असतां त्यांच्या सखींच्या तोंडांतून स्वतःस भाग्यशाली ह्मणवून घेऊं लागला; कामिनींच्या कठिण कुचमंडळावर येऊन अडल्यामुळें लंगडा झाल्यासारखा भासूं लागला; युवतींच्या स्वेदबिंदूंस पाहून मोत्यांची भ्रांति झाली असावी ह्मणून त्यांस वेंचून घेऊं लागला; वनितांच्या कुचांच्या दाबामुळें पातळ होऊन गेला असतांही फिरून त्यांच्या मुखकमळाच्या सुगंधित श्वासानें पुष्ट होऊं लागला; वनितांनीं परिधान केलेल्या बारिक वस्त्रांस नाचाची तालीम दिल्यामुळें तरुणांच्या दृष्टीला आनंद देऊं लागला; पुष्पांच्या सुगंधाची चोरी करणारा असल्यामुळें उघडपणें येण्याला भीत असावा अशा प्रकारें वृक्षांमध्यें दबून दबून येऊं लागला; आणि सुगंधाच्या लोभानें आपल्या पाठीमागून येणाऱ्या भ्रमरयूथांस पाहून जणों प्रवासी जनांच्या स्त्रियांच्या प्राणांस बांधून घेऊन जाण्यासाठीं काळपाशच घेऊन फिरत असावा असें वाटूं लागलें. अगाशीवर विपरीत रति केल्यामुळें

आकाशांतून प्राणप्रियांच्या वक्षःस्थळावर निजलेल्या कांता, भोगावयाचें इतकें पुण्य भोगून सरल्यामुळें चंद्रलोकावरून भ्रष्ट होऊन मूर्च्छा येऊन पडलेल्या देवांगनांप्रमाणें दिसूं लागल्या. सुरतामध्यें विराम पावल्यावर संभ्रमानें नेसूचें लुगडें शोधूं लागलेल्या, मोत्यांचे हार तुटून गेले असतां आणि लेपनादिक उपचार चोळवटून गेले असतांही दुप्पट रमणीयता धरणाऱ्या, दोनही हात उंच करून केशपाश बांधूं लागलेल्या, तुटून गेलेल्या पुष्पमाळांस फेकून देणाऱ्या, श्रमानें चिंब भिजून गेल्या असतांही अंगाचा संकोच करणाऱ्या, आणि श्वासाच्या अधिकपणामुळें कंपित आहेत कुच ज्यांचे अशा प्राणप्रियांच्या दर्शनाचा मोठा आनंद अनुभवून देणाऱ्या पूर्व रात्रीच्या चंद्रम्याला तरुण विलासी लोक अपूर्व आशीर्वाद देऊं लागले. शरदृतूंतील पूर्ण चंद्र आकाशगंगेच्या फेंसाची, कामदेवाच्या पांढऱ्या छत्राची, अमृताच्या कुंभाची, महादेवाच्या क्रोधाग्नीनें जळून गेलेल्या कामदेवालाही फिरून जिवंत उठविण्याकरितां कामदेवाच्या स्त्रीनें पूजा करूं लागलेल्या स्फटिक लिंगाची, शृंगाररसाच्या यशाची, रात्रीच्या प्रौढ भाग्याची, विलासी लोकांच्या पुण्यपुंजाची, जगाचा ताप शांत करण्यासाठीं प्रगट झालेल्या हिमपिंडाची आणि चकोरींसाठीं प्रगट झालेल्या चिंतामणीची भ्रांति उत्पन्न करूं लागला. चंद्राच्या किरणांच्या फैलाव्यामुळें जग क्षीरसागरांत बुडाल्याप्रमाणें भासूं लागलें; कामी लोकांचीं अंतःकरणें शृंगारामध्यें बुडाल्याप्रमाणें दिसूं लागलीं; विरहिणींची दशा पाहून त्यांच्या सख्यांचीं अंतःकरणें करुण रसामध्यें बुडाल्याप्रमाणें भासूं लागलीं; कवींचीं अंतःकरणें अद्भुत रसामध्यें बुडाल्याप्रमाणें दिसूं लागलीं; कामदेव वीररसामध्यें बुडाल्याप्रमाणें दिसूं लागला; मानवतीचा मानीपणा भयानक रसामध्यें बुडाल्याप्रमाणें भासूं लागला; कमळें शांत रसामध्यें बुडाल्याप्रमाणें दिसूं लागलीं; व्यभिचारिणी स्त्रीयांचीं चरित्रें पाहून त्यांच्या सखींचीं अंतःकरणें हास्य रसा-

मध्यें बुडाल्याप्रमाणें भासूं लागलीं; व्यभिचारिणी सुनांच्या कुचेष्टा पाहून सासवांचीं अंतःकरणें रौद्र रसामध्यें बुडाल्याप्रमाणें भासूं लागलीं आणि बीभत्स रस तर सर्वत्र निराश्रितच होऊन राहिला. कोणत्याही ऋतूंतील चंद्राच्या पेक्षां शरदृऋतूंतील चंद्रम्याच्या ठिकाणीं चकचकाट, शुभ्रता, प्रसन्नता आणि कामोद्दीपकता हे गुण कांहीं निराळ्याच प्रकारचे दिसूं लागले. चंद्र तरुण लोकांच्या मनामध्यें कामदेवाला उद्दीप्त करण्याचें काम विशेष प्रकारें संभाळून करूं लागला असतां कामदेवाला वसंताची, कोकिलांच्या पंचमस्वरांची, दक्षिण वायूची किंवा दुसऱ्या कोणत्याही उद्दीपनाची गरज राहिली नाहीं. विलासी लोकांवर आणि विरही लोकांवरही चंद्राचे किरण आणि कामदेवाचे बाण एकच वेळीं पडूं लागले. प्रदोष समय होण्यापूर्वींच युवती घरांतील कामकाज संपवून टाकूं लागल्या. मानवती स्त्रिया मान निघून गेल्यावर सखींची समजूत करूं लागल्या. कुमुदें आणि संयोगी दंपतींचीं मुखें प्रसन्न होऊं लागलीं. रात्रि चंद्रिकेमुळें आणि युवती रमणस्पृहेमुळें शोभूं लागल्या. युवतींस मानीपणा धरण्याविषयीं सुचविणें ह्मणजे खाऱ्या जमिनींत बीज पेरण्याचा यत्न करण्याप्रमाणेंच आहे असें सखी बोलूं लागल्या. प्राणेश्वरांकडून दूती येण्याची वाट पाहणाऱ्या मानवती स्त्रिया सूर्याच्या किरणांची वाट पाहणाऱ्या कमलिनीप्रमाणें दिसूं लागल्या. उगवतांच अंधःकाराला विव्हळ करून टाकणारा चंद्र "तेजस्वी मनुष्याचा उदयच शत्रूला क्षीण करून टाकतो" असें जाणवूं लागला. चांदणें अमृताच्या धारांप्रमाणें उज्वळ दिसूं लागलें; परंतु विरही लोकांच्या प्राणांस प्रयाण करण्याविषयीं उन्मुख करूं लागलें. विरहिणींचे अंतःकरणांत मनोरथ अनेक प्रकारें उचंबळूं लागले असतांही प्राणप्रियांच्या समागमावांचून निष्फळ दिसूं लागले. कामज्वरानें रिवरिवणाऱ्या विरहिणी स्त्रिया, जळाचा वियोग होतांक्षणींच मृत्युमुखीं पडणाऱ्या मासळीला भाग्यशाली ह्मणून समजूं लागल्या; मूर्च्छना

निरंतर अशीच राहो ह्मणून दैवाची प्रार्थना करूं लागल्या; कामदेवाच्या प्रहारानें सुद्धां न खुटणाऱ्या जीविताचा धिक्कार करूं लागल्या; घरच्या कामकाजाकडे न लागणाऱ्या अंतःकरणाला सखींच्या समाजामध्यें दोष देऊं लागल्या; अपभ्रष्ट भाषेप्रमाणें वर्णविकार पावूं लागल्या; ओठावर बोट ठेवून लांब लांब निःश्वास सोडूं लागल्या; आणि कामदेवाचें नांव पुनःपुन्हा उच्चारून फटाफट दूषण देऊं लागल्या. पृथ्वी आणि अंतरीक्ष चांदण्यानें दुग्धमय आणि भागीरथीजलमय झाल्याप्रमाणें दिसूं लागतांच, पाहणाऱ्या लोकांच्या आपण दृष्टीस न पडावें ह्मणून चंदनाचे लेप करून, मोत्यांचे दागिने घालून, पांढऱ्या चोळया आणि पांढरीं पातळें परिधान करून, आणि पांढऱ्या पुष्पांच्या माळा धारण करून, प्रियजनांच्या समागमासाठीं बाहेर पडलेल्या अभिसारिका, ओठांच्या झांकीनें लाल दिसूं लागलीं असतांही नाकांतील नथीचीं मोत्यें, मंद स्मिताच्या कांतीनें, फिरून पांढरीं करून टाकूं लागल्या; पांढरेपणामुळें उपयोगी असतांही नादाच्या अडचणीमुळें निरुपयोगी झालेल्या नूपुरांस काढून घेऊन पदरांत गुंडाळून ठेवूं लागल्या; श्यामवर्ण कटाक्षांच्या कांतीलाही प्रतिकूळ समजूं लागल्या; घाई असतांही पायाच्या धबधब आवाजाच्या भितीमुळें हळुहळू चालूं लागल्या; प्रियकरांच्या घराच्या दाराशीं येऊन पोंहचल्या असतांही लज्जेमुळें "दार उघडा" असें ह्मणण्याला जीभ उचलत नसल्यामुळें काढून घेतलेलीं नूपुरें फिरून पायांत घालून हळुहळू वाजतील असें करूं लागल्या; आणि दारें उघडितांच विजेप्रमाणें झपकन आंत शिरूं लागल्या.

भागीरथीच्या आणि चांदण्याच्या एकत्र होणाऱ्या शुभ्र प्रभा काशींतील राहणारे लोकांस अतिशय आनंद देऊं लागल्या. भागीरथीच्या पाण्यांत पडलेलीं काशींतील इमारतींचीं प्रतिबिंबें क्षीरसागरांत उभे राहिलेल्या अनेक मंदर पर्वतांप्रमाणें दिसूं लागलीं. वरची चंद्रप्रभा आणि

खालची चांदण्याची प्रभा ह्या काशींत सर्वदा निवास करून राहिलेल्या सरस्वती देवीच्या वरल्या आणि खालच्या दांतांच्या पंक्तीची भ्रांति उत्पन्न करूं लागल्या. भागीरथीच्या जळामध्यें शिरलेले चंद्राचे किरण जणों स्वतः केलेल्या अनेक विरहिणी स्त्रियांच्या वधरूप पापांतून मुक्त होण्यासाठीं स्नान करूं इच्छीत असावे असे दिसूं लागले. आणि भागीरथीचा तसाच चांदण्याचा समागम शत्रुजिताच्या आणि कुसुमायुधाच्या कीर्तीच्या समागमाप्रमाणें भासूं लागला.

काशीमध्यें घरोघर दुर्गापूजनसंबंधी महोत्सव होऊं लागले. वर्षाच्या नियमाप्रमाणें शत्रुजितानें नवरात्राच्या महोत्सवासाठीं सर्व प्रकारची सामुग्री तयार करवून विद्वान ब्राम्हणांस आमंत्रणें देण्यांत आलीं; भूतशुद्धि, प्राणप्रतिष्ठा तसेच मातृकान्यास करून, दीपकाची स्थापना केली आणि सुवर्णाच्या पात्रांत शक्ति गंधाष्टकानें नवकोष्टयंत्र लिहून ईशान्य कोपऱ्याकडून आग्नेय कोपऱ्यापर्यंत पहिल्या पंक्तीच्या आंत गौरीसहित रुद्राची, स्वरासहित ब्रम्हाची आणि लक्ष्मीसहित विष्णूची स्थापना केली. मधल्या पंक्तीमध्यें उत्तरेकडून दक्षिणेकडे महाकाली, महालक्ष्मी आणि महासरस्वती यांची स्थापना केली. तिसऱ्या पंक्तींत वायव्य कोपऱ्यापासून नैऋत्य कोपऱ्यापर्यंत दशानना, अष्टादशभुजा आणि अष्टभुजा यांस स्थापिलें. अष्टादशभुजेच्या दक्षिण भागीं सिंहाची आणि उत्तर भागीं महीषाची स्थापना केली. या यंत्राची प्राणप्रतिष्टा करून आणि शोडशोपचार पूजा करून स्तुति केली आणि कवच, अर्गला, कीलक आणि रात्रि सूक्त यांचा पाठ केला; तसेंच नवार्ण मंत्राचे ऋष्यादिन्यास करून एकादशन्यासही केले. नंतर नवार्णाचे षडंगन्यास आणि व्यापन करून शक्तींचें ध्यान करण्यांत आलें आणि मानस पूजा करून मालापूजनपूर्वक एकसहस्त्र नवार्ण मंत्राचा जप केला. पुढें सप्तशतीच्या पाठासंबंधी न्यासादिक करून पाठ वाचण्यासही आरंभ झाला. तेरा क-

वचें पूर्ण झाल्यानंतर षडंगन्यास आणि नवार्णाचा जप आणि देवीसूक्ताचा पाठ करून तीन्ही रहस्यांचाही पाठ करण्यांत आला. या प्रमाणें अनेक ब्राम्हणद्वारा अनेक प्रकारचीं अनेक पुरश्चरणें व दशांश हवनेंही करविलीं. कुंडांतून अग्नीच्या उजवे बाजूस निघणाऱ्या ज्वाळा शत्रुजित् आणि कुसुमायुध यांच्या भावी अभ्युदयास सुचवूं लागल्या. ब्राह्मणांच्या मंत्रोच्चाराचे शब्द जणों सर्व प्रकारच्या विघ्नांस नासून दिगंतपर्यंत पसरत असावे अशा रीतीनें ऐकूं येऊं लागले. आकाशपर्यंत जाऊन भिडलेली धुराची रेषा जणों सर्व देवतांस समर्पण केलेले भाग उचलून स्वर्गीं पोंचते करण्यासाठीं अग्नीनें शिडीच बनविली असावी अशी शोभूं लागली. धूप दीप आणि नैवेद्य यांचा सुगंध सर्व दिशांस व्यापून राहिला. कर्माची समाप्ति झाल्यानंतर जेणें करून ब्राह्मणांचें दारिन्द्य दरिद्री स्थितीला प्राप्त होईल इतकी दक्षणा त्यांस देण्यांत आली. दक्षिणेनें संतुष्ट होऊन ब्राह्मण आशीर्वाद देऊं लागले. लोहाभिसारिका नांवाची क्रिया जी नव नात्रांमध्यें राजांनीं अवश्य केली पाहिजे ती सुद्धां यथाविधि करण्यांत आली. या क्रियेमध्यें उच्चैःश्रव्याच्या तसेंच रेवताच्या प्रतिमांचें पूजन करून छत्र, चामर वगैरे राजचिन्हांची, हत्ती, घोडे वगैरे वाहनांची, धनुष्य वगैरे शस्त्रांची आणि नौबत वगैरे वाद्यांची सुद्धां पूजा करण्यांत आली. घोड्यांची आरती करून प्रार्थना झाली; आणि आवश्यक द्रव्यांचा होमही करण्यांत आला. विजया दशमीच्या दिवशीं मोठी स्वारी काढून शत्रुजित् आणि कुसुमायुध यांनीं घोड्यावर बसून पुरोहित लोकांसहित अपराण्हसमयीं शहरापासून दूर ईशान्य कोपऱ्यास जाऊन अपराजितेचें पूजन केलें आणि त्यानंतर शमी वृक्षापाशीं जाऊन स्वास्तिवाचन करून शमीची, दिक्पालांची, आणि वास्तु देवतांची पूजा केली. पूजा झाल्यावर शमीच्या मूळांतील भिजलेल्या अक्षतांसहित माती घेऊन वाजत गाजत दरबारांत येऊन दाखल झाले आणि सर्व स्वजनां-

सहित मोठा उत्सव केला. सौभाग्यवती स्त्रियांच्या हातून ओंवाळून घेतलें. याप्रमाणें शरदृऋतूंतील चंद्राच्या किरणांबरोबरच महोत्सवही फार प्रकाशूं लागले. नृत्यगायनाची मोठी बहार उडूं लागली; नाचणाऱ्या वेश्या आपल्या आंगांबरोबरच पाहाणाराच्या चित्तालाही भ्रमण करवूं लागल्या. नाचतांना उघडीं होणारीं वेश्यांचीं अंगें पाहणाऱ्या स्त्रियांना सुद्धां पुरुषभावनेची इच्छा उत्पन्न करूं लागलीं. वेश्यांच्या पायांतील विचित्र चाळांस अनुसरून वाजणारे घुंगुर स्त्रियांस वश्य होऊन राहणाऱ्या पुरुषांस उत्कृष्ट दृष्टांतरूप होऊं लागले. शुक्लपक्षांतील चंद्राच्या कलांबरोबरच कामदेवाच्या अभिमानाच्या कलाही वाढूं लागल्या. शेवाळ संपादन करूं लागलेल्या नद्या, जणों येणाऱ्या वसंत ऋतूंतील थंडीच्या भीतीनें जाड जाड रजया तयार करूं लागल्या असाव्या अशी शंका येऊं लागली. शरत्कालाचें नवें राज्य स्थापन होतांच मयूर माजी अधिकाऱ्यांप्रमाणें मुके होऊन बसले; हंस नव्या अधिकाऱ्यांप्रमाणें कोलाहल करूं लागले; तारे फारा दिवसांच्या कैद्यांप्रमाणें मुक्त होऊं लागले. काजवे नव्या कैद्यांप्रमाणें गुप्त स्थळीं नेऊन ठेवण्यांत आले. विजा झालेल्या वेश्यांप्रमाणें दिसत नाहींशा झाल्या. चंद्राचे किरणांची प्रसृति नवीन वेश्यांप्रमाणें उत्कर्ष पावूं लागली. बगळ्या जुन्या राणीप्रमाणें खिन्न होऊन बसल्या. कुंझपक्षिणी नवीन राणीप्रमाणें मौजा मारूं लागल्या. चिखल जुन्या हुजऱ्यांप्रमाणें सुकून गेला आणि रजःकण नव्या हुजऱ्यांप्रमाणें सर्वत्र संचार करूं लागले. अंधकार जुन्या कायद्याप्रमाणें मोडून जाऊं लागला. प्रकाश नव्या कायद्याप्रमाणें सर्वत्र अंम्मल चालवूं लागला. मेघ जुन्या मनुष्यांप्रमाणें पातळ होऊन गेले आणि उन्हें नव्या मनुष्यांप्रमाणें दिवसेंदिवस जोरानें प्रखरता पावूं लागलीं.



# प्रकरण २२ वें.

## सद्भाग्यसोपानाची पहिली पायरी.

कित्येक दिवस लोटल्यावर शरत्काल आपला मार्गक्रम पुरा करण्यास तयार झाला. आपल्या शरीरामध्यें नाचूं लागलेल्या कामविकारांवर लज्जा आणि गंभीरता या दोन मोठ्या शिळांचा दाब ठेविण्याची कुसुमायुधाला गरज वाटूं लागली. मनोरमा कुसुमायुधाच्या लग्नासंबंधानें शत्रुजितास वारंवार स्मरण देऊं लागली. नगरवासी जन कुसुमायुधाच्या विवाहाला एवढा उशीर कां याची निरनिराळीं कारणें आपआपल्या परी कल्पून चमत्कारिक तर्कवितर्क करूं लागले. मंत्री कुसुमायुधाच्या विवाहा संबंधें पुष्कळ वेळां आपण केलेल्या विनंतींकडे शत्रुजित् लक्ष देत नाहीं असें पाहून स्वस्थ राहिले आणि थोडेसे घाबरल्या सारखेही झाले. शेवटीं राजा शत्रुजित् सुद्धां, कुसुमायुधाची जन्मपत्रिका करणाऱ्या जोतिषांहीं सांगितलेल्या भविष्यावर त्याची भिस्त होती ती सर्व आतां सोडून देऊन, कुसुमायुधाच्या लग्नाविषयीं आपणच कांहीं खटपट केली पाहिजे असा विचार मनांत आणूं लागला. इतक्यांत एके दिवशीं शातातप नांवाचा एक महायोगीश्वर एका सर्वोतम घोड्यास बरोबर घेऊन शत्रुजिताच्या दरबारीं आला.

हा ऋषि म्हणजे जणों लोकांच्या मनांत पसरलेल्या अंधकाराला नष्ट करण्यासाठीं रूपांतर घेऊन सूर्यच आला असावा; अज्ञानरूपी निबिड अरण्य जाळून खाक करण्यासाठीं मनुष्यरूप धारण करून अग्निच आला असावा; काशीमध्यें मरण पावणारांस तारक मंत्राचा उपदेश देण्याचे परिश्रम

करणाऱ्या विश्वेश्वराला विश्रांति देण्यासाठीं सनत्कुमार आले असावे; आणि काशीमध्यें मरण पावणाऱ्या सर्व प्राण्यांस मुक्ति मिळत गेल्या-कारणानें आपली सृष्टि रिकामी पडेल असें पाहून त्या प्रकरणीं विश्वे-श्वरापाशीं कांहीं वष्टि चालविण्यासाठीं ब्रम्हा आला असावा असें भासूं लागलें. या योगीश्वराचा जटाजूट जणों संचय करून ठेविलेल्या तपश्चर्येच्या बीजांचें मोठें कोठारच होय; यम आणि नियम इत्यादि योगांच्या नियमांचें विघ्नांपासून निवारण करण्यासाठीं बांधलेले किल्लेच होत; ब्रम्हलोकास चढून जाण्यासाठीं एकत्र करून ठेवलेल्या दोरखं-डाचा ढीग होय; गरुडाच्या भीतीनें शरण आलेल्या सर्पांचा समुदाय होय; आणि योगरूपी कल्पवृक्षांच्या मुळ्यांचा समूह होय असें वाटूं लागलें. त्याच्या आंगावरील पांढरी रोमराजि जणों तपानें मिळविलेल्या अद्भुत यशाचे किरण होत; शरीरांत न सामावणाऱ्या शांतीच्या प्रवा-हाच्या बाहेर निघणाऱ्या धारा होत; आणि ध्यान करून हृदयांत भर-लेल्या भागीरथीच्या जळानें सेचन पावलेल्या ब्रम्हबीज ओंकारांतून बाहेर निघालेले कोंब होत; अशा प्रकारें ती शोभत होती. या योगीश्वरानें हातांत धरलेल्या स्मरणीचे स्फटिक मणि जणों औदार्याचा अभ्यास करण्यासाठीं आलेले चिंतामणिच होत; परक्याचा ताप हरण करण्याची पद्धति शिकण्यासाठीं आलेलीं चंद्राचीं पोरेंच होत; आणि हृदयांत वस-णाऱ्या सरस्वतीस वाहून तिची सेवा करणाऱ्या हंसांचीं अडीं होत ; अशा प्रकारें ते शोभत होते. त्याच्या ललाटीं लाविलेल्या भस्माच्या त्रिपुंड्राच्या रेखा तीनही वेदांच्या जयपताकांची, ब्रम्हादि तीन देवांस बसण्याच्या स्फटिक शिलांची, आणि कायावाचामनानें पाळलेल्या स-त्याच्या तीन पद्धतींची भ्रांति उत्पन्न करूं लागल्या. अकराशें रुद्राक्षांनीं अलंकृत झालेला, पापण्यांस स्पर्श करणाऱ्या पांढऱ्या भिवयांनीं शोभणारा, वारंवार पंचाक्षरी मंत्राच्या जपानें ज्याचे ओठ हालत आहेत असा, पिंव-

ळ्या बाहुल्यांनीं चकचकणाऱ्या नेत्रांमुळें भयंकर वाटणारा, नाभीपर्यंत लांब दाढीवाला, सर्व शरीरावर केलेल्या भस्माच्या उद्धूलनानें हिमालयाच्या शिखराप्रमाणें दिसणारा, तपाच्या प्रभावानें ब्रह्मांडासही चळचळ कांपविण्याची शक्ति असलेला, शरीरांत न सामावणाऱ्या अलोट तेजानें युक्त, शांत असूनही उग्रस्वरूप दिसणारा, जणों सर्व तपस्व्यांच्या एकत्र मिळालेल्या तपांचा पिंडच होय असें जाणविणारा; महापाप्यांसही दर्शनमात्रेंच पवित्र करण्याची शक्ति धारण करणारा; सेवा करणाऱ्यांस कृपेनेंच चारही पुरुषार्थांची जोड करून देणारा; आणि सर्व विद्यांचा आधार असा तो योगीश्वर घोड्यासहित दरबारांत प्राप्त झाला असतां, दरबारी, सर्व लोकांस परम विस्मय वाटूं लागला. हा कोण ब्रह्मा आहे?—रुद्र आहे?—विष्णु आहे?—सूर्य आहे?—अग्नि आहे?—अथवा दुसराच कोणी देव आहे काय?—असा सगळ्यांच्याही मनांत संशय येऊं लागला. त्याचें शरीर तेजाच्या प्रकर्षामुळें त्याजकडे न पाहवविणारें असतांही सौम्य, प्रियदर्शन आणि अवयवांच्या प्रौढ रचनेनें शोभणारें असें होतें. त्याची प्रभा रुचिर, स्वच्छ, चकचकित, आणि अपरिमेय अशी होती. त्याच्या ठिकाणीं गंभीरता समुद्रासारखी, तितिक्षा पृथ्वीसारखी, स्थिरता हिमालयासारखी, तेजस्विता सूर्यासारखी, प्रभाव सदाशिवासारखा आणि निर्मळता स्फटिकासारखी होती. त्याच्या हातांत दीर्घ काळपर्यंत चाललेल्या जीवनाच्या मित्रासारखा, त्याचें तोंड उंच असल्याकारणानें जणों ब्रह्मलोकचा मार्गच दाखवीत असावा असें भासविणारा आणि अनेक तीर्थांच्या उदकांनीं भरलेला असा एक कमंडलु होता.

या योगीश्वरास पाहून सर्वांच्या मनास वाटूं लागलें कीं "अशा पुरुषास येथें येण्याचें काय प्रयोजन असावें? लोकांस नाचविणारी तृष्णा तर अशा व्यक्तीच्या अंतःकरणास स्पर्श करण्यालाही भ्यावयाची आणि स्पर्श करतांच ताबडतोब भस्मसात् होऊन जावयाची. या महात्म्या पुरुषानें

जन्म घेऊन ज्या जननीचें स्तनपान केलें असेल त्या जननीच्या भाग्याचें वर्णन कोण करूं शकेल? असे महात्मे पुरुष दिव्यचक्षूंनीं सगळ्या ब्रह्मांडासही पहात असावे. अशा पुरुषांचीं जेथें जेथें पावलें लागतील तो देश, तें नगर आणि तें स्थळही प्रणाम करण्यास योग्य होय. अशा निःसंग पुरुषानें आपल्यावरोबर घोडा काय कारणास्तव आणिला असावा? महात्म्यांचीं चरित्रें अतर्क्य होत, आणि आपण ह्मणूनच या घोड्याविषयीं विचार करण्याला योग्य नाहीं. हा घोडा साधारण प्रतीचा नव्हे; कांहीं तरी अलौकिक दिसत आहे, त्यावरून यांत कांहीं तरी खोल कारण असलें पाहिजे. नाहीं नाहीं, महात्म्या पुरुषांजवळ जे जे पदार्थ असतील ते सर्व अलौकिकच असतात. ज्याच्या क्रोधानें सर्व त्रैलोक्य कांपणार त्यासही जरा कांपविते. क्रोधरूपी अग्नि शांतिरूप शीतळ जळानें कांठोकांठ भरलेल्या या पुरुषाच्या अंतःकरणरूपी सागरामध्यें प्रवेश केला असतां स्वतः हा गोंधळून जाण्याचीच शंका धरीत असावा. अशा तेजस्वी पुरुषापाशीं त्याच्या आगमनाचें कारण विचारण्यास जाण्याचीही कोणाची प्राज्ञा? अहो! याच्या अवयवांवर पडतांना सूर्याचे किरण यत्किंचितही भीत नाहींत आणि याच्या दाढीच्या केसांस कांपवितांना वायुही बिलकुल घाबरत नाहीं. आपले डोळे मात्र त्याच्या तेजानें दिपावतात; पण आपलीं अंतःकरणें तर त्याच्या तेजांतच लीन होऊं लागतात. हा निरंतर सेवन करित असतांही ज्यापेक्षां रुद्राक्ष उज्वळ झाले नाहींत आणि स्फटिकाची स्मरणी या महात्म्याच्या हातांतच निरंतर राहिली असतांही ज्यापेक्षां तिचें जाड्य दूर झालें नाहीं त्यापेक्षां हें मोठेंच आश्चर्य ह्मटलें पाहिजे. तपाचा प्रभाव अद्भुत आहे; कारण कीं ओळखीशिवाय आणि राजाच्या सारख्या रजोगुणी वैभवाशिवायही आपल्यास अभ्युत्थान देण्याविषयीं तें भाग पाडतें."

या प्रमाणें विचार करीत असतां आणि आपआपसांत बोलत असतां सर्व दरबारी लोक जणों त्याच्या तेजाच्या किरणांच्या रज्जूंनीं आकर्षण केले असावे अशा प्रकारें उठून त्यास सामोरे गेले असतां, शातातपानें, जणों कुसुमायुधाच्या भावी अभ्युदयाचे किरणच होत, दयेच्या लहरीच होत, शांत रसाच्या वृत्तिच होत, आणि संपादन केलेल्या विद्येची कीर्तिच होय अशा दांतांच्या प्रभांनीं त्यांच्या भयरूप अंधकाराला दूर करून सांगितलें कीं—"मी शातातप नांवाचा मुनि आहें. महाराज शत्रुजिताला भेटावयाची मला उत्कंठा आहे. माझ्या येण्याची त्यास खबर पोंचवा." पूर्वेकडील वायूनें भ्रमर जसे मागें फिरतात त्याच प्रमाणें त्या योग्याच्या आज्ञेनें ते लोक मागें फिरले आणि छडीदाराच्या मुखानें त्यांनीं शत्रुजिताला खबर देवविली. ही बातमी कळतांच शत्रुजित् लागलाच आसनावरून उठून उभा राहिला आणि अनवाणींच देवडीपर्यंत आला. तेथें शातातपाच्या प्रभावानें अद्भुत प्रकाश पडलेला दिसत होता, सर्व दरबारी लोकांचे डोळे एकाग्र झाले होते, आणि पिंजऱ्यांतील पक्षी सुद्धां मौन धरून बसले.

सर्वांगीं भस्म फासलेला; केंसांनीं घेरलेल्या कानाच्या पाळीला छिद्रें असलेला; जणों चित्ताला ब्रम्हरंध्रामध्यें चढविण्यासाठीं आंत बांधलेल्या स्फाटिकमय तीन पायऱ्यांच्या ह्या बाहेर दिसणाऱ्या तीन कडा असाव्या अशा त्रिपुंड्राच्या तीन रेघांनीं शोभणारें ललाट आहे ज्याचें असा; मधुर कटाक्षांहीं जणों सर्व पदार्थांस अमृतानेंच भिजवीत आहे असा दिसणारा; जणों आपल्या इंद्रियांप्रमाणेंच सर्वांचींही इंद्रियें आपल्या स्वाधीन ठेवून उभा आहे असें भासणारा, ताठ शरीराचा असतांही विनयानें नम्र दिसणारा; जणों निरंतर प्राणायामाच्या परिश्रमानें थकून जाऊन जरा हवा खाण्यासाठीं बाहेर आलेल्या इळा, पिंगला आणि सुषुम्णा नांवाच्या तीन नाड्याच होत अशा जानव्याच्या तीन पदरांनीं

शोभणारा; जणों शरीराच्या आंत पसरलेल्या शत्रुगणाचे अंकुरच होत अशा सफेत केशांनीं व्याप्त आहे शरीर ज्याचें असा; जणों योगाच्या प्रभावानें नाश पावण्याच्या भीतीमुळें शरीराच्या आंत तर प्रवेश करितां येत नसल्यामुळें बाहेरच उभी राहिलेली ही जरा होय अशा शुभ्र वस्त्रांच्या जोडीनें शोभणारा; शरीराला दुर्बळ करून टाकणाऱ्या तपश्चर्येंत तत्पर असतांही लंबिका उंच करून जिभेच्या द्वारा ग्रहण करण्यांत येणाऱ्या ब्रह्मरंध्रांतील अमृतानें तृप्ति मिळाल्याकारणानें पुष्ट आहे शरीर ज्याचें असा; आणि योगाच्या प्रभावानें प्राप्त झालेल्या अद्भुततेजाच्या द्वारा पाहणारांच्या मनाला अपार विस्मय देणारा, तो **शा**तातप मुनि प्राप्त झालेला पाहून **श**त्रुजितानें आपल्या शरीराला दुरूनच लववून अशा रीतीनें प्रणाम केला कीं मुकुटांतून गळून पडणाऱ्या मण्यांनीं पृथ्वी शोभूं लागली आणि त्या मण्यांच्या खळखळण्यानें ती जणों **श**त्रुजिताचें अभिनंदन करीत असावी असें वाटूं लागलें. या वेळीं **शा**तातपानें **श**त्रुजिताची पाठ थोपटून फार फार आशीर्वाद दिले. नंतर, " आलां, फार चांगलें केलें, चलावें." असें बोलून व योग्य सन्मान करून **श**त्रुजित् आणखी या प्रमाणें बोलला.

" हे मुनीश्वरा! आज आह्मीं आपल्या आगमनानें उद्देश्य झालों; तेणें करून धर्माच्या रीतीप्रमाणें भाग्यशाली लोकांच्या पंक्तीमध्यें पहिलें नांव घेण्याला योग्य झालों. निपुत्रिक पुरुषाला लग्नाच्या आवडत्या स्त्रीच्या समागमानें प्राप्त झालेला पुत्र आनंद देतो; दरिद्री मनुष्याला स्वप्नांत पाहिल्याप्रमाणें जाग्रत अवस्थेमध्यें प्राप्त झालेला पुष्कळ द्रव्याचा लाभ जसा आनंद देतो; आंधळ्यास दैवाच्या कृपेनें मिळालेली दिव्य दृष्टि आनंद देते; जरेनें व्यापिलेल्यास प्राप्त झालेली अमृताची धार आनंद देते; धान्याच्या सुकून जाणाऱ्या रोप्याला जशी पर्जन्यसुवृष्टि आनंद देते; एकच मुलाच्या बापाला फार वर्षांनीं परदेशाहून परत आलेला पुत्र आनंद देतो;

लोभी मनुष्याला गमावलेलें धन परत मिळालें असतां आनंद देतें; आणि मुमुक्षूला प्राप्त झालेला ब्रम्हबोध जसा आनंद देतो; त्याच प्रमाणें आज आपल्या आगमनानें मला आनंद दिला आहे. महात्म्या जनांचा समागम पूर्व जन्मींच्या पुण्याईनेंच प्राप्त होतो, या जन्मींच्या पापाचा तो विनाश करतो आणि भांवी जन्मामध्येंही फार कल्याण करितो. जो अंधकार अग्नीच्या ज्वालांनींही दूर होत नाहीं, विजेच्या प्रकाशानेंही नाहींसा होत नाहीं, रत्नांच्या चकचकाटानेंही कमी होत नाहीं, आणि सूर्याच्या तेजानें नष्ट होत नाही, तो महात्म्यांच्या समागमानें क्षणार्धांत नाहींसा होतो. गटारांतलें पाणी सुद्धां जसें भागीरथीच्या समागमानें वंदनीय होतें त्याच प्रमाणें पापी पुरुषही महात्म्यांच्या समागमानें पूज्य होतो. कल्पवृक्ष, कामधेनु आणि चिंतामणि ही चिंतिलेलीं मात्र फळें देतात आणि महात्म्याचा समागम चिंतिलेलीं आणि न चिंतिलेलीं सर्वच शुभ फलें देतात. ताप हरण करणाऱ्या पदार्थांमध्यें चंदनाहून कमळ श्रेष्ठ आहे, कमळाहून चंद्र श्रेष्ठ आहे, आणि चंद्राहूनही महात्म्यांचा समागम श्रेष्ठ होय. तुह्मीं इच्छा, भय, क्रोध, राग आणि संताप यापासूनही जे मुक्त आहां ते आज माझ्याकडे आलां आहां हे मोठेंच आश्चर्य समजलें पाहिजे. चंद्राला पाहून उचंबळणारा समुद्र जसा स्वतां आपल्याच पात्रांत मावत नाहीं त्याच प्रमाणें आपणास पाहून हर्षानें प्रफुल्लित झालेला जो मी तो माझ्या ठिकाणींच मी सामावत नाहींसा झालों आहें. सूर्याच्या दर्शनानें जसें शीत, सिंहादिकांचें भय, आणि अंधकार हीं तीनही नाश पावतात, त्याच प्रमाणें महात्म्यांच्या दर्शनानें जडता, पुनर्जन्माचें भय, आणि अज्ञान या तीनही उपाधि टळतात. आज माझीं सगळीं पुण्यें सफळ झालीं, नरदेह कृतार्थ झाला, पितर मुक्ति पावले, आणि विश्वेश्वर प्रसन्न झाले असेंच मी समजतों." या प्रमाणें बोलून शातातपाच्या घोड्याला आपल्या खासदाराच्या हातीं

देऊन व मुनीचा हात धरून शत्रुजितानें त्यास सभेच्या दालनांत घेऊन जाऊन आपल्या सिंहासनावर बसाविलें आणि स्वतां आपण त्याच्या चरणाशीं बसला. या वेळीं राज्यांतील आश्रित, विद्वान ब्राह्मण, आणि मंत्रीही आणि तमाम सर्व सभासद सभेस आले. फारच आनंदित झालेल्या शत्रुजितानें आपल्या हातानें पाद्य, अर्घ्य, आणि वस्त्रादिक आणून त्यास अर्पण केलें. सगळे सभासद, शातातपापाशीं बसलेल्या शत्रुजिताला पाहून बृहस्पतीपाशीं बसलेल्या इंद्राची भ्रांति पावूं लागले. यथाविधि मधुपर्कापासून पूजा केल्यावर शत्रुजितानें पुसलें कीं,—"हे मुनीश्वरा! आपण कायावाचामनानें जें तप संपादन करीत आहां त्यांतून कोणत्याही विघ्नाच्या नडीनें कांहीं खर्चावें तर लागत नाहींना? ज्या वृक्षांच्या पाशीं आलेल्या अतिथि जनांतून कोणासही निराश होऊन परत जाण्याचा प्रसंग येत नाहीं; जे आपल्या सर्व पत्र, पुष्प, फळ, साल आणि काष्ट इत्यादि भागांनीं आणि शेंवटीं जळून राख झाल्यावरही त्या राखेनेंसुद्धां परोपकारांतच रत असतात; जे स्वतां वारा, पाऊस, ऊन आणि थंडी इत्यादि पीडा सहन करून दुसऱ्यास सुख देतात; जे आपल्याकडे हजारों याचक आले असतांही कोणत्याही प्रकारच्या चिंतेनें ग्रस्त होत नाहींत; आणि ज्यांस आश्रमस्थळीं आपल्या पुत्रासमान गणून पाट बांधणें तसेंच जलसेचन करणें वगैरे उपायांनीं वाढवितात; अशा वृक्षांस आपल्या आश्रमामध्यें कोणत्याही प्रकारची विपत्ति तर होत नाहीं ना? मृग जे गवत खात असतांही निर्दय लोकांच्या हातांनीं मरण पावतात; जे धनाच्या मदानें अंध झालेल्या लोकांचीं तोंडें आशाळभूत दृष्टीनें कधींही न पाहणारे असल्याकारणानें आणि त्यांची अभिमानाचीं भाषणें ऐकण्याची जरूर नसल्याकारणानें भाग्यशाली समजले पाहिजेत; जे शेतकऱ्यांनीं शेतांत उभे केलेल्या गवताच्या बाहुल्यांनींही भय पावतात; जे अत्यंत निरपराध असतांही दैवाच्या दुर्विलासानें पाशबद्ध हो-

ऊन अनेक संकटांत पडतात; आपल्यासारख्या महात्म्यांच्या आश्रमामध्यें वास करण्यांतच जे निर्भय राहूं शकतात; आणि पूजादिक क्रियेमध्यें उपयोगी पडणारे दर्भ तोडून खात असतांही आपल्यासारख्या दयाळु मुनींकडून यत्किंचितही तिरस्कार पावत नाहींत; त्यांस आपल्या आश्रयामध्यें दुष्ट लोकांकडून कोणत्याही प्रकारची हरकत तर होत नाहीं ना? आणि पाणी जें स्वाभाविकपणेंच शीतळता आणि स्वच्छता यांनीं युक्त असतें; जें स्पर्शानेंही पवित्र करणारें आहे; जें सर्व प्राण्यांस जीवनरूप आहे; आणि जें स्नान तर्पण इत्यादि क्रियेमध्यें उपयोगी असल्याकारणानें आपल्यासारख्या महात्म्या पुरुषांच्याही ममत्वास पात्र होतें; तें कोणी नीच लोक आपल्या आश्रमांत येऊन खराब करून तर टाकीत नाहींत ना? महात्मे पुरुष ज्यांचा आत्मबोध वैराग्यानें आणि उपरतीनें संयुक्त असल्याकारणानें सुगंधयुक्त सुवर्णाचीच उपमा पावतो आणि अशा आत्मबोधामुळें ज्यांस कोणत्याही स्थितींविषयीं अथवा कोणत्याही पदार्थाविषयीं ज्याची बरी वाईट बुद्धि नाहीं त्यांस बरे वाईटाचा प्रश्न करणें ह्मणजे विचारणाराच्या अज्ञानाचेंच आविष्करण झालें ह्मणावयाचें. यास्तव आह्मीं आमच्या कुशलतेविषयींच प्रश्न विचारावा हें योग्य. कारण कीं आह्मी या दुःखाच्या करंड्याप्रमाणें भासणाऱ्या संसारामध्यें पडलों आहों आणि विषयसंबंधी तुच्छ सुखालाच पुरुषार्थ समजत आहों. महामुने! आपण आलां हें फार चांगलें झालें. माझ्या राजधानीला, माझ्या दरबाराला आणि स्वतः मलाही आज अपूर्व पवित्रता प्राप्त झाली आहे. ज्यांच्या घरचें पाणी, आसन अथवा भूमि साधु पुरुष स्वीकारतात ते गृहस्थ कदाचित् धनानें हीन असोत तरी भाग्यशालीच समजले पाहिजेत. ज्या घरामध्यें महात्मे पुरुषांच्या धुतलेल्या चरणांचें पाणी कधींही पडत नाहीं तें घर सर्व समृद्धीनें परिपूर्ण असतांही सर्प राहण्याच्या वारुळाप्रमाणेंच लेखिलें पाहिजे. आपल्यासारख्या निःस्पृह

पुरुषांस आगमनाच्या प्रयोजनाविषयीं प्रश्न करणें ह्मणजे जणों एक प्रकारची धृष्टताच होणार आहे, तरी ज्यापेक्षां आपल्या आगमनानें आपण आह्मांस मोठेपणा दिला आहे त्यापेक्षां आमच्या ह्या धृष्टतेला तुह्मी दोषरूप लेखणार नाहीं असें मी समजतों. माझे प्राण, स्त्री, पुत्र, राज्य, सैन्य, पृथ्वी आणि भांडार हीं सर्व आपल्यासारख्या महात्मे पुरुषांचींच आहेत. यास्तव 'हीं आपणास मी देतों' असें बोलतेवेळीं मला लज्जा उत्पन्न होते. एवढ्याचसाठीं मला इतकें बोलणें योग्य वाटतें कीं सेवकजन स्वामीचे पदार्थच स्वामीला अर्पण करतो, तसा मी तुमचेच पदार्थ तुह्मास अर्पण करीत आहें."

"शत्रुजित्महाराज! आपलें भाषण आपल्या कुलीनपणाला आणि महाशयपणाला साजेसें आहे. जी गोष्ट मनांत आली असेल ती भाषणांत व्यक्त करितां येणें आणि भाषणांत व्यक्त केली असतांनाही अर्थ यथास्थित प्रकाशित करतां येणें, या गोष्टी साधणारे वक्ते जगांत फार थोडे. नेत्र, ललाट, भृकुटी अथवा दुसरेही कित्येक अवयव यामध्यें कोणताही अनुचित विकार न दाखवितां स्पष्ट अर्थाचें, स्पष्ट अक्षरवटिकेचें आणि मध्यम स्वराचें तुमचें हें भाषण कोणाचे कान तृप्त करणार नाहीं? आणि कोणाच्या चित्तास आल्हाद देणार नाहीं? लक्ष्मीच्या भारानें दबून गेले असतांही लघु रहाणारे, सरस्वतीच्या योगानें उन्नति पावले असतांही नम्र असणारे, आणि स्वस्थ असतांही परोपकारामध्यें व्यग्र असणारे पुरुष पृथ्वीला अलंकाररूपच समजले पाहिजेत. महाराज! कोणी दुष्ट दैत्य आमच्या आश्रमामध्यें येऊन कारणावांचून त्या आश्रमाचा विध्वंस करीत आहे. एखाद वेळीं सिंहाचें, एखाद वेळीं हत्तीचें, एखाद वेळीं अस्वलाचें, एखाद वेळीं वानराचें, एखाद वेळीं लांडग्याचें, एखाद वेळीं डुकराचें, अथवा असल्याच एखाद्या लहान मोठ्या प्राण्याचें रूप धारण करून तो आश्रमवासी जनांस भेवडवीत असतो. मी मौनव्रत धरून ध्यानस्थ बसलों

असतां अथवा समाधि घेतली असतां अचूक त्याच वेळीं हा दैत्य असें कृत्य करतो कीं तेणें करून माझें मन चलितच व्हावें. जरी शापरूप अग्नीनें आह्मी या दुष्टास जाळून भस्म करण्यास समर्थ आहों तरी वाणी जसा परिश्रमानें मिळविलेल्या धनाचा व्यय करण्यास कांकूं करतो, त्याच प्रमाणें आह्मींही मोठ्या परिश्रमानें संपादिलेल्या तपाचा व्यय अशा रीतीनें करण्यास इच्छित नाहीं. एके दिवशीं मीं या कष्टांस कंटाळून सूर्याची आराधना मांडली. तेव्हां सूर्याकडे दृष्टि ठेवून खोल आणि उष्ण निःश्वास टाकीत असतां जणों विमानांतून कोणी देव पडावा तसा सूर्यमंडळावरून एक घोडा माझ्यापुढें पृथ्वीवर पडला. आणि त्याच वेळेस कांहीं अपूर्व वाणीही माझ्या कानीं पडली कीं—' हा घोडा मनाच्या संकल्पाप्रमाणें पृथ्वी, पाताळ, आकाश, जळ, पर्वत अथवा दुसरें कोणतेंही बिकट स्थळ यांत संचार करतांना अडणार नाहीं किंवा थकणार नाहीं. काशीच्या शत्रुजित् नामें राजाचा पुत्र कुसुमायुध, या घोड्यावर बसून तुमच्या तपास विघ्न करणाऱ्या दैत्यास मारील.' महाराज! सूर्यनारायणाची ही वाणी ऐकून, हा घोडा घेऊन मी तुमच्यापाशीं आलों आहें. माझ्यावर दया करा, आणि आपल्या पुत्रास मजबरोबर पाठवा. आह्मी तपस्वी लोक तुमचीच प्रजा आहों. प्रजा जो कांहीं धर्म अथवा अधर्म आचरते त्यांतून राजाला भाग मिळत असतो, यास्तव आमचें रक्षण करून आह्मीं आचरलेल्या धर्माला विभागी व्हा.'

शातातप मुनीचें हें भाषण ऐकून, जोशांनीं कुमाराच्या संबंधानें केलेलें भविष्य खरें ठरण्याचें हें एक द्वार उघडलें आहे, आणि गोब्राह्मणांचें रक्षण करणें हा क्षत्रियाचा मुख्य धर्म होय असें समजून आनंदित झालेल्या शत्रुजित् राजानें मनोरमा राणीची तशीच मंत्र्यांची संमति घेऊन कुसुमायुधास शातातपाबरोबर जाण्याची आज्ञा दिली.

# प्रकरण २३ वें.

## सृष्टिसौंदर्याविषयीं कुसुमायुधाचे विचार.

पित्याची आज्ञा मिळतांच अवयवा अवयवांमध्यें व्यापून राहिलेल्या उत्साहानें जणों दुप्पट पुष्ट झाला असावा; उभारलेल्या रोमांचांनीं जणों स्वभावसिद्धच चिलखत ल्याला असावा; वारंवार स्वभुजांकडे पहात असल्याकारणानें जणों शस्त्राच्या साहाय्यावांचून एकट्याच भुजदंडानें सर्व कार्य उरकूं पहात असावा; सुवर्णानें मढविलेलें चिलखत धारण केलें असल्याकारणानें जणों वीरलक्ष्मीला वरण्यासाठीं केशरी रंगाचा पोशाक करून उभा असावा; हातीं घेतलेल्या खड्गाच्या प्रभेनें व्याप्त झाला असल्याकारणानें जणों वीरलक्ष्मीच्या कटाक्षांनींच व्याप्त झाला असावा अपूर्व धैर्यानें आणि अंगाअंगाच्या ठिकाणीं व्यापून राहिलेल्या गर्वानें जणों मनुष्याचें रूप धरून वीररसच प्रत्यक्ष होत असावा; सुवर्णमय अलंकारांच्या प्रभांनीं जणों वीररसाच्या शास्त्रप्रसिद्ध हेमवर्णपणाला प्रत्यक्ष दाखवीत असावा; उद्धट आकारानें जणों त्रैलोक्यासही तृणसमान लेखीत असावा; आणि धनुष्याच्या दोरीच्या तीव्र टंकारांनीं जणों दैत्यासाठीं यमपुरीचें द्वारच खुलें ठेवण्याविषयीं यमराजाला सूचना देत असावा; असा दिसणारा कुसुमायुध स्वस्तिवाचन करवून मातापितरांस तसाच गुरुजनांस प्रणाम करून देवडीवर आला आणि शातातप मुनीबरोबर जाण्यास सिद्ध झाला.

तो घोड्यावर बसून निघतांच दुंदुभींची अद्भुत गर्जना होऊं लागली. दुंदुभींचा नाद पर्वतांच्या गुहांमध्यें निजलेल्या सिंहाचा निद्राभंग करूं लागला आणि शत्रूंच्या स्त्रीयांचा गर्भपात करूं लागला. खणखणाटानें

दुंदुभींच्या ध्वनीलाही दाबून टाकणारा; वेगानें जणों पृथ्वीलाही आपल्याबरोबरच ओढून घेत असावा असा दिसणारा; आपल्याबरोबरच धावणाऱ्या आपल्या छायेची सुद्धां प्रतिस्पर्धा करीत असावा असा दिसणारा; आपल्या वेगानें विखरून गेलेल्या वायूलाही पुढें जाऊन कोठेंही येऊन मिळण्यास अवकाश न देणारा; आपल्या गतीला सगळी पृथ्वीही पुरेशी नाहीं असें जाणून समुद्र भरून काढूं इच्छीत असावा अशा प्रकारें धुळीचा लोट वर चढविणारा; नियमित पंथ क्रमणाऱ्या सूर्याच्या घोड्यांविषयीं तिरस्कार दाखविण्यासाठीं त्यांच्या डोक्यांवर पाय ठेवूं इच्छीत असावा अशा प्रकारें पूर्व भागावरून आकाशांत उड्या मारणारा; खुऱ्यांच्या आघातानें जखमी झालेल्या पृथ्वीला मलमपट्टी करण्यासाठीं अश्विनीकुमारांस जणों हाका मारीत असावा अशा प्रकारें वर तोंड करून आकाशाकडे खिंकाळणारा; सावली करून कुसुमायुधाला प्रसन्न करूं इच्छीत असावा अशा प्रकारें धुळीच्या लोटांनीं सूर्यालाही आच्छादून टाकणारा; वेगानें जात असतां प्यायलेल्या वायूस जणों परत बाहेर काढून टाकीत असावा अशा प्रकारें नाकपुड्या फुरफुरावणारा; वायूच्या गतीचा आणि आपल्या गतीचा हिशोब टांचून ठेवण्यासाठीं जणों लेखण्याच जवळ ठेवल्या असाव्या अशा ताठ उभारलेल्या कानांनीं शोभणारा; युद्धामध्यें मरणाऱ्या शत्रूसही भगवंताचें दर्शन घडवून मुक्ति देण्यासाठीं शाळिग्रामाची जणों जोडी जवळ ठेविली असावी अशा नेत्रांच्या जोडीनें चमकणारा; बिजेच्या चंद्राप्रमाणें पातळ आणि वाकड्या अशा तोंडानें शोभणारा; उज्वलता आणि चकचकीतपणा या गुणांमध्यें हरवून घेतलेले चंद्राचे जणों लांब लांब किरणच असावे अशा केशांनीं युक्त; अनेक राज्यांमध्यें भ्रमण केल्यामुळें थकून गेलेल्या राज्यलक्ष्मीला निजण्यासाठीं जणों पलंगच केला असावा अशा विशाळ पाठीचा; आपल्यावर बसणाऱ्या स्वाराचें रक्षण करण्यासाठीं जणों पुढें ढालच धरली असावी

अशा मजबूत छातीचा; आपल्यावर बसलेल्या स्वारांचा राज्यलक्ष्मीशीं विवाह करून देण्यासाठीं चौरंग तयार करून ठेविला असावा अशा त्रिकानें युक्त; निष्कलंकपणामुळें पुनवेच्या चंद्राचाही तिरस्कार करणाऱ्या ललाटानें शोभनारा; मजबूत नळगुडीचा आणि कमानी-प्रमाणें रमणीय खांद्याचा; असा हा दिव्य घोडा थोड्याच अवकाशांत शेकडों योजनें चालून जाऊन मनाच्या वेगानें शातातप ऋषीच्या आश्रमास येऊन पोंचला.

घोड्याचें रूप आणि वेग पाहून विस्मयानें भरून गेलेला कुसुमायुध आपल्याशींच कल्पना करूं लागला कीं—"ह्या घोड्याला विधात्यानें अनध्यायाच्या दिवशींच निर्माण केलें असावें असें वाटतें. हा घोडा एकटाच ब्रह्मांडाएवढ्या रथालाही ओढून नेण्यास समर्थ आणि प्रबळ गतीचा असल्याकारणानें राहूलाही येऊन पोंचूं देत नसावा असा आहे, आणि ह्मणून त्यासच आपल्या रथाला न जोडतां सूर्यानें सात घोडे काय कारणास्तव जोडले असावे हें लक्षांत येत नाहीं. सूर्याचा सारथि जो अरुण त्यासही ह्या घोड्याची माहिती नसावी असें अनुमान होतें, नाहीं तर सात सात घोड्यांची बरदास्त ठेवण्याची त्रासदायक नो-करी तो कशासाठीं करता? इंद्राचा सारथि मातलि यासही या घोड्या-विषयीं कांहीं माहिती असावी असें दिसत नाहीं. नाहीं तर हा घोडा मागून घेण्याविषयीं इंद्राला त्यानें विनंति केली असती. मग इंद्राच्या रथाचे हजार घोडे संभाळण्याची, वागविण्याची, जोडण्याची आणि हा-कण्याची कडाकूट तो कां ह्मणून करता? विष्णूचा सारथि दारुक यास किंवा स्वतः विष्णूसही आजमितीपर्यंत हा घोडा दृष्टिगोचर झाला नसावा. नाहीं तर दारुक सारथि, शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प आणि बला-हक नांवाचे विष्णूचे चार चार घोडे संभाळण्याचे व्यर्थ परिश्रम कां करता? आणि विष्णुही जरूरीच्या कामाच्या वेळीं लौकर जाऊन पोंचावें

ह्मणून जवळ बाळगलेल्या गरुडासारख्या बेडौल आणि हिंसक जनावराला कांह्मणून रजा देत नाहीं ? उच्चैःश्रवा कमी चपल असल्यामुळें जणों अनेक युद्धांमध्यें इंद्राला दैत्यांच्या हातून मार बसविला तरी त्यास इंद्र आजपर्यंत अश्वरत्न ह्मणून मानतो त्याचें कारणही त्यास ह्या घोड्याची माहितगारी नसावी; याशिवाय दुसरें काय असेल ? इंद्रानें मंथन करून क्षीरसागराला फारच पीडल्यामुळें क्षीरसागरानें ह्या घोड्याविषयीं कांहींएक बातमी न कळूं देतां उच्चैःश्रवा देऊन त्यास चांगलेंच ठकविलें असें ह्मटलें पाहिजे. सूर्य, इंद्र आणि विष्णु यांस या घोड्यावर बसण्याचें भाग्य ज्यापेक्षां मिळालें नाहीं त्यापेक्षां त्यांस जन्माचें साफल्य प्राप्त झालें नाहीं असें ह्मटलें पाहिजे."

याप्रमाणें कल्पना करीत असतां आणि देवाहूनही आपणास कृतार्थ मानीत असतां शातातपाच्या सांगण्यावरून कुसुमायुध घोड्यावरून खालीं उतरला. त्याबरोबर पुढें येऊन शातातपाच्या शिष्यांनीं तो घोडा घेऊन जाऊन, धुऊन, घासून, पुसून, मळून, खरारा करून, दाणा घालून, सुंदर गवताच्या कुरणामध्यें नेऊन बांधला आणि कुसुमायुध ऋषिचा हात धरून त्याच्या आश्रमांत गेला. पुढें कित्येक दिवसपर्यंत सन्मानपूर्वक तो तेथेंच राहिला.

ह्या आश्रमांतील सगळेच वृक्ष कोकिलांच्या कूजितांनीं स्वागत करून पानांच्या भारानें नम्र झालेल्या शाखांनीं प्रणाम करून, निबिड सावलीमध्यें भ्रमरांच्या गुंजारवानें बसण्याविषयीं सांगून, पुष्पांच्या वृष्टीनें पूजन करून, आणि मधुर आणि मिष्ट फळांचा उपहार देऊन, जणों अतिथींचा सत्कारच करीत आहेत असे दिसत होते. शातातपाच्या प्रभावानें सगळे वृक्ष अमुकच देशांत उत्पन्न व्हावयाचे या नियमाचें तसेंच अमुक ऋतूंतच त्यांवर फलपुष्पें धरावयाचीं या नियमाचेंही उल्लंघन करून फलपुष्पांनीं ते ओथंबले होते. स्वतां उन्हांत उभें राहून दुसऱ्यास

छाया देणारे ; स्वतां थंडी सोसून दुसऱ्याचें थंडीपासून निवारण करणारे; स्वतां पानांचा वगैरे मोठा भार सहन करून दुसऱ्यांस विश्राम देणारे; कोणत्याही प्रकारचा मोबदला मिळण्याविषयीं आशा न धरतां अतिथींस फळें वगैरे अर्पण करून तृप्त करणारे; येणारे जाणारे लोक छिन्न भिन्न करून टाकीत असतांही आपला सहनशीलपणा न सोडणारे; कोणी आपल्यास पाणी घालील काय ह्याची अपेक्षा न ठेवितां आपले आपणच आपला निर्वाह चालविणारे; हजारों पक्ष्यांसही आश्रय देणारे; वानर आणि इतर जीव यांसही आराम देणारे; भ्रमरांसही संतुष्ट करणारे; कोणासही निराश न करणारे; घेऊं येणाऱ्यास आपल्यापाशीं असणाऱ्या कोणत्याही वस्तूविषयीं नाहीं न म्हणणारे; आपल्यापासून पुष्कळ सुख पावलें असतांही तें विसरून जाणाराविषयीं आणि कृतघ्नपणा करणारांविषयीं खेद न बाळगणारे; तपस्वी लोकांवर स्वतांच्या आंगाच्या साली देऊनही उपकार करणारे; आणि आपल्या खालच्या प्रदेशास मळमूत्रादिकांनीं खराब करून टाकणाऱ्या पशुपक्ष्यादिकांचाही तिरस्कार न करणारे; असे तेथील वृक्ष पाहून कुसुमायुधाला महाशय पुरुषांच्या उदार चरिताचें घडी घडी स्मरण होऊं लागलें. ऋषींचीं मुलें काष्ठांसाठीं आणि समिधांसाठीं कुऱ्हाड घेऊन वृक्षांस तोडूं लागले असतां त्यावरून पक्षी आणि वानर पळून जात असलेले पाहून कुसुमायुधाला कृतघ्न लोकांच्या चरिताचें स्मरण होऊं लागलें, आणि वृक्षांच्या साली प्रथम आपलें छेदन झाल्यानंतर मग वृक्षांवर कुऱ्हाडीचा घाव पडूं देत हें पाहून कृतज्ञ लोकांच्या आचरणाचें त्यास स्मरण होऊं लागलें. दैवानें फळें आणि पुष्पें येत नसल्याकारणानें दुसऱ्यांस आपल्या साउलीनेंच शांत करणारे, कापणाराच्या कुऱ्हाडीलाही सुगंधमय करून टाकणारे, आपल्या अवयवांस घासून वासूनही दुसऱ्याचा ताप दूर करण्यांत तत्पर असणारे, आपल्याबरोबर उगवणाऱ्या दुसऱ्या वृक्षांसही आपल्या

गुणांनीं अलंकृत करणारे, आपल्या गुणाच्या अपूर्व चमत्कारानें कमळाच्या वगैरे वनांतून भ्रमरांस आकर्षित करून आणणारे, निरंतर सर्पांच्या सहवासांत असतांही त्यांच्या दुर्गुणांचा गंधही न पावणारे, आणि अंगाअंगाचे ठिकाणीं सुवासानें भरलेले असे चंदन वृक्ष पाहून कुसुमायुधाला, निर्धन असतांही परोपकार करण्यांतच तत्पर असणाऱ्या आणि सर्व प्रकारें भलेपणानेंच वागणाऱ्या ऐतिहासिक लोकोत्तर पुरुषांचीं चरित्रें आठवूं लागलीं. नम्र असतांही, निबिड छायेनें युक्त असतांही, रूपवती स्त्रीयांच्या हातापायांच्या तळव्याप्रमाणें लाल अशा पल्लवांनीं सुशोभित असतांही आणि पुष्पांनीं अलंकृत असतांही, सुगंध आणि मधुर फळें यांची सामग्री जवळ नसणाऱ्या अशोक वृक्षाकडे पाहून कुसुमायुधाला बाहेरून भव्य डौल घालणाऱ्या कीर्तिहीन आणि भपक्यानें फसून आलेल्या याचक लोकांस क्षुद्र फळ देणाऱ्या दांभिक लोकांची आठवण होऊं लागली. वृक्षांच्या राईमध्यें अदृश्य होऊन बसले असतांही सुगंधाच्या प्रसारानें भ्रमरांचें आकर्षण करणाऱ्या, आणि बारीक बारीक फुलांनीं सुद्धां अलौकिक चमत्कार दाखविणाऱ्या, बोलसरी मोठ्या समुदायामध्यें गुप्त राहून आपल्या लावण्याच्या फैलाव्यानें तरुणांचें मन आकर्षण करून घेणाऱ्या, आणि आपल्या बारीक व नाजूक अवयवांनींही लोकोत्तर चमत्कार दाखविणाऱ्या, मुग्धा स्त्रियांप्रमाणें दिसूं लागल्या. सुगंधानें भरलेले, सोन्याप्रमाणें पुष्पांनीं आच्छादलेले, उमलणाऱ्या कळ्यांच्या कांतीनें राजवनितांच्या अंगलतिकांच्या सौंदर्यालाही लाजविणारे, आणि विलासी जनांस प्राणप्रिय वाटणारे अशा चंपकवृक्षांकडे पाहून कुसुमायुध, त्यांजकडे ढुंकूनही न पाहणाऱ्या भ्रमरांस दुर्दैवी समजूं लागला, आणि पूजेमध्यें चंपकपुष्पाचा अंगीकार न करणाऱ्या शंकरास पशुपति ह्मणून जें नांव मिळालें आहे तें यथार्थ होय असें ह्मणूं लागला. असंख्य काट्यांनीं व्यापलेलीं आणि परागाच्या समूहानें डोळ्यांस आं-

धळें करून टाकणारी अशी असतांही भ्रमरांस अत्यंत आसक्त करून आपलें अपूर्व सौभाग्य मिरवणारी केतकी परकीया नायिकेप्रमाणें भासूं लागली, आणि भ्रमर कामांध पुरुषांप्रमाणें वाटूं लागले. फणसा एवढें फळ, वडा एवढी उंची, केळीच्या एवढीं पानें, आणि केतकीच्या सारखीं फुलें नसतांही, आपल्या आंगच्या चमत्कारिक गुणांनीं साऱ्या वृक्षांचा राजाधिराज ह्मणून गाजणारे; आपल्याखालीं निजलेल्या प्रवासी लोकांच्या हातांत स्वतांच अमृतासारखीं फळें आणून देणारे; कोकिलांस प्राणांहूनही अधिक प्रिय वाटणारे; फळांच्या रक्षणाहूनही बीजाच्या रक्षणासाठीं अधिक काळजी ठेवणारे; आणि कामदेवास दिग्विजय करण्यामध्यें अपूर्व साहाय्य देणारे असे आंब्याचे मोठमोठे वृक्ष पाहून कुसुमायुध प्रसन्नांतःकरण होऊं लागला; तथापि कोकिला आणि कावळे यांस समानच गणल्याकारणानें आणि निरंतर सेवन करणाऱ्या भ्रमरांस बाहेर ठेवून किडींस फळांच्या आंत आश्रय दिल्याकारणानें दुर्वृत्त राजाप्रमाणें त्यांचे दुर्गुण आठवून त्यास कांहींसा खेदही वाटूं लागला. ब्राह्मणास अमृताहूनही प्रिय अशीं, उपरघीचा चुर्मा चुरण्याच्या कामीं फार उपयोगीं पडणारीं आणि जेवणारांस जेवतानां दुप्पट रुचि उपजविणारीं मोठमोठीं सुरेख पानें आहेत ज्यांचीं अशा, पानांस शोभणारीं बियांशिवायचीं फळें आहेत ज्यांचीं अशा, फळांना शोभविणारी कोमळता आहे ज्यांची अशा, कोमळतेला शोभविणारे ओंडे ज्यांचे अशा, आणि ओंडयांस शोभविणारा विस्तार आहे ज्यांचा, अशा केळींकडे पाहून कुसुमायुध मनामध्यें त्यांची प्रशंसा करूं लागला; परंतु पहिल्या प्रसवकालींच त्यांच्या मरणाचें कारण योजणाऱ्या दैवाचा अविवेकाविषयीं धिक्कार करूं लागला. कडूलिंबाच्या फळांनीं ओथंबलेले लिंबाचे वृक्ष आणि त्यांवरील फळें खाऊन आनंदानें काव काव करणारे कांवळ्यांस पाहून कोणत्याही स्थळीं योग्य घटना न करण्या-

चाच ज्याचा नियम अशा विधात्यानें या ठिकाणीं मात्र आपला नियम मोडला ही एवढी मोठी चूक कशी केली असावी असा विचार मनांत येऊन कुसुमायुध आश्चर्य करूं लागला. अत्यंत उन्नत, अत्यंत विस्तीर्ण, शेंकडो प्रवासीजनांस परम आराम देणारे, अति वृद्ध झाले असतांहीं पारंब्यांच्या रूपानें टेंकण काठ्या धरून पडत झडत पुढें येणारे, विस्तीर्ण सांवली आहे ज्यांची असे, आणि हजारो पक्ष्यांस आश्रमाप्रमाणें उपयोगीं पडणारे, अशा वटवृक्षांकडे पाहून कुसुमायुध त्यांच्या मोठेपणाची वाखाणी करूं लागला. लहानशा बींजांमधून मोठे झाडास उत्पन्न करण्याची विधात्याच्या अकळित शक्तीची तो वारंवार स्तुति करूं लागला आणि एवढें मोठेपण असतांही फारच क्षुद्र आणि भिकार फळें त्यांजवर उत्पन्न करण्याची विधात्याचीही अप्रशस्त खोड दूषणार्ह समजून भोपळ्याची वेलही त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ झाली असें ह्मणूं लागला. जणों आपल्या फळामध्यें आश्रमांतील शुद्ध पाणी भरून तें आकाशगंगेच्या पाण्याबरोबर मिळून पाहण्याची ईर्षा धरीत असाव्या अशा प्रकारें आकाशांत ऊंच वाढलेल्या आणि फळामध्यें कोणत्याही दृश्य मार्गाशिवाय पाणी उत्पन्न होत असल्याकारणानें भाग्यशाली लोकांस आकस्मिक रीतीनें प्राप्त होणाऱ्या धनाचा दृष्टांत देणाऱ्या नारळी पाहून कुसुमायुध त्यांच्या मधुर फळांविषयीं मनांत त्यांची स्तुति करूं लागला आणि दुसरीं सर्व प्रकारचीं खाद्यें सोडून देऊन मोठें फळ खाण्याच्या इच्छेनें येणाऱ्या हजारों पक्ष्यांच्या आशेसहित त्यांच्या चंचूंचा भंग केल्यानें आणि आम्रवृक्षाप्रमाणें उत्कृष्ट फळें नसतांही त्यांचें रक्षण करण्यासाठीं कठीण चोडाची आणि कठीण कवचीची योजना केल्यानें जी कृपणता दिसून येते तिजविषयीं तो त्यांस धिक्कारूं लागला. वडाप्रमाणें, मोठेपण किंवा अवडंबर बिलकुल न बाळगतां सुगंधयुक्त रसानें भरलेलीं तशींच मोठमोठीं फळें देणारे आणि शाखा शाखांवर लटकलेल्या फळांचा

भार तोलण्यास डाळ्या अशक्त होत असें जाणून फळांस आपल्या खांद्यावरही धारण करणारे फणस वृक्ष पाहून कुसुमायुध, साध्या, उदार, आणि दयाळु सज्जनांचें स्मरण करूं लागला. त्याच प्रमाणें भिकार आणि मादक फळें असतांही त्यावर आणखी कांटे उत्पन्न करून शेखी मिरविणाऱ्या धोतऱ्याच्या टारग्या झाडाकडे पाहून कुसुमायुधास मिजासखोर लोकांची आठवण होऊं लागली. आंबट गर व तोही फार थोडा, बिया मोठ्या आणि कुपथ्यांत पहिला नंबर अशीं फळें येत असतांही अपार तीक्ष्ण कांट्यांनीं याचक जनांस टोंचून घेण्याऱ्या बोरी पाहून सर्वांगामध्यें वक्रता धारण करणारे आंबे वगैरे वृक्षांस सोडून कांटेरी वृक्षांतच आपलीं तोंडें खुपसणारे, भेसुर ध्वनि काढून लोकांच्या कानांस त्रास देणारे, कडू पिंपळ वृक्षाच्या डाळ्या खाऊन बीभत्स दांत अर्धे उघडे करून लांब लांब ओठांनीं रवथ करणारे आणि मारवाडांत आनंद पावणारे अशा उंटांस त्यांचा उपभोग घेण्याची योजना करणाऱ्या विधात्याच्या दूर दृष्टीची कुसुमायुध वाखाणणी करूं लागला. बारीक बारीक पानांनीं आणि फळांच्या आंबटपणानें आंवळींचें अनुकरण करूं पाहतानां आंवळीमध्यें असलेला रासायनिक गुण संपादन न करूं शकणाऱ्या चिंचेला पाहून पतिव्रतांचें अनुकरण करूं जाणाऱ्या व्यभिचारीणींची आठवण कुसुमायुधास होऊं लागली. शस्त्रांनीं आपली कातडी कापवून परोपकारांत तत्पर असणाऱ्या भूर्जपत्रांच्या वृक्षांकडे पाहून कुसुमायुध त्यांस फलहीन निर्माण करणाऱ्या विधात्याची निंदा करूं लागला. तीक्ष्ण कांट्यांनीं व्याप्त असलेले, ज्यास छाया नाहीं, सुगंध नाहीं असे, आणि मोठमोठीं सुरेख फुलें दाखवून निःसत्व फळें देणारे सावरीचे वृक्ष पाहून कुसुमायुध त्यांस दुर्जनांची उपमा देऊं लागला. पत्र, पुष्प आणि फळ हीं सर्वच तुच्छ असल्याकारणानें स्वताचें रक्षण करण्याची कांहींच जरूर नसतांही मोठमोठे लांब कांटे बाळगणारे आणि उन्हानें घामाघूम होऊन सुंदर सावलींत येऊन बसणाऱ्यांसही कांट्यांनीं

भोंसकणारे बाभळीचे वृक्ष पाहून कुसुमायुधाला हंसेंच येऊं लागलें; आणि अपार सुगंध जवळ बाळगणाऱ्या चंदन वृक्षांनीं केलेली सर्पांची सोबत कांहींशी कानाडोळा करण्यासारखी आहे असें म्हणूं लागला.

**या** प्रमाणें हरडे, बेहडे, पिंपळी, पिंपळ, बेल, कांचन, शेगवा, वंश, कळंब, उंबर, शिसव, आस्कंद, बिबळा, खैर, ताड, साग, जांब, रांजण, मोह, डाळींब, भोंकर, खजूर, इड, पिलु, लिंब, बदाम, अक्रोड, द्राक्ष, शतावरी, शिंगाडा, चारोळ, करवंद, पळस, शमी कुचला, कंवठ, सुपारी, वायवर्णी, कुडुक, धामणी, धावण, तमाल, इंगुदी, रिठा, पारस पिंपळ, दवणा, मरवा, तुळस, अगस्ता, जास्वंद, बंधूक, मुचकुंद, मोगरी, काटेअशेर, कण्हेरी, मधुमाधवी, कुंदे, जुई, चमेली, लवाळा, बटमोगरा, गुलाब, कमळ, कुमुद, गुलतुरा, ब्रम्ही, लाजाळू, सूर्यकमळ, डिकेमाली, मुरुडशेंग, दुध्या, त्रायमान, उपलसरी, कोळीस्ता, मुंडी, इंद्रजव, जेपाळ, निशोत्तर, शतावरी, मुसळी, कुहिली, मोळु, निर्गुडी, बकाण, अरणी, सागरगोटी, शिवण, तगर, जटामांसी, कचोरा, नागकेशर, वेलची, लवंग, जायफळ, देवदार अगरु, रक्तचंदन, भांग, रासना, मदनफळ, कुडा, वावडींग, गजपिंपळी इत्यादि अनेक वृक्ष, लता आणि वनस्पती पाहून कुसुमायुध आनंदित झाला, त्यांचें गुणदोष पाहूं लागला, आणि त्यांचे प्रयोगांविषयीं विचार करूं लागला.



# प्रकरण २४ वें.

## सात्त्विक सृष्टि.

शातातपमुनीच्या या आश्रमामध्यें, स्वाभाविकपणेंच परस्पराशीं वैर असणारीं जनावरेंही, त्या मुनीच्या प्रभावानें परस्परांच्या मित्राप्रमाणें वागत होतीं. सिंहांच्या बच्याबरोबरच मृगांचीं पिलेंसुद्धां सिंहिणीला पीत असत. सर्प मयूरांच्या पिच्छभारांमध्यें विश्रांति घेत असत. हरिण शिंगांनीं सिंहास खाजवीत असत. लांडगे लांब लांब जिव्हा काढून हरिणास चाटीत असत. गाई वाघाच्या पंजाच्या नखांनीं आपल्या अंगाच्या चळाला शांत करीत असत. वासरें डोक्याच्या धडका मारमारून वाघिणीस पीत असत. श्येनपक्षी कोकिलांच्या चोंचींत धान्याचे कण देत असत. मुंगूस सर्पांच्या पिलांच्या तोंडामध्यें फुंक मारून मारून त्यांची तृप्ति करीत असत. कावळे दिवसास अंध असलेल्या घुबडांवर दया करून त्यांस आपल्या चाऱ्यांतून कांहीं विभाग देत असत. सिंहिणी दूर राहून गेलेल्या हरणींच्या बच्यांस आपल्या तोंडांत धरधरून त्यांच्या आयांपाशीं नेऊन पोंचवीत असत. ससाणेपक्षी, घरट्यांतून खालीं पडलेल्या; ज्यांस अर्धवट पंख फुटले आहेत असे; फिरण्याच्या श्रमांनीं चिमट्यासारख्या चोंची फाडून बसलेल्या; चारण्याचा यत्न केला असतां वारंवार पडत झडत जाणाऱ्या; एका पंखाच्या टेक्यानें सर्व शरीर तोलून धरणाऱ्या; एकेक पाऊल टाकून वर वर पाहात राहणाऱ्या; पाऊल पुढें टाकूं पाहातां धडपडून पडणाऱ्या; आणि धुळीनें माखलेल्या; अशा चिमण्यांच्या पोरांस आपल्या पायांनीं उचलून

उचलून, फिरून घरट्यांमध्यें ठेवीत असत, आणि आपल्या चोंचींमध्यें पाणी आणून त्यांच्या चोंचींत सोडीत असत. ओटींत डोकीं ढोंसकून ढोंसकून पिणारीं; डोकीं ढोसकल्यानें त्यांच्या आयांस राग न येतां उलट त्यांस अधिक स्नेहविव्हळ करून अधिक धार सोडण्याविषयीं भाग पाडणारीं; डोकीं ढोंसकते वेळीं वेळानुसार गुडघ्यांवर वांकणारीं; आनंदानें शेपट्या हालवणारीं; आणि दुधाच्या फेणांनीं ज्यांचीं तोंडें भरलीं आहेत अशीं वासरें खरखरीत जिभांनीं वारंवार चाटणाऱ्या; चाटून चाटून वासरांच्या सर्व आंगास ओलें करून टाकणाऱ्या; हंबरणाऱ्या; आणि वासरें घाबरत असतांही मूत्राच्या स्वादामुळें त्यांच्या नाभि फारच आवडीनें चाटणाऱ्या अशा गाईंच्या आंगावर सिंह आपल्या पंजांनीं खरारा करीत असत, आणि वानर त्या गाईंच्या ओटींवरून गोचीड, पिसवा वगैरे तोडून काढून दूर फेंकून देत असत. जलाशयामध्यें कोळ्यांचीं जाळीं पसरलेलीं पाहण्याचा कधींही प्रसंग नसल्यामुळें मासे जलाशयावर मौनवृत्ति धरून बसलेल्या बगळ्यांकडे पाहून जणों हे भाताचे पिंडच होत असें समजून चावा घेऊन पळून जात असत. चिखलाच्या पाण्याला मद्याहून, आंब्याच्या रसाहून आणि अमृताहूनही अधिक स्वादिष्ट समजणारे बेडूक, डबक्यांत उड्या मारमारून थकून गेल्यावर विश्रांति घेण्यासाठीं, काळियासर्पाच्या फणावर उडी मारून बसून, त्यास चिखलानें माखून टाकीत असत. आणि विक्राळ दाढीचे, लहान आकाराचे असतांही बालकांस अयाळीशिवायच्या सिंहांची भ्रांति उत्पन्न करणारे आणि वैश्वदेवाच्या बळींनीं तृप्त होऊन रहाणारे कुत्रे ससांच्या पिलांस उन्हांतून उचलून जाळ्यांत नेऊन सोडूं लागले. या प्रमाणें क्रूर जनावरें हीं मुनींच्या तपाच्या प्रभावानें निर्वैर तशींच निर्मत्सर झालेलीं पाहून आश्चर्य पावणारा कुसुमायुध, त्या आश्रमांतील मुनींस दुःख देऊं येणाऱ्या दैत्यांचा स्वभाव काय कारणास्तव बदलत नसावा याचा विचार करूं लागला.

**या** आश्रमामध्यें वानरें वृक्षांचीं फळें वारंवार घेऊन येऊन ऋषींच्या बालकांस खेळवीत असत, आणि वृद्ध व अंध ऋषींस त्यांच्या काठ्या धरधरून इच्छित स्थळीं नेऊन पोंचवीत असत. नदीच्या पाण्यांत भरण्याकरितां बुडविलेल्या कलशांच्या शब्दानें मेघगर्जनेची भ्रांति पावून टाहो शब्दानें कानास अमृताच्या सेचनाप्रमाणें सुख देणारे मयूर, तपाच्या परिश्रमानें थकून गेलेल्या मुनींस सेवकाप्रमाणें पंखांच्या रूपानें विचित्र पंख्याचा वारा घालून विश्रांति देत असत; आणि होमाच्या अग्नीला पेटविण्याचे कामींही मदत करीत असत; स्वप्नामध्येंही पारध्याच्या धनुष्याचा निष्ठुर टंकार न ऐकणारे; हिरवा गार चारा खाऊन आणि निर्मळ पाणी पिऊन डोळे मिटून रवंथ करीत बसले असतां कधींही एकाएकीं चकित होण्याचा प्रसंग न आलेले; मृगजळाच्या पाण्याच्या देखाव्यानें कधींहीं न फसले जाणारे; कधींहीं शिकारी कुत्र्यांच्या, दावानलाच्या आणि मध्यान्हीच्या तीव्र उन्हाच्या सपाट्यांत सापडून प्रियकर हरणीच्या वच्चांचा, विश्राम देणाऱ्या वृक्षांचा अथवा जन्म भूमीचा वियोग न पावलेले; आणि पर्वतांच्या उंच सखल भागीं धावपळ करण्यानें खुऱ्या ठेंचाळण्याचें किंवा दुसरेंही कसलें दुःख न पावणारे; असे हरिण शिंगांनीं नदीच्या कांठची ओली माती उकरून तिचे गोळे शिंगांवर घेऊन मुनिजनांसाठीं आश्रमांत नेत असत; राज्याभिषेकाचा संस्कार झाला नसतांही छत्रचामरादिक राजचिन्हें जवळ नसतांही, प्रजेला न्यायान्याय सांगण्याची कसलीही काळजी ठेवावी लागत नसतांहीं, नोकरांस पगार देण्याची पंचाईत करावी लागत नसतांही, आणि मंत्र्यांचे मतभेद ऐकण्याचा त्रास न पावतांही, मृगराज पदवी धारण करणाऱ्या सिंहांच्या पाठीवर मुनींचीं बाळकें स्वार होऊन खेळत असत. प्रभातसमयीं लौकरच उठून, पंख उंच करून, पिसें फडफडावून, आंग ताणून लांब करून, तुरे हालवून, आणि गळे उंच करून, आरवूं लागणारे कोंबडे, वेदादिकांचा अभ्यास करण्यासाठीं

लौकर उठूं इच्छिणाऱ्या मुनिबाळकांचा आशीर्वाद मिळवीत असत; आणि पाणिनीय व्याकरणाच्या नियमाप्रमाणें ऱ्हस्व, दीर्घ आणि प्लुत स्वरांचा उच्चार करण्याची संवय लावण्यामध्यें गुरुजींचा उद्देश सिद्धीस नेत असत; जांबाचीं कफ हरण करणारीं फळें खाल्ल्यानें, आंबा, डाळिंब आणि राण यांचीं त्रिदोषहर फळें खाल्ल्यानें, द्राक्षांचीं कफपित्तहर फळें खाल्ल्यानें, खजुरीचीं कफवातहर फळें खाल्ल्यानें, आणि आंवळीचीं त्रिदोषहर, तशींच रसायनरूप फळें खाल्ल्यानें, ज्यांचे कंठ अति निर्मळ झाले आहेत असे; पिंजऱ्यामध्यें बंधनाची अथवा शिकविते वेळीं प्रहार करण्याची वगैरे पीडा कधींही न पावणारे; आणि सहवासामुळें, मुनींच्या पुत्रांस बंधुसमान गणणारे असे पोपट निरंतर श्रवणाच्या अभ्यासामुळें, अनध्यायाच्या दिवशींही वेदमंत्र, शास्त्रें आणि साहित्य वगैरे यांच्या मधुर उच्चारांनीं सर्वांचीं अंतःकरणें आनंदमय करून सोडीत असत; अनावृष्टीचे वेळींही कोंबड्याप्रमाणें कधींही किड्याचें भक्षण न करणारे; दूध आणि पाणी यांचें पृथक्करण करतां येत असल्याकारणानें विवेकी पुरुषांस दृष्टांतरूप होणारे; ज्या स्थळीं रहावयाचें त्या स्थळाला शोभा आणणारे; गंगेलाही मलिन पहातांच तिचाही त्वरित त्याग करणारे; रमणीय ध्वनीचे शब्द करणारे; कमलवनामध्यें विहार करणारे; अति सुंदर मंद गतीनें चालणारे आणि अत्यंत निर्मळता धरणारे असे हंस कुसुमायुधाला फारच आनंद देऊं लागले. परंतु त्यांच्या बरोबरच वास करणारे; शरीर निश्चळ ठेवून आणि मौनवृत्ति धारण करून तपस्व्याचा खोटा डौल मिरवणारे; आणि एवढ्यानेंही संतुष्ट न होतां हंसाप्रमाणें रूप आणि त्यांच्या प्रमाणें त्यांचा अभिमान धरणारे असे बगळे त्याचे मनांत खेद उत्पन्न करूं लागले.

या आश्रमामध्यें सर्वत्र वेदमंत्राचा ध्वनि ऐकूं येत असे. अग्निहोत्राचा धूर आकाशांत मेघमंडलाची शोभा दाखवीत असे. मुनिजनांच्या मु-

खांतून निघणारा शुद्ध मंत्रोच्चार आनंद देत असे. पत्रपुष्पांच्या भारानें लवलेल्या लता मुनिजनांस प्रणाम करीत असाव्या अशा दिसत असत. अग्निहोत्राच्या आकाशांत पोंचलेल्या धुरानें मेघमंडलाची भ्रांति धरून मयूर नाचत असत. पुरोडाषाचा आणि तुपाच्या धारेचा सुगंध, पुष्पांच्या सुगंधाबरोबरच पसरून जात असे. अतिथि, देवता आणि पितर यांचीं पूजनें चालत असत. वृक्ष निरंतर पुष्पांची वृष्टि करीत असत. आणि कोकिला पंचम स्वराच्या उच्चारणानें मुनींचीं अंतःकरणें सुद्धां आकर्षण करून घेत असत. आणखी या आश्रमाच्या एके ठिकाणीं समिधा आणि दर्भ यांचे ढीग; एके ठिकाणीं मृगांनीं आपल्या शिंगांच्या साहाय्यानें उकरून आणलेल्या कंदमूळांची रास; एके ठिकाणीं जमा करून ठेविलेल्या श्यामाक वगैरे ऋषींच्या धान्याचे कणगे; एके ठिकाणीं आंबे, केळी, जांब, रामफळ, सीताफळ, फणस, डाळिंब, वगैरे फळांचे समूह; आणि कांहीं ठिकाणीं अग्नीच्या संधुक्षणाकरितां जमाकरून ठेविलेल्या गाईंच्या रानशेण्यांचे जमाव जागोजाग पाहण्यांत येत असत. मुनिजनांचे बटु कांहीं ठिकाणीं अध्ययनाचा खूप तडाका चालवीत होते; कांहीं ठिकाणीं लतांस आणि वृक्षांस पाणी घालण्याचे कामीं आणि त्यांजभोंवतीं आळीं करण्याचे कामीं गुंतून गेले होते; कांहीं स्थळीं जटापाठाची आणि घनपाठाची झपाट्यानें आवृत्ति करीत होते; कांहीं स्थळीं डुकरांच्या दाढांमध्यें खोंचून राहिलेले नागरमोथ्यांचे कोंम उपटून काढीत होते; कांहीं स्थळीं वानरांच्या डोळ्यांत उडालेल्या धुळीचे कण काढीत होते; काहीं स्थळीं सिंहाच्या पायांत बोंचलेले कांटे काढीत होते; कांहीं स्थळीं वल्कलें धुऊन धुऊन सुकवीत होते; कांहीं स्थळीं देवांच्या पूजेकरितां वृक्षांवरील फुलें वेंचीत होते; कांहीं स्थळीं नुकत्याच व्यायलेल्या हरणींस सूतिकोपचार करीत होते; कांहीं स्थळीं मयूरांच्या पिसाऱ्यांमध्यें खुप-

सून बसलेल्या सर्पास हातांत धरून बाहेर ओढून काढीत होते; कांहीं स्थळीं पिलांस स्तन पाजणाऱ्या वानरीवर हात फिरवीत होते; कांहीं स्थळीं वानरांच्या आणि हरणांच्या जिव्हांनीं आपलीं आंगें चाटवून घेत होते; कांहीं स्थळीं अग्निहोत्राच्या भस्माचे गोळे वळीत होते; कांहीं स्थळीं रुद्राक्षांच्या व कमळबीजांच्या माळा गुथीत होते; कांहीं स्थळीं वेलींच्या हिंदोळ्यावर बसून झोंके घेत होते; कांहीं स्थळीं आपल्या गुरुजींसाठीं देवपूजेची सामग्री रचून ठेवीत होते; कांहीं स्थळीं पृथक् पृथक् विषयांवरील पुस्तकें निरनिराळीं काढून व्यवस्थितपणें ठेवीत होते; कांहीं स्थळीं अभ्यास केलेल्या विषयांचें परस्परामध्यें प्रश्नोत्तरानें द्रढीकरण करीत होते; कांहीं स्थळीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें न देऊं शकलेल्या सहाध्याय्यांचा उपहास करीत होते; कांहीं स्थळीं मातापित्यांची सेवा करण्यांत गुंतले होते; कांहीं स्थळीं मुंजनामक गवताच्या मेखला तयार करीत होते; आणि कांहीं स्थळीं सर्पाची कांत उलगडून काढून आणण्याकरतां मयूरांस प्रेरीत होते.

**या** आश्रमांतील कित्येक शिला समिधांच्या हिरांनीं, कित्येक फळांच्या रसांनीं, कित्येक सिंहिणींच्या दुधानें, कित्येक पुष्पांच्या मकरंदानें, कित्येक कंदमूळांच्या गरानें, आणि कित्येक शिला नुकत्याच कापलेल्या वल्कलांच्या रसानें चिकट झालेल्या दिसत होत्या. मुनिकन्यका कांहीं ठिकाणीं पुष्पें वेंचीत होत्या, कांहीं ठिकाणीं निरनिराळ्या रंगांनीं स्वस्तिकें काढीत होत्या, कांहीं स्थळीं पर्णशाळा लिंपीत होत्या, कांहीं स्थळीं त्या झाडून काढीत होत्या, कांहीं ठिकाणीं यज्ञपात्रें घासून विसळीत होत्या, कांहीं स्थळीं देवपूजेच्या निरांजनामध्यें कापसाच्या वाती घालून तूप घालीत होत्या, कांहीं स्थळीं गाणीं गात होत्या, कांहीं स्थळीं आळीं साफ करीत होत्या, कित्येक स्थळीं सिंहिणींच्या बच्चांस खेळवीत होत्या, कित्येक स्थळीं धर्मशास्त्राभ्यास करीत होत्या, आणि कि-

त्येक स्थळीं देवतांस बळी समर्पण करण्याची तयारी करीत होत्या; कित्येक ऋषिपत्न्या आपापल्या स्वामीसाठीं स्नानाचें पाणी तयार करीत होत्या, कित्येक श्यामाक वगैरे धान्यें आणि फळें निवडून ठेवीत होत्या, कित्येक वल्कलें धुऊन ठेवीत होत्या, कित्येक शयनभूमि साफ करीत होत्या, कित्येक त्या त्या ऋतूला अनुसरून आरोग्यदायक फळांची जमवाजमव करीत होत्या, कित्येक आपल्या सखींबरोबर पतिव्रता धर्माच्या गोष्टी बोलत होत्या, कित्येक पुत्रांस आणि कन्यांस सुभाषिताचा बोध करीत होत्या, कित्येक मुलां मुलींच्या सोयरीकी करण्यासंबंधी घटना करीत होत्या, कित्येक वैराग्याची चर्चा करीत होत्या, कित्येक विषयसुखाचा उपहास करीत होत्या, कित्येक गर्भवासांतील यातनासंबंधी गोष्टी सांगत होत्या, कित्येक संसाराच्या अनित्यपणाविषयीं कविता ह्मणत होत्या आणि कित्येक कांहींका विषयांमध्यें सखीस समजावीत होत्या.

या आश्रमामध्यें ठिकठिकाणीं यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि या नांवाच्या योगाच्या आठ आंगांचा अभ्यास कडाक्यानें चालला होता. तीक्ष्णता, मलिनता, मिथ्या भाषण, फसवणूक, पक्षपात, भांडण, चोरी, तृष्णा, हिंसा, कामीपणा, वैर अथवा व्यसन इत्यादि कोणताही दोष कोठेंही आढळण्यांत येत नव्हता. अंधकार वृक्षांच्या राईमध्येंच वसत होता पण कोणाच्याही मनांत नव्हता; चपळता वानरांच्या ठिकाणींच होती परंतु स्त्रियांच्या नेत्रांत नव्हती; द्वेष दुर्गुणाचाच होत होता परंतु परस्परांमध्यें नव्हता; तीक्ष्णता कंटकांमध्येंच होती परंतु कोणाच्याही स्वभावामध्यें नव्हती; अनास्था संसारभोगाविषयीं मात्र होती, धर्माविषयीं नव्हती; परिवर्तन जपाच्या माळेमध्यें मात्र होतें कोणाच्याही वचना[illegible] नव्हतें; व्यसन शास्त्राभ्यासाचेंच होतें परंतु दुराचाराचें [illegible]; वक्रता चिंचेच्या आंकड्याच्या ठिकाणीं मात्र होती परंतु कोणाच्याही चित्तामध्यें न-

व्हती; कडूपणा कडुलिंबाच्या बियांच्या ठिकाणीं मात्र होता पण भाषणामध्यें नव्हता; पतन फळांच्या ठिकाणीं मात्र होतें, आचारांत नव्हतें; हलकेपणा जळांत मात्र होता परंतु विचारांत नव्हता; मळग्राहीपणा नदीच्या आंगीं मात्र होता परंतु अंतःकरणांत नव्हता; काठिण्य व्रताचरणामध्यें मात्र होतें परंतु हृदयामध्यें नव्हतें; आणि तृष्णा चातकाला मात्र होती परंतु मुनीजनांस नव्हती.

**या** आश्रमांत पुष्परूप अस्त्रांचा अतिसुकाळ असतांही कामदेवाचा यत्किंचितही पराक्रम चालत नव्हता. जलाशय वृक्षांनीं शोभत होते आणि वृक्ष आश्रमानें शोभत होते आणि आश्रम मुनीनीं शोभत होता.



# प्रकरण २८ वें.



## अंधारी गुहा.



योगीश्वर शातातप आणि दुसरे मुनिजन यांजकडून अत्यंत मान पावलेला, पर्णशाळांमध्यें फिरून फिरून अग्निहोत्राचें आणि ऋषिपत्नींचें दर्शन करणारा, आश्रमाची दिव्य शोभा पाहून आश्चर्य पावणारा, महात्म्यांच्या दर्शनसुखामुळें राजधानीचें केवळ अति स्मरणसुद्धां न करणारा, आश्रमवासी जनांच्या निर्मळ चित्तवृत्तीकडे पाहून प्रसन्नता पावणारा, दैत्य येण्याच्या चिन्हांविषयीं शातातपाजवळ वारंवार चौकशी करणारा, महात्म्यांच्या पादसेवनादि सेवा करणारा, महात्म्यांच्या वचनामृतानें तृप्ति पावणारा, मुनिबाळकांस सुवर्णमय व रत्नमय आभरणांनीं आणि धनुष्यादि शस्त्रांनीं चकित करणारा, ऋषिपत्नींचा आशीर्वाद संपादन करणारा, आणि दैत्यांचा वध करण्यास उत्कंठित असूनही, दैत्यांस या गोष्टीचा सुगावा न लागावा ह्मणून शातातपाच्या सांगीवरून धनुष्याचा टणत्कारही न करणारा असा कुसुमायुध एके दिवशीं शातातपाच्या अग्निहोत्रशाळेमध्यें बसला होता. इतक्यांत एकाएकीं सर्व आश्रमांत कोलाहल उसळून गेला. पक्षी वृक्षांच्या शाखांवरून उडून किलकिल शब्द करूं लागले; सिंहादिक पशु सुद्धां जणों शिकारी लोकांनीं पाठलाग केल्याप्रमाणें कावरेबावरे होऊन पळूं लागले; वृक्ष वाऱ्याच्या झपाट्यावांचूनही हलूं लागले; जलाशय वर्षाऋतूशिवायसुद्धां मलिन झाले; गाई थंडीवांचूनही कांपूं लागल्या; कमळें हेमंतऋतु नसतांनाही सुकून जाऊं लागलीं; पापी लोकांच्या हृदयाप्रमाणें आकाश अंधकारमय झालें; पीडित

मनुष्याच्या निःश्वासाप्रमाणें वायु उष्ण वाहूं लागला; अग्निहोत्राचे अग्नि विकर्मी लोकांच्या संबंधी जनांप्रमाणें मंद दिसूं लागले; दिशा कामांध लोकांच्या चित्तवृत्तीप्रमाणें रजोमय होऊन गेल्या; पृथ्वी लोभ्याच्या चित्तवृत्तीप्रमाणें हेलकावे खाऊं लागली; पाण्याचे प्रवाह शिकलेल्या दुष्ट लोकांप्रमाणें सैरावैरा धावूं लागले; मेघ पिकलेल्या गळवांतून गळणाऱ्या पुवाप्रमाणें पुवाचा वर्षाव पाडूं लागले; गाईंचे अचूळ अर्शरोगाप्रमाणें रक्तस्राव सोडूं लागले; आश्रमवासी जन, बुडणाऱ्या गलबतांत बसलेल्या वाण्यांप्रमाणें आक्रोश करूं लागले; आश्रम मूर्ख राजांच्या राज्याप्रमाणें अंधकारमय होऊन गेला; सूर्य मूर्ख लोकांच्या सभेंत बसलेल्या पंडिताप्रमाणें निस्तेज होऊन गेला; आणि थोड्याच वेळांत जणों सगळ्या जगताच्या पापाचा समुदायच काय, यमराजाचा काळा हल्याच काय, अंधकाराचा वृंदच काय, अज्ञानाचा कंदच काय, कोळशाचा पर्वतच काय, क्रूरतेचें भांडारच काय, काळमेघाचा काकाच काय, किंवा काळकूटाचा सोयराच काय, असा एक भयंकर सूकर ह्मणजे डुक्कर आश्रमांत शिरतांना त्यानें पाहिला.

**या** डुकराचा घुरघुर आवाज समुद्राच्या लाटांच्या घरघराटीप्रमाणें ऐकूं येऊं लागला; त्याचे दांत सगळ्या प्राणिजातास चाऊन टाकण्यासाठीं तयार झालेल्या महाकाळाच्या दांतांप्रमाणें भासूं लागले; त्याची रोमराजि लोखंडी शंकूप्रमाणें दिसूं लागली. या वेळीं **शा**तातपाच्या सूचनेवरून तत्काळ रोमांचित झालेला आणि उत्साहामुळें जणों वीररसमय होऊन गेला कीं काय असा दिसणारा कुसुमायुध उभा राहून, आपल्या त्या दिव्य घोड्यावर स्वार होऊन, धनुष्याच्या टंकारानें दशदिशा भरून टाकून, कानापर्यंत दोरी खेंचून घेऊन, बाण जोडून, त्या डुकरास तोंड देण्यास पुढें गेला. टंकार शब्दानें उत्पन्न झालेलें भय, घोड्याच्या टापांच्या खडखडाटानें दुप्पट, आरक्त नेत्रयुक्त कुसुमायु-

धाच्या दर्शनानें तिप्पट, कुसुमायुधाच्या प्रचंड आयुधांच्या दर्शनानें चौपट, आणि बाण फेंकण्यासाठीं ओणवलेल्या कुसुमायुधाची छाती एका बाजूनें घोड्याच्या खांद्याला भिडलेली असल्यामुळें सहस्त्रपट भासून तो डुकर इतका भयभीत झाला कीं त्याच्या डोळ्यांतली बाहुली भ्रमण करूं लागली; घोंटीव काजळाप्रमाणें असलेला त्याच्या शरीराचा वर्ण किट-लेल्या तव्याच्या तळाप्रमाणें होऊन गेला; प्रळयकाळच्या मेघासारखा त्याचा आवाज भिजलेल्या नगाऱ्याच्या आवाजाप्रमाणें बद्द होऊन गेला; चारी पाय जमिनींत ठोकलेल्या मेखांप्रमाणें होऊन गेले; शेपूट मागच्या पायांच्या मध्यें बसून गेलें; सर्व आंग बोढणांत मस्ती केल्यावांचूनच पाण्याच्या धारा बाहेर टाकूं लागलें; रोमराजि घामानें भिजून चिंब झाली असतांही खिळे मारल्याप्रमाणें ताठ होऊन गेली; सर्व शरीर शीतज्वरानें पीडिलेल्याप्रमाणें थरथर कांपू लागलें; डोळे चोंहोंकडे भ्रमण करूं लागले; अंतःकरण, आश्रमांत चौकशी केल्याशिवाय प्रवेश केल्यामुळें जें साहस झालें त्यानें स्वतांचाच धिक्कार करूं लागलें; दृष्टि पृथ्वी फिरत आहे असेंच पाहूं लागली, व तिची शक्ति नाहींशी होऊं लागली; शरीर उपवासामुळें पीडित झाल्याप्रमाणें क्षीण दिसूं लागलें; उत्साह नाहींसा झाला; तेज शून्य झालें; तोंड सुकून गेलें; आणि भान नष्ट होऊं लागलें. कुसुमायुधाच्या धनुष्यापासून सुटलेला अर्धचंद्राकृति बाण, आकाशांतून पडणाऱ्या ताऱ्याप्रमाणें वेगयुक्त आणि अग्नीच्या ज्वाळांप्रमाणें तेज प्रगट करणारा असा पाहून त्या डुकरानें आपलें शरीर स्वतःच्या कह्यांत नसतांही बळानें वाकवून पाठ फिरविली. पाठ फिरतांच तो बाण, जसा नाग वारुळांत किंवा वीज मेघमंडळांत प्रवेश करते त्याप्रमाणें त्याच्या पाठींत शिरून पार निघून गेला. मग रक्त, घाम, आणि अश्रु यांच्या धारांनीं धरित्रीला भिजवून टाकणारा तो डुकर वाऱ्याच्या वेगानें पळत सुटला. आतां " युद्धांत पाठ फिरवून पळ

काढणाऱ्याचा पाठलाग करूं नये असा नियम आहे, पण शिकारींत हा दोष ह्मणून समजत नाहींत आणि पित्याची आज्ञाही त्यास मारून टाकण्याबद्दलच आहे," असा विचार करून कुसुमायुधानें स्वतःचा घोडा त्याच्या मागें सोडला.

स्वतांचें रक्षण करण्याविषयीं तत्परतेनें तो जखमी डुकर मोठमोठ्या पर्वतांचें, वृक्षांच्या दऱ्यांचें उल्लंघन करीत, पळत सुटला, तसाच कुसुमायुधाचा घोडाही त्याच्या मागोमाग चालला. कुसुमायुध या घोड्यावर बसला असतां त्यास पर्वत केवळ सपाट जमिनीप्रमाणें वाटले आणि झाडी लहान लहान झुडपांच्या जाळ्यांप्रमाणें भासूं लागली; पर्वत आणि अरण्यें, घोड्याचें अभिनंदन करण्यासाठीं, त्याच्या इतक्याच वेगानें समोरून धावून येत आहेत असें भासूं लागलें; जो पदार्थ नीट पाहाण्याची इच्छा करावी तो दिसतो न दिसतो तोंच बाजूला निघून मागें पडूं लागला; कोणताही पदार्थ आतां जवळ आहे असें वाटतें तोंच क्षणांत दूर दिसूं लागला व जो फार दूर आहे असें वाटतें तोंच क्षणांत अगदीं जवळ येऊन ठेपूं लागला. यामुळें विधात्यानें सृष्टि वेगमयच निर्मिली काय, असा संशय येऊं लागला. घोड्याची पडच्छाया त्याच्या प्रमाणें दिव्य नसतांही त्याच्या बरोबरच धावत येऊं लागल्यासारखी दिसल्यामुळें विस्मय उत्पन्न करूं लागली. जाड नाड्यांप्रमाणें दिसणाऱ्या नद्यांचे प्रवाह आतांच अतिविस्तीर्ण दिसत असतांही क्षणांत कोठें दडून गेले ते लक्षांतही येत नाहींसे झाले. भूगोलवेत्त्यानीं गणितानें कल्पिलेल्या अक्षांशरेखांशांच्या खुणा लहान लहान दिसूं लागल्या. क्षितिजावर एकवटलेल्या मेघमालेप्रमाणें दिसणारीं पर्वतशिखरें, क्षणांत अति उन्नत, पाषाणमय आणि जवळ दिसत असतांही त्याच क्षणीं अदृश्य होऊन गेल्यामुळें ऐंद्रजालिक देखाव्याचें अनुकरण करूं लागलीं; आणि वायु सुद्धां दऱ्यांतून

वगैरे अडकून गेल्यामुळें श्रम पावून मागें राहूं लागला. प्रबळ वेगानें धावत असतां त्या डुकरानें शेकडों योजनें पृथ्वीचें उल्लंघन करून गेल्यावर एका मोठ्या खोल गुहेमध्यें उडी घातली, तों त्याच्या मागोमाग कुसुमायुधानेंही घोड्यासहित उडी घातली. या गुहेंत भयंकर अंधकारच पसरलेला होता; देहाभिमानी लोकांच्या वासनेप्रमाणें अति अद्भुत गंभीरता जींत वास करीत आहे; आणि विधात्यानें पर्वतांच्या रचनेसाठीं अतिशय माती खणून घेतल्यामुळें हा खाडा पडला असावा असें भासविणारी; छळानें तीन पावलें पृथ्वी दान मागून बळीचें सर्व राज्य हिसकून घेणाऱ्या भगवान वामनानें बळीला सैन्यासहित पाताळांत नेऊन पोंचविण्यासाठींच पृथ्वीला हें मोठें छिद्र पाडलें असावें असें भासवणारी; अगस्त्य मुनीनें सर्व पाणी प्यालयावर कोरडा पडलेल्या समुद्रांत पुनः पाणी भरण्याच्या उद्देशानें पाताळांतून पाणी काढण्यासाठीं ही मोठी विहीर खोदली आहे काय असें अनुमान करविणारी; उष्णतेनें गुदमरून जाणाऱ्या पाताळवासी जनांनीं वरची थंड हवा येण्यासाठीं केलेलें हें एक मोठें छिद्रच असावें अशीं शंका उत्पन्न करविणारी; प्रळयकाळीं नृत्य करणाऱ्या शंकराच्या टांचेच्या प्रहारानें पृथ्वीचा डवका निघाल्यामुळें पाताळपर्यंत पडलेली ही घाडच काय अशी दिसणारी; इंद्रानें पर्वतांचें पंख तोडून टाकले ते वेळीं इंद्राच्या सपाट्यांतून सुटण्यासाठीं, उडी मारून समुद्रांत पडणाऱ्या मैनाक पर्वताच्या बैठकी खालचा हा खाडा आहे काय असें भासवणारी; प्रळयकाळीं अभ्रमंडळांतून पडलेली व पृथ्वीला भेदून पाताळांत जाऊन पोंचणारी अशा प्रबळ विजेनें फोडून पाडलेली खोल भेगच अशी; विष्णूच्या सुदर्शनचक्रानें पाताळवासी लोकांचा वध करण्याच्या उद्देशानें पाताळांत उतरण्यासाठीं पृथ्वींत हा बोगदा पाडला असावा अशी शंका उत्पन्न करणारी; आणि शुंभनिशुंभांच्या सैन्याचा वध करण्याच्या वेळीं महाकाळीनें आकाशांत उडी मारून दोन्ही हात

पृथ्वीवर आपटले तेव्हां त्यांच्या जोरानें हा खाडा पृथ्वींत पडला कीं काय अशी शंका सहजच उत्पन्न करणारी अशी ही गुहा भयंकर खोल आणि अंधकारमय दिसत होती.

ऋषींच्या कष्टांचें निर्मूळन करूं इच्छिणाऱ्या कुसुमायुधानें घोड्यासकट या अंधकारमय गुहेंत उडी घालून, आंत शिरून त्या डुकराचा पुष्कळ प्रकारें शोध केला; पण आत्मस्वरूपामध्यें अज्ञानाचा, सूर्यमंडळांत अंधकाराचा, कुबेरनगरींत दारिद्र्याचा, सुषुप्तीमध्यें अंतःकरणाचा, नरकामध्यें धर्मात्म्याचा, स्वर्गामध्यें पाप्याचा, सांख्यमतामध्यें ईश्वराचा, योगमतांत अद्वैताचा, चार्वाकमतामध्यें प्रत्यक्षभिन्न प्रमाणाचा, बौद्धमतांत स्थायी आत्म्याचा, न्यायमतांत निर्गुण आत्म्याचा, मीमांसकमतांत जगाच्या मिथ्या भावाचा, आणि जैनमतांत निरवयव आत्म्याचा ठिकाण लागणें मुष्कील आहे त्याचप्रमाणें त्या डुकराचा ठिकाण लावणें दुष्कर होऊन गेलें.

मुनिजनांच्या शल्यरूप डुकराचा पत्ता काढण्यासाठीं कुसुमायुध त्या गुहेमध्यें पुष्कळ खोल खोल शिरला. ज्याप्रमाणें अद्वैतविद्येमध्यें खोल जातां जातां आवरण उल्लंघून गेल्यावर आत्मस्वरूप नजरेस येतें त्याचप्रमाणें त्या गुहेंत अंधकार जाऊन अलौकिक प्रकाश राजपुत्राच्या नजरेस आला. या प्रकाशांत घोड्यास पुढें चालवीत नेल्यावर नंदनवनापेक्षांही रमणीय अशा बगीच्यांनीं युक्त; सुवर्ण व मणि यांनीं बनविलेलें; हजारों सौधांनीं युक्त; विधात्यानें अनेक सृष्टींमध्यें उपयोग करण्यासाठीं रत्नांचें भांडार जमवून ठेवलें असावें असेंच वाटविणारें; नीलमण्यांच्या प्रभेमुळें यमुनेच्या प्रवाहांनीं रचलें आहे काय अशी शंका उपजविणारें; स्फाटिकमण्यांच्या प्रभेमुळें चांदण्यानें बनविलें कीं काय असें भासविणारें; सूर्यादिकांच्या किरणांचा संबंध नसतां ही प्रकाशमय दिसणारें; नेत्रांस तृप्ति देणाऱ्या रचनेमुळें अमृत स्रवणारें असें दिसणारें; आणि

आकाशांत पसरलेल्या मण्यांच्या विचित्र किरणरूपी इंद्रधनुष्यांमुळें जणों अद्भुतरसाची वृष्टि करण्याला सज्ज झालें असावें असें दिसणारें, असें एक नगर दृष्टीस पडलें. कुसुमायुध या नगराला पाहण्यांत क्षणोक्षण जे निमिष विघ्नस्वरूप झाले त्यांस तो वैऱ्यासारखे लेखूं लागला; एकाग्रतेंत व्यत्यय आणणाऱ्या घोड्याच्या किंखाळण्याचा कंटाळा करूं लागला; पळून आलेल्या दैत्यानें ही काय इंद्रजालसृष्टि निर्मिली आहे अशी शंका मनांत धरूं लागला; ही जर इंद्रजाललीला ह्मणावी तर ती फार वेळ टिकूं नये असा विचार मनांत आणून हा सर्व खराच प्रकार आहे असें मानूं लागला; बरें सत्य ह्मणावा तर हें एवढें थोरलें नगर पण त्यांत लोकवसति कशी नाहीं हें पाहून फिरून तो विचार बदलूं लागला; मग हें काय आपल्यास स्वप्न पडत आहे असेंही ह्मणूं लागला; पण स्वप्नाचें मूळ निद्रा आहे आणि निद्रेचें मूळ श्रम होत, आणि एथपर्यंत येण्यास मला तर बिलकूल श्रम पडले नाहींत मग हें स्वप्न खचीत नाहीं असाही तर्क होऊं लागला; पुनः कदाचित् हें मनोराज्य तर नसेल अशीही कल्पना बसवूं लागला; मनोराज्य संकल्पांनीं बनत असतें, आणि मी तर असें कोणतेच संकल्प केलेले नाहींत, असें जाणून ही कल्पना खोटीच असें म्हणून तीही रद्द करूं लागला. "मी या अज्ञान भूमींत आलों ही मोठी चूक झाली पण माझ्यापाशीं शस्त्रविद्यादिकांची सर्व सामग्री परिपूर्ण असतां, काय चिंता आहे, असें म्हणून फिरून हिंमत धरूं लागला. अनेक प्रकारच्या चिंता मनांत येऊन भुंवई व बोटें यांचे अनेक प्रकारचे चाळे चालू झाले. मीं पुस्तकांत पाताळाचें वर्णन वाचलें आहे तें या स्थळाला बरोबर लागू पडतें, आणि हा घोडा पाताळांत प्रवेश करण्यास सुद्धां समर्थ आहे असें मनांत आणून घोड्याकडे बहुमानपूर्वक पाहूं लागला. "अरेरे! माझ्या हातांतून शत्रु सुटून गेला कसा?" असें म्हणून पुनः खेदमुद्रा धारण केली. माझा उजवा डोळा

व उजवा बाहु फुरफुरूं लागतो यावरून हा देखावा कांही चांगल्या परिणामाचा दर्शक तर नसेल? असेंही त्यास वाटूं लागलें. आणि अशा नगरांत जाऊन तें पाहिल्यावांचून बाहेर निघून जाणें चांगलें नाहीं असा त्यानें संकल्प केला.



## प्रकरण २९ वें.

### नायिकाप्रवेश.

दृष्टीस पडलेल्या पाताळभूमीवरील नगराविषयीं अनेक कल्पना बांधणारा, आणि इतक्यांतच अकस्मात् प्राप्त झालेल्या मनःप्रसादावरून भावी सुखपरिणामाविषयीं होणाऱ्या अटकळीला बळकटी आणणारा कुसुमायुध घोड्यासहित त्या नगरांत प्रवेश करून चोहोंकडे पाहूं लागला ; परंतु तेथें कोठेहीं स्त्री कीं पुरुष कोणीही त्याच्या नजरेस आलें नाहीं. तेव्हां त्याचें मन परस्परविरुद्ध अशा अनेक तर्कवितर्कांमध्यें घोटाळूं लागलें. उजव्या हातांतील आभरणांस स्फुरणचलनामुळें हलतांना पाहून " अनुकूळ दैव असतां कोणतीही गोष्ट कोणत्याही ठिकाणीं घडणें अशक्य नाहीं " असें त्यास सहजच वाटूं लागलें. ग्रंथांतरीं एकाएकीं अमक्याचें दैव उघडून कोटकल्याण झालें अशा लिहिलेल्या गोष्टी त्याच्या वाचण्यांत आल्या होत्या त्या तो आठवूं लागला. दैवीं शुभफळ लिहिलें असेल तर त्याचीं चिन्हें मात्र दर्शवून फळप्राप्ति लांबणीवर टाकण्यांत काय हेतु असावा या गोष्टीचा तो विचार करूं लागला. उत्कंठेमुळें अधीर होणाऱ्या आपल्या मनाला तो दोष देऊं लागला. मनांत निश्चयाऽभावामुळें लांब लांब डोळे लावून सर्व दिशांकडे पाहूं लागला. वाऱ्याच्या खडबडाटानें सुद्धां मनुष्याची चाऊल झाल्याची भ्रांति धरूं लागला. आणि नगराची शोभा पाहून अधिकाधिकच विस्मय पावूं लागला.

राजमार्गानें व गल्लीमध्यें सुद्धां घोड्यासहित फिरतां फिरतां, तो एका अति रमणीय मंदिराशीं आला. तेथें त्याच्या मुखशाळेंतच बसलेली, गळ्यांत रुद्राक्षांची माळ घातल्यामुळें भ्रमरपंक्तिसहित कमलिनी-

प्रमाणें शोभणारी, शुभ्र लुगड्यांतून झळकणाऱ्या शरीराच्या प्रभेवरून तसेंच आभरणांशिवाय शुष्क अंगांवरून कामदेव दग्ध झाल्यावर वैधव्यव्रत पाळणाऱ्या रतीसारखी दिसणारी, अतिउत्तम व सर्व सुखांची सामुग्री जवळ सिद्ध असलेल्या ठिकाणीं बसलेली असतांही उष्ण निःश्वास सोडून लुगड्यास निस्तेज करणारी, चिंतारूप समुद्रांतून तरून जाण्यास नौका जणों शोधीत आहे असें दिसणारी, अनेक तीर्थीहून आणलेली पवित्र मृत्तिका ललाट आदिकरून अंगभागीं लावणारी, काळाच्या अतर्क्य गतीचें व धैर्याचें वर्णन ज्यांत केलें आहे अशीं गाणीं वाद्याच्या साहाय्याशिवाय तोंडानें मधुर स्वरानें गात बसलेली, नेत्रांतून गळणाऱ्या अश्रूबिंदूंस पदरांत घेणारी, संकल्पांच्या अत्युच्च भूमिकेप्रत चढत असतां थकून गेल्यामुळें लांब लांब निःश्वास सोडणारी, नासिकाग्रदृष्टि ठेवल्यामुळें योगधारणा करण्यास बसल्याप्रमाणें भासणारी, एकटीच असतांही, मणिमय स्तंभामध्यें पडलेल्या प्रतिबिंबामुळें जणों समान दुःखानें समान वेश व समान आचरण करणाऱ्या हजारों संख्यांनीं वेष्टिलेली, हृदयांत उद्भवणाऱ्या दुःखांस स्वतःचें खरें हृदय न दिसावें या हेतूनें त्यांस भ्रमण करण्यासाठीं अनेक शरीरें धारण करणारी, स्तनमंडळावर लोळणाऱ्या केशकलापावरून जणों हृदयांत वास करणाऱ्या चिंतारूप विषारी नागिणीला प्रत्यक्ष दाखवीत आहे काय अशी दिसणारी, उजव्या हाताची तर्जनी वारंवार ओठावर धरणारी, ललाटीं काळ्या मृत्तिकेचा अंगारा लाविल्यामुळें व तोंड निस्तेज झाल्यामुळें पुनवेच्या रात्रीं पाहाटेस फिकट दिसणाऱ्या चंद्रबिंबाचें अनुकरण करणारी, दैत्याच्या क्रौर्यामुळें व त्यापासून उद्भवणाऱ्या अनर्थांच्या कल्पनेनेंच केवळ गात असलेल्या गाण्यांतही स्वरभंग पावणारी, मानसिक पीडेमुळें घाबरून जाऊन उत्साहानेंही सोडून दिलेली, डोक्यावरल्या पदरासही नीट करण्यास अशक्ततेमुळें असमर्थ अशी, नेत्रांच्या भुंवया आणि हाताचीं बोटें

वारंवार हलविल्यामुळें श्रमानें शून्यदृष्टि झालेली, थोड्या थोड्या वेळानें पुनः पुनः डाव्या हाताच्या तळाथावर मुख ठेवून बसल्यामुळें कमळावर प्रभात समयीं चंद्र येऊन बसल्याप्रमाणें शोभा दाखविणारी, बांधवजन जीवमान असतांही त्यांस आपली खबर पोंचविण्याचा कांहीं इलाज नसल्याकारणानें फक्त दीर्घ निःश्वास टाकूनच काळ कंठणारी, वृक्षांच्या हलणाऱ्या पानांनीं सुद्धां शत्रूच्या चाऊलीचेंच भय धरून कांपणारी, डाव्या शरीरभागीं स्फुरण झालेलें पाहून कांहीं धीर धरणारी, माडीवर बसलेल्या प्रिय सखीच्या कंकणांचा नाद ऐकून वर खालीं आसपास नजर फिरविणारी, शुभ चिन्हें पाहून अशा चिन्हांचीं फळें पूर्वीं कोणतीं कसकशीं आलीं त्या जुन्या कथांचें स्मरण करणारी, शुभ चिन्हें दिसत असून त्यांचीं फळें मात्र मिळण्यास अवधि लागल्यामुळें संताप पावणारी, शत्रूची उद्धटपणाची वागणूक आठवून आठवून वारंवार मस्तक हलविणारी, मनाला लांब लांब मार्गांनीं हिंडण्यास लाविल्यामुळें श्रमित झालेली अशी एक दिव्य स्त्री कुसुमायुधाच्या दृष्टीस पडली.

दुरून पाहून " आकृतीवरून आणि स्वरावरून ही कोणी दिव्य स्त्री दिसते, दिव्य स्त्री असूनही कांहीं मोठ्या दुःखानें गांजली असावी अशी दिसते, वारंवार चकित चकित दृष्टीनें पाहात राहते आणि महालाच्या वरच्या भागाकडे टक लावून पाहत राहते, यावरून वरील भागीं कांहीं-तरी सबळ कारण असलें पाहिजे. दैवाची गति विचित्र आहे; त्यानें मला दैत्याच्या पाठीमागें लावून या दिव्यभूमीला आणून सोडलें. या ठिकाणीं कांहींतरी अद्भुत वृत्तांत दृष्टीस पडेल अथवा ऐकूं येईल असें वाटतें. घोडा जर या ठिकाणीं किंकाळला तर ही स्त्री चकित होऊन जाईल. अझून तिची दृष्टि मजवर पडली आहे असें दिसत नाहीं. येथून परत फिरावें किंवा तिच्या जवळ जावें? दुःखित लोकांस पाहून परत फिरावें हा क्षत्रियांचा धर्म नव्हे. दैत्यानें मला भुलविण्यासाठीं ही माया

तर केली नसेल? माया फारवेळपर्यंत टिकत नाहीं हा सिद्धांत आहे. माया असली ह्मणून काय चिंता आहे? हिला पाहून माझ्या मनांत दया उत्पन्न होते आणि ती दया क्षत्रियांच्या धर्माप्रमाणें हिचें दुःख दूर करण्याविषयीं मला प्रेरणा करते. शत्रूचे पक्षाकडील बळाबळ माहीत नसतांही विरुद्ध पक्षाकडील मनुष्याच्या चित्ताला कधींही दयार्द्र करणार नाहीं, हा असा स्वाभाविक नियमच आहे. ज्यास पाहिल्यानेंच चित्त द्रव पावतें त्यास अहित ह्मणून कसें मानावें? मनुष्यांचे डोळे हित करणाराच्या दर्शनानें आर्द्र होतात, पुत्राच्या दर्शनानें रसपूरित होतात, कामिनीच्या दर्शनानें वक्र होतात आणि शत्रूच्या दर्शनानें लाल रक्त होतात. या नियमास अनुसरलें असतां या स्त्रीच्या दर्शनानें माझे डोळे आर्द्रता पावतात. पाहिजे तें होवो, जवळ जाऊन हकीगत विचारावी तर खरी. वेळानुसार माझ्या तडाक्यांतून जखमी होऊन निसटून गेलेल्या दैत्याचा पत्ता लागण्याचा कदाचित् हा मार्ग असेल? मला पाहून जर ही मागें सरली नाहीं, वर चढून गेली नाहीं, किंवा उडूनही गेली नाहीं तर तिचें नांव गांव तशीच तिची एकंदर हकीगत विचारण्यास बरें पडेल." याप्रमाणें मनांत विचार करीत करीत कुसुमायुध घोड्यावरून खालीं उतरला. आणि झाडाच्या बुंधाशीं त्यास बांधून ठेवून हळुहळु, तिजकडे पाहत पाहत, थोपत थोपत, आश्चर्य पावत पावत, दृढता धरीत धरीत, आणि हात जोडीत जोडीत, तिकडे जाऊं लागला.

तरुण राजकुमाराला येतांना पाहून विस्मित होणारी; दैत्याच्या कपटाची शंका मनांत धरणारी; डावा डोळा स्फुरण पावण्याचें फळ मिळणार ह्मणून कल्पना करणारी; हा प्रदेश मनुष्यांस केवळ अगम्य होय असें जाणून फळाच्या अपेक्षेविषयीं कल्पना सोडून देणारी; कुमाराचे नेत्र आर्द्र झालेले पाहून धास्ती सोडून देणारी; "दैव अनुकूळ झालें असतां पाहिजे तें घडवून आणून सुखाचें द्वार खुलें करतें"

अशी कल्पना मनांत आणणारी; क्षणांत हा सर्व प्रकार स्वप्नवत् लेखणारी; क्षणांत मनोराज्य ह्मणून समजणारी; क्षणांत सत्य ह्मणून विश्वास धरणारी; क्षणांत गोंधळून त्रास पावणारी; क्षणांत विश्वास धरणारी; क्षणांत फिरून त्रास आणि विश्वास यांच्या मध्येंच गोंधळणारी; काय बोलावें आणि हा काय बोलेल याच विचारांत पडलेली; विविध तर्क करणारी; धीर धरणारी; स्त्री स्वभावाच्या बळानें लज्जा पावणारी; दुःखाच्या बळानें उमेद धरणारी; आणि कोणतीही स्थिति असो तरी अतिथीच्या सत्काराविषयीं अवश्य कर्तव्य केलेंच पाहिजे असें समजणारी अशा या दिव्य स्त्रीनें, उभें राहून, नेत्रांच्या किरणरूपी अमृतानें अभिषेक करीत असावी, मंदहास्याच्या प्रभारूप गंगाजळानें पवित्र करीत असावी, मुखचंद्राच्या चांदण्यानें आल्हाद देत असावी, आणि नेत्रकमलाच्या प्रफुल्लितपणानें अश्वासन देत असावी, अशा प्रकारें त्याजकडे पाहून ह्मटलें कीं, "यावें महाराज. या अगम्य भूमीमध्यें आपलें येणें कसें झालें? आपण कोणत्या राजकुळाला सूर्यानें प्रफुल्लित केलेल्या कमळवनाची शोभा आणिली आहे? कोणत्या देशाला वसंतानें सोडून दिलेल्या उपवनाची दशा प्राप्त केली आहे? कोणत्या राजाला जयंताच्या पित्याची उपमा साजेल असें केलें आहे? कोणत्या मातेला रत्नप्रसूमध्यें अग्रगण्य पदावर बसविलें आहे? आणि कोणत्या राजधानीला परम भाग्यशाली बनविलें आहे? हें पवित्र जळ आणि हीं अमृतासारखीं फळेंही येथें सिद्ध आहेत. यांचें ग्रहण करून जळ पिऊन विश्रांति घेऊन, नंतर, जर गुप्त नसेल तर आपला वृत्तांत आपण सांगावा."

त्या दिव्य स्त्रीच्या भाषणाच्या अनुग्रहानेंच आपल्या आत्म्याला वरदान पावल्याप्रमाणें समजणाऱ्या कुसुमायुधानें थोडासा विनय दाखवून तीं मधुर फळें सेवन केलीं आणि जलपान केलें. यानंतर त्यानें आ-

करावें. असह्य शोकही सज्जनाच्या समागमानें सह्यतेला पावतो. अहो! दुःखाच्या समयीं मनींचें गूज निवेदन करण्याला स्थळ मिळालें असतां दुःखाचा बराच भार हलका होतो ही ऐकलेली गोष्ट आज सिद्ध झालेली मी पाहात आहें. सज्जनांची मैत्री सात पावलें चालल्यानें घडते ही गोष्ट जर खरी असेल, आपले मनांत माझे विषयीं जर कांहीं गौरव वसत असेल, कोणताही प्रसंग असो तरी दयेचा गुण जर अत्याज्य असेल, आमचें दर्शन जर थोडें तरी सुखदायक वाटत असेल आणि तुमच्या दुसऱ्या कामांत जर व्यत्यय येत नसेल, तर उठा, माझ्या बरोबर चला."

"भगवति! तुम्हीं शोकाक्रांत असतांही माझें आदरातिथ्य केल्याकारणानें मी तुमचा सेवक बनलों आहें. मला निःशंकपणें आज्ञा करून कृतार्थ केलें पाहिजे."

याप्रमाणें बोलून कुसुमायुध उठला. त्याबरोबर अनंगप्रभाही उठली आणि पुढें चालू झाली. तिच्या मागून, उपराग जसा ब्रह्मविद्येच्या, विजय साहाय्यसंपत्तीच्या, अभ्युदय सुशीलतेच्या, विवेक विद्येच्या, उत्साह शूरतेच्या, आणि मान लक्ष्मीच्या मागोमाग जातो त्याचप्रमाणें कुसुमायुध तिच्या मागून चालला. कांहीं पावलें चालून मग अनंगप्रभा महालाच्या जिन्यावर चढतांच कुसुमायुधही तिच्या मागोमाग वर चढून गेला आणि तिच्या बरोबरच महालाच्या वरल्या दालनांत येऊन दाखल झाला. महालामध्यें आल्यावर सुवर्णमय मोठ्या पलंगावर बसलेली, मेघाशिवाय असलेल्या विजेसारखी, चंद्राशिवाय असणाऱ्या चंद्रिकेसारखी, महादेवाच्या ललाटस्थ अग्नीनें जळून गेलेल्या कामदेवाच्या संजीवनी औषधीसारखी, रतीनें कामदेवाकरितां साध्य केलेली मृत्युंजयाची विद्या असावी अशी दिसणारी, पाहणाराच्या हृदयांस हरण करणारी, न पाहणाराच्या जीविताचें फळ हरणारी, शृंगाररसाची कुळदेवताच होय अशी भासणारी, एकटी

माझें आतिथ्य करण्यामध्यें मोठेंच औदार्य दाखविलें त्याचा मोबदला माझ्यानें कसा देतां येईल ? याबद्दल मी आपला उतराई कसा होऊं ? तथापि तुमच्या दुःखाचें कारण जर समजलें तर तें निवारण करण्याचा होईल तो उपाय करण्याविषयीं माझ्या मनांत अत्यंत उत्कंठा उत्पन्न झाली आहे. हातच्या गेलेल्या शिकारीविषयींही तुमचें भाषण वरदानाप्रमाणेंच लेखून मी फार आनंदित झालों आहें. तुमचें शरीर शुभ्र पातळानें वेढलेलें तसेंच आभरणशून्य पाहून माझ्या मनामध्यें ज्या ज्या शंका उत्पन्न होतात त्या सर्व निवेदन करण्यास माझी जीभ कांहीं उचलत नाहीं !'

राजकुमाराच्या भाषणरूप अमृतधारांच्या सेचनानें पुनर्जीवन पावली असावी अशी दिसणारी; नेत्रांतून अविच्छिन्न चाललेल्या अश्रुधारांनींच कुसुमायुधास कारुण्यरसानें भरपूर करूं पाहात असावी अशी दिसणारी; गुहेमध्यें आणून सोडल्यावर ज्याची आशाही ठेवतां येत नाहीं असें अचिंतित आश्वासन मिळाल्याकारणानें धैर्याला बहुमान देणारी; आणि कुसुमायुधाचें आतिथ्य करीत असतां मनांत ठसलेले विचार सिद्धीस पावावे ह्मणून मनापासून प्रभूची प्रार्थना करणारी अशी ती दिव्य स्त्री बोलली कीं—' महाशय राजकुमार, गंधर्व लोकींचा विश्वावसु नामें एक राजा आहे. ज्याचें नांव तुमच्या कानावर पुष्कळ वेळां आलें असेलच. या गंधर्व राजाची त्रैलोक्याची रत्नभूत अशी एक **मुक्ता** नांवाची कन्या आहे. तिची मी अनंगप्रभा नांवाची प्रियसखी आहें आणि तिच्या साठींच मी चिंतारूप समुद्रांत बुडालें आहें. एक दिवस **मुक्ता** आपल्या पित्याच्या बगीच्यामध्यें माझ्या संगतीं फिरत होती तों या पाताळभूमीमध्यें राहणारा भीमासुर नांवाचा दुष्ट दैत्य, जो डुकराचें रूप धरून मुनीच्या आश्रमाचा विध्वंस करीत असतां तुमच्या बाणानें आज विद्ध झाला आहे, त्यानें एकाएकीं तेथें येऊन अंधकारमय आसुरी मायेच्या बळानें

सर्वांचे नेत्र बंद करून मुक्ता हरण करून नेली. मीही, माझ्या त्या प्रियसखीच्या शीलाच्या आणि प्राणांच्या रक्षणासाठीं आणि दैत्याच्या पाशांतून तिला मुक्त करण्याची कांहींतरी युक्ति योजितां यावी ह्मणून, माझीं सगळीं धर्मकृत्यें सोडून देऊन, दिव्यगतीनें त्याच्याच पाठोपाठ निघालें. त्या नीच दैत्यानें एका अंधारी गुहेमध्यें प्रवेश करून व या नगरांत येऊन वरल्या या महालामध्यें माझ्या प्रियसखीला आणून ठेविलें आणि मागें वळून पाहूं लागला तों मी ही पाठोपाठ आलेली त्याच्या नजरेस पडलें. तेव्हां त्यानें आह्मा दोघींनाही अडकवून टाकून येथें ठेविलें आहे. असें ऐकतें कीं या दुष्ट दैत्यानें माझ्या प्रियसखीबरोबर बलात्कारानें लग्न करण्याचा निश्चय केला आहे. शूद्र जसा वेदाच्या श्रुतीला, राहु चंद्राच्या अमृतधारेला, पापी सद्गतीला, कुत्रा हविष्याच्या पत्रावळीला, उंट द्राक्षीच्या वेलीला, कावळा पुरणपोळीला, आणि खळ ब्रह्मविद्येला जसा योग्य नाहीं त्याच प्रमाणें हा दुष्ट राक्षसही माझ्या सखीला योग्य नाहीं. काल ही माझी प्रियसखी येथून सुटका करून घेण्याविषयीं निराश होऊन बसली असतां आत्मघात करण्याला तयार झाली होती. पण मी प्राचीन इतिहासाचें स्मरण देऊन व दैवाच्या अचिंत्य शक्तीचें वर्णन ऐकवून आश्वासन दिलें. शरदृतु जसा पावसाला, पर्वतांची पंक्ति पाण्याच्या पूराला, तृष्णा धैर्याला, विद्या अविवेकाला, राज्यलक्ष्मी नम्रतेला, तारुण्य विवेकाला, अनीति अभ्युदयाला, कृपणता सुयशाला, जरावस्था सामर्थ्याला, दरिद्रता तेजाला, चिंता लावण्याला, साधुसेवा शोकाला, याचकता सन्मानाला आणि ब्रह्मविद्या देहाभिमानाला शांत करिते त्याचप्रमाणें तिच्या मनाच्या वेगाला मी शांत केलें. कुसुमायुध महाराज! विधात्यानें कपाळीं लिहिलेली अक्षरमालिका उचकटून टाकण्याला कोणीही समर्थ नाहीं. दैव विन्मुख झालें असतां कोणीही साहाय्य करीत नाहीं आणि दैव अनुकूळ झालें असतां समुद्राच्या मध्यभागींही साहाय्य करणारा मिळूं शकतो. जेथें मन,

स्वप्नवृत्ति, अथवा कवीची वाणीही न पोंचावी अशी घटना घडवून आणावयास दैवाला यत्किंचितही वेळ लागत नाहीं. दैव विरुद्ध झालें असतां क्षीरसागरांतही दूध मिळावयाचें नाहीं. आणि दैव उन्मुख झालें असतां मारवाडच्या वैराण प्रदेशामध्यें क्षीरसागराचीही प्राप्ति होईल. दैवाच्या इच्छामात्रें मित्र शत्रूचें कर्म करितो. शत्रू मित्राचें कार्य करितो. आपण इच्छिलेलें घडूं देत नाहीं, न इच्छिलेलें कपाळीं येतें. बंधु निरुपयोगी होतात आणि एकटें राहणेंही उपयोगाचें होतें. शक्य कार्य घडत नाहीं, अशक्य कार्य आपोआप घडतें, हातीं आलेलें सुटून जातें, अनपेक्षित हातांत येऊन पडतें ; अमृत विष बनतें, आणि विष अमृत बनतें; तृण वज्र बनतें, आणि वज्र तृण बनतें, उद्योग विफळ होतो, निरुद्योग लाभप्रद होतो, आणि चढलेला पडून जातो व पडलेला वर चढतो. विश्वावसूच्या बगीच्यामध्यें स्वच्छंद फिरणें कोठें आणि दुष्ट दैत्याच्या हातीं लागून कैदेंत पडणें कोठें? या अगोचर स्थलीं आमचें राहणें कोठें आणि तुमचें येणें कोठें? राक्षसाचा लग्नाचा मनोरथ कोठें आणि तुमच्या हातानें जखमी होणें कोठें? पाताळची गुहा कोठें आणि तुमची राजधानी कोठें? विधवापणामुळें मला करायची ईश्वरभक्ति कोठें आणि सखीसाठीं करावी लागणारी खटपट कोठें? महाराज! तुमच्या हातून निसटून गेलेली शिकार तुह्माला बसल्या जागींच येथें हातांत येऊन पडेल, तुह्मी निश्चित रहा. दोन चार दिवस येथेंच गुप्त राहून आपल्या दर्शनसुखानें आमच्या नेत्रांचें पारणें फेडा. तुमचें कामचें काम होऊन आमचेवर मोठे उपकार होतील. जगामध्यें हजारों जण राहतात परंतु जे परोपकार करितात त्यांचेंच जीवित धन्य होय. जर कांहीं अडचण नसेल तर मी तुह्माला माझ्या सखीकडे येण्याविषयीं विनंति करतें. माझ्या सखीला आपण दर्शन द्यावें आणि परितापानें विव्हळ झालेल्या तिच्या हृदयाला भाषणरूप अमृताच्या सेचनानें शांत

करावें. असह्य शोकही सज्जनाच्या समागमानें सह्यतेला पावतो. अहो! दुःखाच्या समयीं मनींचें गूज निवेदन करण्याला स्थळ मिळालें असतां दुःखाचा बराच भार हलका होतो ही ऐकलेली गोष्ट आज सिद्ध झालेली मी पाहात आहें. सज्जनांची मैत्री सात पावलें चालल्यानें घडते ही गोष्ट जर खरी असेल, आपले मनांत माझे विषयीं जर कांहीं गौरव वसत असेल, कोणताही प्रसंग असो तरी दयेचा गुण जर अत्याज्य असेल, आमचें दर्शन जर थोडें तरी सुखदायक वाटत असेल आणि तुमच्या दुसऱ्या कामांत जर व्यत्यय येत नसेल, तर उठा, माझ्या बरोबर चला."

"भगवति! तुह्मीं शोकाक्रांत असतांही माझें आदरातिथ्य केल्याकारणानें मी तुमचा सेवक बनलों आहें. मला निःशंकपणें आज्ञा करून कृतार्थ केलें पाहिजे."

याप्रमाणें बोलून कुसुमायुध उठला. त्याबरोबर अनंगप्रभाही उठली आणि पुढें चालू झाली. तिच्या मागून, उपराग जसा ब्रह्मविद्येच्या, विजय साहाय्यसंपत्तीच्या, अभ्युदय सुलीलतेच्या, विवेक विद्येच्या, उत्साह शूरतेच्या, आणि मान लक्ष्मीच्या मागोमाग जातो त्याचप्रमाणें कुसुमायुध तिच्या मागून चालला. कांहीं पावलें चालून मग अनंगप्रभा महालाच्या जिन्यावर चढतांच कुसुमायुधही तिच्या मागोमाग वर चढून गेला आणि तिच्या बरोबरच महालाच्या वरल्या दालनांत येऊन दाखल झाला. महालामध्यें आल्यावर सुवर्णमय मोठ्या पलंगावर बसलेली, मेघाशिवाय असलेल्या विजेसारखी, चंद्राशिवाय असणाऱ्या चंद्रिकेसारखी, महादेवाच्या ललाटस्थ अग्नीनें जळून गेलेल्या कामदेवाच्या संजीवनी औषधीसारखी, रतीनें कामदेवाकरितां साध्य केलेली मृत्युंजयाची विद्या असावी अशी दिसणारी, पाहणाराच्या हृदयांस हरण करणारी, न पाहणाराच्या जीविताचें फळ हरणारी, शृंगाररसाची कुळदेवताच होय अशी भासणारी, एकटी

असतांही कामदेवाची मोठी सेनाच होय अशी वाटणारी, वसंत आणि चंद्र इत्यादिकांच्या साहाय्याशिवायच कामदेवाचें इष्टकार्य सिद्धीस नेणारी, कामदेवाच्या राज्याभिषेकाकरितां लावण्यरूपी जल भरून स्फटिकमय कळशाची जोडी आणून ठेविली असावी असे स्तन धारण करणारी, परस्परामध्यें अवयव प्रतिबिंबित झाल्यामुळें विचित्र अवयवाचें शरीर धारण करणारें कामदेवाचें वशीकरण असावें अशी दिसणारी, तारुण्यावर यथेष्ट आज्ञा चालविण्यास प्रकट झालेल्या कामदेवाच्या सोन्याच्या छडीची भ्रांति उत्पन्न करणारी, दृष्टिरूप विषास कट्यारीनें कामदेवाला जीवन देणारी, मादक द्रव्यांनीं बनली नसतांही उन्मत्त करून टाकणारी, सिद्धौषधिरूप नसतांही दर्शनमात्रेचें आकर्षण करणारी, आयुधमय नसतांही चित्ताचा भंग करणारी, महादेवापासून नाचण्या करितां स्त्रीचें रूप धरून बसलेला कामच होय अशी दिसणारी, यौवनानेंही अनुरागानें पूर्ण भरलेली असून आलिंगलेली असावी अशी दिसणारी, शब्दाच्या शक्तिवृत्तीनें अवर्णनीय असल्याकारणानें ब्रह्मानंदाची सख्खी बहीण असावी अशी भासणारी, अग्नीनें निर्मिली नसतांही तरुणांच्या हृदयाला द्रवरूप करणारी, शीतल द्रव्यांनीं निर्माण केली नसतांही नेत्रांस थंडगार करणारी, हृदयांत थय् थय् नाचूं लागलेल्या कामदेवाच्या भारानें घाबरून जाऊन हृदयांतून अर्धेच बाहेर आले असावे असे स्तन धारण करणारी, आणि कामदेवरूपी सिद्ध योग्यानें सर्व अंगामध्यें प्रवेश करून भीमासुराच्या क्लेशांतून मुक्त करूं इच्छिलेली, अशी **मुक्ता** त्याच्या दृष्टीस पडली.



# प्रकरण २७ वें.

## निस्सीम सौंदर्य.

मुक्तेचा केशपाश जणों मुखरूप चंद्रांतील अमृत पिण्यासाठीं आलेला मोठा नाग होय; शरीराच्या कांतींतून पळून जाऊन वरच्या भागीं एकवट झालेला अंधकारच होय; कामी लोकांच्या अंतःकरणरूपी मासळीला पकडण्यासाठीं कामदेवानें टाकलेलें जाळें होय; पुष्परूपी बाणांचा संग्रह करून ठेवण्यासाठीं कामदेवानें बनवलेला काळ्या रंगाचा भाता होय; तरुणांच्या चित्तरूपी घोड्याला स्वाधीन करून घेण्यासाठीं कामदेवानें तयार केलेला चाबुक होय; मुखरूपी कमळांतला मकरंद पिण्यासाठीं एकत्र मिळालेल्या भ्रमरांची पंक्ति होय; मुखाच्या प्रभेमध्यें भागीरथीच्या प्रवाहाची भ्रांति पावून तीस मिळूं आलेला यमुनेचा प्रवाह होय; आणि शरीरामध्यें न समावल्याकारणानें बाहेर निघालेला शृंगाररसाचा प्रवाह होय अशा प्रकारें दिसत असे.

तिचें ललाट कामदेवाचें बसावयाचें स्फाटिकमय पीठ होय, कस्तूरीच्या तिलकरूप कळंकाचा अनुभव पाहण्यासाठीं आलेला अष्टमीचा चंद्र होय आणि शरीररूपी आपल्या आफिसाची प्रसिद्धी करण्यासाठीं कामदेवानें तिलकरूप एक आपली निशाणी काढून लाविलेला स्फटिकमय फळा होय असें शोभत होतें. तिच्या ललाटीं लाविलेली कस्तुरीची टिकली जणों कामदेवानें भृकुटीरूप धनुष्यांतून तरुणांचीं अंतःकरणें मूर्च्छित करण्याच्या हेतूनें फेंकलेलें तामसास्त्र होय; नेत्ररूप दोन कमळांतून कोणत्या कमळावर जावें याचा निश्चय करण्यासाठीं घोटाळून उभें राहिलेलें भ्रमराचें पोर होय; मुखरूपी चंद्राच्या बळाचा निश्चय करण्यासाठीं केशपाशरूप

अंधकारानें पाठविलेलें आपलें लहानसें पोरच होय; आणि विधात्यानें आंत लिहीलेल्या सर्वोत्तम पति मिळण्याविषयींच्या अक्षरपत्रिकेवर कामदेवानें आपली भारलेली बारिक मोहोर होय अशी दिसत होती.

तिच्या भुंवया कामी जनांवर कटाक्षरूप बाण फेंकण्यासाठीं कामदेवानें मांडलेला कमठा होय; कामठ्याच्या खुबीनेंच मोह पावलेल्या कामदेवानें या पुढील आपला अभिप्राय विसरून जाऊन तो कमठा दोरीशिवायच ठेऊन दिला असावा. नेत्ररूप कमळावर आलेल्या भ्रमरांच्या पोरांची पंक्तिच होय; कटाक्षांनीं अभ्यास करण्यासाठीं जवळ ठेवलेली चपळतेची काळी वर्णमाला होय ; शृंगाररसानें पोषण पावणाऱ्या लीलारूप लतेची काठी होय; आणि मदोन्मत्त झालेल्या यौवनरूप हत्तीच्या मदलेखा होत अशा दिसत होत्या.

तिचे नेत्र खंजनाचा गर्व खंडन करतील असे होते. मुखरूपी कमलाच्या पाकळ्या होत असे दिसत होते; कमळें आणि हरिणांचे डोळे यांचें सार काढून निर्माण केले असावे असे वाटत होते; कटाक्षांच्या वृष्टीनें योग्यांच्या चित्तालाही चलित करतील असे होते; हरिणीच्या नेत्रालाही शोभारूप धन मिळविण्याचा खजिना होय असे दिसत होते. कामदेवानें खूटतूट भरून काढण्यासाठीं वेगळे काढून ठेविलेले दोन बाण होत अशी शंका उत्पन्न करीत होते; तरुणांच्या शरीराला श्रमित आणि दृष्टीला भ्रमित करीत असल्या कारणानें विषाच्या उपमेला पात्र झाले होते ; नदीच्या लाटांना चंचलतेचें अध्ययन करवतील असे होते; आपली गति अडविल्या कारणानें कानांवर रागावत असावे अशा प्रकारें कोपऱ्यावर कांहींसे लाल होते; कानांनीं विहिरीची भ्रांति उत्पन्न होऊन तिचें उल्लंघन करण्यास भीत असावे अशा प्रकारें कानाच्या शिंवे पर्यंत येऊन पोंचल्यावर तेथेंच थबकून राहिले होते ; कानामध्यें लटकावलेल्या भोंकरांच्या मोत्यांला पिठाच्या गोळ्या

असें मानून त्यावर झडप घालणारी मासळी होय असे दिसत होते; काजळ घातलें असल्याकारणानें तरुणांस विषानें लेपटलेल्या बर्चीप्रमाणें लागत होते; शस्त्रानें किंवा अस्त्रानेंसुद्धां विंधतां येणार नाहींत अशा तरुणांच्या अदृष्ट अंतःकरणालाही क्षणांत भंगून टाकणारे होते; परस्परांच्या अवलोकनाचा आनंद मिळत नसल्याकारणानें व्यग्र होत असावे अशा प्रकारें चांचल्यानें चमकत होते; इंद्रनीलासारख्या रमणीय बाहुल्या असल्याकारणानें गोळीबार भरलेल्या कामदेवाच्या रायफलीची ( बंदुकीची ) शंका उत्पन्न करीत होते; तरुणांच्या चित्तरूप हरिणांस पकडणाऱ्या योग्यांच्या चित्तरूप सिंहालाही पकडणारे, असे बळवान होते; कटाक्ष फेंकित असल्याकारणानें माशांच्या जोडींतून तीक्ष्ण बाण निघाल्याची अलौकिक कल्पना उत्पन्न करीत होते; दिवसाला श्यामकमळाच्या जोडीचा प्रफुल्लितपणा पाहण्याचा अपूर्व महोत्सव देत होते; तरुणांस बर्च्याप्रमाणें विंधून टाकणारे असतांही स्वभावानें कोमळ होते; अंजनशलाकेलाही मध्यें विश्रांति दिल्याशिवाय शेवटपर्यंत न पुरूं देतील असे होते; कमलांसही त्यांनींच पराजित करून पाण्यामध्यें तपश्चर्या करण्याचें भाग पाडलें असावें अशा कल्पनेला कारणीभूत झाले होते; हरिणांसही लाजवून जंगलांत निवास करण्यास पाठविण्याला कारणीभूतही तेच झाले असावे असे दिसत होते; आणि सर्व कोमळ द्रव्यांनीं निर्माण केलेले असतांहीं ज्यांच्यावर पडत त्याला घायाळच करून टाकीत असे होते.

तिचे कटाक्ष तरुणांस जमीनदोस्त करून टाकितील असे होते; आह्मी जीवंत असतां कामदेवाला दुसरे बाण जवळ ठेवण्याचें काय प्रयोजन आहे? असें दाखविण्यास उत्कंठित झाले असावे असे दिसत होते; स्वतां पडल्यापूर्वीच कामी जनांस पाडून टाकणारे असे होते; कामी जनांच्या हृदयामध्यें स्वताच्या प्रवेशाबरोबरच मोहाचा प्रवेश करविणारे

असे होते; चपळ असतांही पाहणारांच्या हृदयांतून कधींही न हलणारे असे होते; उत्कंठेला शांत करूं लागलेल्यांस अधिकच उत्कंठित करणारे असे होते; नेत्रांत घातलेलें काजळ आपल्याहून वेगळें नाहीं असे भासविणारे होते; चांचल्यादि चमत्कारांमुळें काजळापासून निराळे होणारे होते; आणि वारंवार स्वतांच इकडे तिकडे फिरणारे असतांनाही कामी जनांस घामाघूम करून सोडणारे असे होते.

खरें हृदयभेदकत्व मुक्तेच्या कटाक्षांमध्येंच होतें, असें असतांही कवीश्वरांच्या कवितांमध्यें आणि वीरलोकांच्या शस्त्रादिकांमध्यें असल्याचें चुकूनच लोक समजत असत. कामदेवरूपी चोर ह्या मुक्तेच्या कटाक्षरूप खुरपण्याच्या साहाय्यानेंच हृदयरूप भिंत फोडून तरुणांच्या चैतन्यरूप सर्वस्वाचें हरण करूं इच्छीत असावा असें वाटत होतें; मुक्तेच्या शरीराला रचूं बसलेला विधाता तिच्या कटाक्षांच्या प्रहारानेंच व्यग्रचित्त होऊन मध्य भाग रचण्याचें विसरून गेला असावा असें भासत होतें; आणि अंगशून्य योध्यानें, भृकुटीरूप कोमळ कमठ्याच्या साहाय्यानें फेंकण्यांत येणारे कटाक्षरूप बाण त्रैलोक्याला हलवून सोडण्यामध्यें एवढे समर्थ असतील हे कोणाच्या ध्यानांत येईल?

मुक्तेची नासिका, मुखरूप चंद्रामध्यें मृग प्रवेश करीत असतां त्यास अडवण्यासाठीं कामदेवानें जवळ बाळगलेली जोडनळीची सोन्याची रायफल ( बंदुक ) होय अशी वाटत होती. महादेवाच्या नेत्राग्नीनें दग्ध झालेल्या कामदेवानें दाहाची शांति करण्याकरितां तोंडांतून अमृत भुरकून घेण्याची ही जोडनळी जवळ ठेविली असावी अशी भासत होती. डाव्या व उजव्या नेत्राला परस्परांच्या चमत्काराची चढाओढ न होऊं देण्याकरितां विधात्यानें मध्येंच रचलेली ही सूवर्णाची पाळ होय अशी दिसत होती. मोत्यांस आपल्याखालीं आश्रय देऊन त्याच्या समुद्रांतील निवासाच्या आणि लोहशलाकेनें विद्ध झाल्याच्या तपाला सफळ करीत

असावी अशी दिसत होती. स्वतां विंधलेली असतांही दुसऱ्यास मूर्च्छित करीत होती. शीतळता देणाऱ्या मोत्यांनींच तरुणांच्या हृदयाला संतप्त करीत होती. अधररूप बिंबफळावर झडप घालणाऱ्या मुक्ताफळाला प्राप्त झालेली पोपटाची चोंचच होय अशी दिसत होती. कामदेवानें नासिकेच्या मिषानें आपल्या सर्वस्वाची मुरली ठेविली असावी अशी भासत होती; कामदेवानें पोपटाची चोंच जाणून तिनें आपलें सगळें रहस्य उघडें होण्याच्या धास्तीनें तिला चूप ठेवण्यासाठीं मुक्ताफळ दाखवून लालचवूं पाहत असावी अशी दिसत होती; नाकांतील नथीच्या मोंत्यांनीं कामी लोकांच्या मर्मस्थळाला विंधून टाकण्याचें असंभाव्य काम करीत होती, कामी लोकांस विंधून टाकण्यासाठीं स्वतां विद्ध झाली होती आणि स्वतां धारण केलेल्या मोत्यांनीं मुखाला स्वाती नक्षत्राच्या संबंधाच्या चंद्राचें सादृश्य देत होती.

तिचे कान मुखांत न समावणाऱ्या लावण्याच्या प्रवाहाला समावून घेण्यासाठीं विधात्यानें विहीरीच निर्माण केल्या असाव्या असे दिसत होते. आपल्या मध्यें आलेल्या तरुणांच्या हृदयाला भोवऱ्यांत घालूं पाहात असावे अशा प्रकारें रमणीय आवर्तांची रचना धारण करून बसले होते; अनेक छिद्रांनीं युक्त असतांही कामी लोकांच्या अंतःकरणाला स्वतांतून बाहेर जाऊं देत नव्हते; स्वतांला कर्ण ह्मणून ह्मणवीत असतांही परक्यांच्या चित्तरूप रत्नाची चोरी करीत होते; लहान असतांही मोठमोठ्या विद्यांच्या अभ्यासास पात्र झाले होते; नेत्रांच्या टोंकाला फार दूर जातांना अटकाव करण्यासाठीं विधात्यानें केलेली शिवेची खुणा होय, असे दिसत होते; आणि सखीजनांनीं ऐकविलेल्या रस रहस्याला भरून ठेवण्याचे द्रोण होत असे वाटत होते.

तिचे गाल लावण्याला नाचवयाची रंगभूमि होय असे दिसत होते; सखींनाहीं चुंबन करण्याची अभिलाषा उत्पन्न व्हावी असे होते; का-

मदेवाचे केवळ जीवितरूप होते; विधात्यानें चंद्राचे दोन वाटोळे तुकडे कापून बनविले असावे असे शोभत होते; विरहीणींच्या शापामुळें दग्ध होणाऱ्या कामदेवानें दाहाच्या शांतीकरितां फिरवण्यासाठीं ठेवलेलें अमृतमय पेले होत असे दिसत होते; कुसुमायुधाच्या भविष्यकाळीं कामज्वराला शांत करण्याकरितां विधात्यानें योजिलेले बर्फाचे तुकडेच होत असे दिसत होते; चक्रवर्ती कामदेवाच्या अमलाखालीं गेलेल्या पृथ्वीचे पूर्व गोलार्ध आणि पश्चिम गोलार्ध यांची शंका उत्पन्न करीत होते; कामदेवानें आपला प्रतिस्पर्धी जो शंकर त्याला हटविण्याकरितां कसरत करण्याचे हे दोन चेंडूच होत असे वाटत होते; आणि थोडक्यांत ह्मटलें तर हजार मुखांचा शेषनागच कवि झाला असतां त्यांचें बरोबर वर्णन करूं शकला असता.

मुक्तेचे ओठ पोंवळ्यासारखे होते; स्वतां लाल असतांही विरक्त लोकांच्या अंतःकरणाला मलिन करून टाकीत होते; अमृतानें परिपूर्ण असतांही तरुणांस हतप्राय करणारे होते; सदाशिवाच्या कोपाग्नीनें जळून गेलेल्या कामदेवाला फिरून संजीवन करण्याकरितां विधात्यानें अमृतानें परिपूर्ण केले होते; परंतु केवळ दर्शनानेंच त्यास जीवन करतील अशी शक्ति त्यांस आहे असें घडलें; विधात्यानें तिचे ओठ बनवितेवेळीं कामदेवाचें आयुष्यच बनविलें अशी कल्पना उत्पन्न करीत होते; कामदेव अमृतानें परिपूर्ण वस्तूंनींच जगाला मारून टाकितो असें पाहणारांच्या तोंडांतून वदवीत होते; इंग्लिश भाषेप्रमाणें माणिक्याच्या अधरवर्डाप्रमाणें असल्याकारणानें आपल्या अधर या नांवाचें सार्थक करीत असावे असे वाटत होते; केवळ दर्शनानेंच शांति देणाऱ्या अमृताच्या विश्वासानें पाहणारांस अत्यंत परितप्त करणारे होते; आपल्या ल्हानशा स्वरूपांत अपार अमृताला समावून घेतल्याकारणानें, आश्चर्य वाटवीत होते; द्राक्षाहूनही अमृत आणि अमृताहूनही आह्मी अधिक मधुर

आहों अशा अभिमानानें हांसत असावे असे दिसत होते; त्रैलो-क्याला जिंकून घेण्याच्या कामदेवाच्या उत्कंठेला सहजरीतीनें पूर्ण करणारे होते; पोपटाच्या चोंचेनें जखमी न झालेल्या बिंबफळाप्रमाणें वाटत होते; तांबडटपणानें माणकाप्रमाणें दिसत होते; तरी स्वाभाविक कोमळतेनें परिपूर्ण होते; अशोकाच्या नवपल्लवाची कांति ग्रहण करीत होते; अमृताचा सुद्धां अनादर करतील असे होते; "हे ओठ नाहींत पण मुखरूप चंद्राच्या बालकिरणांचा समुदाय आहे" अशी कल्पना उ-पजवीत होते आणि कामदेवाशिवाय दुसऱ्या कोणाच्यानेंही त्यांचे प-रिपूर्ण वर्णन करितां आलें असतें असे नव्हते.

मुक्तेची दंतावली मुखरूप चंद्रांतून झरलेल्या अमृताच्या बिंदूप्रमाणें दिसत होती; मुखाच्या आंत राहिलेल्या अमृतसागरांतील मोत्यांप्रमाणें दिसत होती; पांढरें स्वच्छ असतांही तीवर ओठांची झांक पडल्या कार-णानें दाळिंबाच्या बियांचें अनुकरण करीत होती; केवळ दर्शनानेंच कामी-लोकांच्या हृदयाला चिरून टाकण्यासाठीं कामदेवानें योजलेली अदृष्टपू-र्व कवरत होय अशी दिसत होती; मुखरूप चंद्रानें आपलें अलौकिकत्व दाखविण्यासाठीं स्वतांच्या आंत ठेवून दिलेली ताऱ्यांची पंक्ति होय अशी शोभत होती; विधात्यानें मुखरूप कंमळापासून भ्रमरांस दूर ठेवण्या-साठीं त्याच्या आंत मांडलेल्या चंपकाच्या कळ्या होत अशी दिसत होती; विधात्यानें मुखामध्यें असलेल्या अमृताच्या प्रवाहाचें रक्षण कर-ण्यासाठीं बारिक बारिक स्फटिकाच्या मण्यांनीं रचलेला हा बांधच होय अशी दिसत होती; पक्षांच्या चोंचीच्या प्रहारापासून रक्षण करण्यासाठीं मुखाच्या आंत बसवलेली डाळिंबाची बीजावली होय अथवा विंधण्याच्या पीडेपासून सुटण्याकरितां मुखांत येऊन लपून बसलेली क्षीरसांगरांतील मोत्यांची पंक्ति होय अशी शोभत होती; विधात्यानें अमृताच्या समु-द्राच्या आंत शिंपल्याशिवायच मोत्यें उत्पन्न करण्याची नवीनवाई दा-

स्रविण्याची उत्प्रेक्षा करवीत होती आणि कोठेंही युद्धामध्यें क्षतयुक्त न झालेल्या कुसुमायुधाला सुरतयुद्धामध्यें क्षतयुक्त करण्याकरितां निर्माण केली असावी अशी दिसत होती.

मुक्तेचें मुख, जर पूर्ण चंद्रमंडल कलंकरहित होईल तरच त्याच्याशीं तुलना करितां येईसें होतें; दिवसास चंद्रापासून भ्रष्ट होणाऱ्या आणि रात्रीस कमळापासून भ्रष्ट होणाऱ्या लक्ष्मीचें राहावयाच्या ठिकाणाप्रमाणें होतें; विधात्यानें कल्पाच्या आरंभापासून असंख्य अमावास्येला आणि असंख्य चंद्रबिंबाला चुरून चुरून त्यांच्या सारांशानें बनविलें असावें असें दिसत होतें; भुवयांच्या चाळ्यानीं रहित आणि कटाक्षांच्या संचारानें रहित असा पुनवेचा चंद्र माझ्याशीं सादृश्यच कसा पावेल अशा प्रकारचा गर्व धरीत असावें असें वाटत होतें; कवींच्या सरस्वतीला सफळ करील अशा प्रकारचें होतें; शृंगाराला आयुष्यरूप होतें; मंदस्मिताच्या प्रभेमुळें भागीरथीमय असावें, असें भासत होतें; केशपाशाच्या आणि कटाक्षांच्या प्रभेमुळें यमुनामय असावें असें भासत होतें; ओठांच्या प्रभेमुळें सरस्वतीमय असावें असें भासत होतें; सुवर्णाच्या लतांमध्यें उदय पावलेल्या आणि कधींही खंडित न होणाऱ्या आणि कलंकरहित अशा अदृष्टपूर्व चंद्राची भ्रांति उपजवीत होतें; लोकांस केशपाशांच्या ठिकाणीं होणारी अंधकाराची भ्रांति सुगंधाच्या उदयामुळें दूर करून टाकीत होतें; धवल मंद स्मितानें दिशांस धवल आणि कामी जनांच्या अंतःकरणास रक्त करून सोडीत होतें; चंद्राला मंदस्मिताच्या प्रभेचा सहस्रांश देत असतांही कृपण होतें; लक्ष्मीला कमळांत वसत असलेली पाहून कमळांत राहावयाला लालचलेल्या सरस्वतीनें निवास स्थान ह्मणून ठरविलें असावें असें दिसत होतें; चंद्राला लज्जित करून वारंवार आपल्या पूर्ण बिंबाला तोडून टाकण्याचें भाग पाडित असावें असें वाटत होतें; विधात्यानें मुक्तेचें मुख आणि चंद्र यांस

निर्माण करून तोलून पाहत असतां चंद्र वर चढून गेला आणि मुख खालीं राहिलें असावें अशी कल्पना उत्पन्न करीत होतें; आणि वर चढून गेलेल्या चंद्रासहित असलेल्या पारड्यांमध्यें तारांच्या रूपानें पासंग घातला असतांही तें पारडें मुख असलेल्या पारड्याची बरोबरी करूं शकलें नाहीं, आणि ह्मणूनच पासंगासाठीं घातलेले सारे निर्माण करण्याचे ब्रह्मदेवाचे परिश्रम विफळ करणारें असावें असें भासत होतें. पुनवेच्या रात्रीस चंद्राला दर्पणामध्यें दिसणाऱ्या आपल्याच प्रतिबिंबामधून थोडीशी मागीतलेली शोभा देत असावें असें दिसत होतें; देवांनीं फार परिश्रमांनीं समुद्राचें मंथन करून मिळविलेलें अमृत स्वतां आपणच बळकावून बसलें असावें असें दिसत होतें; पाहाणाऱ्यांस केशपाशाच्या ठिकाणीं अंधकाराची भ्रांति उत्पन्न करून आपल्या ठिकाणीं होणारी पूर्ण चंद्राची भ्रांति निरसून टाकीत होतें; कटाक्षांच्या मिषानें कामदेवाच्या बाणाची वृष्टिच करीत असावें असें दिसत होतें; आणि अमृतासही माधुर्याचा अभ्यास करविण्यामध्यें उपाध्यायाची पदवी धरील अशा आणि विधात्याच्या कोमळ सृष्टीची केवळ पराकाष्ठा होऊन गेली अशा शब्दांनीं भाषण करणारें होतें.

तिचा कंठ कोकिलांसही पंचमस्वराची तालीम देण्यामध्यें आचार्यच होय असा होता; सरस्वतीच्या स्वरालाही लाजवून टाकील अशा मधुर स्वरांनीं ऐकणारांस आनंद देईल असा होता; ज्यांच्यापुढें दुसरे सगळे स्वर तारा तुटलेल्या विण्याच्या स्वराप्रमाणें वाटतील अशा स्वरांस काढणारा होता; कामदेवाच्या दिग्विजयाच्या प्रयाणसमयीं वाजणारा असा शंख असावा असा दिसत होता; गायनसंबंधी तीन ग्रामांची तिजोरी असावी किंवा षट्शास्त्रांमध्यें दोन दोन शास्त्रांमधल्या सीमा असाव्या अशा तीन रेखांनीं शोभत होता; शंखांतून विण्याचा स्वर प्रकट होण्याची अद्भुत कल्पना उपजवीत होता; आणि आपल्या ठि-

काणीं लावण्यरूप महासागरांतून उत्पन्न झालेल्या शंखाची उत्प्रेक्षा करवीत होता.

तिचे हात लावण्यरूपी जळांतून प्रकट झालेले कमलांचे नाळच होत असे दिसत होते; कामदेवाच्या कुंडलित केलेल्या धनुष्याच्या दोऱ्या होत अशा कंकणांनीं शोभत होते; अंगुलींनीं कामदेवाच्या बाणांची भ्रांति उपजवीत होते; स्तनांच्या उंचीवरून आणि विस्तीर्णतेवरून बाहूंस परस्परांच्या दर्शनाचा आनंद न मिळाल्याकारणानें कंकणाच्या घागऱ्यांच्या आवाजाच्या मिषानें कोलाहल करीत असावे असे दिसत होते; आपला गर्व अखंडित राहावा ह्मणून कामदेवाच्या मोठ्या दीर्घ दीर्घ आशाच होत अशा शुभ रेखांनीं शोभत होते; आणि लावण्याच्या पुरांत निमग्न करून टाकलेल्या कंकणांस फक्त आवाजानें अथवा कठिणपणानेंच प्रकट होण्याची संधि मिळवून देत होते.

तिचे स्तन कामदेवाच्या राज्याभिषेकाकरितां तयार केलेले कनककलशच होत; लावण्यरूपी अगाध जलांमध्यें पोहण्यासाठीं कामदेवानें उपडे घातलेले भोपळे होते; त्रैलोक्याचा विजय केल्यावर उपडी घालून ठेवलेली कामदेवाच्या नगाऱ्यांची जोडी होय; कामदेवाची सुंदर चरणांचें पीठच होय; यौवनरूप अमृतसरोवरामध्यें बुडालेल्या कामदेवरूपी हत्तीची बाहेर दिसणारी गंडस्थळें होत; अंगामध्यें समावून ठेवीत असतां वाढलेलें लावण्य जमा करून गोळ्यांच्या रूपानें बांधून ठेविलें असावें; कामदेवानें क्रिकेटचा खेळ खेळण्याकरितां कंदुक बनविले असावे; कामदेवानें कुसुमायुधासाठीं मुक्तेचें हृदय वश व्हावें ह्मणून त्यांतून सगळें काठिण्य खरवडून काढून बाहेरच्या भागीं त्या काढण्याच्या दोन राशि करून ठेविल्या असाव्या; कामदेवानें दिग्विजयाच्या प्रमाणासंबंधी तंबू उठवून दिले असावे; कामदेवानें आपलें सर्वस्व जपून ठेवण्यासाठीं स्फाटिक मण्यांचे करंडे तयार केले असावे आणि विधात्यानें

स्तन निर्माण करण्याच्या बुद्धीनें कामदेवास इष्टसिद्धि देणाऱ्या कल्पवृक्षाचे गुच्छ उत्पन्न केले असावे असे दिसत होते; आणखी हृदयानें कठिण आणि वजनदार जाणून आपल्यांतून काढून बाहेर घालविले असावे असे वाटत होते; सर्वांगांनीं काढून दूर केलेलें काठिण्य शरण आलेंसें जाणून त्यास आपल्यापाशीं यांनीं आश्रय दिला असावा असे दिसत होते; आंब्याची आणि डाळिंबाची शोभा हरण केल्यावर हत्तींच्या गंडस्थळांची शोभा हरण करण्यासाठीं उन्मुख झाले असावे असे दिसत होते; आमच्या वृद्धीला एवढें वक्षःस्थळ पुरत नाहीं असा अभिमान धरून फुगले असावे असे भासत होते; स्वतांच्या हृदयाचा भेद करण्यामध्यें ज्यांस बिलकुल दया आली नाहीं त्यांस परकी हृदयाचा भेद करण्यास दया कोठून असावी असें स्वतांच्या काळतोंडावरून जाणवीत असावें असे दिसत होते; मुखचंद्राच्या चांदण्याच्या थंडीमुळें कुडकुडत असावे अशा प्रकारें परस्परांस दाबीत होते; कामी जनांच्या विवेकाला कामरूप अग्नीमध्यें होमून त्या अग्नीच्या भस्माचा टिळा लावून बसले असावे अशा प्रकारें काळ्या अग्रांनीं सुशोभित झाले होते; मुखरूपी चंद्राला भीत नसावे एवढेंच नाहीं तर उलटें त्यांच्या विरुद्ध होणारे हे दोन अलौकिक चक्रवाकपक्षी विधात्यानें उत्पन्न केले असावे असे दिसत होते; स्वतां परस्परामध्यें बिलकुल अंतर नसतांही कामदेवाला राहण्यापुरती जागा देत होते; दाढीपर्यंत पोंचलेले असल्याकारणानें मुक्तेच्या तोंडाला सखीच्या हास्यवचनांनीं लाजण्याच्या प्रसंगीं सुद्धां खालीं नमूं देत नव्हते; त्यांस झांकण्यासाठीं नव्या नव्या शिवण्यांत येणाऱ्या सगळ्या चोळ्या थोड्या वेळांत लहान लहान करून टाकूं लागले; स्वतां हूड असल्याकारणानें कंचुकीच्या बंधनामध्यें राहण्यास शरमत असावे अशा प्रकारें घडोघडीं कंचुकीस फाडून टाकीत होते; मुखचंद्राच्या किरणांचें अमृत यथेष्ट प्याल्याकारणानें नित्य

पुष्ट होत चालले असावे असे दिसत होते; सडपातळ अंगलतेची जणों दया आली असावी अशा प्रकारें नृत्य करणाऱ्या कामदेवाचा भार स्वतांच वाहत होते; आणि मुखचंद्राच्या भयानें पळून गेलेल्या अंधकारपंक्तीला छायेच्या मिषानें स्वतांच्या खालीं आश्रय देऊन आपलें उद्धतपण दाखवीत असावे असे वाटत होते.

मुक्तेचा मध्यप्रदेश कुचमंडलाचा मोठा बोजा उचलल्याकारणानें, अथवा कामदेवानें अंगलता धनुष्यासारखी समजून मध्यें मुठीच्या द्वारा दाबून टाकिल्याकारणानें, अथवा सरहद्दीचें एक निशाण स्तनमंडलावर आणि दुसरें नितंबमंडलावर रोखून ठेविल्याकारणानें, अथवा त्रिवलीनें प्राप्त झालेल्या बंधनाच्या दाबानें अथवा स्तनांच्या उंचीमुळें मुखाचें दर्शन न मिळाल्याच्या खेदानें कृष होऊन गेला असावा असा दिसत होता; वरील सर्व कल्पना एका बाजूस टाकून देऊन आह्मी तर इतकेंच समजतों कीं विधात्याचें रचण्याचें सगळें सामान दुसऱ्या अवयवांत आलेली तूट भरून काढण्यांत वापरल्यामुळें मुक्तेचा मध्यप्रदेश रचल्यावांचूनच राहून गेला!

तिची त्रिवली कामदेवास स्तनावर चढावयाच्या तीन पायऱ्याच होत; कामदेवानें तिन्ही लोकांस वश्य करण्यासाठीं वापरलेलीं तीन साधनें होत; अंगलतारूप धनुष्यास मुठीनें मध्यें पकडून खेचूं लागलेल्या कामदेवाच्या बोटांच्या या तीन रेघा पडून गेल्या असाव्या; कामदेवानें स्तनमंडलरूप उंच सखल प्रदेशाखालीं चालण्यासाठीं तीन सडका बांधल्या असाव्या; आणि तरुणांच्या अंतःकरणाला स्तनमंडलरूप उंच सखल प्रदेशावरून नाभिरूप पुष्करणींत उतरण्यासाठीं कामदेवानें मधोमध हे तीन धक्के बांधून ठेविले असावे अशी दिसत होती.

तिची रोमावली नाभिरूप सुवर्णाच्या कंकणांतून निघालेली लाखेच्या रसाची धारा असावी; नाभिरूप पुष्करणीच्या खोलीचा निश्चय करण्या-

करितां तींत टाकलेली साखळी असावी; तरुण लोकांकडे आज्ञापत्रें पाठविण्यासाठीं लिहूं लागलेल्या कामदेवाच्या नाभिरूप दौतींतून सांडलेली शाई असावी; स्तनरूप उंच सखल प्रदेशावरून उतरून नाभिरूप पुष्करणींत पडलेल्या कामी जनांच्या अंतःकरणाला बाहेर निघतांना अवलंबन करण्यासाठीं कामदेवानें बांधलेली काळी दोरी असावी; सदाशिवाच्या तिसऱ्या नेत्रांतील अग्नीनें जळूं लागलेल्या कामदेवानें नाभिरूप विहिरीमध्यें उडी घातली असतां त्याच्या अंगांतून निघालेल्या धुराच्या रेखा होत; कामदेवानें कामी लोकांस स्वाधीन ठेवण्याकरितां काढलेल्या आज्ञापत्रकांतील अक्षरमाळा असावी; कामदेवरूप मदोन्मत्त हत्तीला बांधण्यासाठीं वापरलेला साखळदंड असावा; कामदेवाला कुचरूप स्फटिकमय पर्वतावर चढण्याची पायवाट असावी; नाभिरूप जलाशयामध्यें कमळ असल्याच्या भ्रांतीमुळें उतरूं लागलेली गुंजारवरहित भ्रमरांची पंक्ति असावी; यौवनरूप हत्तीनें नाभिरूप विहिरींतून पाणी घेण्यासाठीं आंत घातलेली सोंड असावी; कुसुमायुधाच्या नेत्रामध्यें भावी अमृताची वृष्टि करण्यासाठीं बारिक बारिक मेघ चढले असावे; अनंगशास्त्रांतील सिद्धांतांच्या निर्णयांची फकीकाच लिहून ठेविली असावी; कामदेवाला विरही जनांच्या वधरूप पापांतून मुक्त करण्याकरितां विधात्यानें पाठवलेली यमुनेची लाट असावी; मध्यरूप वैराणप्रदेशामध्यें फिरणाऱ्या सखींच्या नेत्ररूप हरिणांनीं नाभींतून निघालेली कस्तुरीची ओळ असावी; आणि यौवनानें लिहिलेली कामदेवाच्या विजयाची प्रशस्ति असावी अशी भासत होती. ती मध्यस्थ असतां ही सर्व प्रकारें कामदेवाचाच पक्षपात करीत होती हें मोठें आश्चर्य आहे.

तिचा नितंब ह्मणजे कामदेवाचें बसावयाचें सिंहासन होय, आणि कामदेवाच्या रथाचें चाक होय, असा भासत होता. तो मुक्केला उठतांना तसाच चालतांनाही दमवून टाकीत होता; स्तनमंडलाच्या मोठेपणाची स्पर्धा

करीत होता; कामी जनांच्या अंतःकरणाच्या भारानेंच वजनदार झाला असावा असा दिसत होता; सखींच्या मनामध्येंही पुरुषपणाची इच्छा उत्पन्न करणारा होता; सखींस "पुरुषायिताच्या कळेमध्यें मुक्ता अशक्त गणली जाईल" अशी शंका उत्पन्न करीत होता; आणि निःशंक-पणें अनेक तरुणांच्या अंतःकरणाची चोरी करण्याचा गुण मिळविल्या-कारणानें आपल्यावर मुक्तेची दृष्टि पडत नाहीं हाही एक गुण ह्मणून गणीत असावा असा दिसत होता. आश्चर्य हें कीं स्वतां अत्यंत गुरुत्व धारण करणारा असतांही कामदेवानें मनांत धरलेला हेतु सिद्धीस नेण्याच्या कामीं तो भारी चपळता दाखवीत होता.

मुक्तेचें जघन ह्मणजे कामदेवाच्या सर्वस्वाचें गुप्त भांडारच होय; शृंगाररसाचें बसावयाचें हें पीठच होय; आणि महादेवापासून त्रास पावणाऱ्या कामदेवाचें गुप्त रीतीनें लपून बसण्याचें मुख्य स्थळ होय असें वाटत होतें. तें आपला मोहकपणा हाच निरतिशय गुण तेणेंकरून निरंतर बंदोबस्तीनें राहण्याचें संकट पावत होतें; स्वतां अदृश्य अस-तांही कल्पनामात्रेंकरूनच तरुणांस जमीनदोस्त करून टाकीत होतें; आणि नाभीपासून वरच्या भागीं बहुत बारीक बारीक अवयव रचून र-चून कंटाळून गेलेल्या विधात्यानें हें जाडें आणि मोठेंच राहूं दिलें. तें स्तनाप्रमाणें किंवा नितंबाप्रमाणें उद्धत नसतांही चित्ताकर्षक पदार्थां-मध्यें अग्रगण्य होतें.

मुक्तेचे ऊरु ह्मणजे कामदेवाचे विजयस्तंभच होत असे भासत होते. हत्तीच्या सोंडा जर कठिणपणा टाकून देतील आणि केळीचे खांबले निःसारपणाला आणि अतिशीतलपणाला टाकून देतील तरच त्याच्या कांहीं सादृश्याला ते पावले तर पावतील. शीतकालामध्यें उष्ण आणि उष्ण-कालामध्यें शीतल असून आपल्या ठिकाणीं नित्य राहणाऱ्या कामदेवाला सुखी ठेवूं पाहात असावे असे भासत होते; आणि "वेदप्रोक्त्या विधा-

त्यानें असे रमणीय अवयव रचण्याच्या कामीं कोणापासून एवढें चातुर्य शिकून घेतलें? तो जर आपले डोळे उघडे ठेवून ते रचण्यास बसला असता तर कामदेवाच्या बाणांनीं विव्हळ झाल्यावांचून राहिलाच नसता; आणि डोळे मिटून रचण्यास बसला असता तर अशी रमणीयता या ठिकाणीं त्यास आणितां आली नसती. तेव्हां त्यानें हे अवयव कोणत्या नमुन्यावर बनविले असावेत?" अशा प्रकारें पाहणाराच्या मनांमध्यें वारंवार विचाराच्या भोंवऱ्यांत टाकीत होते.

सुक्तेचे चरण नितंबाच्या भारानें श्रमित झाले असावे अशा प्रकारें मेंदीच्या वगैरे रंगांवांचूनही तांबडे लाल दिसत होते; स्तनमंडलरूप मोठें व्यवधान आडवें आल्याकारणानें मुखरूप चंद्राच्या किरणांचा संसर्ग न मिळाल्यामुळें नेहमी प्रफुल्ल राहणारीं कमळें होत असे शोभत होते; तरुणांच्या रजोगुणानें भरलेल्या अंतःकरणाला चुरडून चुरडून चालल्यामुळें लाल होऊन गेले असावे असे दिसत होते; ज्या प्रदेशावर ठेवावे त्याही प्रदेशाला भाग्यशाली लेखवतील असे होते; नूपुरांमुळें रत्नमय आळीं असलेल्या कल्पवृक्षांची जोडी असावी असे भासत होते; चालण्याच्या समयीं नखांच्या किरणरूप पुष्पांनीं पृथ्वीचें पूजन करीत असावे असे दिसत होते; आकाशामध्यें निराधार फिरल्यावर कंटाळून पृथ्वीवर फिरण्याकारितां दहा तारेच खालीं आले असावे असे दिसणाऱ्या नखांनीं शोभत होते. जिचें लावण्य पाहून विधात्यापाशीं दुसऱ्या सृष्टीमध्यें प्रगट करण्याची लावण्याची पुंजी शिल्लक राहिली नसावी असें मानतां येईल, अशी केसांनीं रहित अंगपिंडानें ती शोभत होती. चरणांच्या लावण्यरसाचे ओढे चांगले वाहात चालले असावे अशा भासणाऱ्या बोटांनीं पाहाणाराचें चित्तबळानें आकर्षण करीत होते; चालण्याची गोष्ट निघाली असतांही विशेष लाल होऊन जात होते; आणि स्वतां चुरलेल्या धुळीच्या कणास आपल्या डोक्यावर धरण्याविषयीं तरुणांच्या मनांत अ-

भिलाष उत्पन्न करणारे होते. परंतु आश्चर्य तें हेंच कीं स्वतां अतिकोमळ असतांही कामी जनांस ह्यांची प्राप्ति होण्याच्या कामीं फार कठीण दिसत होते. त्यांच्या गतीच्या महिम्याचें व्याख्यान राजहंसाकडूनच झालें असतें तर झालें असतें.

**सारांश** तिच्या सर्व अवयवांचें वर्णन कामदेव स्वतां कवि झाला असता तरच त्याला करतां आलें असतें. किंवा तिचा प्रत्येक अवयव स्वतांच कवि झाला तर मात्र प्रत्येक अवयवाचें यथार्थ वर्णन झालें असतें तर झालें असतें.



# प्रकरण २८ वें.

## सात्विक भाव.

रूपानें आणि नांवानें ओळखलें जाण्याच्या भीतीमुळें जणों आपल्या 'कामदेव' या प्रसिद्ध नांवाला गुप्त ठेवण्याकरितांच कीं काय कुमाराचा वेष घेऊन अनंगप्रभेच्या बरोबर आलेल्या कुसुमायुधाला पाहातांच मुक्तेच्या आंगावरील रोमावली जणों त्याला मान देण्यास इच्छीत असावी अशा प्रकारें उभी राहिली. त्यानंतर आभरणांचा शब्द जणों त्याचें स्वागत करण्यास उत्कंठित झाला असावा अशा प्रकारें उत्पन्न झाला आणि त्यानंतर मुक्ता स्वतांच स्तनमंडळाच्या आणि नितंबमंडळाच्या भाराची बिलकुल परवा न करतां चटकन उभी राहिली. अभ्युत्थानाचा संभ्रम कामदेवाच्या आवेशानें उत्पन्न झालेल्या स्वेदोद्गमास झाकून टाकूं लागला. पायांच्या स्तब्धपणाला स्तनमंडलाचा भार मिथ्या कारणीभूत होऊं लागला. आनंदामुळें गळूं लागलेल्या अश्रुबिंदूंला भीमासुराचें भय निमित्तासारखें होऊं लागलें. आणि गात्रांच्या कंपाला उपवनाचा शीतळ पवन मिथ्या कारणीभूत होऊं लागला. कुसुमायुध दृष्टि रोखून पाहूं लागला असतां मुक्ता आपली दृष्टि भुईकडे नमवूं लागली आणि कुसुमायुध अनंगप्रभेकडे दृष्टि फिरवून पाहूं लागला असतां मुक्ता दृष्टि रोखून कुसुमायुधाकडे पाहूं लागली. कुसुमायुधाकडे पाहून पाहून मुक्तेच्या मनांत विचार येऊं लागले कीं, 'अहो! शरदृतूंतील पुनवेचा चंद्र त्याच्या मुखाची सेवा करण्यासही अधिकारी नाहीं. विधात्यानें कामदेवाला उत्पन्न केल्यानंतर या दुसऱ्या कामदेवाला उत्पन्न करण्याची सामग्री कोठून मिळविली असावी? विधात्यानें याचे नेत्र उ-

त्पन्न करण्यासाठीं प्रथम कित्येक दिवसपर्यंत कमळें बनविण्याची उमेदवारीच केली असेल आणि याचें मुख निर्माण करण्याकरितां पाहिल्यानें कित्येक दिवसपर्यंत चंद्रबिंबें बनविण्याचा अभ्यास केला असेल. याच्या दृष्टीला आणि मुखाला उपमानरूप वस्तूंचें जगामध्यें दारिद्र्यच असलें पाहिजे. याला पहाणाऱ्या स्त्रिया सुरांगना नसतांही निमेषरहित दृष्टीच्या झाल्या असल्या पाहिजेत. याला पाहणाऱ्या स्त्रियांमध्यें कोण सठवी याला स्वप्नांत पुन्हां पाहात नसेल? कोणती स्त्री सुरतलीला करीत असतां आपल्या पतीच्या शरीराच्या ठिकाणीं याच्या सुरताचें ध्यान करीत नसेल? आणि कोणत्या स्त्रीच्या तोंडांतून पतीच्या नांवाच्या जागीं याचेंच नांव चटकन निघून जात नसेल? कृष्णपक्षामध्यें आजपर्यंत चंद्राच्या जेवढ्या जेवढ्या कला चंद्रापासून निराळ्या पडल्या असतील त्या सगळ्या कळांनीं याच्या मुखांत प्रवेश केला असावा असें वाटतें. याचा अभिप्राय जाणल्यावांचूनच माझ्या मनामध्यें अविवाहित्वाला न साजतील असें विकार कसे उत्पन्न होऊं पाहातात? माझें हृदय मला याच्या स्वाधीन करण्याकरितां ओढीत असावें, लज्जा नाहींशी होण्याविषयीं इच्छित असावी आणि रोमांच आलिंगन देण्याविषयीं घाई करीत असावे असें वाटतें. माझे श्वास माझ्या हृदयामध्यें याला स्थळ करून देण्याकरितां बाहेर निघत असावे, रोमावली हृदयाची चहाडी करण्यास तयार झाली असावी, लज्जा स्वेदाच्या जळानें धुपून जात असावी आणि अंगलता कामदेवाच्या तीव्र बाणांनीं विंधून जात असावी असें वाटं लागतें. मी मूर्च्छितेसारखी, शिळेवर कोरल्यासारखी, अंगाला देत असावी अशी, ह्याच्या हृदयामध्यें शिरलें असेन अशी, आणि जणों कांहीं तरी प्रार्थना करीत असेन अशी, कशी अगदीं होऊन गेलें? जसे कांहीं माझे विकार जाणूनच हा माझी मस्करी करीत असावा. नीच कामानें माझ्यावर हा काय गहजब मांडला असावा? मी चांगली जाणती असतांही माझें शरीर आणि मन मला आपल्या ताब्यांत ठेवतां येत नाहीं. ‘ कामदेव स्त्रियांस वेड्या करून

टाकतो, मनानें पूर्णपणें जाणले असतांही दुसऱ्या कोणापाशीं सांगतां येत नाहींत असे विकार उत्पन्न करतो, पाठशाळेमध्यें कधींही शिकविण्यांत न आलेल्या अपूर्व युक्तिप्रयुक्ति क्षणांत विदित करतो आणि थोड्याच वेळांत सगळ्या गौरवाला नाहींसें करून परवश करून टाकतो.' अशा इ- तिहासामध्यें वाचण्यांत आलेल्या गोष्टी आज माझ्या अनुभवास येतात."

कुसुमायुध जो मुक्तेच्या दर्शनानें आपल्या नेत्रांचें, शिकार हातीं नसतांही फार दूर आल्याच्या परिश्रमाचें, आणि शातातपाच्या प्रसादानें दिव्य घोडा मिळाल्याचें साफल्य झालें असें मानीत होता; जो सगळ्या इंद्रियांची नेत्ररूप रचना व्हावी ह्मणून इच्छित होता; जो सगळ्या इंद्रि- यांमध्यें नेत्रांसच भाग्यशाली ह्मणून गणीत होता; आणि जो मुक्तेच्या शरीरामध्यें सगळें सौंदर्य रचून ठेविल्यामुळें संपून गेलें असें मानून स्त्रि- यांची नवी सृष्टि निर्माण करण्यांत सौंदर्याची विधात्या जवळची पुंजी सरून गेली असावी असें कल्पीत होता; त्याच्या हृदयामध्यें सुद्धां थोड्या वे- ळांतच कामदेवानें मुक्तेसहित प्रवेश केला. कुसुमायुधाचें मन थोडा वेळ- पर्यंत मुक्तेच्या चरणामध्यें; थोडा वेळ तिच्या मांड्यांमध्यें, थोडा वेळ नाभीमध्यें, थोडा वेळपर्यंत स्तनमंडळामध्यें, थोडा वेळ मुखाचें ठिकाणीं, थोडा वेळपर्यंत नेत्रांचे ठिकाणीं आणि थोडा वेळपर्यंत केशपाशांमध्यें भ्रमण पावूं लागलें. कुसुमायुधाची रोमावली मुक्तेचें आलिंगन करण्यास उत्कंठित झाली असावी अशा प्रकारें उभी राहिली. संग्रामांगणावर सुद्धां कंपित न होणारें त्याचें शरीर कांपूं लागलें. उपवनांतील पवनाच्या सुंदर लहरी येत असतांही कपालावर स्वेदाचे बिंदु दिसूं लागले. आणि मूर्च्छा, मद, आणि आनंद यांनीं घेरलें जाणारें कुसुमायुधाचें मन मुक्तेला, थोडा वेळपर्यंत विषमय, थोडा वेळपर्यंत मादकमय आणि थोडा वेळपर्यंत अमृतमय मानूं लागलें. तो तिच्या आभरणांच्या शब्दालाही संभाषणरूप गणूं लागला; मनाच्या बेशुद्धपणालाही तिचा प्रसादरूप मानूं लागला;

मुक्तेच्या हारामध्यें पडणाऱ्या आपल्या प्रतिबिंबांनींही स्वतांस कृतार्थ ह्मणून समजूं लागला; तिला भाषणाशिवायच बोलत असावी अशी पाहूं लागला; मदाशिवायच अडखळत असावी अशी देखूं लागला; तिचीं आभरणें तिच्या शरीराच्या शोभेला कमीपणा आणणारीं होत असें मानूं लागला; जर सुवर्ण कस्तूरीजवळून सुगंधाचा अभ्यास करील तरच तिच्या शरीराची उपमा पावूं शकेल असें मानूं लागला; तिच्या कटाक्षांस वरचेवर येणारे कामदेवाचे बाणच होत असें समजूं लागला; तिचें मुख पाहून चंद्रास पुनरुक्त शब्दाप्रमाणें नीरस गणूं लागला; आपल्या दृष्टीच्या निमिषांस ही प्रतिबंधरूप मानूं लागला; आपल्या उरावरील आभरणांमध्यें ती प्रतिबिंबित झाल्याकारणानेंच आलिंगनाचें सुख कल्पूं लागला; तिच्या चरणाच्या नखांमध्यें पडणाऱ्या आपल्या प्रतिबिंबांवरून चरणपाताचा आनंद मानून घेऊं लागला; आंसवें गळूं लागल्याकारणानें तिचें दर्शन बंद झालें असतां वियोगाच्या दुःखासारखें दुःख अनुभवूं लागला; आणि थोड्या वेळपर्यंत 'मी आलों आहें कोठें? मीं करतों आहें काय? बोलतों आहें काय? मुका आहें! ऐकूंही येत आहे! पहात आहें! दिवस आहे! रात्र आहे! ही कोणी माया रचली आहे कीं सारा खराच प्रकार आहे!' अशा अनेक प्रकारच्या संभ्रमामध्येंच गढून गेला.

कुसुमायुधासमोर पुष्कळ वेळपर्यंत उभें राहण्यास मिळावें म्हणून इच्छिणारी; कुसुमायुधाच्या दृष्टीला दृष्ट मिळतांच आपल्या डोळ्यांस फिरविणारी; पदर साप सरण्याच्या आणि केशपाश नीट करण्याच्या मिषानें स्तनमंडल आणि नाभि यांस उघड करणारी; जांभया देण्यास आरंभ होतांच पुष्पगुच्छाला मुखाच्या आड धरणारी; सुंदर आंगठ्या घातलेल्या बोटांनीं वारंवार कानाच्या पाळीला कांडूळणारी; जशीच्या तशीच असतां ही निराळ्याच प्रकारें दिसणारी; गळ्यांत घातलेला हार एके बाजूनें

कांहींसा दुमडलेला आणि डोळ्यांची प्रभा डोळ्यांच्या कोंपऱ्यामध्यें फिरलेली अशा प्रकारें वाकड्या डोळ्यांनीं कुसुमायुधाकडे पुनःपुनः पाहणारी; कामदेवानें त्याच वेळीं दिलेल्या अद्भुत विज्ञानानें अलंकृत झालेली; कुसुमायुधाला आपले प्राण अर्पण करण्याला उत्सुक झाली असतांही दृष्टि मात्र संपूर्णपणें अर्पण न करणारी; बोटांचीं पेरें मोडणारी; आळसानें अंग मोडणारी; बोलण्याचा समय मिळाला असतांही लज्जेनें कांहींच न बोलणारी; कांहीं बोलत नसतांही आपल्या मनाशींच कांहीं गुत गुत शब्द पुटपुटणारी; मुखाच्या सुगंधावर उड्या घालणाऱ्या भ्रमरांचें निवारण करण्याच्या श्रमानें घाम वगैरे विकारांचें गोपन होईल असें मानणारी; कुसुमायुधाचीं प्रतिबिंबें मणिमय पुतळ्यांमध्यें पडलेलीं पाहून पुतळ्यांचाही हेवा करीत असावी अशी दिसणारी; डोळ्यांच्या निमेषानींही कुसुमायुधाच्या विरहाची व्यथा अनुभवणारी; आंसवांच्या बिंदूंनीं दर्शनांत येणाऱ्या व्यत्ययासही सहन न करूं शकणारी; वृथा चकित नेत्रांनीं आजूबाजूस पाहणारी; घामानें चिंब भिजली असतांही कपाळ पुसून टाकण्याचा नीट संभाळ न राखूं शकणारी; कुसुमायुधाच्या शरीरावर उत्पन्न झालेल्या स्वेदोद्गमाच्या वगैरे चिन्हांची परीक्षा करून प्रफुल्लित झालेली; स्तनांमध्यें कुसुमायुधाचें प्रतिबिंब पडण्याला अंतराय आणल्यामुळें कंचुकीचाही द्वेष करीत असावी अशी भासणारी; कुसुमायुध आपल्या हातांत धरलेल्या रुमालाच्या गोळ्याला बोटांनीं दाबीत असतांही सीत्कार करून स्तनमंडलावर हात ठेवणारी; कुसुमायुध फुलांचा वास घेत असतांही मंदहास्य करून मुख खालीं नमविणारी; आणि कांपूं लागलेले हात स्थिर ठेवण्यासाठीं ते वारंवार स्तनावर ठेवणारी; अशा मुक्तेकडे अनंगप्रभाही कौतुकानें चपळ झालेल्या बाहुल्यांच्या वांकड्या नजरेनें पाहूं लागली.

कुसुमायुध आणि मुक्ता यांस निरनिराळ्या आसनांवर बसवून अनंगप्रभा स्वतांही तिसऱ्या एका आसनावर बसून म्हणाली.—"सखि मुक्ते!

भरतखंडामध्यें काशीपुरी नामें जी नगरी त्रैलोक्यनाथ विश्वेश्वराला कैलासाहूनही अतिप्रिय आहे; ब्रम्हविद्येचा लेशमात्रही संस्कार न पावलेल्या जनास, केवळ जनांसच नव्हे तर, पशु पक्षी आणि कीटपतंग इत्यादि प्राण्यांसही आपल्या ठिकाणीं मरण येतांच जी त्यांस मुक्ति देणारी आहे; ज्या पापांचें निराकरण करण्याकरतां धर्मशास्त्रामध्येंही प्रायश्चितें सापडत नाहींत आणि जीं दूर व्हावीं ह्मणून प्रार्थना केली असतांही ब्रम्हादिक देव सुद्धां कानावर हात ठेवितात अशीं महान महान पापें सुद्धां स्वतां जळमय असतांही क्षणांत भस्म करून टाकणाऱ्या भागीरथीनें जिला सुगंधयुक्त सुवर्णाची आणि दुधानें युक्त शंखाची उपमा यो-जेल असें केलें आहे आणि जी भोगवती व अमरावती याहूनही अधिक रमणीय असल्यामुळें पृथ्वीला अभिमानानें चढविण्याच्या कामीं कारणरूप आहे; अशा नगरीमध्यें सगळ्या राजांच्या मुकुटांचीं रत्नें प्रतिबिंबित झालीं असतां आपल्या चरणाच्या नखांनींच त्यांस परम शोभा देणारा, याचकांस कल्पवृक्षाच्या दर्शनाचें फळ देणारा, उदार असतांही शत्रूस कधींही पाठ न देणारा, सर्व शास्त्रांचा अभ्यास करणारा असतांही 'देत नाहीं' या चार अक्षरांचा अभ्यास ज्याला माहीत नाहीं असा, आपल्या भुजांवर सगळ्या पृथ्वीचा भार धारण करून शेषनाग आणि भगवान कूर्म यांस परमविश्रांति देणारा, एकटाच असतांही शत्रूंस सर्व दिशांच्या ठिकाणीं दिसणारा, आपल्या कीर्तीनें विष्णूच्या मनांत सर्वच समुद्रांविषयीं क्षीरसागराची शंका उत्पन्न करणारा; सैन्यांतील हत्तींच्या मदजलानें सर्वच नद्यांविषयीं समुद्राला यमुनेची भ्रांति होऊं देणारा आणि जणों धर्माचें रक्षण करण्यासाठीं मानव शरीर धारण करून साक्षात् धनुर्वेदच अवतरला असावा असा शत्रुजित् नांवाचा राजा राज्य करीत आहे. त्या राजाचा कुसुमायुध नांवाचा हा कुमार युवराज आहे. यांनीं दिग्विजय करून पृथ्वीला कामधेनूप्रमाणें केलें आहे. कीर्ति पसरवून जगाला

चंद्रमय केलें आहे. जन्म देणाऱ्या मनोरमा नांवाच्या आपल्या जननीला रत्नप्रसूची पदवी दिली आहे. सर्वत्र न्यायीपणा प्रवर्तविल्यामुळें लक्ष्मीला चांचल्य दोषापासून मुक्त केलें आहे. आणि अभ्यास करून सरस्वतीला ब्रहस्पतीच्या मुखांत वास करण्याच्या सारखा आनंद दिला आहे. ज्या दैत्याचें नांव घेतलें असतांही आपणाला खेद उत्पन्न होतो त्या दैत्यापासून मुनिजनांच्या आश्रमाचें रक्षण करण्याकरितां पित्याच्या आज्ञेवरून आलेल्या या कुमारानें, डुकराचें रूप घेऊन आश्रमांत गेलेल्या त्या दैत्याला पळावयास लाविलें आणि भयंकर बाणांनीं जखमी केलें आहे; परंतु तो गतप्राण न झाल्याकारणानें त्याचा पाठलाग करीत करीत हे आपल्या मोठ्या शुभ दैवयोगानें एथें आले आहेत. सखि मुक्ते! आतां आपणास निश्चिंत राहावयाचें आहे, दुःखाचे दिवस आतां संपले, सुखाचा समय जवळ येऊन ठेपला आहे, कुसुमायुधाच्या मिषानें आपलें मोठें भाग्यच, सजन, दुष्ट दैत्याचा शोध करीत करीत एथें आलें आहे. यांचें दर्शन झाल्यापासून माझ्या मनाला जो आनंद झाला तो यांची हकीकत ऐकिल्यावर सहस्त्रपट झाला, आणि यांचे गुण पाहिल्यावर तर अगणितच झाला आहे! या आनंदांत तुला वाटेकरी करण्याकरितां—वाटेकरि करण्याकरितांच केवळ नव्हे तर त्याहूनही अधिक आनंदाची जोड करून देण्याकरितां मी या कुमारास तुझ्यापाशीं घेऊन आलें आहें. क्रिया-वाचा-मनामध्यें एकरूपता धरणारे चतुर सज्जन मोठ्या भाग्याच्या योगानेंच कोणासही प्राप्त होतात. यांस पाहिल्यावर, आणखी परिचय झाल्यावर, माझ्याप्रमाणेंच तुझी ही खात्री होईल कीं मनुष्यलोकीं सुद्धां विधात्यानें कांहीं कांहीं व्यक्तींच्या ठिकाणीं सर्वोत्तम रूपाचा, सर्व विद्यांचा, सर्व कळांचा आणि निरतिशय लक्ष्मीचा, आश्चर्यजनक एकत्रयोग करवून "अपूर्ण करणारा" अशा आपल्या अपकीर्तीला अपवादही करून ठेविला आहे. पृथ्वी अशा रत्नांस धारण केल्यामुळें आपलें 'रत्नगर्भा' हें नाम

अन्वर्थ करीत आहे. पृथ्वीलाही असे राजे राज्य करणारे मिळाल्याकारणानें अमरावतीच्यासारखेंच सुख प्राप्त होतें. मनुष्यजातीच्या स्त्रियांचे नेत्रही अशा व्यक्तींच्या दर्शनानें कृतकृत्य होतात. लक्ष्मी सुद्धां अशा व्यक्तींचा आश्रय करून आपल्या नीचगामीपणाच्या कलंकाला अपवाद आणिते. मनुष्यामध्येंही एखादे व्यक्तीचा चमत्कार देवादिकांनींही इच्छिण्यासारखा असतो. सखि! मी या कुमाराला तुझी हकीकत इत्थंभूत विदित केली आहे, आणि त्याच्या कुलशीलाचीही पुरती चौकशी केली आहे. यासाठीं लज्जा, शंका, आणि संकोच सोडून देऊन मोकळे मनानें यांच्याशीं बोल."

अनंगप्रभेनें वर लिहिल्याप्रमाणें मुक्तेस सांगितल्यावर ती कुसुमायुधाला म्हणाली—"महाराज कुमार! आम्ही दुर्दैवामुळें या कारागारामध्यें येऊन पडलों आहों, तुमचें जसें आदरातिथ्य करावयास पाहिजे तसें करतां येण्याचा हा समय नव्हे. तुमची सरलता सर्वांसही प्रेमवश करून टाकील अशी आहे. तुमची अंगकांति, चुंबकमणि जसें लोहाचें आकर्षण करितो तसें सर्वांच्या चित्ताचें आकर्षण करील अशीच आहे. तुमचें वात्सल्य अबंधूलाही बंधु करून घेईल असें आहे. तुमचा भलेपणा प्रतिकूळ मनुष्यासही अनुकूळ करून घेईल असा आहे. तुमचें रूप कठोर मनुष्याच्या हृदयासही कोमळ मनाचा करून टाकील असें आहे. आणि तुमची रीतभात अपरिचितालाही क्षणमात्रांत परमविश्वास उपजवील अशी आहे. ह्यासाठीं, आणखी तृण, भूमि, जळ, आणि प्रिय जन हीं जे अशक्त असतात त्यांसही कोणी नाहीं म्हणत नाहीं, म्हणून मनुष्य कोणत्याही स्थितींत असो तरी सज्जनांनीं कोणाचेंही आदरातिथ्य करण्यांत चुकूं नये अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. तिला अनुसरून आह्मी विज्ञाप्ति करितों कीं आपण जळपान करावें, फळांचा उपहार करावा, आणि थोडे दिवसपर्यंत एथें रहावें आणि मग ज्या कामासाठीं एथें आलां आहां त्या कामाची यो-

जना करावी. तुम्ही एथें राहिल्यानें आह्मांस आश्वासन मिळेल आणि तुमचें कार्यही सिद्ध होईल."

अनंगप्रभेच्या भाषणानें आणि मुक्तेच्या मदनविकारांनीं, जणों अमृतासिंचन झाल्याप्रमाणें प्रफुल्लित झालेला कुसुमायुध हात जोडून म्हणाला —"हें काय बोलतां? तुमच्या सज्जनतेनें मला इतका पराधीन करून टाकिला आहे कीं तेणें करून हो किंवा ना म्हणण्याचाही मजकडे कांहीं अधिकार उरला नाहीं. परंतु तुमच्या ह्मणण्याप्रमाणेंच वागण्याचा अधिकार मला प्राप्त झाला आहे. मजवर जर तुम्हास अनुग्रहच करणें आहे तर तुमची यथायोग्य सेवा करण्याकडे माझी योजना करा. तुमच्या आणि तुमची सखी मुक्ता हिच्या अमूल्य गुणांनीं मला विकत घेतलें आहे. दुष्ट भीमासुराला मारून तुमची सेवा करावी हीच या जनाला उत्कंठा आहे."

याप्रमाणें कुसुमायुध अनंगप्रभेशीं बोलत होता इतक्यांत अपूर्व हर्षानें घेरलेल्या मुक्तेचे डोळे, वांकड्या नजरेनें पाहण्यामुळें आणि वारंवार कोंपऱ्यापर्यंत येण्याजाण्याच्या श्रमांमुळें थकून जाऊन घामाचे बिंदु उत्पन्न झाले असावे अशा प्रकारें आनंदाश्रूंचे बिंदु पाडूं लागले. लाज मुक्तेच्या डोळ्यांच्या किरणांस अनंगप्रभेकडे ओढून घेऊं लागली आणि कामदेव त्यांस कुसुमायुधाकडे ओढूं लागला. मुक्ता अनंगप्रभेकडे पाहण्याचा बलात्कार करीत असतांही तिची दृष्टि तिच्या आज्ञेंत न राहतां कुसुमायुधाकडेच धावूं लागली. मुक्ता आपल्या शरीरांत खोंचून गेलेल्या कामदेवाच्या बाणांस, अवयव मुरडून मुरडून, काढून टाकण्यास इच्छित असावी अशा प्रकारें वारंवार आळस देऊं लागली. कुसुमायुधाला भीमासुराच्या युद्धामध्यें अमर करूं इच्छित असावी अशा प्रकारें मंदस्मितरूपी अमृताच्या धारांनीं त्यास न्हाऊं घालूं लागली. कुसुमायुधाच्या आणि भीमासुराच्या बलाबलाविषयीं तर्क करूं लागली असावी

अशा प्रकारें भुवयांस नाचवूं लागली. कुसुमायुधाच्या मुखास कमळ समजून आपल्या दंतप्रभारूप चंद्रिकेस त्याच्यापासून दूर ठेविण्यास इच्छित असावी अशा प्रकारें वारंवार जांभया देण्यास आरंभ करणाऱ्या मुखास एके हातानें झांकूं लागली. कुसुमायुधाच्या मुखकमळावर झडप घालणाऱ्या आपल्या हृदयरूप भ्रमराला लाजेमुळें दुसरा आधार देऊन आडवून धरूं पाहात असावी अशा प्रकारें वारंवार नाभिकमळाला दाखवूं लागली. आपल्या शरीराच्या ठिकाणीं होऊं लागलेला कंप कुसुमायुधाच्या मुखप्रभारूप चंद्रिकेच्या थंडीमुळें होत असावा असें जाणून त्या चंद्रिकेचें निवारण करण्याकरितां अंधकार निर्माण करूं इच्छित असावी अशा प्रकारें उंच उंच हात करून आपल्या दीर्घ केशपाशाला साफसारूं लागली. कामदेवरूप उपाध्याय ब्रम्हचर्यांतून मुक्त करून समावर्तनाचा संस्कार करण्याकरितां स्नान घालूं लागला असावा अशा प्रकारें घामानें आर्द्र होऊन गेली. चरणावरून उतरूं लागलेल्या घामाच्या धारा अनंगप्रभेच्या नजरेस न पडतां जमीनींत सोडून देऊं इच्छित असावी अशा प्रकारें पायाच्या अंगठ्यानें जमीनीला उकरूं लागली. कामदेवाच्या बाणाच्या प्रहारांनीं होणारी वेदना आपल्याच ओंठांतलें अमृत चोखून शांत करूं इच्छित असावी अशा प्रकारें वारंवार ओठ चावूं लागली. हृदयांत प्रवेश करून बसलेला कुसुमायुध अनंगप्रभेच्या दृष्टीस न पडावा म्हणून इच्छित असावी अशा प्रकारें वारंवार लुगड्याच्या पदरानें स्तनमंडळ झांकून घेऊं लागली. स्तनमंडळावर दोन्ही हात ठेविल्यामुळें आलिंगनाची संज्ञा देत असावी असें वाटूं लागलें, आणि कुसुमायुधावर पडणाऱ्या आपल्या कटाक्षांस अनंगप्रभेच्या दृष्टीस न पाडण्याच्या इच्छेनें वारंवार दोन्ही हातांनीं लुगड्याचीं शेवटें एके ठिकाणीं जोडल्याची कृति करून प्रणामाची संज्ञा देत असावी असें भासवूं लागली.

कुसुमायुधाचें मनसुद्धां मुक्तेच्या नाभिरूप विहिरीमध्यें पडून बुडत असतां त्यांतून रोमावलीरूप दोरीचा आधार मिळाल्याकारणानें बाहेर निघून स्तनमंडलावर चढलें आणि एवढ्या श्रमांनीं अगदीं थकून गेल्याकारणानें मुखरूप चंद्रमंडळावर विश्रांति घेत असावें असें दिसूं लागलें; कामदेवाच्या बाणांनीं विंधून गेलें असतांही वरल्या भागीं स्तनमंडळरूप मोठे उंचवटे आणि खालच्या भागीं नाभिरूप खोल विहीर असल्याकारणानें कोठें जावें म्हणून घाबरून जाऊन मध्यप्रदेशाला शोधूं लागलें असावें असें दिसूं लागलें; कामदेवरूप अग्नीपासून उत्पन्न झालेला परिताप शांत करण्यासाठीं नाभिरूप विहीरींत स्नान करण्यासाठीं त्यानें उडी मारली असावी असें भासूं लागलें; नाभिरूप विहीरींत आंघोळ करण्यानेंही शांत न होणारा परिताप दूर करण्यासाठीं मांड्या हेच केळीचे खांबले त्यांस तें आलिंगन देत असावें असें जाणवूं लागलें; मुक्तेचें हृदय पकडून नेण्याकरितां स्तनमंडलावर फेरफटका करीत असावें असें वाटूं लागलें; अधरामृताचें पान करण्यामध्यें लंपट झाल्याकारणानें परत कुसुमायुधापाशीं येण्यास नाखुश असावें असें भासूं लागलें; कटाक्षरूपी जाळ्यामध्यें गुरफाटून गेल्याकारणानें त्यांतून बाहेर निघण्यास असमर्थ होऊन गेलें असावें असें दिसूं लागलें; आणि केशपाशरूप अंधकारामध्यें पडून त्यांतून बाहेर निघण्याचा रस्ता चुकलें असावें असें भासूं लागलें.

या प्रमाणें परस्परांचें अवलोकन करण्यांतच कांहीं वेळ गेल्यावर अनंगप्रभा मुक्तेस म्हणाली—"सखि! कुसुमायुध फार दूरच्या प्रदेशाहून वेगानें आल्याकारणानें थकून गेला असेल यासाठीं आतां त्यानें विश्रांति घ्यावी आणि स्नानादिक विधिही आटपून घ्यावा म्हणून त्यास विनंती करणेंच योग्य आहे. तूं त्यास पानाचा विडा दे म्हणजे त्यास या समोरच्या बागेंत जाऊन यथेष्ट विश्रांति घेतां येईल आणि शारीरिक विधि उरकतां येतील. पहा! राजकुमाराचें शरीर कमळाहूनही अधिक सुकुमार असतें."

मुक्तेनें मस्तक नमवून, आपला स्वरभंग अनंगप्रभेच्याही लक्षांत न यावा अशी इच्छा करीत असावी अशा प्रकारें फारच मंदस्वरानें "प्रिय-सखि! मला या अपरिचित आणि तरुण राजकुमाराला विडा देण्यास लाज वाटते, म्हणून तूंच आपल्या हातानें दे." असें म्हटलें असतांही, अनंगप्र-भेच्या वारंवार आग्रहामुळें तिनें आपली दृष्टि अनंगप्रभेच्या मुखाकडे ठेवू-नच हातांत विडा घेऊन तो कुसुमायुधाकडे लांब केला. कामदेवाच्या अस्त्रांच्या ज्वाळा पाहूनच त्रास पावत असावी अशा प्रकारें डोळे मिट-णारी; कामदेवानें कन्यादान करण्यासाठीं तिला न्हाऊं घातलें असावें अशा प्रकारें घामानें थबथबलेली; हृदयामध्यें कामदेवाचा अपूर्व भार झाल्या कार-णानें धापा टाकीत असावी अशी दिसणारी; कामदेवाच्या धनुष्याच्या दोरीच्या टणत्कारानें चकित चकित होऊन गेली असावी अशा प्रकारें रोमांचांनीं व्याप्त झालेली; मोहरूप अंधकारामध्यें येऊन पडल्याकार-णानें कोणतीही दिशा समजत नसल्यामुळें हातानें चाचपून पाहात असावी अशी दिसणारी; कामज्वरानें पीडित झाल्याकारणानें नाडी दाखविण्या-साठीं हात लांबवीत असावी अशी भासणारी; आणि कामदेवाचे पुष्पमय बाण आंगावर येऊन पडल्याकारणानें उत्पन्न झालेल्या थंडीनें घेरली गेली असावी अशा प्रकारें थर थर कापूं लागणारी; अशा मुक्तेनें, जणों मरणपर्यंत शरीर अर्पण केल्याची चिठी असावी, अपूर्व विकाररूप इंद्र-जाळ उत्पन्न केल्याची मानपत्रिका असावी, आणि कामदेवरूप आचा-र्याची शिक्षापत्रिका असावी, अशी भासणारी जी पानाची पट्टी, तिनें सु-शोभित झालेला तिचा नाजुक हात लांबविला असतां; कुसुमायुधानेंही स-कळ सद्गुणांला आणि सर्व प्रकारच्या सुभाग्याच्या महिम्याला सुचविणा-ऱ्या सामुद्रिक रेखांनीं शोभणारा, इष्ट मनोरथ पूर्ण करण्याकरितां काम-देवानें प्रकाशित केलेली वरदानमुद्राच होय अशा आकृतींनीं चित्तांचें आकर्षण करणारा, अंतःकरणाच्या मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार या

नांवाच्या चार वृत्ति आणि पांचवा त्यांचा साक्षी आत्मा हीं मुक्तेच्या हाताच्या स्पर्शसुखाच्या लोभानें साकार होऊन बाहेर पडलीं असावीं अशा पांच बोटांनीं सुशोभित झालेला आणि नखांच्या वाढलेल्या किरणांनीं जणों स्तनमंडलाला स्पर्श करण्याविषयीं अत्यंत उत्सुक झाला असावा असा दिसणारा आपला हात पुढें केला. त्या बरोबरच मुक्तेनें, स्वेदजलानें भिजलेली, नव्या राज्याभिषेकाला प्राप्त झालेल्या कामदेवरूपी राजाची आज्ञापत्रिकाच असावी अशी भासणारी, आणि आंत जाऊं दिलेली मनाची प्रवृत्तिच होय अशी दिसणारी, कस्तूरीच्या गोळ्यांनीं घमघमाट सुटलेली पानपट्टी कुसुमायुधाच्या हातांत दिली आणि लाजेमुळें लागलाच आपला हात कुसुमायुधाच्या धैर्यासहित मागें ओढून घेतला.

"महाराजकुमार! हीं माझी सखी मुक्ता, हिच्या हृदयाला आश्वासन देऊन विश्रांति घेण्यासाठीं बगिच्यांत चलावें" असें अनंगप्रभा म्हणाली असतां,

"कांहीं चिंता करूं नका, तुमच्या सखीच्या परितापाचें कारण मी पूर्णपणें जाणून आहें. माझ्या येण्यानें तुमचे आणि तुमच्या सखीचे सगळे मनोरथ परिपूर्ण होतील. कामाची स्थिति माझ्या लक्षांत येऊन चुकली आहे. मी माझें शरीर अर्पण करून सुद्धां तुमच्या सखीचा परिताप शांत करीन."

या प्रमाणें अर्थांतरगर्भित भाषण करून मुक्तेच्या रोमांचजालाबरोबरच कुसुमायुध उभा राहिला, तेव्हां मुक्तेच्या, विकार गुप्त ठेवण्याच्या चातुर्यानें आणि कुसुमायुधाच्या भाषणचातुर्यानें गालांतले गालांत हांसत हांसत अनंगप्रभा कुसुमायुधाचा हात धरून त्यास बगीच्यांत घेऊन गेली. बगीच्यामध्यें निजण्या बसण्याला आणि स्नानादिक विधि करण्याला योग्य अशी जागा कुसुमायुधास दाखवून आपल्या हातांनीं वृक्षांवरील कांहीं

फळें तोडून घेऊन कुसुमायुधाला दाखवून दिलेल्या जागेंत ठेविलीं आणि तुमच्या घोड्याची तुम्ही कोणत्याही प्रकारची नका असें सांगून व त्याची आज्ञा घेऊन ती आपल्या देवपूजे गेली.



# प्रकरण २९ वें.

## कुसुमायुधानें केलेली मुक्तेच्या मनाची स्थिति.

कुसुमायुध बगीच्यांत निघून गेल्यावर महालांत एकटीच बसलेल्या मुक्तेच्या मनाला एकीकडून लज्जा आणि दुसरीकडून कामव्यथा खेंचूं लागली. एकीकडून कुलीनता "त्वां हें काय साहस आरंभिलें?" असा ठपका देऊं लागली, आणि दुसरी कडून यौवन असें साहस करण्याविषयीं प्रोत्साहन देऊं लागलें. एकीकडून सदाचार गंभीरता शिकवूं लागला आणि दुसरी कडून मोह क्षुद्रपणाचा उपदेश करूं लागला. एकीकडून धैर्य तिच्या चपळतेला धिक्कारूं लागलें आणि दुसरीकडून उत्कंठा चपळतेची वाहवा करूं लागली. एकीकडून मुक्तेचा बालभाव लज्जेला वाढवूं लागला आणि दुसरीकडून कामदेवाचे बाण लज्जेला हाणून पाडूं लागले. एकीकडून मर्यादेचें स्मरण उतावळेपणाला शांत करूं लागलें आणि दुसरीकडून कुसुमायुधाच्या अंगकांतीचें स्मरण उतावळेपणाला वाढवूं लागलें. एकीकडून मोठेपणा अविनयाला प्रतिबंध करूं लागला आणि दुसरीकडून कामांधता अविनयाला जोर देऊं लागली. एकीकडून बालभाव विलासांच्या व्युत्पत्तीमध्यें शंका घेऊं लागला आणि दुसरीकडून यौवन त्या शंकांचें समाधान करूं लागलें. एकीकडून मुग्धता अनंगप्रभेची मसलत घेण्याविषयीं सुचवूं लागली आणि दुसरीकडून कामदेव स्वच्छंदपणें वागण्याविषयीं चिथावणी देऊं लागला. एकीकडून लोकापवादाच्या चिंतेविषयीं विचार करण्याची जरूर पडूं लागली आणि दुसरीकडून जीविताच्या प्रस्थानाच्या चिंतेचा एलकोट करण्याविषयीं अगत्य वाटूं लागलें. एकीकडून कुसुमायुधाचा अपरिचितपणा पूर्वपक्ष करूं लागला आणि दुसरीकडून अनंगप्रभेनें केलेली

कुसुमायुधाच्या सद्गुणांविषयींची खात्री पूर्वपक्षाचीं कारणें खोडून काढूं लागली. एकीकडून गुरुजनांची भीति ग्लान करूं लागली आणि दुसरीकडून स्वयंवराची पद्धति उत्साहयुक्त करूं लागली. एकीकडून विवेक आडवून धरूं लागला आणि दुसरीकडून कामदेवाच्या कोर्टाचें वारंट येऊन दाखल झालें. विवेक, उताविळ न होण्याविषयीं पुरावा करूं लागला पण कामदेव राज्यकारणीं मसलतीनें खटपट करूं लागला. मुक्तेला "कुसुमायुध नाकारील तर?" अशी धास्ती पडून विवेक आपली बाजू सिद्ध करूं लागला परंतु हृदय तिला सोडून जाऊं लागलें. धैर्य तिला महाग करूं लागलें परंतु कुसुमायुधाचे गुण तिला खरेदी घेऊं लागले. कुलस्थिति तिला प्रौढ होण्याविषयीं खटपट करूं लागली परंतु अनुराग तिला दासी बनवून कुसुमायुधाजवळ घेऊन जाऊं लागला. सुविचार तिला आडवा येऊं लागला परंतु इंद्रियें न्याय व्हावा म्हणून तिला बांधून कामदेवाच्या हवालीं करूं लागलीं. मुक्ता,आपल्या प्रतिबिंबाससुद्धां आपलें रहस्य कळूं नये म्हणून बाहेर काढून देण्यास इच्छित असावी अशा प्रकारें पायाच्या आंगठ्यांनीं मणिमय जमीनीला खरवडूं लागली. कंपानें व्याप्त झाल्याकारणानें प्रतिबिंबाकडून सुद्धां आपला हात घट्ट धरवावा म्हणून इच्छित असावी अशा प्रकारें डावा हात मणिमय भुईवर थरथर कांपत ठेवूं लागली. कामदेवरूपी अग्नीपासून प्राप्त झालेला परिताप शांत करूं इच्छित असावी अशा प्रकारें घामाच्या धारांनीं न्हाऊं लागली. आपले विकार आपल्या मनापासूनही गुप्त ठेवण्यास इच्छित असावी अशा प्रकारें मनाला दूरदूर प्रेरूं लागली. कुचमंडळाचे ठिकाणीं प्रकट होणारा घाम निःश्वासाच्या वाऱ्यानें सुकवून टाकूं इच्छित असावी अशा प्रकारें धापा टाकूं लागली. हृदयामध्यें प्रकट झालेल्या कामाग्नीच्या धुरानें घाबरून गेली असावी अशा प्रकारें नेत्रांतून अश्रूंच्या धारा गाळूं लागली. सर्व दिशांच्या ठिकाणीं दिसून येणाऱ्या कुसुमायुधाला लाजत असावी अशा प्रकारें डोळे मिटून धरूं लागली. हृदया-

मध्यें वास करणाऱ्या कुसुमायुधाचा, कन्यात्वाला दूषित न करणारा असा समागम मिळाल्याकारणानें आनंदित झाली असावी अशा प्रकारें रोमांचित होऊं लागली. मनामध्यें उत्पन्न होणाऱ्या शेंकडोंशें कल्पनांची गणति करण्याकरितां मोत्यांचे दाणे एक एक ठेवीत असावी अशा प्रकारें अश्रूंचे बिंदु बाहेर टाकूं लागली. वरचेवर पडूं लागलेल्या कामदेवाच्या बाणांनीं खिळली जात असावी अशा प्रकारें स्तब्ध होऊं लागली. चिंतेच्या भारानें दडपून गेली असावी अशा प्रकारें वारंवार तोंड खालीं नमवूं लागली. जसें कांहीं आपल्याकडे कोणी पहातच असावें अशी शंका आल्याकारणानें उदरावरील त्रिवलीरूप लता तुटून जाईल अशा रीतीनें मागें सारसारून पाहूं लागली. आणि निरंतर चिंतन करीत असल्याकारणानें डोळ्यांसमोर उभा असलेला कुसुमायुध आपल्याच डोळ्यांच्या दोषामुळें अस्पष्ट दिसत आहे असें समजून अश्रुरूप जळानें डोळ्यांचें प्रक्षालन करूं लागली असावी अशा प्रकारें रुदन करूं लागली.

मुक्ता हातांचे आणि डोळ्यांचे कांहीं विचित्रच चाळे करीत आपले मनाशीं विचार करूं लागली—"कुसुमायुधाच्या चित्तवृत्तीची परीक्षा केल्यावांचूनच मी हें काय करीत आहें? नाहीं नाहीं, त्याच्या शरीराच्या ठिकाणींही माझ्या दर्शनानें उत्पन्न झालेले कित्येक विकार माझ्या पाहाण्यांत आले आहेत. मी साहस केलें तर जगामध्यें लोक मला काय नांव ठेवतील? नाहीं नाहीं, योग्य वर सोधून काढण्यामध्यें कन्यकाजनांस कोणत्याही प्रकारचा दोष लागत नाहीं. अरेरे! कामदेवाच्या विकारांचा जिला पूर्ण अनुभव आहे अशी चपळ अनंगप्रभा माझें चरित्र तेंव्हांच ओळखील या गोष्टीचाही म्यां मूर्खेनें विचार केला नाहीं. अनंगप्रभा तरुण कुसुमायुधाला मजपाशीं घेऊन आली त्यापेक्षां तिच्या मनांतही त्याच्या बरोबर माझा संबंध जोडण्याची इच्छा असावी असें दिसतें. अरे! पण माझी आई आणि बाप मला काय म्हणतील? अजून पर्यंत

टाकून सदाचाराचें उल्लंघन करून, कुळाला कलंकित करून, कन्यकाव्रतचा भंग करून घेऊन, आई बापांस वाईट वाटण्यास लावून, वडिलांस दुर्जन लेखून, आणि एकट्या कामदेवाचेंच ऐकून जर मी माझ्या शरीराला कुसुमायुधाच्या हातांत देईन तर मोठा अधर्म होणार नाहीं काय? शिव शिव! एवढा अधर्म माझ्या हातून कधींही होऊं नये. मेला कामदेव माझ्या मनाला पकडून, कोणजाणें, कोठें घेऊन चालला आहे? माझे विचार स्थिर होत नाहींत. कुसुमायुध सिद्धयोग्याप्रमाणें अनेक शरीरें धारण करून माझ्या आसपास सर्व दिशांस फिरत असलेला दृष्टीस पडतो, माझें हृदय वारंवार आकर्षण करतो, आणि मी जर त्याचा अनादर करावा तर तो माझे प्राण घेतल्यावांचून कधींही जाईल असें सहसा वाटत नाहीं. परंतु धर्मशास्त्राचा विचार केला असतां स्वयंवर करण्यामध्यें कसलाही अधर्म घडत नाहीं, परंतु कदाचित् झाला तर माझ्यानें त्यास नकार देववेल असें मात्र होणार नाहीं. मग हा कोणी धुतारा असो, तोतया असो, जादुगार असो, मला कलंक लावण्यासाठींच आलेला असो, किंवा मोह घालणारा असो किंवा शिधा सरळ मनुष्य असो—कोणीही असला तरी हें शरीर तर आतां त्याचेंच होऊन चुकलें. अरे! त्याचा अनादर करण्याचा मी संकल्प करीत आहें इतक्यांत माझें जीवितच माझ्या शरीराचा अनादर करण्याविषयीं संकल्प करीत आहे, युवतींचा कुलगुरु जो कामदेव तो मला आपल्या संप्रदायांतून काढून लावण्याची धमकी देत आहे, डोळ्यांस ओलवूं लागलेल्या अश्रुधारा 'फिरून नीट डोळे उघडून पहा' अशी सूचना देत असाव्या असा भास पडत आहे आणि मनोवृत्ति हितेच्छु सखीप्रमाणें मागाहून पस्तावा पावण्याच्या मजबूत कारणांची भली मोठी लांबलचक याद मजपुढें टाकीत आहे."

जुना संबंध असावा अशासारखी, केवळ विलासमय झाल्यासारखी, वेड्यासारखी, कामदेवमय होऊन गेल्यासारखी, फसून गेल्यासारखी, विकून गेल्यासारखी, जड झाल्यासारखी, हलकी झाल्यासारखी आणि आपल्याच शरीरावर आपला अधिकार न चालवूं शकणारी अशी होऊन गेलें, हा काय प्रकार आहे? कुसुमायुधानें जशी कांहीं जादू केली असावी! मी पुष्कळ पुस्तकांमध्यें वाचलें आहे कीं जादू करण्याच्या गप्पा सगळ्या गप्पा होत. तर मी आतां कोणाला विचारून चालूं? माझीं इंद्रियें भलत्या मार्गाला जाऊं पाहात आहेत, मन सांगितलेलें ऐकत नाहीं, धैर्याचा अवसर नाहींसा झाला. दुखऱ्या डोळ्यांच्या मनुष्यांस जसा दिवा त्याच प्रमाणें मलाही कोणी समजावूं लागलें तर तें प्रतिकूळ वाटूं लागतें. मी कोणाचें म्हणणें ऐकेन अशा स्तितींतही राहिलें नाहीं. हृदय उकळत आहे असें वाटतें, शरीर जळत आहे असें भासतें आणि अश्रूंच्या धारा कामरूप अग्नीमध्यें तुपाच्या धारांचें कार्य करीत आहेत. कोठें जाऊं? काय उपाय करूं? कोणाचें साहाय्य घेऊं? कोणती युक्ति योजूं? कोणतें शहाणपण लढवूं? कोणाकडे विचारण्याला जाऊं? मी कोठें बसलें आहें? काय करीत आहें? मी कशाचा विचार करीत आहें? मी जागी आहें अथवा निजलेली आहें? मजवर ही विपत्ति आली आहे अथवा उत्सवप्रसंग आहे? हा दिवस आहे का रात्र आहे? अहो! हा दुष्ट कामदेव मला फार दूरवर फरपटीत घेऊन चालला. तो मला हे वाईट चाळे शिकवीत आहे. माझ्या पित्याचें पवित्र कुल कोणीकडे आणि माझे हे नीच विचार कोणीकडे? शास्त्राचा अभ्यास कोणीकडे आणि कन्यकाजनांस न शोभतील असा हा मार्ग कोणीकडे? लाज सोडून देऊन लोकापवादाची पर्वा न करून, धैर्याला सोडचिठी देऊन, अपयशाचा अंगीकार करून, शीलाला घालवून

टाकून सदाचाराचें उल्लंघन करून, कुळाला कलंकित करून, कन्यकाव्रतचा भंग करून घेऊन, आई बापांस वाईट वाटण्यास लावून, वडिलांस दुर्जन लेखून, आणि एकट्या कामदेवाचेंच ऐकून जर मी माझ्या शरीराला कुसुमायुधाच्या हातांत देईन तर मोठा अधर्म होणार नाहीं काय? शिव शिव! एवढा अधर्म माझ्या हातून कधींही होऊं नये. मेला कामदेव माझ्या मनाला पकडून, कोणजाणें, कोठें घेऊन चालला आहे? माझे विचार स्थिर होत नाहींत. कुसुमायुध सिद्धयोग्याप्रमाणें अनेक शरीरें धारण करून माझ्या आसपास सर्व दिशांस फिरत असलेला दृष्टीस पडतो, माझें हृदय वारंवार आकर्षण करतो, आणि मी जर त्याचा अनादर करावा तर तो माझे प्राण घेतल्यावांचून कधींही जाईल असें सहसा वाटत नाहीं. परंतु धर्मशास्त्राचा विचार केला असतां स्वयंवर करण्यामध्यें कसलाही अधर्म घडत नाहीं, परंतु कदाचित् झाला तर माझ्यानें त्यास नकार देववेल असें मात्र होणार नाहीं. मग हा कोणी धुतारा असो, तोतया असो, जादुगार असो, मला कलंक लावण्यासाठींच आलेला असो, किंवा मोह घालणारा असो किंवा शिधा सरळ मनुष्य असो—कोणीही असला तरी हें शरीर तर आतां त्याचेंच होऊन चुकलें. अरे! त्याचा अनादर करण्याचा मी संकल्प करीत आहें इतक्यांत माझें जीवितच माझ्या शरीराचा अनादर करण्याविषयीं संकल्प करीत आहे, युवतींचा कुलगुरु जो कामदेव तो मला आपल्या संप्रदायांतून काढून लावण्याची धमकी देत आहे, डोळ्यांस ओलवूं लागलेल्या अश्रुधारा 'फिरून नीट डोळे उघडून पहा' अशी सूचना देत असाव्या असा भास पडत आहे आणि मनोवृत्ति हितेच्छु सखीप्रमाणें मागाहून पस्तावा पावण्याच्या मजबूत कारणांची भली मोठी लांबलचक याद मजपुढें टाकीत आहे."

या प्रमाणें कामदेवानें कबजांत घेतलेली, प्रेमानें परवश केलेली, उत्कंठेनें उतावळी केलेली, घामानें घेरलेली, रोमांचांनीं व्यापलेली, विवर्णतेनें विलासांत व्युत्पन्न केलेली, स्वेदोद्गमानें परस्वाधीन केलेली, कंपानें कौतुकित केलेली, आणि जांभयांनीं भांबावलेली अशी मुक्ता उठून महालाच्या खिडकींतून कुसुमायुधाकडे पाहूं लागली.



# प्रकरण ३० वें.

## संदिग्ध प्रेम आणि कामाची सत्ता.

अनंगप्रभेनें सांगितल्याप्रमाणें कुसुमायुध बगीच्यामध्यें एके ठिकाणीं उतरला, आणि स्नानसंध्या करून जेवणखाण उरकल्यावर मुक्तेच्या स्वरूपाचाच निदिध्यास करूं लागला. तेव्हां तो परिश्रमांतून मुक्त झाला असतांही घामानें घेरला जात होता. स्वतां हा वीर असतांही कामदेवाच्या प्रहारानें कंपित होत होता. शरीराच्या विकारांचें गोपन करूं इच्छित असावा अशा प्रकारें रोमांचांनीं आच्छादित होत होता. निश्चल बसला असल्याकारणानें समाधि घेऊन बसला असावा असा दिसत होता. हृदयामध्यें कामदेवाला स्थल दिल्यावरून धैर्यानें त्यास सोडून दिलें असावें असा वाटत होता. दूर राहिलेल्या मुक्तेलाही हृदयांत ओढून ओढून रमवीत असावा असा दिसत होता. कांहीं एक बोलत नसतांही कामदेवाच्या व्यथेविषयीं व्याख्यान देत असावा असा भासत होता. कामदेव क्षत्रियांच्या तेजाला डरून अंतर्हित राहून बाणानीं विंधित असावा, असा भासत होता. हृदयांत प्रविष्ट झालेल्या मुक्तेला परत बाहेर न जाऊं देतां इंद्रियांच्या पहाऱ्यामध्यें तिला ठेवण्याच्या उद्देशानें सर्व इंद्रियांस हृदयांत एके ठिकाणीं जमवून ठेवीत असावा असा दिसत होता. तिला आपल्या हृदयांतून प्रवासास न निघूं देण्याच्या उद्देशानें अति वृष्टीचा देखावा दाखवूं इच्छित असावा अशा प्रकारें अश्रूंच्या धारांचा वर्षाव करीत होता. स्वतांही वीर असतांही कामदेवाच्या हातानें पराजय पावल्याकारणानें

तर केली नसेल? माया फारवेळपर्यंत टिकत नाहीं हा सिद्धांत आहे. माया असली ह्मणून काय चिंता आहे? हिला पाहून माझ्या मनांत दया उत्पन्न होते आणि ती दया क्षत्रियांच्या धर्माप्रमाणें हिचें दुःख दूर करण्याविषयीं मला प्रेरणा करते. शत्रूचे पक्षाकडील बळाबळ माहीत नसतांही विरुद्ध पक्षाकडील मनुष्याच्या चित्ताला कधींही दयार्द्र करणार नाहीं, हा असा स्वाभाविक नियमच आहे. ज्यास पाहिल्यानेंच चित्त द्रव पावतें त्यास अहित ह्मणून कसें मानावें? मनुष्यांचे डोळे हित करणाराच्या दर्शनानें आर्द्र होतात, पुत्राच्या दर्शनानें रसपूरित होतात, कामिनीच्या दर्शनानें वक्र होतात आणि शत्रूच्या दर्शनानें लाल रक्त होतात. या नियमास अनुसरलें असतां या स्त्रीच्या दर्शनानें माझे डोळे आर्द्रता पावतात. पाहिजे तें होवो, जवळ जाऊन हकीगत विचारावी तर खरी. वेळानुसार माझ्या तडाक्यांतून जखमी होऊन निसटून गेलेल्या दैत्याचा पत्ता लागण्याचा कदाचित् हा मार्ग असेल? मला पाहून जर ही मागें सरली नाहीं, वर चढून गेली नाहीं, किंवा उडूनही गेली नाहीं तर तिचें नांव गांव तशीच तिची एकंदर हकीगत विचारण्यास बरें पडेल." याप्रमाणें मनांत विचार करीत करीत कुसुमायुध घोड्यावरून खालीं उतरला. आणि झाडाच्या बुंधाशीं त्यास बांधून ठेवून हळुहळु, तिजकडे पाहत पाहत, थोपत थोपत, आश्चर्य पावत पावत, दृढता धरीत धरीत, आणि हात जोडीत जोडीत, तिकडे जाऊं लागला.

तरुण राजकुमाराला येतांना पाहून विस्मित होणारी; दैत्याच्या कपटाची शंका मनांत धरणारी; डावा डोळा स्फुरण पावण्याचें फळ मिळणार ह्मणून कल्पना करणारी; हा प्रदेश मनुष्यांस केवळ अगम्य होय असें जाणून फळाच्या अपेक्षेविषयीं कल्पना सोडून देणारी; कुमाराचे नेत्र आर्द्र झालेले पाहून धास्ती सोडून देणारी; "दैव अनुकूळ झालें असतां पाहिजे तें घडवून आणून सुखाचें द्वार खुलें करतें"

ण्याचा पुष्कळ संभव आहे. पायाच्या अंगठ्यानें भुई खरडणें आणि ओठ चावणें हेही प्रकार प्रतिबंधाच्या दुःखानें होणाऱ्या चिंतेमुळें होणें संभाव्य आहेत. स्तनमंडळाच्या भारानें लवलेल्या स्त्रियांस वारंवार पदर सावसारण्याची जरूर पडावी हें ही स्वाभाविकच आहे. भीमासुरास मारतां येईल असें बळकट शरीर आणि दृढशक्ति माझ्या ठिकाणीं आहे किंवा नाहीं हें निरखून पाहातां येण्याकरितां मुक्ता मजवरील आपली दृष्टि फिरवूं शकली नसेल हें ही असंभाव्य नाहीं. कसेंही असो, तरी ह्या सर्व चिन्हांबरोबर स्वेदोद्गम, अंगकंप, रोमांच, विवर्णता आणि अश्रुपात वगैरे सात्विक भाव उत्पन्न होणें हें कामदेवाच्या आवेशावांचून कोणत्याही कारणानें शक्य नव्हे. मुक्तेच्या गालावरील लुगड्याचा पदर आणि स्तनमंडलावरील चोळीचा भाग मला पाहिल्या नंतरच भिजून गेला, आणि कपाळावरील कुंकवाचा टिळाही ओहळून गेला. मला पानाची पट्टी देतेवेळींही तिचा हात कांपल्यामुळें हातांतील बांगड्याचा आवाज झाला, इतकेंच नाहीं तर त्यापूर्वीं सुद्धां विरळ लुगड्याच्या पदरांतून कानांतील अलंकार आणि स्नतमंडळावरील हार, मंदवायूच्या लहरीनें दोलायमान होणाऱ्या पल्लवांप्रमाणें थरथरत असलेला पाहण्यांत आला. स्तनमंडळावरील पदर नाचत असावा असा दृष्टीस पडत होता. केशपाश साफसारीत असतां हात उंच केल्याकारणानें उघडी झालेली नाभिजवळची रोमावली सुद्धां, पहिल्यानेंच पाऊस पडूं लागला असतां भुईंतून उद्भिन्न झालेल्या सूक्ष्म अंकुरांच्या पंक्तीप्रमाणें दिसत होती. मी पहिल्यानेंच तिला पाहिले तेवेळीं मुक्तेच्या अंगलतेचा वर्ण बावनकशी सोन्यासारखा आणि अंधाऱ्या रात्रीच्या विजेसारखा दिसला, परंतु थोड्याच अवकाशांत तो बदलून हीणकस सोन्याप्रमाणें आणि सायंकाळच्या विजेप्रमाणें दिसूं लागला. गालावर काळे ओहळ आणि

चोळीवर काळे डाग दृष्टीस पडले, त्याचें कारणही काजळानें युक्त अश्रुधारा त्यांवर पडल्या असाव्या या शिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. मुक्ता अनंगप्रभेबरोबर बोलत होती त्या वेळीं तिचा कांहींसा स्वरभंग झालेलाही कळत होता. तिच्या मांड्या सुद्धां कामदेवाच्या बाणांनीं खिळून गेल्या असाव्या, कामव्यथारूप वायूच्या झटक्यानें घेरल्या असाव्या आणि माझ्या डोळ्यांच्या किरणांनीं भोंसकल्या असाव्या अशा प्रकारें चालण्यास अशक्त झालेल्या दृष्टीस पडल्या. कांहीं वेळपावेतों तर तिला अनंगप्रभेजवळ उभी असल्याचेंही भान राहिलें नसावें असेंही उघड दिसत होतें. जसें कांहीं मला अशा खोट्या संकल्पांत लोटून कामदेव भ्रमवीत असावा; यौवन ठकवीत असावें; चपळता गोते देत असावी; चित्तवृत्ति भलतेंच समजावीत असावी; आशा मन ओलवीत असावी; लालसा लंपट करीत असावी; अभिमान भुलचूक पाडीत असावा; चिंता भलतेच चाळे करवीत असावी; मनोरथ उन्मत्त करून सोडीत असावा; एकांत अंध करून टाकीत असावा; पोरकट मत फसवीत असावें आणि राज्यलक्ष्मी आडमार्गास लावीत असावी, अशा प्रकारें परस्परविरुद्ध चिंतांनीं ग्रस्त झाल्याकारणानें काय होणार? जो कांहीं खरा प्रकार असेल तो आपसुखेंच हळुं हळू वाजत गाजत पुढें येईल."

**या** प्रमाणें चिंतारूप महानदीच्या तरंगांमध्यें पोहणारा आणि मोठ्या कष्टानें धीर धरून जराशी विश्रांति घेणारा अशा कुसुमायुधाकडे मंदिराच्या खिडकींतून डोकावून पाहूं लागलेली मुक्ता अश्रूंचे प्रवाह सुद्धां दर्शनसुखांत आडकाठी आणणारे होत असें मानूं लागली; निरोप घेऊन जाण्याच्या आणि घेऊन येण्याच्या कामीं आपल्या मनालाच पाठवूं लागली; दृष्टि अश्रूंनीं भरून गेली असतां कुसुमायुधाच्या हृदयावरच स्थिर करून अवलोकन करूं लागली; संकल्पानें जवळ आणून

सोडलेल्या कुसुमायुधापासून कन्यकाभाव खंडित न करणारें असें सुरतसुख मिळवूं लागली. दंतक्षताची पीडा ज्यांत नाहीं असा चुंबनाचा आनंद अनुभवूं लागली. नखक्षताची व्यथा ज्यांत नाहीं अशी स्तनमर्दनाची गोडी उपभोगूं लागली. ज्यांत कुचमंडलही अडवें येणार नाहीं असें आलिंगनाचें सुख उपभोगूं लागली. बगीच्याच्या ज्या प्रदेशीं कुसुमायुध बसला होता तो प्रदेश रत्नमयाप्रमाणें आणि जीवनमयाप्रमाणें लेखूं लागली. त्या प्रदेशाकडून येणाऱ्या वायूला तसेंच पक्षांच्या शब्दालाही मान देऊं लागली. कामदेवाच्या हातून सोडवून कुसुमायुधाजवळ न पोंचविल्याबद्दल आपल्याच स्तनमंडलाच्या आणि नितंबमंडलाच्या भाराचा दोष पाहून त्यास नांवें ठेवूं लागली. मनानें तर त्याच्यापाशीं जाऊन पोंचूं लागली. तो प्रीतिमय, विलासमय आणि उत्साहमय असावा असाच पाहूं लागली. वडिलांच्या आज्ञेंत रहाण्याच्या शास्त्राच्या आज्ञेला धिक्कारूं लागली. दुःखाचा शेवट यावयाचा असला तर तो कुसुमायुधापासून अथवा यमापासूनच येईल असें मानूं लागली. "तूं मला जसा व्यथित करितोस तसा त्यालाही व्यथित कर" अशी कामदेवाची प्रार्थना करूं लागली. त्याच्या जवळ जाण्याला आडकाठी घालणारी लज्जा वैरिणी होय असें गणूं लागली. कुसुमायुधाच्या सात्विक भावाची परीक्षा करून कामदेवाचा उपकार मानूं लागली. कामदेवरूप कुवैद्याच्या सेवनामुळें निरंतर विकारांच्या वृद्धीसच पात्र होऊं लागली. बगीच्यांतून येणारा शीत, मंद आणि सुगंधी वायु धगधगणाऱ्या निखाऱ्यांच्या वर्षावाप्रमाणेंच गणूं लागली. उत्कंठेला जर खांदा असता तर त्यावर बसून परभारेंच निघून गेलें असतें अशी कल्पना करूं लागली. आणि कामदेव अनंग असल्याकारणानेंच मला उचलून कुसुमायुधापाशीं नेऊन पोंचवूं शकत नाहीं असा तर्क करूं लागली.

या प्रमाणें संध्याकाळ होई तों पर्यंत खिडकींतूनच कुसुमायुधाकडे पहात बसून स्तनमंडलाच्या तशाच नितंबमंडलाच्या भारानेंही अतिगुरुत्व धारण करणारी झाली असतांही हृदयांत व्याप्त झालेल्या उत्कंठेनें हुरळली असावी अशा प्रकारें त्वरितच मंदिराच्या गच्चीवर गेली. या वेळीं चंद्रानें आपल्या किरणांनीं आकाशाला क्षीरसागरमय करून सोडलें होतें; दिशा चंद्राच्या प्रकाशामुळें मानीपणाच्या ज्वरानें रहित झालेल्या कामिनीप्रमाणें प्रसन्न दिसत होत्या; चंद्रमंडल कामी जनांस कामदेवाच्या साम्राज्याच्या श्वेत च्छत्राची भ्रांति उत्पन्न करीत होतें; चंद्र कामी जनांस सूचना करण्याकरितां कलंकरेखेच्या निमित्तानें आपली प्रिया जी रात्री तिला हृदयाशीं धरून बसला असावा असा दिसत होता; आकाशामध्यें वर येणारें चंद्रमंडळ यौवनाप्रमाणें कामदेवाला साहाय्य करीत होतें; सर्वांस प्रकाशित करणारें असतांही कामी जनांच्या कामरूप अग्नीच्या ज्वाळांनीं जळणाऱ्या हृदयाला मात्र अंधकारमय करून टाकीत होतें; कुटुंबांतील मनुष्यांनीं आब्रादाबांत ठेवलेल्या युवतीससुद्धां कामदेवाच्या स्वाधीन करून देत होतें; युवतीजनांच्या सर्व शंकांचें महामहोपाध्यायाप्रमाणें निवारण करून टाकीत होतें; विरही लोकांस व्रणांत घातलेल्या क्षाराप्रमाणें वाटत होतें; कामी जनांच्या बोलावण्याशिवायही अभिसार करण्यास उद्युक्त झालेल्या कामिनींस हलकटपणाच्या दोषांतून मुक्त करण्याची हमी देत होतें; आणि महालांत योजलेल्या चंद्रकांतशिलांस कामीजनांच्या हृदयाप्रमाणें द्रवमय करून टाकीत होतें; अशा वेळीं गच्चीवर आलेल्या मुक्तेनें, जशी आकाशांत अकस्मात चमकलेली वीज दृष्टीचें हरण करिते, त्याच प्रमाणें कुसुमायुधाच्या दृष्टीचें आकर्षण केलें.

"मेघावांचून आणि चंद्राच्या प्रकाशानें भरून गेलेल्या आकाशामध्यें, ही काय वीज! विजेच्यावर अंधकार असेल कदाचित्, परंतु अंधकारा-

च्या खालीं आणि विजेच्यावर हें दुसरें चंद्रमंडळ कोठून? हा काय चमत्कार? आणखी तें चंद्रबिंबही कलंकरहित कसें? चंद्रबिंबावर कमळांची जोडी कोठून? कमळांच्या जोडीवर धनुष्यांची जोडी कशाची? मोठें आश्चर्य आहे! चंद्रमंडलाच्या खालीं काळ्या ढगांनीं झांकलेली कलशांची ही जोडी कसली? आणखी या कलशांच्याही खालीं शून्य प्रदेशीं विहीर कसली? वीज तर एवढ्या वेळपर्यंत स्थिर रहावयाची नाहीं, तेव्हां ही काय सुवर्णाची लता असेल? सुवर्णाच्या वेलीवर लटकलेली ही फळांची जोडी संभवेल परंतु तिच्यावर कमळ कसें? आणि कमळामध्यें पुन्हा मासळीचीही जोडी कोठून आली? ही सगळी चूक होत आहे. खरोखर, चंद्रच हा आपलें एक रूप, अंधकाराचा नाश करून जगाचें कार्य संपादण्यासाठीं, आकाशांत ठेवून देऊन, मला व्याकुळ करण्याच्याच मुख्य उद्देशानें दुसरें रूप धरून या मंदिराच्या गच्चीवर आला असेल!"

असे असे अनेक तर्कवितर्क करीत असतां कुसुमायुधाची थोड्याच अवकाशांत खात्री झाली कीं हीतर माझ्या चित्ताची चोरी करणारी आणि मला उन्मत्ताप्रमाणें नाचवून सोडणारी मुक्ता! आणि ती तरी माझ्या ठिकाणीं आसक्त होऊन माझें अवलोकन करण्याच्या उद्देशानेंच गच्चीवर येऊन उभी आहे! अहो! माझा संकल्प खरा झाला. कामदेव माझ्यावर प्रसन्न झाला! ही गच्चीवर गेली ती माझ्या पाशींच जर आली असती तर केवढी बहार झाली असती! अनंगप्रभा मला मुक्तेपाशीं घेऊन गेली परंतु तेथें घेऊन गेल्यावर ती परत निघून गेली असती तर केवढी सवड मिळाली असती? मुक्तेचें शरीर तसेंच तिचे डोळेतर साक्ष देऊन चुकलेच आहेत; परंतु अझून तोंडची कबूली होणें राहिलें आहे. पण नव्हे नव्हे. मी भाषण बोललों तेव्हां मंद हास्य करून तोंडची कबूलीही मिळून चुकली असेंच म्हटलें पाहिजे. कामिनी, मनापासून

राजी असतांही, तोंडानें तशी गोष्ट कधीं कबूल करावयाच्या नाहींत; इतकेंच नाहीं तर होय या अर्थाचा वाचक नकारच बोलतील; तसेंच प्राणही अर्पण करितील तरी पुरती दृष्टि ह्मणून कधीं अर्पण करणार नाहींत, हा त्यांचा असाधारण चमत्कारिक स्वभावच आहे. आतां अनंगप्रभा मजवर केव्हां कृपा करतील बरें? आणि हें जीवित केव्हां भाग्यशाली करतील? मुक्तेचे प्रेमयुक्त वाकडे कटाक्ष माझ्यावर पडले तेव्हांच मी भाग्यशाली होऊन चुकलों आहें, तरी कृतार्थ केव्हां होणार? मुक्ताही सौंदर्याची नदीच आहे, कामदेवाची करामत आहे, विधात्याची अलौकिक चातुरी आहे, विलासांची जन्मभूमि आहे, शृंगाराची पराकाष्ठा आहे, यौवनाची असाधारण लीला आहे, लावण्याची परम उन्नति आहे, कळांची अपूर्व सृष्टि आहे, आणि नखऱ्यांची अद्भुत कीर्ति आहे! आणि दुसरें काय?"

या प्रमाणें विचार करितां करितां आणि एकाग्र दृष्टि करून पहातां पहातां, कुसुमायुधाला मुक्ता कटाक्षांनीं विंधून टाकूं लागली आणि कामदेव आपल्या बाणांनीं विंधूं लागला. मुक्ता आपल्या नितंबावर वारंवार हात ठेवूं लागली आणि कामदेव संतोषित होऊन आपल्या हृदयावर हात ठेवूं लागला. मुक्ता आपल्या केशपाशावर हात फिरवूं लागली आणि कामदेव आपल्या मिशांवर हात फिरवूं लागला. मुक्ता आपल्या वायूनें फडफडणाऱ्या लुगड्याच्या पदरास घट्ट धरून ठेवण्यासाठीं हात लांब करूं लागली आणि कामदेव धनुष्याला कुंडलाकार करण्याकरितां हात लांब करूं लागला. मुक्ता वारंवार येणाऱ्या जांभयांस बंद करूं लागली, आणि कामदेव आपल्या सौम्यतेला बंद करूं लागला. मुक्ता कामातुरपणामुळें ओठ चावूं लागली आणि कामदेव उग्रपणामुळें ओंठ चावूं लागला. केशकलाप वारंवार मोकळा सोडसोडून पुनःपुनः बांधूं लागणारी;

लुगड्याचा पदर सरला असतां उजव्या हातानें उजव्या खांद्यावर वारंवार ठेवून स्तनमंडळ आच्छादित करणारी; कुसुमायुधाच्या दृष्टीशीं दृष्ट मिळतांच आपल्या मुखकमळाला खालीं नमविणारी; फूल अथवा पल्लव वगैरेकडे पाहूनच विनाकारण मंद हास्य करणारी; हातांतलें खेळणें घेऊन व त्यास उराशीं धरून त्याचे वारंवार मुके घेणारी; गच्चीवर शोभेसाठीं ठेविलेल्या स्फटिकमण्यांच्या पुतळ्यांच्या कपाळीं कुंकूं लावण्याची क्रिया करणारी; गच्चीवर फिरत असतांही ज्या स्थळीं कुसुमायुधाची दृष्टि नीट पोंचेल तशा स्थळीं जास्त वेळ उभी राहणारी; केशकलाप टांचेपर्यंत पोंचून पायांत गुर्फाटला असतां कामदेवानें बांधून स्वाधीन केली असावी अशी दिसणारी; वारंवार खालीं मान करूनच रहात असल्याकारणानें प्रणाम करीत असावी अशी वाटणारी; अजुबाजूस वळून वळून पहात असल्याकारणानें क्षणक्षणीं उदरावरील त्रिवली तुटून गळून चालली असावी अशी दिसणारी; अंगलतेच्या कंपामुळें कामदेवाच्या बाणांनीं होणाऱ्या वेदनेचें निवेदन करीत असावी अशी दिसणारी; मंद हास्याच्या उज्वल प्रभेनें चांदण्यासही अधिक शोभा देणारी; बोटांतून ठिबकणाऱ्या स्वेदजलानें स्वतांच संकल्प करून आपल्या शरीरास अर्पण करीत असावी अशी भासणारी; शरीरावर पसरलेल्या चंद्राच्या किरणांसच कामदेवाचा शरपंजर होय असें मानणारी; कुसुमायुधाच्या गुणांनीं आपल्या आत्म्यास विकत घेतलें असें मानणारी; नूपुरांच्या झणत्कारानें कुसुमायुधाला आमंत्रण देत असावी अशी दिसणारी; वारंवार अंगावरून सरणारा लुगड्याचा पदर संभाळण्यामध्यें व्यग्र होणारी; आपल्या डोळ्यांनींसुद्धां स्मरावेशाचा चमत्कार पाहाण्याच्या उत्कंठेमुळें आभरणांमध्यें प्रतिबिंबित होण्याच्या निमित्तानें वळून वळून पहात असावी अशी दिसणारी; मणिमय नूपुरांच्या आंत प्रतिबिंबित झालेल्या नितंबमंडळानें आणि स्तनमंडलानें पायावर भार आला असावा अशा प्रकारें हळुहळू

पावलें टाकणारी; चंद्र प्रतिबिंबाच्या मिषानें कपाळांतून लावण्य चोरण्याकरितां आला असावा असें समजून त्यास आंत येण्यास प्रतिबंध करूं इच्छित असावी अशा प्रकारें वारंवार कपोलतलावर आपला हात ठेवणारी; चंद्राचा प्रकाश कामदेवाचें अग्न्यस्त्र होय असें समजून त्यास विझवून टाकूं इच्छित असावी अशा प्रकारें स्वेदजलाचा वर्षाव करणारी; कामदेवाच्या धनुष्याच्या टंकाराच्या श्रवणानें संतप्त होऊन जाणाऱ्या श्रवणाला शीतल करूं इच्छित असावी अशा प्रकारें अश्रूंच्या धारा श्रवणावर सोडणारी; अंगावरून वारंवार दूर सरत असल्याकारणानें हृदयामध्यें पेटणाऱ्या कामाग्नींत जळण्याच्या धास्तीनें पळून जात असावा अशा लुगड्याच्या पदरानें शोभणारी; हृदयांत प्रविष्ट झालेल्या कुसुमायुधाला अडवून धरूं इच्छित असावी अशा प्रकारें स्तनमंडळाला तळहातांनीं दाबणारी; आणि कुसुमायुधाचें प्रतिबिंब गालांमध्यें पाडण्याच्या उद्देशानें स्वेदजलानें त्यास साफ करीत असावी अशी दिसणारी; मुक्ता पुष्कळ वेळपर्यंत कुसुमायुधाच्या दृष्टिपथांतच जाणूनबुजून उभी राहिली.

मुक्तेकडे एकाग्र दृष्टि धरून पहात राहणाऱ्या कुसुमायुधाचें अंतःकरणही मुक्तेच्या केशपाशरूप अंधकारामध्यें गोते खाऊं लागलें, लावण्याच्या पूरामध्यें वाहून जाऊं लागलें, ललाटस्थ कुंकवाच्या बिंदूनें विंधून जाऊं लागलें, भिवयांच्या ठिकाणीं भ्रमण करूं लागलें, लोचनांच्या ठिकाणीं लंपट होऊं लागलें, नथीमध्यें नाचूं लागलें, अधरांच्या ठिकाणीं अधीर होऊं लागलें, मंदहास्याच्या ठिकाणीं मस्त होऊं लागलें, दंताच्या ठिकाणीं मंतरल्या प्रमाणें स्थिरावूं लागलें, गालांच्या ठिकाणीं विरघळून जाऊं लागलें, गळ्यामध्यें बिलगून राहूं लागलें, बाहुलतांमध्यें बांधलें जाऊं लागलें, कुचांच्या ठिकाणीं खुपसून बसूं लागलें, त्रिवलीमध्यें वेटाळून बसूं लागलें, रोमावलीमध्यें रेंगाळून राहूं लागलें, नाभीमध्यें निमग्न होऊं

लागलें, नितंबाच्या ठिकाणीं थांबूं लागलें, मांड्यांच्या ठिकाणीं मंडित होऊं लागलें, पोटऱ्यांच्या ठिकाणीं पराधीन होऊं लागलें आणि चरणांच्या ठिकाणीं शरण जाऊं लागलें.

मुक्ता बराच वेळपर्यंत कुसुमायुधाकडे निरखून पाहून व कामदेवाचे प्रयास सफळ करण्याचा निश्चय करून आणि कुसुमायुधाच्या अंतःकरणाचें हरण करून, गच्चीवरून खालीं येऊन आपल्या पलंगावर जाऊन बसली. कुसुमायुधही मुक्ता आपलीच असें समजून तिला कामदेवापासूनही अदृश्य ठेवूं इच्छित असावा अशा प्रकारें मनांत घट्ट धरून बसून, बागेंतील आंतल्या शयनगृहामध्यें निघून गेला. शयनगृहामध्यें कामाग्नीच्या ज्वाळांनीं होरपळत असतांही तो आर्द्र असूं लागला; निद्रेनें, मुक्तेच्या ठिकाणीं आसक्त झालेला पाहून, मत्सरामुळें त्यास सोडून दिलें असावें अशा प्रकारें बिछान्यावर या कुशीवरून त्या कुशीवर वळून वळून वेळ घालवूं लागला; मनाला मुक्तेकडेच पाठवून दिलें असल्याकारणानें स्वतां मनावांचूनच निर्माण झाला असावा अशा प्रकारें शून्य असूं लागला; सर्व दिशांकडून येणाऱ्या कामदेवाच्या बाणांपासून आपला बचाव करूं इच्छित असावा अशा प्रकारें रोमांचरूपी चिलखत धारण करूं लागला; हृदयामध्यें वास करणाऱ्या मुक्तेला कामदेवाच्या प्रहारांनीं आलेल्या मुर्च्छेतून मुक्त करूं इच्छित असावा अशा प्रकारें दीर्घ दीर्घ निःश्वासरूपी वायु हृदयामध्यें ओढून घेऊं लागला; नवरदेव बनण्याच्या इच्छेनें मंगलस्नान करीत असावा अशा प्रकारें स्वेदजलानें भिजून जाऊं लागला; मुक्तेचा अभिप्राय तिच्या विकारांवरून स्पष्ट समजून आला असतांही, संदेहांत पाडून त्याच वेळीं स्पष्टपणें खुलासा न करूं देणाऱ्या आपल्या विचारांस नांवें ठेवूं लागला; स्पष्टपणें खुलासा करून न घेतल्याकारणानें माझें मन कठोर समजूं नये अशी मुक्तेपाशीं विज्ञप्ति करीत असावा अशा प्रकारें

ओठ थरथरावूं लागला; कामदेवामुळें अंधकारयुक्त झालेल्या दिशा प्रकाशित करूं इच्छित असावा अशा प्रकारें मुक्तेच्या चेष्टा आठवून आठवून स्मित करूं लागला; हृदयामध्यें धुमसणाऱ्या कामरूपी अग्नीच्या धुरानें घाबरून गेला असावा अशा प्रकारें डोळे मिटून अश्रूंचे बिंदु गाळूं लागला; जसजसा कामसंताप शांत करण्याकरितां चंद्राच्या किरणांचें सेवन करूं लागला तसतसा त्या संतापापासून विशेष पीडा पावूं लागला; अत्यंत दाह करणाऱ्या कामरूपी अग्नीमध्यें उन्मत्ताप्रमाणें स्नेहाच्या आहुति देऊं लागला; चंद्राच्या किरणांपासून संताप वाढूं लागला असें पाहून, "सूर्याच्या किरणांपासूनच चंद्राचा प्रकाश निष्पन्न होतो" असें लिहिणाऱ्या खगोलशास्त्रवेत्त्याचें स्मरण करूं लागला; आंत, बाहेर, पुढें, मागें, वर, खालीं आणि आजूबाजूसही मुक्ताच पाहूं लागला; सर्वत्र मुक्तेला पाहूं लागल्याकारणानें संयोगापेक्षांही वियोगास अधिक मानूं लागला; वारंवार विव्हळ होऊन बिछान्यावरून उठून बसूं लागला; शयनावरून उठून उठून लतामंडपांत जाऊं लागला; थोडथोडा वेळ राहणाऱ्या परंतु तेवढा वेळ तरी कामव्यथा न जाणवूं देणाऱ्या मूर्च्छेचा उपकार मानूं लागला; रोमांचित झाल्यामुळें मुक्तेच्या प्राप्तीसाठीं शरशय्येवर पडून तप आचरीत बसला असावा असा दिसूं लागला; कामावेशामुळें फाटूं लागलेल्या हृदयाला स्थिर राखण्यास इच्छित असावा अशा प्रकारें वारंवार हृदयावर हात ठेवूं लागला; पुष्पांच्या विकासानें खेद पावूं लागला; भ्रमरांच्या गुंजारवानें उद्वेग पावूं लागला; संतापाच्या शांतीसाठीं कदलीपत्रें तोडून छातीवर धरूं लागला; मणिमय बैठकीच्या आंत दिसणाऱ्या चंद्राच्या प्रतिबिंबासही संतापवर्धक समजून पल्लवांनीं झाकून टाकूं लागला; पल्लवांवर बोटांनीं उत्कंठालेख लिहूं लागला; शत्रूंच्या लोहमय शस्त्रांनींही कंपायमान होणारा नसतांही बगीच्यांतून येणाऱ्या मंद वायूच्या लहरीनेंही

कंपायमान होऊं लागला; क्षणिक स्वप्नामध्यें मिळणाऱ्या मुक्तेच्या समागमानेंसुद्धां स्वतांला धन्य मानूं लागला; जागृत अवस्थेमध्येंसुद्धां मुक्तेला प्रत्यक्ष पहात असावा अशा प्रकारें तिच्या बरोबर स्वप्नामध्यें केलेल्या निर्दय दांडगाईबद्दल क्षमा मागूं लागला; आणि मुक्तेच्या महालामध्यें परभारें एकदम चढून जावें अथवा यांत अनंगप्रभेची मसलत घ्यावी अशा संदेहामध्यें दोलायमान होऊं लागला.



# प्रकरण ३१ वें.

## धीर.

पलंगावर आलेली; दाह करीत असतांही भस्मरूप न करणाऱ्या कामाग्नीनें व्याप्त झालेली; एकेक क्षणालासुद्धां वर्षोनवर्षे लेखणारी; क्षणक्षणीं आपल्या लुगड्याच्या पदरानें मुखमंडलास झाकून घेऊन पलंगावर पडून लोळणारी; थोड्या वेळानें उठून बसली राहणारी; बसून बसून उपाय न सुचल्याकारणानें फिरून लोळपट घेणारी; घामाच्या आणि अश्रूंच्या धारांनीं शयनाला भिजवून टाकणारी; भिजलेल्या शयनालाही शरीराच्या संतापानें उष्ण करून टाकणारी; भिजून चिंब झाली असतांही कामसंतापामुळें सुकून जाणारी; कुसुमायुधाच्या चेष्टा पाहून समागमाच्या आशेला आणि समागमाच्या आशेनें जीविताला धरूं इच्छिणारी; कामरूप शस्त्रवैद्यानें हृदयामध्यें कुसुमायुधाला राहण्याला जागा करून देण्याकरितां बगीच्यांतील सुगंधरूप क्लोरोफॉर्म हुंगवून मूर्छित पाडली असावी अशी दिसणारी; परवश होऊन पडली असतां उत्कंठारूप सखीच्या स्पर्शानें जागी होणारी; अशक्त होऊन गेली असतां मनोवेगरूपी सेवकानें हात देऊन महालामध्यें पाऊलें टाकीत चालविली गेलेली; आभरणांसही भाररूप समजणारी; धीरानें सोडून दिलेली; कुसुमायुधाच्या समागमाचे उपाय शोधून काढणारी; थंडीनें गारठल्याप्रमाणें सीत्कार करणारी; जांभया देण्यामुळें प्राणांस निघून जाण्यास रस्ता करून देत असावी अशी दिसणारी; स्वप्नीं आलेल्या कुसुमायुधाला युवतिजनांच्या स्वाभाविक सांप्रदायाप्रमाणें नाहीं नाहीं म्हणत असतां लागलीच जागी होऊन त्याचा पश्चात्ताप करणारी; मान-

सिक सुरताच्या आरंभींसुद्धां अनंगप्रभा एकदम येऊन उभी राहण्याची शंका मनांत धरणारी; स्वप्नामध्यें झालेल्या सुरतप्रसंगाच्या वृत्तांताचेंही पुनःपुन्हः मनन करणारी; स्वप्नाच्या क्षणिक वृत्तीमध्यें सुद्धां स्वाधीन-पतिका, अभिसारिका वगैरे आठही नायिकांच्या अवस्थेला प्राप्त होणारी; स्वप्नांतील सुखालाही थोड्या वेळांत दूर करून टाकणाऱ्या चिंतेचा धिक्कार करणारी; क्षणभर चिंतन करकरून शिथिल होऊन जाणारी; व्याकुळ होऊन जाणारी; पलंगावर लोळकण घेणारी; महालांतच इकडे तिकडे फिरणारी; वलभींत जाऊन उभी राहणारी; डोक्यावरून पांघरूण घेऊन निजून राहणा-री; धडपडून उठणारी; कुसुमायुधाच्या नांवाचा जप करणारी; अक्षर तोंडांतून न काढतां बोलणारी; शब्दाशिवाय कानोसा घेणारी; डोळ्यांच्या मदती-वांचूनही पाहणारी; पायांच्या मदतीवांचूनही बगीच्यांत जाऊन पोंचणारी; त्वचेवांचूनही स्पर्श करणारी; हाताच्या साहाय्यावांचूनही आलिंगन करणारी; लेखणीवांचूनच चिठ्या लिहिणारी; अग्नीवांचून जळणारी; थंडीवांचून थरथर कांपणारी; वायूच्या प्रकोपावांचूनच आंखडण पावणारी; आंखडून गेली अ-सतांही धडपड करणारी; संतप्त असतां चंद्रप्रकाशामुळें घाबरून जाणारी; आशेमुळेंच जगलेली; महालांतून खालीं उतरण्यासाठीं जिन्याच्या पायऱ्यां-वर पावलें टाकणारी; पावलें टाकल्यावरही पुनः परत फिरणारी; क्षणांत जड होऊन जाणारी; आणि मनांतले मनांतच अनेक कर्तव्य गोष्टींची हालवाहालव करणारी; अशी मुक्ता, "काय करूं? कोठें जाऊं? कोणाला विचारूं? कोणावर विश्वास ठेवूं? कोणाची प्रार्थना करूं? कोण मार्गाला लावील? कोणाला माझी दया येईल? ही गोष्ट कोणाला सांगूं? हा ठक कुसुमायुध कोठून आला? माझें काम कोणावर सोपवून देवून निश्चिंत होऊं? माझ्यासाठीं कोण युक्ति योजील? मज एकटीच्यानें काय घडेल? माझ्या मनाचें कोण समाधान करील? अनंगप्रभेला तरी कसें सांगूं? तिला जर न सांगावें तर सांगूं तरी कोणाला! तिच्यावांचून माझ्या

दुःखांचा कोण वाटा घेईल? काय युक्ति करावी? कोणत्या योजना कराव्या? कोणाचा आश्रय घ्यावा? कशी बुद्धि चालवावी? कोणाला शरण जाऊं? आणि अनंगप्रभेनें विचारलें तर तिला काय सांगूं?" असे असे अनेकविध विचार मनांत येऊन घाबरून गेली असतां तिचा जरासा डोळा लागला इतक्यांत अनंगप्रभा भगवत्पूजनाचें काम संपवून घाई घाईनेंच मुक्तेपाशीं आली.

अनंगप्रभा निजलेल्या आणि स्वप्नामध्यें मानीपणा धरून बसलेल्या मुक्तेला, घामानें ओली चिंब झालेली आणि श्वासांनीं घाबरून गेलेली, पाहून तिच्या शरीरावर कदली पत्रांनीं वारा घालूं लागली असतां आणि हात फिरवूं लागली असतां, मोठ्या कष्टांनीं मुक्ता शुद्धीवर येऊन आणि स्वप्नांतील संस्कारांमुळें "प्रिया! मला धरूं नका, धरूं नका," असें बोलत बोलत शून्यहृदय होऊन पाहूं लागली; आपल्याच स्वराच्या ठिकाणीं कोकिलेच्या स्वराची भ्रांति धरून उद्वेग पावूं लागली; अनंग-प्रभेला जवळ आलेली पाहून लज्जेनें डोळ्यांतील पाणी आडवून धरूं लागली; आणि आपल्याच प्रलापांनीं चपापून जाऊन कपाळावर हात ठेवून "आतां काय सांगूं?" म्हणून विचार करूं लागली; तेव्हां अनंगप्रभेनें सर्व प्रकार जाणिला असतांही तिला विचारलें—"प्रियसखि मुक्ते! नासिकेच्या श्वासानें तुझा अधर पल्लवाप्रमाणें थरथरत असलेला दिसत आहे, शय्याही या कुशीवरून त्या कुशीवर धडपडण्यानें फारच चोळ-वटून गेलेली दिसत आहे, लुगड्याचा पदर श्वासानें थरथर हालत आहे, अश्रूंचे बिंदु पापण्यामध्यें मोत्यांच्या दाण्याप्रमाणें गुंफून राहिले आहेत, हृदय एखाद्या अलक्ष्य वस्तूचें ध्यान करीत असावें असें भासत आहे, लतेपासून खुडून घेतलेल्या नव पल्लवाप्रमाणें तुझें शरीर ग्लान झालेलें दिसत आहे, शरीरावर चंदनरसाचें सेचन केल्याकारणानें फोड उठ-तील एवढा विलक्षण ताप भरला आहे, अंगलता हेमंतांतील वाऱ्यानें

पिंवळ्या होणाऱ्या पानांनीं युक्त अशा लतेची उपमा स्वीकारीत आहे, आणि वाणी कंठापर्यंत येऊन मागें फिरत असावी असें वाटत आहे. तर या सर्वांचें जें कारण असेल तें मला खरें खरें सांगीतलें पाहिजे. जसा कांहीं कामदेव संतापरूप दिवा घेऊन तुझ्या प्राणांचा शोध काढण्याकरितां शरीरांत बसला असावा; जणों कुसुमायुधाच्या भारानें तुझें हृदय ओथंबलें असावें; जणों यौवनरूप उन्मादानें तुला वेडी केलें असावें; आणि जणों चंद्राच्या किरणांनींच तुला संतापयुक्त करून टाकिलें असावें! सखि! तुझ्या दुःखानें मला दुःख व्हावें आणि तुझ्या सुखानें मला सुख व्हावें अशी मीं आहें. मी तुझ्यासाठींच, खरें ह्मटलें तर, तुझ्या मागून येथें आलें आहे. यास्तव तुझ्या मनांतील कोणताही अभिप्राय माझ्यापासून गुप्त ठेवूं नको."

अनंगप्रभेनें अनेक प्रकारें विचारलें असतांही मुक्तेचे शब्द, थोडावेळपावेतों चिंतेनेंच जणों हृदयांत अडवून धरले असावे; संतापरूप अग्नीनें जळून गेले असावे; दुःखाच्या भारानें दडपून गेले असावे; आणि निःश्वासाच्या वायूनें उडून गेले असावे; अशा प्रकारें लाजेमुळें कंठांतून बाहेर निघाले नाहींत, परंतु नेत्रांतून मात्र अश्रूंचे बिंदु टपटप बाहेर निघूं लागले. "हें काय?" असें म्हणून अनंगप्रभेनें आपल्या जिवाची शपथ घालतांच मुक्ता दीर्घ आणि उष्ण असा निःश्वास टाकून, मान खालीं घालून, लाजेमुळें विसरून गेलेल्या आरंभींच्या शब्दांची आठवण करीत असावी अशा प्रकारें थोडा वेळपर्यंत ध्यानस्थ राहून अडखळत अडखळत याप्रमाणें बोलली.

"प्रियसखि! या वेळीं आई, बाप, बहीण, सोयरेधायरे आणि प्रियसखी हीं सर्व तूंच आहेस. या अपूर्व दुःखाची गोष्ट मी जरी माझ्या हृदयांत गुप्त ठेऊं इच्छितें तरी ती तुझ्यापाशीं सांगितल्यावांचून राहवत नाहीं. त्याचें कारण असें कीं तुझ्यावर माझा माझ्या हृदया-

पेक्षांही अधिक विश्वास आहे. प्रियसखि! ज्या राजकुमारास तूं माझ्यापाशीं घेऊन आली होतीस त्याला मीं पूर्वीं कधींही पाहिलें नव्हतें, त्याचें नांवही कधीं ऐकिलें नव्हतें, आणि त्याच्याविषयीं कधींही माहिती नव्हती; तथापि त्यानें मला आपल्या दृष्टीच्या चमत्कारानेंच, कोण जाणे, कसेंसेंच करून टाकलें आहे! मी अगदीं विव्हळ होऊन गेलें आहें. मी उन्मत्तेसारखी आणि देहभानरहित अशी होऊन गेलें आहें. चोहोंकडे मी त्यासच पाहतें. एकेक क्षणही मी वर्षाप्रमाणें गणीत आहें. स्वप्राण कंठगत झाले असें पाहात आहें. चंद्राचे किरणांस धगधगीत निखाऱ्यांप्रमाणें लेखीत आहें. पुष्पांतून पडणाऱ्या परागाच्या वृष्टीला विषाच्या वृष्टीसमान लेखीत आहें. घामानें न्हाऊन जात आहें. अधीर होऊन कासावीस होत आहें. शास्त्राभ्यास सगळा विसरून जात आहें. माझ्याच हृदयाची मला लाज वाटत आहे. अलंकार भाररूप वाटत आहेत. धीर सगळा निघून गेला आहे. केवळ धीरालाच नव्हे पण हृदयालाही हरवून बसलें आहें. तुझ्यापाशीं बोलण्यालाही मन कचरत आहे. पुरतें न बोलावें तर आत्मद्रोह घडतो असें जाणत असतांही अभिप्रायाच्या प्रमाणानें पहातां जेवढें बोलणें जरूर आहे तेवढें सुद्धां बोलूं शकत नाहीं. अभिप्रायाला अनुरूप भाषण बोलण्यासाठीं शब्द शोधूं लागलें असतांही मिळत नाहींत. हें कोणत्या अपराधाचें फळ तें समजत नाहीं. आणि मी जीविताचीही पर्वा करीत नाहीं. जणो हा रोग जन्मांतरींच बरा झाला तर होईल असें वाटतें. सखि! मला अशी मूठ मारून या ठकानें—या जादुगारानें कोणता लाभ इच्छिला असेल? अबलांस दुःखित करून कोणतें पुण्य जोडूं पहात असेल? मुलींस काव्ऱ्या बाव्ऱ्या करून सोडून कोणता पुरुषार्थ मिळविण्याचें यानें मनांत आणिलें असेल? या पूर्वीं कधींही न जाणलेले अभिप्राय माझ्या मनांत उत्पन्न करून असें कोणतें चातुर्य दाखविण्याची यानें इच्छा धरली असेल? स्वप्नामध्यें मी पळून जात

असतांही माझे मागून धांवत येऊन मला आडवून कडेस घेतो; मी रागावलें असतां काकळुत करतो; आणि पायांही पडतो; माझ्या नखांमध्यें आपलीं प्रतिबिंबें पडल्यानें आपल्यास मोठा मान मिळाला असें गणतो; पत्रिकेमध्यें अनीतीनें भरलेलीं वाक्यें लिहून पाठवितो; माझ्या वेणीमध्यें फुलें गुंफावयास बसतो; पायांचे प्रहारही शिरसा मान्य करतो; दासाप्रमाणें हात जोडून उभा रहातो; मी बोलत नसतांही हसविण्याच्या अनेक युक्ति करून बोलवतो; तिरस्कारालाही परिहासाप्रमाणें लेखतो; मी सखींच्या समाजामध्यें बसलेली असतांही समोर येऊन उभा राहून अनेक संज्ञा करतो; अपमानालाही प्रेमाचें तत्वच समजून संतोषित होतो; माझ्या तोंडावरून आपल्या धोतराच्या पदरानें घामाचे बिंदु पुसून काढितो; मला समजावण्यासाठीं अनेक दूती पाठवितो; बागेमध्यें फिरत असतां माझ्या डोळ्यांच्या पापण्यांवर पडणारा पराग आपल्या तोंडच्या शीतल फुंकरानें दूर करतो; आणि माझें उष्टें मद्य प्यावयास मागतो; तर मग सखि! मी आतां काय करावें? भल्या मनुष्याला असें करणें शोभतें का? राजकुमाराला असा च्छिचोरपणा करणें योग्य आहे का? सभ्य पुरुषानें कुमारिकांस एवढा त्रास द्यावा काय? सुशिक्षित मनुष्याला असा फांकडेपणा बरा दिसतो का? प्रौढ बुद्धीच्या मनुष्याची कुठें तरी अशी रीत असते का? मी तुझ्या सांगण्यावर भरंवसा ठेवूनच फसून गेलें आहें, नाहींतर अशा जादुगाराला येथपावेतों येऊंच मुळीं दिलें असतें का? मी त्याला मान दिला त्याचा उपकार त्यानें कसा फेडला पहा. स्वप्नीं आलेला मनुष्य कांहीं समजत असेल कीं नाहीं? जर समजत असला तर तूं सांगशील तसें करून मी ह्याला येऊं देणार नाहीं. माझ्या कन्यकाव्रताचा भंग धडधडीत होत आहे; माझ्या बापाचा अपमान होत आहे; माझ्या कुलीनपणाला कलंक लागत आहे; विद्याभ्यासाला बट्टा लागत आहे; आणि तुझ्या सहवासालाही दूषण

लागत आहे. सखि! अशा बाबतींत कसें वागावें आणि काय करावें हें मी कांहींएक जाणत नाहीं. यासाठीं तुला विचारतें. त्याचें आणि माझें एकमेकांशीं कांहींसुद्धां भाषण झालेलें नाहीं. असें असतां त्यानें, काय मनांत आणून, माझ्यावर एवढी जादू पसरली असेल बरें? भीतर बाई, अशी अचिंत्य विपत्तीचा अनुभव घेण्यापेक्षां मरणच बरें असें मानितें."

मुक्तेचें भाषण ऐकून आपल्याशींच हसणारी; मुक्तेचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन तिच्या स्तनमंडलावर पडलेला केशकलाप नीट करणारी; आपल्या शुभ्र स्वच्छ पातळाच्या पदरानें तिच्या तोंडावरील घर्मबिंदु पुसून काढणारी; स्तनमंडलादि अवयवांवर हात फिरवून तिला धीर देणारी; आणि तिचा कामावेश पराकाष्ठा वाढलेला पाहणारी; अशी ती अनंगप्रभा म्हणाली—"प्रियसखि मुक्ते! तुझी अशी अवस्था करून टाकण्यांत, राजकुमार कुसुमायुधाचा अपराध नाहीं तर त्या कामदेवाचाच हा सगळा आपराध बरें. काम हा ज्वाळारहित अग्नि आहे; मधुर लागणारें विष आहे; धारेशिवायचें खड्ग आहे; मोहरहित मद्य आहे; आणि धातूंच्या प्रकोपाशिवाय महाव्याधि आहे. कामदेवाच्या बाणांनीं घायाळ झाल्याशिवाय मोकळा राहिलेला प्राणी या जगांत फार विरळा. कामदेवाला अतिक्रूर समजूनच विधात्यानें त्याला लोहमय शस्त्रें न देतां पुष्पमय धनुष्य व बाण दिले आहेत, आणि ते तरी केवळ पांचच आहेत. कामदेव महादेवाच्या तृतीय नेत्रांतील अग्नीनें भस्मसात् झाला असतांही कामी जनांस जाळून टाकितो; बालिकांच्या सरळ अंतःकरणांस कांहींशी वक्रतेची शिकवणी देतो; युवतींस आपल्या सोबतीणींपासूनही आपल्या विकारांचें गोपन करण्याची वस्तादगिरी शिकवितो; वियोगी जनांस चंद्र आणि चंदन इत्यादि शीतळ पदार्थांच्या ठिकाणींसुद्धां संताप देण्याची विपरीत भावना करवितो; अनुभवानें आणि सहवासानें सगळें रहस्य समजून घेतलेल्या सखींच्या ठिकाणींसुद्धां मूर्खपणाची भ्रांति

उत्पन्न करून मुलींच्या तोंडांतून प्रपंच भरलेले शब्द काढवितो; युवतींच्या चित्तवृत्तीस सुरतसंकल्पांनीं भरून टाकून स्वप्नामध्यें आणि जागेपणींही खोट्यानाट्या विलक्षण परिणामांच्या रूपानें प्रगट करतो; ढोंगी आणि जादुगार वगैरे शब्दांचा नवीनच अर्थानें प्रयोग करण्याची परिभाषा तयार करून ती युवतींस घोकल्यावांचूनच शिकवितो; आणि एक क्षणसुद्धां युगाप्रमाणें दीर्घ वाटवितो. सखि! मी त्या राजकुमाराला तुझ्यापाशीं घेऊन आलें त्याच वेळीं तुझ्या शरीरांत दिसून आलेल्या विकारांवरून तुझी मनोवृत्ति पूर्णपणें मला समजून चुकली. यासाठीं ती छपवून नेण्याचा तुझा हा प्रयास केवळ निष्फळ होय."

"अनंगप्रभे! तूं जें कांहीं बोललीस तें खरें आहे. कामदेवानें माझी जी विटंबना मांडली आहे ती तुझ्या सांगण्याहूनही फार अधिक आहे. ज्या राजकुमारानें मला कर्पुराहूनही अधिक शीतल अशा मंदस्मितरूप चांदण्यानें न्हाऊं घातलें तोच राजकुमार या माझ्या संतापाचें कारण होऊन बसला आहे. माझा हा संताप चंद्राच्या किरणांनीं, चंदनाच्या रसांनीं, मोत्यांच्या अथवा पुष्पांच्या हारांनींही टळेल असा नाहीं. तर त्या राजकुमारानें अथवा तत्संबंधीं चर्चेनेंच टळला तर टळेल. ह्या राजकुमारानें एथून जातेवेळीं द्व्यर्थी शब्द बोलून जें कांहीं केलें तेंच माझ्या मनाला एक सारखें व्यथित करीत आहे. जेव्हांपासून मी त्याला पाहिलें तेव्हांपासूनच माझें हृदय, कामदेवाचे बाण पडल्यानें भ्यालें असावें अशा प्रकारें, मला सोडून देऊन निघून गेलें असें वाटतें. अत्यंत चंचल आणि अदृश्य अशा मनालाही भोंक पाडून त्यांत शिरून बसण्याची संधी या राजकुमाराला कशी मिळाली असेल? चंद्र, तारे आणि मणि वगैरे झळकत असतांही ह्या राजकुमारावांचून मला सर्व कांहीं अंधकारमय वाटत आहे. तुझ्या ह्मणण्याप्रमाणें कामदेव क्षणास कल्पयुगा एवढा दीर्घ करणारा असतांही माझ्या आयुष्याच्या क्षणास लहान

करण्याला तयार झाला असावा असा भासतो. त्याचें कारण काय असेल? मला या राजकुमाराचें स्मरण नित्य होत जाईल तर जगण्याची आशा दिसत नाहीं, आणि त्याचें विस्मरण पडेल तर मग जगण्याची एवढी खटपट तरी कशाला असें वाटतें. त्याच्याकडे पाहण्यांत माझ्या नेत्रांचा पाहिजे तर अपराध समजावा परंतु त्यांत माझ्या हृदयाचा काय अपराध? मग कामदेव माझ्या हृदयाला कशासाठीं बाणानें विंधीत आहे? अशा व्यथेच्या वेळींही जर मृत्यु कामास येणार नाहीं तर मग त्या मेल्याचा उपयोग तरी केव्हां? हा राजकुमार येथें आला तेव्हां तो आनंददायक दिसत होता, पण तो हृदयांत शिरला तेव्हांपासून तो दुःखदायकच होऊन बसला आहे. त्यानें आपल्यासाठीं ऐस पैस जागा मिळावी म्हणून माझ्या मनांतून धैर्य, गांभीर्य, विवेक आणि लज्जा यांस हाकलून दिलें असावें असें वाटतें. अहो! माझ्यावर फेंकून फेंकून सगळे बाण संपून गेल्याकारणानें कामदेव आतां पवनास्त्राचा उपयोग करूं लागला असावा असें वाटतें. कारण कीं माझ्या हृदयांतून उष्ण आणि दीर्घ निःश्वास निघूं लागले आहेत. रस तृषेला शांत करितो असें म्हणतात; परंतु जेव्हांपासून मी डोळ्यांनीं याच्या लावण्यरूप रसाचें पान करूं लागलें तेव्हांपासून माझी तृषा उलटी वाढतच चालली आहे. अश्रूंनीं दृष्टीस रोधिलें; जडतेनें शरीराला घेरलें; आणि मोहानें अंतःकरणाला व्यापिलें; यामुळें मी तर त्याला पुरतें पाहूंही शकलें नाहीं. अरे हाय हाय! स्वप्नामध्येंही दुर्दैवानें मानीपणा माझ्या वाट्यास दिला त्यामुळें मी त्याच्या आलिंगनाचें सुख मिळवूं शकलें नाहीं; हृदय व्यथित असतांही फुटून जात नाहीं; शरीर जड होऊन गेलें असतांही पडून जात नाहीं; आणि कामदेव जाळीत असतांही मला भस्म करून टाकीत नाहीं. त्यामुळें चोहकडून कोंडली गेलें आहे. हा राजकुमार तुझ्या बरोबर आला तेव्हांच त्याला लज्जेमुळें अडवून मला धरतां आलें

नाहीं; परंतु आतां तर मला माझ्या मनालाही अडवून धरतां येत नाहीं. माझ्या हृदयांत हा राजकुमार प्रतिबिंबित झाला असावा; कोरून काढलेला असावा; चित्र काढून ठेविलेला असावा; चिकटवून ठेविलेला असावा; खिळून ठेविलेला असावा; अथवा बांधून टाकिलेला असावा असें वाटतें. निजलें असतां, बसलें असतां, चालत असतां, फिरत असतां, उभी असतां, बोलत असतां, मुकाट्यानें बसलेली असतां, डोळेमिटीत असतां, डोळे उघडीत असतां, स्वप्नामध्यें, जागेपणीं, महालामध्यें, मागें, पुढें, वर, खालीं, पलंगावर, रस्त्यावर आणि सर्व दिशांच्या ठिकाणीं मी यालाच देखत असल्याकारणानें अपूर्व अद्वैतवादाचें सत्य आणि ज्यांचें वर्णनही देतां येत नाहीं अशा विकारांचें अस्तित्व अनुभवीत आहें. मी सुखी आहें कीं दुःखी आहें, जागी आहें का निजलेली आहें, बसलेली आहें का चालत आहें, जात आहें का येत आहें, भानावर आहें कीं भुरळींत आहें? अथवा मी करीत आहें तरी काय, याचा कांहींच निश्चय मला करितां येत नाहीं. माझें त्याच्या बरोबर भाषण झालें नाहीं, त्याचें शील कसें आहे तेंही जाणिलें नाहीं, तसेंच त्याच्याशीं अशी कांहीं गाढ ओळखही झालेली नाहीं; असें असतां माझें मन सर्व सोडून देऊन त्याच्या ठिकाणींच गुंतून राहिलें आहे. सखि! या राजकुमारानें आणि कामदेवानें माझी अशी गति करून सोडली आहे. तुला ठाऊकच आहे कीं मी कन्यका आहें, परतंत्र आहें, वडीलांवर अवलंबून आहें, आईबापांच्या आधीन आहें, आणि कुळाला कलंक लावण्यासही मी इच्छित नाहीं; यासाठीं जगण्यापेक्षां मरणच बरें मी समजतें."

"सखि मुक्ते! स्वयंवर करण्याचा प्रचारही अनादिकाळापासून चालत आला आहे. धर्मशास्त्रांत सुद्धां गांधर्व विवाह धर्माला अविरुद्ध म्हणून गणला आहे. आईबापांसही तरुण कन्येचा योग्य वराशीं विवाह झाला नाहीं तों पर्यंत अपार चिंता वाटत असते. कन्याच जर

आपण होऊन योग्य वर शोधून काढून त्याच्याशीं विवाह करील तर त्यांत समजूतदार आईबाप खेद पावतील असें नाहीं ; उलटी ती गोष्ट त्यांस आनंद पावण्यासच कारणीभूत होईल. माझ्या विचाराप्रमाणें गांधर्व विवाह करण्यास कसलाही बाध नाहीं. पुष्कळ कुलीन कन्यकांनीं गांधर्व विवाह केले आहेत ही गोष्ट इतिहासावरून सिद्धच आहे. कुमार कुसुमायुध दुष्ट भीमासुराला मारण्याकरितांच येथें आलेला आहे, भीमासूर तरी त्याच्या बाणानेंच घायाळ झाला आहे, आणि त्याच्या भीतीनेंच पळून पाताळीं आला आहे. यावरून या कुमाराच्या हातानेंच आपले कष्ट दूर होण्याची आशा दिसत आहे. भीमासुर घायाळ होऊन पडला नसता तर ह्या वेळपर्यंत तुझ्याशीं लग्न केल्यावांचून तो ठेवताना. अझूनही क्षणक्षणीं तुझी चिंता मला दुःख देत आहे. आपली पीडा दूर करण्यासाठींच दैवानें त्याला एथें पाठवून दिलें, असेंच समजावयाचें. तूं त्याच्यावर आणि तो तुझ्यावर आसक्त झाला आहां हें ही बरेंच झालें आहे. मी तरी तो तुझ्या योग्य आहे असें जाणूनच तुजपाशीं त्याला घेऊन आलें होतें. दुष्ट भीमासुरानें तुझ्यावर बलात्कार केला नाहीं त्यापूर्वींच या कुमाराबरोबर विवाहसंबंध त्वां करून घ्यावा हें बरें. जर तूं मला संमति देशील तर मी त्याच्यापाशीं जाऊन गोष्ट काढितें आणि सर्व व्यवस्था लावून घेतें."

"मी या विषयांत कांहीं समजत नाहीं. माझ्या सगळ्या शुभ आशा तुझ्या हावालीं करितें. तुला जसें योग्य दिसेल तसें तूं कर. राजकुमार कोणत्याही प्रकारें मला नीच मानणार नाहीं आणि माझ्यावर करुणा करील अशा युक्तीनें बोल म्हणजे झालें."

मुक्तेबरोबर याप्रमाणें भाषण करून तिनें दिलेला एक बहुमोल हार, तांबूल, लवंग, वेलची आणि कस्तूरी हतांत घेऊन, ईश्वराचें नांव घेत घेत, अनंगप्रभा महालांतून खालीं उतरली आणि बागेमध्यें कुसुमायुधापाशीं गेली.

---

# प्रकरण ३२ वें.

## दोष.

बागेतील शयनगृहामध्यें निजलेला; मुक्तेच्या ठिकाणीं बुडून गेलेल्या आपल्या अंतःकरणाला बाहेर न काढूं शकणारा; मुक्तारूप चंद्रिका हृदयामध्यें विराजमान असतांही वृद्धि पावणाऱ्या संतापामुळें विस्मय पावणारा; वारंवार फुरफुरूं लागलेल्या उजव्या दंडाचें चुंबन घेणारा; मुक्तेच्या कटाक्षांच्या ठिकाणीं विषमयपणाची तशीच अमृतमयपणाचीही कल्पना करणारा; मुक्तेचें आलिंगन मिळेल तरच आपल्या जीविताचें साफल्य झालें असें मानणारा; मुक्तेच्या चेष्टांनीं हृदय हरून गेलें असतांही संकल्प उत्पन्न झाल्याकारणानें आश्चर्य मानणारा; हृदयामध्यें वसणाऱ्या मुक्तेचा, हृदयावर पडणाऱ्या कामदेवाच्या बाणापासून, बचाव करूं इच्छित असावा अशा प्रकारें वारंवार हृदयावर हात ठेवणारा; स्वप्नीं आलेल्या मुक्तेलाही अनंगप्रभेमुळें उत्पन्न झालेल्या लाजेच्या योगानें आलिंगन देतां न आल्याकारणानें खेद पावणारा; अनंगप्रभेला हसती पाहून, मुक्तेनें, लज्जेमुळें, मान नमवून, केलेल्या मंद स्मिताच्या आणि वाकडा डोळा करून फेकलेल्या कटाक्षांच्या खुबीचें स्मरण करणारा; मुक्तेच्या मंद स्मिताच्या ठिकाणींच तसेंच कटाक्षांच्या ठिकाणींच एवढी मोठी मोहक खुबी भरली आहे त्यापेक्षां तिच्या आलिंगनामध्यें याहून किती पट अधिक गोडी राहिली असेल त्याचें गणित करणारा; मुक्तेच्या कुचकुंभावरील घर्मबिंदूनीं अभिषेक प्राप्त होईल तर तो यौवराज्याभिषेकाहूनही मला अधिक भाग्यशाली करील असेंच मानणारा; आपलें मन मुक्तेच्या ठिकाणीं समाधि धरून बसलें असतांही अनुभवास

येणाऱ्या विरहरूप व्याधीमुळें विस्मय पावणारा; मुक्तेच्या आलिंगनाचें सुख प्राप्त करून देणाऱ्या स्वप्नाच्या मध्यभागींच जाग्रत अवस्था प्राप्त झाली असतां तें आपल्या पापाचें फळ होय असेंच लेखणारा; आणि सगळ्या भूमंडळाला वशकरून टाकणारा असतांही आपल्याच चित्ताला वश्य न करूं शकणारा; असा कुसुमायुध, मध्यरात्रीच्या समयीं आपलेकडे अनंगप्रभा येत आहे असें पाहून, तिला मनोरथाची सिद्धिरूप, विश्वेश्वराची कृपारूप, पूर्वीच्या पुण्याईची परंपरारूप, मुक्तेची इच्छारूप, जीविताची आशारूप, आणि भाग्योदयाची सूचनारूप, मूर्तिच होय असें मानूं लागला.

"अनंगप्रभा मुक्तेनें पाठविल्यावरूनच येत आहे. जसें कांहीं अधम भीमासुरानें कांहीं नीच युक्ति करून मुक्तेला आणि अनंगप्रभेला कोणतें तरी नवें भय दाखविलें असावें. भीमासुर माझ्या बाणानें सक्त घायळ झाला आहे आणि तो अझूनही उठण्या सवरण्यास अशक्तच असला पाहिजे; मग काय तर भीमासुराचा कोणी अनुयायी सेवक मुक्तेला दुःख देण्यास आला असेल? मी जागत आहें तरी आतांपर्यंत कोठेंही पायाची चाहुल अथवा गोंगाट माझ्या कानीं आला नाहीं. अवश्य मुक्तेला कामदेवाच्या प्रहारांनीं व्यथित झालेली पाहून कामदेवाचीच फिर्याद करण्यासाठीं ही आली असली पाहिजे. विशेषें करून कामदेव रात्रीच्या वेळींच कामिनींस व्यथित करीत असतो. काय चिंता आहे? जरी भीमासुराबद्दल फिर्याद करण्याकरितां येत असली तरीही ठीक आहे; आणि कामदेवाची फिर्याद करण्यासाठीं येत असली तरी ठीकच आहे. परंतु भीमासुराची किंवा त्याच्या सेवकाची फिर्याद घेऊन येत असती तर याप्रमाणें ती हळुहळू पावलें टाकीत चालत आली नसती."

या प्रमाणें तर्क करून कुसुमायुधानें दुरून उठून सामोरें जाऊन अनंगप्रभेला उपचारपूर्वक योग्य मान दिला, आणि अनंगप्रभाही मधुर वचनें बोलत बोलत जवळच येऊन भुईवर बसली. त्यानंतर कुसुमायुध फिरून बोलूं लागला :—

"तुमच्या आणि मुक्तेच्या सौजन्यानें मला खरेदी करून घेतलेल्या गुलामाप्रमाणें करून टाकिलें आहे. दासजनाचा कोणत्याही कामीं विनियोग करणें असेल तर यथेष्ट आपल्या जवळ बोलावून आज्ञा करण्याचा स्वामिजनांस पूर्ण अधिकार आहे. असें असतां तुम्ही अशा वेळीं येथवर येण्याची तसदी कशासाठीं घेतली? मुक्ता कुशल आहेना? दुष्ट भीमासुराकडून कांहीं नवी अडचण तर उत्पन्न झाली नाहींना?"

"तुम्ही येथें आलां त्या वेळेपासूनच आम्हीं भीमासुराच्या भयापासून मुक्त झालों आहों. सूर्य उदयाचलाच्या शिखरावर आला नाहीं तोंपर्यंतच लोकांस अंधकाराचें भय असतें. मुक्ता कुशल आहे? या तुमच्या प्रश्नाचा जबाब देतांना मुक्ता जीवंत आहे इतकेंच प्रत्युत्तर माझ्यानें देतां येण्यासारखें आहे. तुम्ही मुक्तेच्या हृदयाची चोरी करून महालांतून खालीं उतरलां तेव्हांपासूनच मुक्ता अग्नीवांचून जळूं लागली आहे; थंडीवांचूनच थरारूं लागली आहे; वायूच्या विकारावांचूनच झटके खाऊं लागली आहे; परिश्रमावांचूनच घामानें थबथबून जाऊं लागली आहे; उंचस्वरानें बोलल्यावांचूनच स्वरभंग पावूं लागली आहे; शोकावांचूनच आसवें गाळूं लागली आहे; निर्भय झाली असतांही विवर्ण होऊं लागली आहे; पटावरल्या सोंगटीप्रमाणें मरूनही पुन्हा जिवंत होऊं लागली आहे. ती अपभ्रंशभाषेप्रमाणें प्रकृतिभ्रष्ट झाली आहे; मंद वायूच्या लहरी वज्राच्या प्रहाराप्रमाणें समजत आहे; चंद्राची प्रभा चांडाळाच्या छायेप्रमाणें गणीत आहे; कृष्णपक्षांतील अष्टमीच्या चंद्राच्या कळेप्रमाणें अर्धी अवशेष राहिली आहे;

पृथ्वीला अश्रूंच्या प्रवाहानें प्रथम भिजवून टाकून, मागाहून श्वासाच्या प्रवाहानें सुकवून टाकीत आहे; तुमची गोष्ट निघाली असतां पाठ लांब करून आणि स्तनमंडळ उंच होतील अशा रीतीनें दोनही हात वर करून जांभया देत देत अंग मुरडीत आहे; शरीरामध्यें संताप व्यापून राहिला असतांही सीत्कार करीत आहे आणि जड होऊन जात आहे; चंद्राची कोर अश्रींत पडून शुद्ध झाली असतां तिची उपमा धरीत आहे; समयानुसार तुमचें नांव ऐकून रोमांचित झाल्याकारणानें मात्र अद्याप जिवंत आहे असें दाखवीत आहे; चंद्रापासून त्रास पावत असल्याकारणानें अरशाकडेही पाहात नाहीं; तुमचें चित्र लिहिण्याचें चिंतन करितां करितां स्वतांच चित्रांत लिहिल्याप्रमाणें निश्चल होऊन जात आहे. ती प्रलाप करीत आहे; ग्लानि पावत आहे; ध्यान करीत आहें; भ्रमीत होत आहे; पडून जात आहे; ऊठउठून चालती होत आहे; मूर्च्छित होत आहे; डोळे मिटून बसत आहे; रडत आहे; निजून राहात आहे; सुकून जात आहे; चळत आहे; लोळत आहे; द्वाराकडे पहात राहात आहे; बगीच्याचा द्वेष करीत आहे; विव्हळ होऊन जात आहे. महाराज! माझी सखी तुम्हाला हृदयामध्यें विराजमान झालेले समजून शवाच्या स्पर्शानें विटाळ होईल अशी धास्ती धरूनच आपले प्राण सोडून देत नसावी असें वाटतें. या साठीं तुम्ही कृपा करून............... आतां रसराजाच्या प्रयोगावांचून तिची या व्याधींतून मुक्तता करून आरोग्य होईल असें वाटत नाहीं. मी तिच्या व्याधीची पूर्ण परीक्षा करून तुमच्यापाशीं येण्यास निघालें असतां "कांहीं निरोप आहे का म्हणून विचारलें, परंतु तिनें लाजून कांहीं एक न बोलतां, क्षीण होऊन गेलेल्या आपल्या आंगाकडे पहात पहात श्वासानें आणि काजळानें युक्त अश्रूंनीं मलिन झालेला हा मोत्यांचा हार, आणि हाताच्या उष्णतेनें सुकून गेला असतांही घर्मबिंदूच्या संसर्गानें कांहींसा आर्द्र राहिलेला हा तांबूल आणि कंपामुळें हातां-

तून पडून गेल्यामुळें अर्धी अधिक कमी झालेली ही वेलची, लवंग आणि कस्तूरी वगैरे सामग्री तुमच्च्यासाठीं माझ्या हातांत तिनें दिली आहे. तुमच्यासारख्या महाराज कुमाराकडे अशा वस्तु पाठविणें हें जरी पाठविणाराचें हसें करणारें आहे, सूर्याचें दिव्यानें आराधन करण्याप्रमाणें आहे, समुद्राचें जलांजलीनें तर्पण करण्यासारखें आहे, आम्रवृक्षाचें सुपारीनें पूजन करण्यासारखें आहे, लक्ष्मीपतीचें दक्षिणेनें अर्चन करण्यासारखें आहे, आणि त्यावरून पाठविणाराची चपळता मात्र प्रकट करणारें आहे, तरी मुक्तेनें आपल्या स्नेहाची खूण ह्मणून या वस्तु पाठविल्या आहेत असें समजून कोणत्याही प्रकारच्या मानाची, अपमानाची अथवा मिथ्याभिमानाची कल्पना न करितां आपण यांचा स्वीकार केला पाहिजे. तुम्ही येथें आगमन करून जें प्रेम, जी वत्सलता, जें बंधुत्व, जो व्यवहार, जी मैत्री, जी सौम्यता, जें भलेपण आणि जे सद्गुण प्रगट केले त्याबद्दल आभार प्रदर्शक आम्हीं काय देणार? काय करणार? काय बोलणार? आणि काय इच्छिणार? मुक्ता पहिल्यापासूनच आपल्या हृदयाला आणि जीवितालाही तुमच्या हावालीं करून बसली आहे. त्यापेक्षां आतां जें कांहीं आणखी द्यावयाचें तें केवळ पोरकट होय. क्षुद्र वस्तु घेणाराला लाजवीत नाहींत तर देणारालाच लाजवितात. दीन जनांनीं प्रेमपूर्वक पाठविलेल्या क्षुद्र वस्तूचाही स्वीकार करण्यांत महाशयाचें महाशयपण दिसून येतें असा विश्वास धरून मुक्तेनें साहस केलें आहे."

या प्रमाणें बोलून उभी राहून, अनंगप्रभेनें हार त्याच्या गळ्यांत घातला आणि तांबूल वगैरे दिला. त्या सर्वांचा स्वीकार शिरसा मान्य करून, हा समय म्हणजे अमृतप्राप्तीचा, विधिप्राप्तीचा, जन्मसाफल्याचा, सिद्धिप्राप्तीचा आणि वरप्राप्तीचाच असें मानून अमर्याद आनंद पावलेला कुसुमायुध बोलला.

"अनंगप्रभाबाई! मला बोलण्याला यत्किंचितही अवकाश राहूंच नये असें भाषण करून तुम्ही मला केवळ परवश करून टाकिलें. मी तरी माझें जीवित आणि राज्यादिक सर्व कांहीं मुक्तेचेंच म्हणून समजतों. मी विचार करकरून पहात असतांही माझ्या ठिकाणीं असा एकही गुण पाहूं शकत नाहीं कीं तेणेंकरून माझा आत्मा तुमच्या एवढ्या मोठ्या अनुग्रहाला पात्र व्हावा! आज्ञा करण्यालाच योग्य अशा या दासावर स्वामिजनाचें एवढें प्रेम? एवढा आदर? एवढी वत्सलता? एवढें मोठें औदार्य? सर्वच मोठें आश्चर्य आहे. अनंगप्रभाबाई! मी तुमच्याबरोबर मुक्तेकडे गेलों त्याच वेळीं तिच्या चेष्टा आणि विकार यावरूनच माझ्या जन्माचें साफल्य व्हावयाचें, आणि कामदेवाचा मजवर अनुग्रह व्हावयाचा, याची कांहींशी माझ्या मनांत कल्पना येऊन चुकली होती. परंतु कधींही दिव्य कन्यकांस पाहिलें नसल्याकारणानें दिव्य कन्यकांच्या शरीराच्या ठिकाणीं अशा चेष्टा आणि असे विकार सहज सुद्धां वसत असतील अशी उलटी कल्पना मनांत आल्याकारणानें, आणि माझ्या गुणांत आणि माझ्या रूपांत दिव्य कन्यकांचा अनुग्रह मिळविण्याची योग्यता असेल असा निश्चय न झाल्याकारणानें अनेक संशयामध्यें आणि तर्कवितर्कांमध्यें पडून त्या वेळीं द्व्यर्थी भाषण बोलण्याशिवाय अधिक कांहीं मला करतां आलें नाहीं आणि तेणें करून मुक्तेला व्यथित करण्याचा अपराध मजवर लागू होत आहे. हा अपराध मुक्तेच्या लज्जेचा होय असेंही ह्मणतां येईल; कारण कीं कमलतंतूहूनही अधिक कोमळ अशा मुक्तेच्या हृदयाला पीडा होईल या गोष्टीकडे यत्किंचितही ध्यान न देतां केवळ निर्दयपणें ओठ मात्र स्फुरण पावण्याची वाट पाहात उभा असलेल्या या दासाला आज्ञेचा अनुग्रह करण्याचे एकांत सांकेतिक शब्दसुद्धां या लाजेनें मुक्तेच्या मुखांतून निघूं दिले नाहींत. मुक्तेच्या लज्जेवर हा अपराध लागू करतांना मला माझ्या बुद्धीचा

अपराधही विसरून जातां कामा नये. कारण कीं या बुद्धीनें दीर्घकाळपर्यंत साहित्यशास्त्राचा अभ्यास केला असतांही आणि मुक्तेच्या चेष्टा तसेच तिचे विकार स्पष्टपणें तिच्या स्मरव्यथेचें अनुमान करवीत असतांही मला शेवटपर्यंत एखाद्या खेडवळ मनुष्याप्रमाणें ठेवून संदेहमुक्त केलेंच नाहीं. अरे! संदेह, जो मनुष्याच्या बुद्धीचा एक स्वाभाविक धर्मच होऊन बसला आहे त्या संदेहानें मला केवळ पढतमूर्ख करून सोडलें! परंतु महाविचक्षण मुक्तेनें चरणसंवाहन करण्याची आज्ञा केल्यानेंच आपल्या जीविताचें साफल्य झालें असें मानणाऱ्या या दासजनाचा कशासाठीं तिनें अविश्वास धरला? काय कारणास्तव लज्जा स्वीकारली? आणि काय ह्मणून एवढें गौरव ठेविलें?—कीं अशा प्रकारें सुकुमार शरीराला दावानलानें दग्ध होऊं लागलेल्या नवपल्लवाची दशा प्राप्त झाली. अहो! मुक्तेवर दोष लागू करतांनाही माझें पढतमूर्खपण दिसून येत आहे, हेंही माझ्या लक्षांत येत नाहीं. सर्वच युवती आणि त्यांतूनही कन्यका शेवटपर्यंत लाजेच्या आधीन राहून आपले मनोभाव मुखानें प्रकाशित करूं शकत नाहींत. शरीर अर्पण करितात परंतु पुरती दृष्टीही अर्पण करीत नाहींत; प्रियकरांचे सद्गुण मनांतून पूर्णपणें जाणत असतात तरी त्यांचे खरे खोटे दोषच जिभेच्या टोंकावर नाचवीत असतात; आणि प्रियकरांनीं धरलेली इच्छा पूर्ण करण्यास अत्यंत खुशी असतांही अनुज्ञेच्या पर्यायानें नकारच प्रगट करीत असतात. याविषयीं साहित्यशास्त्रामध्यें मी पुष्कळ वाचलें आहे. भ्रमर कमलिनीसभोवतीं एकसारखा घिरट्या घालीत असतो तरी प्रफुल्लित होऊन त्याला कृतार्थ करणें ही गोष्ट तर कमलिनींच्याच हातांत असते. चातकपक्षी मेघमालेपाशीं पुष्कळ उत्कंठा दाखवीत असतो तरी वृष्टीनें त्याला संतुष्ट करणें हें तर मेघमालेंच्याच हातीं आहे. आम्रवृक्ष वासंतिक वेळेच्या आसपास पुष्कळ नाचत असतो तरी मंजर्यादिकांनीं त्याला कृतार्थ

करणें हें त्या वेळेच्याच तंत्राप्रमाणें होतें आणि चकोरपक्षी चंद्रिकेच्या पुष्कळच विनवण्या करीत असतो तरी सुधेच्या धारेनें त्यास संतुष्ट करणें हें चंद्रिकेच्याच स्वाधीन आहे. त्याच प्रमाणें मी मुक्तेपाशीं द्व्यर्थी वचन बोलून माझा विकार विदित केला आणि प्रार्थना केल्याप्रमाणें दाखविलें, तरी मला पूर्णकाम करणें ही गोष्ट तर मुक्तेच्याच स्वाधीन होती. आणि मुक्ताही कदाचित् लज्जेच्या आधीन असेल हेंही स्वाभाविक होतें. परंतु, अनंगप्रभाबाई! तुम्ही मुक्तेच्या दुसऱ्या हृदयाप्रमाणेंच ज्या आहां, मुक्तेच्या रक्षणासाठींच एवढी विपत्ति ज्या भोगीत आहां, मुक्तेला आपल्या प्राणांहूनही अधिक जपलें पाहिजे असें समजत आहां, आणि येथें तर मुक्तेच्या सर्व आप्तबंधूवर्गांच्या ठिकाणीं आहां, त्या तुम्हीतरी कामाच्या ज्वालारहित अग्नीनें, धारेशिवायच्या वज्रानें, दोषरहित ज्वरानें, आणि खोकल्याशिवायच्या क्षयानें, जळून जात असतां, छिन्न होत असतां, व्यथित होत असतां आणि क्षीण होत असतांना, मुक्तेच्या शरीराची कशी उपेक्षा केली? मी मुक्तेपाशीं बसलों होतों त्या वेळींच माझ्या कानांत कां ह्मणून सांगितलें नाहीं? मला बगीच्यांत घेऊन गेल्यावरही लागलीच सूचना काय कारणास्तव केली नाहीं? आणि एवढा कालक्षेप करून व्यथा कशासाठीं दृढमूल होऊं दिली? हें कांहीं समजत नाहीं. आतां आपली काय आज्ञा आहे? जसें सांगाल तसें निष्कपटपणें करण्याला हा मी तयार आहें."

"महाराजकुमार, गांधर्व विवाहाच्या पद्धतीला अनुसरून तुह्मी माझ्या सखीचें पाणिग्रहण करावें; आणि तेंही उद्यां सकाळींच झालें पाहिजे अशीही माझी सल्ला आहे. ज्याप्रमाणें कांति चंद्राला, लक्ष्मी भाग्यशाली जनाला, धैर्यवृत्ति वीराला, क्षमा महाशयाला, आणि तेजस्विता सूर्याला प्राप्त व्हावी त्याप्रमाणें मुक्ता तुम्हाला प्राप्त होवो; आणि तुमच्या संबंधानें धन्य आणि सभाग्य होवो. तुमचें दर्शन झालें तेव्हांच

तिचें हृदय तुमचे ठिकाणीं आसक्त झालें, आणि जर तुमचा संबंध तिला प्राप्त न होईल तर यावत्जीव तिला दुःखच भोगावें लागेल अशी गोष्ट आहे. माझ्यामध्यें आणि सखीमध्यें मी कोणत्याही प्रकारचा फरक आहे असें लेखीत नाहीं. त्यामुळेंच विरक्त असतांही दुःखी होऊन तिच्या बरोबरच या कारागृहांत आलें आहे. तुमच्यावरोबर तिचा विवाह झालेला जर मी या डोळ्यांनीं पाहीन तर मग मी निश्चिंत चित्तानें यात्रा करण्यासाठीं आणि तपश्चर्या करण्यासाठीं निघून जाईन. जर हा बेत भीमासुराच्या कानावर जाईल तर तो अथवा त्याची मोठी सेना या बेतांत विघ्न आणील, यासाठीं सावध रहा आणि शस्त्रादिक आयुधें सज्ज करून ठेवा."

"काहीं चिंता करूं नका. जसा सूर्य अंधकाराची, अग्नि शीताची, प्रेम दोषाची आणि कामदेव विवेकाची पर्वा करीत नाहीं, त्याचप्रमाणें मलाही दैत्यांची मुळींच पर्वा नाहीं. दैत्य माझ्या दृष्टीस पडले नाहींत तोंपर्यंतच ते जिवंत आहेत. सुकलेल्या गवताच्या जंगलाचा दाह करतांना अग्नीला जेवढा वेळ लागेल तेवढाही वेळ दैत्यांस मारण्याला मला लागणार नाहीं. तर याच पावलीं तुह्मी परत जा, मुक्तेला धैर्य द्या, मांगलिक वस्त्रें आणि अलंकार यांनीं तिला शृंगारा आणि विवाहाची सगळी सामग्री तयार करून ठेवा. सकाळ व्हावयाला आतां फारसा वेळ नाहीं. मीही प्रातःस्नान करून, वस्त्रें अलंकार आणि आयुधें धारण करून तयारच असतों. तुमचें बोलावणें आलें कीं लगेच मी येईन."

या प्रमाणें भाषण झाल्यावर अतिप्रसन्न झालेली अनंप्रभा "जयजयकार असो" असें ह्मणून कुसुमायुधापासून निघून लागलीच महालांत मुक्तेपाशीं गेली.

---

# प्रकरण ३३ वें.

## गांधर्व विवाह.

आपल्यापाशीं आलेल्या अनंगप्रभेच्या तोंडून प्रातःकाळींच व्हावयाचा म्हणून ठरलेल्या विवाहासंबंधीं खबर ऐकून मुक्ता अपार आनंदाच्या स्वाधीन झाली. लौकर सकाळ आणावी ह्मणून उत्कंठेमुळें सूर्याची प्रार्थना करूं लागली. अनंगप्रभेची प्रशंसा करूं लागली. स्मरव्यथेमुळें उत्पन्न झालेल्या, स्तंभ, रोमांच आणि अश्रुपात इत्यादि भावांस प्रहर्षानें उत्पन्न झालेल्या याच भावांनीं पुनरुक्त करूं लागली. भीमासुराला मरण पावलेलाच पाहूं लागली. आपल्या अवयवांकडे विलासपूर्वक पाहूं लागली. तोंडधुणें वगैरे शरीरव्यवहार उरकून घेऊन, मंगल स्नान करून, सुंदर सुंदर वस्त्रें आणि अलंकार धारण करूं लागली. नरकांतून निघून ब्रम्हलोकीं येऊन पोंचली असावी अशी दिसूं लागली. आणि जीं कंकणें आणि नूपुरें हातां पायांतून गळूं लागलेलीं दिसत होतीं तींच आतां बरोबर घट्ट बसूं लागलेलीं पाहूं लागली.

अनंगप्रभा ही देवपूजन करून समिधा पुष्पें आणि फळें इत्यादि व्यावहारिक सामग्री सिद्ध करून ठेवून मुक्तेला शृंगारूं लागली; इतक्यांत कोंबडे आरवूं लागले; रात्र, अनंगप्रभेच्या चिंतेबरोबर, क्षीण होऊं लागली; पूर्वदिशा मुक्तेच्या मनोवृत्तींबरोबर रागानें व्याप्त होऊं लागली; चंद्रबिंब निःश्वासानें मलिन झालेल्या दर्पणाप्रमाणें दिसूं लागलें; तारका प्रकाशांत अंतरधान पावूं लागल्या; कमळें मुक्तेच्या मनाबरोबरच प्रफुल्लित होऊं लागलीं; कमळांतील ताज्या सुगंधानें पुष्ट झालेला वायु वाहूं लागला; मुक्तेच्या नेत्रांतून हर्षाश्रूचे बिंदु आणि वृक्षांच्या

पानांवरून तुषाराचे बिंदु गळूं लागले; सूर्याचे किरण, कापून काढलेल्या अंधकाराच्या रुधिरानें माखले असावे असे दिसूं लागले; आणि सूर्यबिंब कुसुमायुधाच्या भाग्याबरोबरच उदय पावलें.

विवाहसंबंधीं सर्व व्यवस्था होऊन चुकल्यावर अनंगप्रभा कुसुमायुधाला बोलावून आणण्यास बगीच्यामध्यें गेली. तेथें उत्तम उत्तम वस्त्रें, अलंकार आणि सर्व शस्त्रें अंगावर धारण करून अगदीं तयार असलेला, रात्रीस सर्व कामिनींच्या आणि कामी जनांच्या अंतःकरणामध्यें फिरण्याच्या कामगिरीनें थकून विश्रांति घेण्यासाठीं बगीच्यांत येऊन बसलेला कामदेवच होय असा शोभणारा, मुक्तेच्या चिंतनानें व्याप्त झालेल्या शृंगाररसानें आणि दैत्याच्या चिंतनानें व्याप्त झालेल्या वीररसानेंही परिपूर्ण होऊन राहिलेला, वारंवार आपले अवयव आणि आयुधें याजकडे पाहात असलेला, आणि आनंदामुळें आपल्या शरीरांतही न मावणारा, असा कुसुमायुध तिच्या दृष्टीस पडला. अनंगप्रभेला येत असलेली पाहून, चंद्राची प्रभा पाहून समुद्र जसा उसळूं लागतो, तसा कुसुमायुध एकदम उठला आणि तिच्या सांगण्याप्रमाणें, नीतीच्या पाठीमागून जसा अभ्युदय जातो, विद्येच्या पाठीमागून जसा विवेक जातो, धैर्यवृत्तीच्या पाठीमागून धर्म जातो, आणि सद्‌बुद्धीच्या पाठीमागून परोपकार जातो तसा तोही अनंगप्रभेच्या पाठीमागून चालला.

महालाच्या खालच्या आवासामध्यें अग्निस्थापनेची व्यवस्था करून ठेविली होती, वधूवरासाठीं आसनें मांडून शृंगारून ठेविलीं होतीं आणि समिधा, पुष्पें वगैरेही आणून सिद्ध करून ठेविलीं होतीं. या ठिकाणीं कुसुमायुधाला बसावयास सांगून अनंगप्रभा महालामध्यें मुक्तेला बोलावून आणण्यासाठीं गेली.

अनंगप्रभेबरोबर महालांतून जिन्याच्या पायऱ्यांवरून उतरणारी मुक्ता, नूपुरांच्या झणत्कारानें, अलंकारांच्या आणि नेसलेल्या भरजरी

पैठणीच्या प्रभेशीं संमिश्र झालेल्या आपल्या अंगकांतीनें, केशपाशाच्या सुगंधानें, अधराच्या कांतीनें लाल दिसणाऱ्या नथीच्या मोत्यांस फिरून पांढरेपणा देणाऱ्या आपल्या मंदस्मिताच्या प्रभेनें, पुष्टपणामध्यें परस्परांची स्पर्धा करणाऱ्या नितंबमंडलानें आणि स्तनमंडलानें, नितंब आणि स्तन यांच्या भारामुळें जिन्याच्या पायऱ्यांस कांहीं निराळ्याच प्रकारच्या चमत्कारिक आवाजानें दणदणणाऱ्या चरणांनीं, आणि नखमंडलामध्यें दिसणाऱ्या अलंकारांच्या प्रतिबिंबांस कांहीं वेळ दृश्य आणि कांहीं वेळ अदृश्य करणाऱ्या नेसूंच्या लुगड्याच्या घोळानें, कुसुमायुधाच्या चित्ताला परवश करून सोडलें.

लाजणारी, हर्षित होणारी, संभ्रम पावणारी, विजेप्रमाणें चमकणारी, शरीरावयवांस झांकून घेण्याचा विशेष प्रयत्न करणारी, नजर चुकवून कुसुमायुधाकडे दृष्टि फेंकणारी, आणि नितंबावर पडलेल्या पदरास वारंवार ओढून ओढून ताठ करणारी, अशा मुक्तेला अनंगप्रभेनें कुसुमायुधाच्या पुढें मांडलेल्या आसनावर बसविलें; मग शास्त्रविधीप्रमाणें संकल्प करून, दोघांसही अक्षतारोपणादि क्रिया करवून, आणि मंत्र ह्मणून व त्यांजकडून ह्मणवून, तिनें कुसुमायुधाकडून मुक्तेचें पाणिग्रहण करविलें; आणि लागलेंच सिद्ध केलेल्या अग्नीमध्यें होमाचा विधिही करविला. याप्रमाणें विवाहाचें काम लौकरच आटोपून घेतलें. इष्टहेतु तडीस जातांच निश्चिंत झाल्याकारणानें जणों मोठ्या ओझ्यापासून सुटली असावी अशी दिसणारी आणि जाण्यास तयार झालेली अशा अनंगप्रभेनें, स्नेहवश होऊन, गद्गद स्वरानें, वधूवरांस खालीं लिहिल्याप्रमाणें बोध केला.

“ कुमार कुसुमायुध आणि प्रियसखि मुक्ते! क्षत्रियांस गांधर्वविवाह उक्तच आहे. या विवाहाला शुभ दिवस अथवा शुभ मुहूर्त वगैरे पहाण्याची मुळींच गरज पडत नाहीं असें धर्मशास्त्रांत लिहिलें आहे आणि ह्मणून तुमचा हा विवाह यथाविधि झाला आहे. कन्या रजस्वला झाली

असतांही जर तिचा पिता वगैरे कोणीही संबंधी जन तिचें कन्यादान न करतील तर तिनें तीन वर्षेंपर्यंत वाट पाहून मग खुशाल स्वयंवर करावें अशी मोकळिक मनूनें दिली आहे. आणि असें करण्यांत वर अथवा कन्या यांच्या हातून कोणताही धर्मसंबंधी अपराध घडत नाहीं. यामुळें या स्वयंवराची योजनाही यथाशास्त्रच होऊन चुकली आहे. आतां विवाहाच्या समयीं वर आणि वधू हीं गणपति आणि अग्नि इत्यादि देवतांच्या संनिध वेदमंत्राचा उच्चार करून परस्पराशीं जे करार करतात आणि कन्यादानकर्ता ज्या करारानें कन्यादान करतो, ते करार कशा प्रकारें पाळावे आणि त्यांचें स्वरूप काय हें सर्व तुम्ही जाणतीं असल्याकारणानें जाणतच आहां, तथापि माझ्या बंधुधर्मास आणि सखीधर्मास अनुसरून दोन गोष्टी बोलल्यावांचून माझ्यानें रहावत नाहीं. कन्यादान करते वेळीं पिता वराला म्हणतो कीं—'धर्माच्या कार्यामध्यें, अर्थासंबंधी कार्यामध्यें, आणि कामभोगसंबंधी कार्यामध्यें तुम्हीं या माझ्या कन्येला कधींही अंतर देऊं नये. या कन्येशीं कधींही ठकपणा करूं नये. ही कन्या धर्म, अर्थ आणि काम या संबंधी कृत्यांला योग्य आहे तों पर्यंत तुम्ही कोणत्याही प्रकारें हिचा अतिक्रम करूं नये आणि कोणतीही गोष्ट हिच्यापासून गुप्त ठेवूं नये.' या प्रमाणें कन्यादानकर्त्यानें म्हटल्यावर मग 'नाऽतिचरामि' या वाक्यानें, वरतीं सांगितलेल्या सर्व बाबतींत मी कधींही चलित होणार नाहीं असें वर वचन देतो. कन्या, अग्नींत भाताच्या लाह्यांचा होम करतेवेळीं बोलते कीं 'पतिराज! मी नेहमी तुमच्या सांगण्याप्रमाणें वर्तेन आणि तुम्ही माझ्या सांगण्याप्रमाणें वर्तावें. परस्परांस अनुकूळ वागणें हें अभ्युदयास कारण आहे.' पाणिग्रहण करते वेळीं वर म्हणतो—'प्रिये! जन्मभर तुझ्याबरोबर प्रेमपूर्वक समागमाचें सुख मिळावें म्हणून मी तुझें पाणिग्रहण करतों, कारण कीं अर्यमा आणि सूर्य इत्यादि देवतांनीं गृह-

स्थाश्रमाचें सुख मला मिळावें यासाठीं तुला माझी पत्नी म्हणून माझ्या हवालीं केलें आहे. जसा विष्णु आणि लक्ष्मी परस्पराशीं अनुकूलतेनें वागतात तशींच आपणही वागूं. तूं ऋचारूप आहेस आणि मी सामरूप आहें. अर्थात साम जसा ऋचेला अनुसरून कार्य करतो तसा मी तुला अनुसरून कार्य करीन. तूं पृथ्वीरूप आहेस आणि मी स्वर्गरूप आहें. अर्थात मनुष्यांनीं दिलेल्या हविष्यानेंच देवता जशा तृप्त होतात त्याच प्रमाणें मी ही त्वां दिलेल्या सुखांनींच तृप्त होईन. आपण एकत्र राहून सर्व व्यवहार चालवूं. एकत्र राहूनच वीर्याचा उपयोग करूं. एकत्र राहून प्रजा उत्पन्न करूं. एकत्र राहून पुष्कळ पुत्र संपादन करूं. एकमेकांवर पूर्ण प्रेम ठेवूं. परस्परांपासून शोभा पावूं आणि नेहमीं संतुष्ट राहूं.' चोरीच्या क्रियेमध्यें कन्येचा पाय साहाणेवर ठेवते वेळीं वर ह्मणतो--'प्रिये! ही साहाण जशी स्थिर आहे तशी तूं स्थिर राहा, वराची मालकीण हो आणि व्यवहाराच्या अडचणी दूर करून टाक.' असें बोलून स्त्रियांच्या प्रशंसेची गाथा गातो. सप्तपदी म्हणजे सात पावलें बरोबर चालण्याचा विधि करते वेळीं तो म्हणतो--'प्रिये! तूं अन्न, शक्ति, धन, सुख आणि ऐश्वर्य यांस वाढव, पशूंचा सांभाळ कर आणि सर्वकाल मला अनुसरून वाग.' उजव्या खांद्यावर हात ठेवून कन्येच्या हृदयाला स्पर्श करते वेळीं वर म्हणतो--'तुझ्या चित्ताला माझ्या नियमामध्यें मी ओढून घेतों. तुझें चित्त माझ्या चित्ताला अनुसरतें ठेव आणि माझ्या प्रत्येक कार्यांत पूर्ण ध्यान देत जा.' इतकें बोलून अभिमंत्रण करते वेळीं सर्व लोकांस बोलावून केलेल्या सर्व करारांस साक्षी रहाण्याविषयीं सर्वांस कळवितो कीं 'जे जे करार करण्याविषयीं वेदामध्यें सांगितलें आहे ते सर्व करार परस्परांमध्यें करून मीं आणि ह्या कन्येनें दंपतीभाव स्वीकारला आहे आणि त्याप्रमाणें ही माझी मांगलिक पत्नी झाली आहे, तर तुम्ही सगळे मिळून ह्या माझ्या पत्नीला पाहून

ठेवा आणि सौभाग्यवर्धक आशीर्वाद द्या.' यानंतर ध्रुवाच्या ताऱ्याचें दर्शन घेते वेळीं वर कन्येला म्हणतो---'प्रिये! तूं आतां माझ्या बरोबर दृढ संबंध पावली आहेस, त्यापेक्षां तूं माझ्यावरच भोग्यदृष्टि ठेव आणि तूं माझ्यावरच पतिदृष्टि ठेव, तसेंच मला संतोषित ठेवण्याविषयीं मनाचा दृढ निग्रह कर. तूं माझ्या समागमानें प्रजावती हो आणि शंभर वर्षें पर्यंत जिवंत राहा.' हे करार शेवटपर्यंत अमलांत यावे म्हणून मनुस्मृति इत्यादि धर्मशास्त्राचे ग्रंथ निक्षून बोध करितात कीं---'स्त्री ही धर्म, अर्थ आणि काम या कृत्यांमध्यें नेहमीं सहायरूप आहे. यासाठीं पतीनें सर्वदा स्त्रीचें पोषण आणि रक्षण करावें. जर स्त्री पुरुषाला वश्य असेल आणि पुरुष स्त्रीला वश्य असेल तरच धर्म, अर्थ आणि काम या तीन पुरुषार्थांचा लाभ होईल. पुरुष एकटाच स्त्रीवांचून धर्म, अर्थ किंवा काम यांस संपादन करूं शकत नाहीं. कारण कीं या तीनही पुरुषार्थांस मुख्य आधार स्त्रीच होय. स्त्रीवांचून पति जसा या पुरुषार्थांस संपादन करण्यास असमर्थ होय तशी पतीवांचून एकटी स्त्रीही त्यांचें संपादन करण्यास असमर्थ आहे. देव, पितर, भृत्य आणि अतिथि यांचा संतोष करणें हें जें एक धर्मकृत्यच आहे तें स्त्रीवांचून पुरुषाच्यानें एकट्यानें करतां येण्यासारखें नाहीं. पुरुषानें मिळविलेलें आणि घरीं आणलेलें धन सुद्धां, जर स्त्री नसेल तर अथवा ती स्त्री दुष्ट असेल तर, नाश पावतें. कामसुख तर एकट्या पुरुषाला किंवा एकट्या स्त्रीला मिळतच नाहीं आणि पुत्रांच्या उत्पत्तीचें साधन स्त्रीवांचून दुसरें नाहींच नाहीं ही गोष्ट प्रत्यक्ष सिद्ध आहे. ज्याची पत्नी सुपात्र असेल तोच पुरुष पुत्रांनीं, श्राद्धादिकांनीं, यज्ञादिकांनीं आणि भोजनादिकांनीं पितर, देव आणि अतिथि यांचें आराधन करूं शकतो. आणि स्त्री ही, पति सुपात्र असेल तरच धर्म, अर्थ आणि काम यांस सिद्ध करूं शकते. ह्यासाठीं गृहस्थाश्रमामध्यें स्त्रीचा आणि पुरुषाचा अधिकार समसमान

आहे. पति स्त्रीला आपल्याहून नीच मानीत असला तर धर्मार्थादि पुरुषार्थांचें संपादन जसें व्हावें तसें कधीं होणार नाहीं. स्त्रियाही कल्याणाचें स्थान आणि घराची शोभा अशा होत. यासाठीं स्त्रियांस लक्ष्मीप्रमाणेंच मानून वस्त्रालंकारादिकांनीं संतोषित केलें पाहिजे. लक्ष्मीशिवाय घर जसें शोभत नाहीं तसें तें स्त्रीवांचूनही शोभत नाहीं. संतानाची प्राप्ति, उत्पन्न झालेल्या संतानाचें पालन आणि इष्टमित्रांस जेवण घालणें वगैरे लोकव्यवहार चालू ठेवण्याची प्रवृत्ति या गोष्टी स्त्रियांकडूनच होऊं शकतात. सर्व प्रकारचीं धर्मकृत्यें, अतिथींचा वगैरे सत्कार, उत्तम रतिसुख आणि पितरांस व स्वतांस स्वर्गप्राप्ति हे सर्व पुरुषार्थ पुरुषास स्त्रियांच्या साहाय्यानेंच प्राप्त होतात. जी स्त्री कायावाचामनानें नियमित राहून वेदोक्त करारापासून कधींही प्रचलित होत नाहीं तिला पतिव्रता ह्मणावें. गृहस्थाश्रमासंबंधी कृत्यामध्यें पुरुषांचा आणि स्त्रियांचा अधिकार जरी सारखाच आहे तरी बाल, तरुण अथवा वृद्ध स्त्रीनेंही पतीच्या संमतीवांचून कसलेंही काम करूं नये. स्त्रीनें बाल्यावस्थेंत आईबापांच्या तंत्रानें, यौवनावस्थेंत पतीच्या तंत्रानें आणि पति नसेल तर पुत्राच्या तंत्रानें राहावें. स्वतंत्र ह्मणून कधीं राहूंच नये. स्त्रीनें सर्वदा प्रसन्नचित्त असावें, सैंपाक वगैरे गृहकृत्यामध्यें चतुर असावें, घरांतल्या वस्त्रपात्रादि उपस्कारांस स्वच्छ ठेवावें, सैल हातानें खर्च करूं नये, पतीच्या सेवेमध्यें तत्पर रहावें, पति कुपात्र निघाला तरीही महापातकी न होई तोंपर्यंत त्याची देवाप्रमाणेंच सेवा करावी, आणि आपल्या सोयऱ्याधायऱ्यांचा बहुमान करावा. जी स्त्री खोटें बोलणारी, नेत्रादिकांच्या मिषानें दुष्ट सूचना देणारी, जाराची संगति करणारी, पतीपाशीं विरस होऊन जरा निमित्त मिळतांच लागलाच स्नेह तोडून टाकणारी अथवा नीच संकल्प मनांत धरणारी अशी असेल तिला **असती** ह्मणावें. कुळानें, उपकार करण्यानें, विद्या शिकवण्यानें, अलंकारादिक दिल्यानें,

जाहीर झालेल्या अपराधाची परवा न केल्यानें अथवा अटकेंत ठेवल्यानें-ही **असती** स्त्रीचें मन पापप्रवृत्तीपासून परावृत्त होत नाहीं. पतिव्रता तर सदाचरण, सत्य, वडिलांचा उपदेश आणि कुळाची मर्यादा यांस अनुसरून पतीच्या सेवेलाच सर्वोत्तम मानिते. जी स्त्री व्रतादिकांत तत्पर राहात नसतां आणि देवादिकांस नमस्कारित नसतांही केवळ पतीच्या सेवेंतच तत्पर रहात असेल तीच उत्तम ह्मणून समजावी. जादू करून अथवा अमुक पदार्थ खाऊन किंवा स्पर्श करून पतीचें मन वश करून घेण्याचे जे भ्रामक अज्ञानजन्य रिवाज आहेत ते सगळे खोटे आहेत; इतकेंच नाहीं तर त्यांनीं पतीच्या शरीराची आणि मनाचीही फार खराबी होते, आणि मग स्त्रीवरचें तिच्या पतीचें प्रेम असेल तेंही न उडालें तर मोठें भाग्य. खरें वशीकरण म्हटलें म्हणजे क्रोध, अहंकार आणि हेवा इत्यादि तमाम दुर्गुणांस रजा देऊन धीर धरावा आणि तनमनानें पतीची सेवा करावी हेंच होय. आळस करूं नये, पतीला वेळेवर जेवूं घालावें, फार हसूं नये, दरवाजांत अथवा रस्त्यावर वारंवार उभें राहूं नये, सत्यावर निष्ठा ठेवावी, पतीच्या सांगण्याप्रमाणें वागावें, पति प्रवासास गेला असतां त्याच्या मागें योग्य नियम पाळून रहावें, कुटुंबांतील माणसांबरोबर सासूच्या आज्ञेप्रमाणें वागावें, सासूला किंवा नणंदादिकांला तोंडास तोंड देऊन उत्तर करूं नये, किंवा त्यांच्याशीं वाद घालूं नये, कुळाची मर्यादा मोडेल असें करूं नये, सासूची सेवा करावी, नोकरचाकरांच्या कामावर नजर ठेवावी, घरच्या उत्पन्नाचा आणि खर्चाचा हिशोब ठेवावा, पति निजल्यावर निजावें, पतीच्या उठण्यापूर्वीं उठावें, दासी उभ्या असतांही पतीचें काम आपण जातीनें करावें, पतिव्रतांची संगत करावी, नीच स्त्रियांशीं संबंध ठेवूं नये, जी गोष्ट पतीला अप्रिय असेल ती कधींही करूं नये, सुरा पिऊं नये, फार बोलूं नये, वस्त्रें आणि अलंकार यांची फार गोडी राखूं नये, आणि सुख

भोगिल्यानें सुख मिळत नाहीं तर दुःख भोगल्यानेंच सुख मिळतें ही गोष्ट नेहमीं ध्यानांत असूं द्यावी. यांतच स्त्रियांचें खरें कल्याण आहे. महाराज कुमार कुसुमायुध आणि प्रियसखि मुक्ते! मला जें कांहीं करावयाचें होतें आणि जें कांहीं तुह्मांला सांगावयाचें होतें तें सर्व आतां होऊन चुकलें, यासाठीं मी तुमची आतां आज्ञा घेऊन जाऊं इच्छितें. तुम्ही दंपती सर्वदा सुखी रहा आणि धनवान, पुत्रवान, आणि दीर्घायुषी व्हा!"

**या** प्रमाणें भाषण करून अनंगप्रभा दिव्य गतीनें आकाश मार्गें निघून गेली. आणि इकडे कुसुमायुधही मुक्तेला बरोबर घेऊन आणि आपल्या दिव्य घोड्यावर बसून तें पाताळ लोकचें नगर सोडून बाहेर पडला.



# प्रकरण ३४ वें.



## इष्टसिद्धि.



"मुक्तेला हरण करून कोणी राजकुमार येथून चालला आहे" अशी पहारेकरी दैत्यांस खबर मिळतांच "घेऊन चालला, घेऊन चालला, गेला गेला, धांवा धांवा, पकडा पकडा, कन्येबरोबर अब्रू, अब्रूबरोबर वीरता, वीरतेबरोबर सावधगिरी, आणि सावधगिरीबरोबर नोकरीसुद्धां चालली." असा एकच कल्होळ झाला. कल्होळ होतांच दैत्यांची मोठी सेना लागलीच जमा झाली. सेना जमा होतांच भीमासुरही तेथें येऊन पोंहचला. भीमासुर येऊन पोंहचतांच कुसुमायुधासभोंवतीं सैन्याचा घेरा पडला. घेरा पडतांच लढाई सुरू झाली, आणि मग अनेक शस्त्रें चमकूं लागलीं, भयंकर वाद्यें वाजूं लागलीं, सिंहनाद होऊं लागले, "उभा रहा, उभा रहा" असें दैत्य ओरडूं लागले, दैत्यांची हजारों आयुधें कुसुमायुधावर आणि त्याच्या घोड्यावर पडूं लागलीं, कुसुमायुधाच्या बाणांनीं दैत्यांचीं मस्तकें पटापट तुटून पडूं लागली, रक्ताचे प्रवाह चालू झाले, कुमार आपल्या बाणांनीं दैत्यांच्या आयुधांचे तीन तीन तुकडे करून टाकूं लागला, कुमाराचा दिव्य घोडाही गतीच्या चमत्कारानें दैत्यांच्या आयुधांस निष्फळ करून टाकूं लागला, दैत्यांच्या अंगांनीं, अलंकारांनीं आणि आयुधांनीं रणभूमि व्याप्त होऊं लागली, शवांच्या पसाऱ्यामुळें योद्ध्यांस आणि वाहनांस रणभूमीवर चालणेंही कठीण पडूं लागलें, नीच मनुष्यावर केलेले उपकार जसे व्यर्थ होतात त्याचप्रमाणें कुसुमायुधावर दैत्यांच्या आयुधांची शक्ति वायां जाऊं लागली, वीज जशी मेघमालेंत सुरसुरते त्याचप्रमाणें कुसुमायुधाची

बाणपंक्ति दैत्यांच्या शरीरांमध्यें सुरसुरूं लागली, दैत्यांच्या शरीरांतून बाहेर निघणाऱ्या रक्ताच्या धारा, कृतघ्न मनुष्याच्या अपकीर्तीप्रमाणें चोहोंकडे फेलावूं लागल्या, विद्वानाच्या मुखांतून सुभाषितें जशीं अविच्छिन्न निघूं लागतात त्याचप्रमाणें कुसुमायुधाच्या धनुष्यापासून बाण अविच्छिन्न निघूं लागले, दैत्यांचा उत्साह आशेसहित बंद पडूं लागला, कुसुमायुधाचा उत्साह मुक्तेच्या विस्मयाबरोबर वाढूं लागला, मुक्तेला कुसुमायुधाचें बळ कुसुमायुधासारखेंच दिसूं लागलें, मुक्ता दैत्याच्या अटकेंतून मुक्त झाल्याकारणानें स्वतां खरोखर मुक्ताच म्हणून मानूं लागली, कुसुमायुधाचें शौर्य दैत्यांस इंद्राच्या शौर्याचेंही विस्मरण पाडूं लागलें, कुसुमायुधानें बाणजालांनीं प्रकाशाला बंद केलें असतां मुक्तेच्या प्रभेनें प्रकाश दिसूं लागला, दैत्यांचे बाण कुसुमायुधाकडे येत असतांही अभाग्याप्रमाणें निराश होऊन वळूं लागले, दैत्य कुसुमायुधावर तुटून पडले असतां स्वतांच तोडले जाऊं लागले. कुसुमायुध बाण सोडूं लागला आणि दैत्य प्राण सोडूं लागले. कुसुमायुध दैत्यांचें मर्दन करून त्यांच्या स्त्रियांच्या कुचमंडलास मर्दनाच्या दुःखांतून मुक्त करूं लागला. कित्येक दैत्य कुसुमायुधाचे बाण येऊन पोंहचण्यापूर्वींच प्राण सोडूं लागले. समुद्राचा किनारा जसा येणाऱ्या भरतीचा निरोध करतो त्याचप्रमाणें कुसुमायुध शत्रूंच्या सेनेचा मोठ्या वेगानें निरोध करूं लागला. दैत्य कुसुमायुधाच्या धनुष्याच्या टणत्काराला यमराजाच्या रेड्याच्या गळ्यांत बांधलेल्या घंटेचाच आवाज म्हणून समजूं लागले. अग्नि जसा सुकलेल्या गवताच्या पेंडीमध्यें प्रवेश करतो त्याचप्रमाणें कुसुमायुध दैत्यांच्या सैन्यामध्यें चालून जाऊं लागला. कुसुमायुधाच्या बाणांपासून त्रास पावलेले कित्येक दैत्य मागें फिरून आपल्या तर्फेच्या लोकांसच कापून काढीत काढीत पळून जाऊं लागले. कुसुमायुधावर चालून येणारी दैत्यांची सेना समुद्रावर जाणाऱ्या नदीच्या दशेला प्राप्त

होऊं लागली. प्रचंड वायु जसा मेघांस विखरून टाकितो त्याचप्रमाणें कुसुमायुध दैत्यांस विखरून टाकूं लागला. कुसुमायुधाचें धनुष्य इंद्राच्या वज्राप्रमाणें, रुद्राच्या त्रिशूळाप्रमाणें, आणि यमाच्या काळदंडाप्रमाणें दिसूं लागलें. वेदनेमुळें कण्हणारे आणि रक्ताच्या प्रवाहामध्यें बुडणारे कित्येक दैत्य जिवंतपणींच नरकाच्या यातनेचा अनुभव घेऊं लागले. ग्रीष्मऋतूंतल्या मध्यान्ह काळच्या सूर्याकडे पहाणें जसें अशक्य होय त्याचप्रमाणें दैत्यांसही कुसुमायुधाकडे दृष्टि देऊन पहाणें अशक्य होऊन गेलें. यमाच्या दाढेंतूनही सुटावे असे दैत्य कुसुमायुधाच्या प्रहारापासून सुटून जाण्याला असमर्थ झाले. प्रमादी राजाचा देश जसा चोरांकडून पीडला जातो त्याचप्रमाणें भीमासुराचें सैन्य कुसुमायुधाकडून पीडा पावूं लागलें. कावळे आणि कोल्हे वगैरे मांसभक्षक प्राणी मरण पावलेल्या दैत्यांच्या शरीरांतून त्यांची आतडीं ओढूं लागले. आणि भीमासुराची सर्वांत मोठी सेना सुद्धां दावानलापासून प्राप्त झालेल्या वनाच्या दशेला पावली. कुसुमायुध, ग्रीष्मऋतूंमध्यें वनास जाळून पोळून टाकणाऱ्या दावानलाप्रमाणें शोभूं लागला असतां, भीमासुर त्याच्यावर चालून आला. मुक्ता, भीमासुराला अग्नीच्या मुखांतच होमिल्याप्रमाणें समजूं लागली. वाघ जसा हरिणावर दृष्टि टाकितो तशीच दृष्टि कुसुमायुध भीमासुराकडे फेकूं लागला. भीमासुरानें कुसुमायुधाचें चिलखत भेदून टाकिलें आणि कुसुमायुधानें भीमासुराचें चिलखत भेदून टाकिलें. कुसुमायुधाचे बाण भीमासुराचें आणि भीमासुराचे बाण कुसुमायुधाचें रक्त पिऊं लागले. त्या दोघां योध्यांनीं पुष्कळ वेळपर्यंत बाणांनींच लढून नंतर अस्त्रांनीं लढाई सुरू केली. भीमासुराच्या अंधकारास्त्राला सूर्यास्त्रानें, मेघास्त्राला वायव्यास्त्रानें, पर्वतास्त्राला वज्रास्त्रानें आणि ब्रह्मास्त्राला ब्रह्मास्त्रानें तोडून टाकून, कुसुमायुधानें त्वाष्ट्रास्त्रानें भीमासुराच्या मस्तकाला छेदून उडविलें.

भीमासुर यमपुरीचा पाहुणा होतांच, कुसुमायुध, मेघापासून मुक्त झालेल्या चंद्राप्रमाणें, शोभूं लागला. देव आणि मुनि कुसुमायुधाला आशीर्वाद देऊं लागले आणि दीर्घ काळच्या चिंतेंतून निर्मुक्त झालेली मुक्ता, राहूच्या दाढेंतून मुक्त झालेल्या चंद्रप्रभेप्रमाणें शोभा पावूं लागली. पित्याच्या आज्ञेप्रमाणें आणि शातातप आदिकरून मुनिजनांच्या इच्छेप्रमाणें भीमासुराचा वध केल्यामुळें आपल्या भुजांकडे बहुमानानें पाहणारा; मुक्तीसाठीं करण्यांत येणाऱ्या प्रयत्नाच्या पोटीं सिद्धीचा लाभ झाला असतां योगी जसा आनंद पावतो, त्याचप्रमाणें भीमासुराच्या वधासाठीं झालेल्या खटपटीच्या पोटीं मुक्तेचा लाभ झाल्यामुळें आनंद पावणारा; अचिंत्य घटना घडवून आणणाऱ्या भाग्याच्या शक्तीविषयीं विस्मय पावणारा; आणि ब्रम्हविद्येमुळें जसा चिदाभास तसा मुक्तेमुळें स्वतां आपण कृतार्थ झालों असें मानणारा; असा कुसुमायुध, ज्याप्रमाणें चिदाभास वेवेकाच्या साहाय्यानें कोशपंचकाच्या अभिमानांतून निघतो त्याचप्रमाणें, दिव्य अश्वाच्या साहाय्यानें पाताळांतल्या गुहेंतून निघून, मुक्तेला भय न वाटावें ह्मणून आपल्या दिव्य अश्वाला कांहींशा कमीवेगानें चालवीत चालवीत, आणि अनंगप्रभेच्या अपूर्व सौजन्याला आठवीत आठवीत, शेंकडों देशांचें उल्लंघन करून, आपल्या बापाची राजधानी वाराणशी तिच्या शिवेवर येऊन पोंहचला.

धर्मात्म्याप्रमाणें पाप्यांचाही उद्धार करण्यानें निर्विवेक ह्मणून ह्मटली गेलेली; वाराणशीच्या संभोगामुळें लक्ष्मीच्या संभोगानें युक्त अशा सरस्वतीप्रमाणें सर्वांच्या चित्ताचें आकर्षण करणारी; निर्मळतेमुळें ब्रम्हवेत्यांच्या शांतरसाच्या प्रवाहाप्रमाणें भासणारी; आणि विस्तीर्णतेमुळें आणि उज्वलतेमुळें क्षीरसागराची प्रतिमाच होय अशी दिसणारी; अशा भागीरथीला पाहून अपार आनंदासहित मुक्ता दुरूनच तिला वंदन करूं लागली.

# प्रकरण ३९ वें.

## उत्सव आणि अभिनंदन.

भागीरथीच्या फेणाच्या पुंजानें रचलेला असावा; कुसुमायुधाच्या यशाच्या समूहानें निर्माण केला असावा; मुनिजनांच्या अंतःकरणाच्या अवयवांनींच बनला असावा; विधात्यानें क्षीरसागराला निर्माण करतानां बाकी राहिलेल्या त्याच परमाणूंनीं उत्पन्न केला असावा आणि वाराणशी-मध्यें निवास करून राहिलेल्या सदाशिवाची सेवा करण्याकरितां कैलासानें पाठविलेलें आपलें पोरच होय असा दिसत असावा; असा दिव्य घोडा दृष्टीस पडला असतां; आणि त्याच्यावर विराजमान झालेला, उच्चैःश्रव्यावर विराज-मान झालेल्या दोन डोळ्यांच्या इंद्राची भ्रांति उत्पन्न करणारा, रस्त्याच्या धूळीनें धूसरित झाल्याकारणानें तुषारांनीं मलिन झालेल्या पूर्ण चंद्राची उपमा पावणाऱ्या मुखानें शोभणारा, आपणास पाहून लोकांस उत्पन्न होणारी कार्तिकेय स्वामीची भ्रांति आपल्या मागें बसविलेल्या कामिनीनें नाहींशी करून टाकणारा आणि अलंकारांच्या तसेंच आयुधांच्या प्रभा-मंडळानें भारलेला असल्याकारणानें नेहमींच्या परिचयांतल्या लोकांसही निरखून पाहिल्यावांचून ओळखतां न येणारा, असा कुसुमायुध दृष्टीस पडला असतां; तसेंच त्याच्या पाठीमागें बसलेली नारायणाच्या पाठी-मागें गरुडावर बसलेल्या लक्ष्मीसारखी दिसणारी, लुगड्याचा पदर डो-क्यावरून घेतल्याकारणानें मुखही झांकून गेलें असतां आंतून चकचकणाऱ्या कपोलांच्या कांतीनें पहाणारांचें चित्त पकडून आपल्या पदरांत बांधून घेऊन जात असावी अशी दिसणारी, कुसुमायुधाच्या शरीराचा अपूर्व प्रफुल्लित-पणा बनविण्यामध्यें विजयलक्ष्मीबरोबर मुख्य भागीदार झालेली,

आणि कुसुमायुधाच्या प्राप्तीनें झालेल्या आनंदात भागीरथीच्या आणि वाराणसीच्या दर्शनानें मोठी भर पडली असें मानणारी, अशी मुक्ता दृष्टीस पडली असतां; वाराणसींतील लोक आनंदांत, कुतूहलांत, संभ्रमांत, विस्मयांत, तर्कांत, संशयांत, संकल्पांत, प्रेमांत आणि चमत्करांत एकाच वेळीं निमग्न होऊन गेले.

हजारों लोकांचें प्रणाम एकदम स्वीकारण्यामध्यें, सर्व लोकांस आपापले प्रणाम निष्फळ न झाल्याविषयींची बोलल्यावांचूनच खात्री पटविण्यामध्यें, आणि लवण्याचा, हात जोडण्याचा, मंदहास्याचा, सलाम देण्याचा, भिंवया ढाळण्याचा, कुशल प्रश्न करण्याचा, हाताची खूण करून 'बरें आहे ना?' असें विचारण्याचा आणि दृष्टिपाताचा पात्रानुसार उपयोग करण्यामध्यें, अपूर्व चातुर्य वापरणारा कुसुमायुध शहराशीं येऊन पोंचला. इतक्यांत संभ्रमानें आणि आनंदानें दुप्पट वेग देऊन, दुरूनच धावविलेल्या कोणा परिजनाच्या तोंडानें पुत्राच्या आगमनाचें अभिनंदन ऐकून अत्यंत उत्सुक झालेल्या महाराज शत्रुजितानें, फार त्वरेनें पाठविलेली सामोरें जाण्याची स्वारीही शहराच्या बाहेर येऊन पोंचली. स्वारीमध्यें आलेले राजे, भाऊबंद, तसेच मंत्री यांनीं, योग्य रीतीनें प्रणाम आणि इतर उपचार करून व प्रतिसत्कार घेऊन, कुसुमायुधाचें अभिनंदन केलें आणि शहरांत जाण्याकरितां तयार ठेवलेल्या जनानी रथामध्यें विराजमान होण्याविषयीं विनंती केली. तेव्हां कुसुमायुध, आपल्या घोड्यास खासदाराच्या हातांत देऊन, मुक्तेसहित रथांत बसला. मांगलिक वाद्यें वाजूं लागलीं. ब्राह्मण पुण्याहवाचन करूं लागले. सेना मोठ्या धामधुमीनें बाजाराच्या वाटेनें दरबाराकडे चालली. पाहण्यास मिळालेल्या लोकांची कांहीं विलक्षणच गर्दी जमली. स्त्रिया गच्चीवर चढून पुष्पवृष्टि करीत असतांना एकीकडे मुक्तेच्या भाग्याची प्रशंसा करूं लागल्या. वाटेनें कुलाचाराप्रमाणें वधूवरांनीं विश्वेश्वराचें दर्शन घेऊन ब्राम्हणांस पुष्कळ

पुष्कळ दक्षिणा दिल्या. मुक्ता रथांत बांधलेल्या चिकाच्या पडद्यांतून श्री काशीचें अवलोकन करून गंधर्व लोकची शोभा विसरूं लागली. मिरवणूक दरबाराच्या किल्याच्या दरवाजाशीं येतांच, आनंदाच्या अश्रुबिंदूंनीं आपल्या छातीवर मोत्यांचा दुसरा एक हार घालण्यासाठीं ओवूं लागला असावा असा दिसणारा, महाराज शत्रुजित् पायांनींच कुसुमायुधाकडे आला. कुसुमायुधानें पित्यास आलेला पाहून, दुरूनच रथांतून उतरून, पित्यापाशीं जाऊन, त्याच्या चरणांस प्रणाम केला. शत्रुजितानें, प्रथम हृदयानें आणि नंतर आशीर्वाद देऊन, दोन्ही भुजांनीं कुसुमायुधाचें अलिंगन केलें. रथ अंतःपुराच्या दरवाजांत येतांच, महाराणी मनोरमेनें सामोरें येऊन वधूवरांवरून उतरून मुलानें व सुनेनें प्रणाम केल्यावर, मनोरमेनें, हर्षाश्रूंच्या प्रवाहानें भिजून गेल्याकारणानें परस्पराशीं चिकटून राहलीं असावीं अशा गद्गद अक्षरांनीं त्यांस आशीर्वाद दिले आणि त्या दोघांस बरोबर घेऊन आपल्या मंदिरांत गेल्यावर सगळे कुळाचार केले. इतक्यांत कुसुमायुधानें मनोरमेला प्रवासाची सगळी हकीकत थोडक्यांत सांगितली आणि पित्याचें बोलावणें आल्यावरून मुक्तेला मनोरमेच्याच मंदिरांत ठेवून तो दरबारांत शत्रुजिताकडे गेला. शत्रुजितानें 'या या इकडे' असें बोलून, हात धरून, कुसुमायुधाला आपल्या शेजारीं बसवून घेतलें आणि भीमासुराच्या आयुधांनीं जखमी झालेल्या त्याच्या अंगावर हात फिरवीत फिरवीत प्रवासाचा वृत्तांत विचारला.

कुसुमायुधानें शातातपाच्या आश्रमांत राहिल्याची, तेथून घायाळ केलेल्या भीमासुराचा पाठलाग करितां करितां पाताळांतील गुहेंत उतरल्याची, पाताळांतील नगरीच्या दर्शनाची, तेथें अनंगप्रभेच्या दर्शनाची, आणि अनंगप्रभेनें मुक्तेच्या हरणाविषयीं सांगितलेल्या वृत्तांताची, सविस्तर हकीगत निवेदन केली. नंतर लाजत लाजत मुक्तेपाशीं आपला

विवाह झाल्याची आणि भीमासुर वगैरे अनेक दैत्यांच्या वधाची संक्षिप्त हकीगतही कळविली.

पुत्राच्या प्रवासाची हकीगत ऐकून प्रसन्न झालेल्या शत्रुजितानें सगळ्या सभेस ऐकूं जाईल अशा प्रकारें ह्मटलें कीं—"पुत्रा कुसुमायुधा! तुह्मीं राज्यरक्षणाच्या चिंतेंतून मला मुक्त केलें; असुरांच्या भयांतून मुनिजनांस मुक्त केलें; श्राद्धलोपाच्या चिंतेंतून पूर्वजांस मुक्त केलें; आणि भविष्य काळाच्या राज्याच्या दुःखाच्या चिंतेंतून प्रजेला मुक्त केलें. माझ्या पूर्वजांनीं संपादन केलेल्या कुलकीर्तीला मीं विस्तीर्ण केलें आणि तुह्मी तों अद्भुत पराक्रम करून तिनें सर्व लोक भरून टाकला. जे पुरुष पित्यानें मिळविलेल्या यशाला, धनाला आणि पराक्रमाला जसेंच्या तसेंच राखतात, न्यून होऊं देत नाहींत, ते मध्यम पुरुष समजावे; जे पित्यानें मिळविलेल्या यशाला, धनाला आणि पराक्रमाला न्यूनता येऊं देत नाहींत इतकेंच नव्हे तर थोडी फार भरच घालतात आणि यथाशक्ति दुसऱ्याही कांहीं चमत्कारिक वस्तूंचें संपादन करितात ते उत्तम पुरुष समजावे; आणि जे पुरुष पित्यानें मिळविलेलें यश, धन आणि पराक्रम यांस न्यूनता आणतात ते केवळ अधम होत. तुह्मी खरोखर महाभाग आहां अथवा तुमच्याहूनही मी अधिक भाग्यशाली आहें असें ह्मटलें पाहिजे; कारण कीं मला तुमच्यासारखा पुत्र झाल्याकारणानें पुण्यवान पुरुषांच्या गणनेमध्यें नांवाची मात्र कनिष्ठिका अशा बोटावर विराजमान होण्याचा महालाभ मला प्राप्त झाला आहे. उंदराप्रमाणें घरचे दाणे खाऊन जिवाचें रक्षण करणारे आणि शोक संताप देणारे पुष्कळ मुलगे असतील तथापि त्यांच्या मुळें पिता पुत्रवान गणला जात नाहीं. परंतु ज्यांची बुद्धि, विद्या, कळा, बळ, सौजन्य आणि संपत्ति इत्यादि चमत्कारांनीं सगळ्या कुळाला विश्रांति, प्रख्याति आणि उन्नति प्राप्त होते अशा एका पुत्रानेंही पिता पुत्रवान होतो. सुपु-

त्राला कुलदीपक ह्मणतात परंतु मी तर त्यांस कुलदीपक ह्मणण्यालाही लाजतों ; कारण कीं दीपक क्षणक्षणीं स्नेहाला क्षीण करीत जातो आणि तुह्मीं क्षणक्षणीं स्नेहाला वाढवीत जात आहां. दीपक हा गुण दग्ध करण्याला तत्पर असतो आणि तुह्मी गुणांस पल्लवित करण्यांतच तत्पर असतां. दीपक मंद वायूनेंही कंप पावतो आणि तुह्मी प्रचंड शत्रूपासूनही कंप पावत नाहीं. दीपक मलिन काजळाला धारण करितो आणि तुह्मीं मलिनतेपासून नित्य दूर रहात आहां. दीपक आपल्याशीं संसर्ग ठेवणाराला संतप्त करून टाकितो आणि तुह्मी आपल्याशीं संसर्ग ठेवणाऱ्यांस शांतिसुख देतां. दीपक आपल्या संरक्षणासाठीं इतरांस मदतीस घेतो आणि तुह्मीं कोणापासूनही मदतीची अपेक्षा ठेवीत नाहीं. दीपक घरांतून बाहेर जातां क्षणींच भिऊं लागतो आणि तुह्मीं देशांतरीं भ्रमण करीत असतांही निर्भय आहां. दीपकाच्या संरक्षणासाठीं इतरांस काळजी घ्यावी लागते आणि तुह्मीं इतरांच्या रक्षणासाठीं काळजी वाहातां. दीपक आंधारातच विशेष प्रकाश देतो आणि तुह्मीं सर्वदाही विशेष प्रकारें प्रकाशितां. आणि शेवटीं, दीपक सूर्याच्या तेजापुढें अंधक होतो आणि तुह्मी कोणाच्याही तेजापुढें अंधक होत नाहीं. जो मनुष्य पुत्रामुळें प्रसिद्धीस येतो त्याचा जन्म सफळ झाला, परंतु जो मनुष्य पित्यामुळें ओळखला जातो त्याचा जन्म निंद्य समजावा. जो मनुष्य आपल्याच पराक्रमानें प्रसिद्धीस येतो तो उत्तम होय. जो आजापणजांच्या नांवावर खपतो तो मध्यम होय. मामाच्या अथवा आईच्या नावावर खपतो तो अधम जाणावा आणि जो सासऱ्याच्या नांवावर खपतो तो अधमाहूनही अधम समजावा. पुत्रा! तुह्मी मला सर्व प्रकारें संतोषित केलें आहे. मी तुह्माला आशीर्वाद देतों कीं धन, पुत्र आणि पराक्रम याहीं करून सर्व काळ तुह्मीं सुखी असा आणि भाग्यानें उन्नति, रूपानें पराकाष्ठा, राज्यलक्ष्मीनें परमशोभा, विजयकीर्तीनें पताका, इष्ट देवतांनीं

असाधारण कृपा, विधात्यानें अद्भुत चातुरी, सांसारिक सुखानें आपली मर्यादा आणि आमच्या विरहकाळच्या धैर्यानें सफळता हीं प्राप्त करून घेऊन गंधर्वपुत्री जी मुक्ता तिजसहवर्तमान अखंड आनंद भोगा."

**या** प्रमाणें प्रशंसापूर्वक अभिनंदन करून आणि आशीर्वाद देऊन **शत्रुजितानें** त्याचें वारंवार आलिंगन केलें. पित्याची अनुज्ञा मिळतांच, कुसुमायुध, प्रिय मंत्री आणि प्रिय सेवक यांसहित, आपल्या कुमारभवनांत आला आणि प्रवासाचा पोषाख काढून उष्णोदकानें स्नान करून व इतर शारीरिक विधि उरकून त्यानें देवपूजन केलें. **मनोरमेकडून** वाढलेलें ताट येतांच त्यानें आनंदानें भोजन केलें, आणि तुंबून राहिलेलीं युवराज्याच्या अधिकाराच्या संबंधीं राज्यकारणी कामकाजें पाहून नित्याच्या नियमाप्रमाणें हवा खाण्यासाठीं तो बाहेर गेला. **मुक्तेच्या** नवीनच समागमानें उत्पन्न झालेली उत्सुकता हृदयांत मावत नसल्याकारणानें त्वरितच परत येऊन त्यानें अल्प भोजन केलें आणि तो आपल्या शयनगृहामध्यें निघून गेला व तेथें गेल्यावर नवीन संगमाच्या संबंधें अनेक संकल्प करूं लागला.



# प्रकरण ३६ वें.



## वधूविलास.

मुक्तेच्या लोकोत्तर सौंदर्यानें आणि विवेकानें अत्यंत प्रसन्न झालेल्या महाराणी मनोरमेनें, मुक्तेला सुगंधयुक्त ऊन पाण्यानें न्हाऊं घालून, फुंकरानेंही उडून जाईल अशीं नवीं वस्त्रें नेसावयास देऊन, परिमित तरी अतिरमणीय अलंकार तिच्या अंगावर घालून, अमृतापेक्षांही अति मधुर जेवण वाढून, सुगंधयुक्त पुष्पांच्या माळा घालून, सासूपणाला शोभेसा उपदेश करून, कुसुमायुधाच्या मंदिरांत पाठविण्याची तयारी केली असतां, मुक्ता लाजूं लागली; महाराणीच्या सूचनेवरून मालती वारंवार 'चलावें' ह्मणून विनंती करीत असतांही खालीं पाहत बसून राहूं लागली; मालती हास्यवचनें बोलून हात धरूं लागली असतां मनोहर युक्तींनीं हात झिडकारूं लागली; आणि महाराणी तेथून उठून दुसऱ्या आवासांत गेल्यावर मालती नर्मवचनांनीं मंदहास्य करून उभी राहिली असतां मुक्ता तिचा हात धरून आंतल्या दारानें कुसुमायुधाच्या मंदिराकडे चालूं झाली.

कामदेवानें पुढें लोटलेली आणि लाजेनें मागें हटविलेली अशा मुक्तेला रस्त्यामध्यें कुसुमायुधाच्या आराधनाच्या अनेक प्रकारांचें अध्ययन करविणारी, कुचग्रहादिकांच्या चर्चेमुळें प्रफुल्लित झालेली पाहून कामदेवानें अगोदरच शतपट शिकवून ठेविली आहे असें समजणारी, कुसुमायुधाला नववधूच्या वशीकरणाच्या उपायामध्यें अव्युत्पन्न ह्मणून समजून त्यालाही शिष्य करण्याचा विचार मनांत आणणारी, आणि "राजकुमार अशा विषयामध्यें कधींही अव्युत्पन्न असण्याचा संभव नाहीं" असें सम-

जून आणखी आपल्या संकल्पाला दाबून ठेवणारी, अशी मालती मुक्तेला कुसुमायुधाच्या मंदिराशीं आणून महालाच्या जिन्यावर चढवून मागें फिरूं लागली असतां मुक्ताही मागें फिरूं लागली. परंतु इतक्यांत कुसुमायुधानें संधी साधली आणि मुक्तेचा हात धरला. त्यामुळें सर्वच गोष्टीविषयीं निश्चिंत होऊन मालती परत निघून गेली.

हात धरिला असतां "सोडा सोडा" असें बोलणारी, मनामध्यें उत्सुक असतांही लाजेमुळें पाठ करून बसणारी, बोलवीत असतांही प्रत्युतर न देणारी, दृष्टीला दृष्टि मिळवीत असतांही खालीं पाहात राहणारी, आलिंगन करीत असतांही थरथर कांपणारी, चुंबन करूं जातां तोंड फिरविणारी, बलात्कारानें कुशीस घेत असतां दूर सरणारी, वस्त्राचा पदर धरला असतां हात आड धरणारी, कामदेवानें व्यापिली असतांही कालक्षेप करून कामदेवालाही निरभिमान करून टाकणारी, अनेक तऱ्हांनीं प्रतिकूळ आचरण करून सुरतसुखाहूनही अधिक सुख देणारी, निषेधानेंही अनुमतीचीच सूचना देणारी, मौन धरूनच स्वीकार केल्याचें उत्तर देणारी, वांकडे पाहण्यानें सन्मुखता जाणविणारी, राजी असतांही प्रतिकूळ वागणारी, प्रतिकूळ वागूनच कामाग्नीला प्रदीप्त करणारी, आणि मर्दन पावण्याला उत्कंठित असतांही शरीर अर्पण करण्यांत माघार घेणारी अशा मुक्तेच्या मुखाचें कुसुमायुधानें एकदम येऊन चुंबन घेतलें असतां मुक्तेची लाज वस्त्रासहित शिथिल झाली.

कामदेवाच्या आधीन झाली असतांही धैर्य दाखविणारी, शरीर अर्पण करून बसली असतांही प्रतिकूळ वागणारी, उत्कंठित झाली असतांही उगाचच्या उगाच लटकी कुरकुर करणारी, धृष्ट असतांही लाज दाखविणारी, मंदमंद हंसत असतांही हात झिडकारणारी, राजी असतांही अडवा हात धरणारी, पाहण्याची अत्यंत स्पृहा असतांही अर्धे डोळे मिटणारी, कामाग्नीनें तप्त झाली असतांही सीत्कार करणारी, नकाररूप

एकाच अक्षरानें कामदेवाच्या संपूर्ण सूत्रभाष्याचें व्याख्यान करीत असावी अशी दिसणारी आणि भाषणानें दयेची मागणी करीत असतांही मनानें निर्दयपणा मागणारी, अशी **मुक्ता** कुसुमायुधाला अपूर्व आनंद देऊं लागली.

**बा**लांच्या धैर्याला अधैर्य, वक्रतेला सरळता, रुदनाला हास्य, लाजेला धृष्टता, झिडकारण्याला अनुकूळता आणि निषेधाला स्वीकार असा प्रकार समजण्याच्या अलौकिक परिभाषेंत अत्यंत व्युत्पत्ति पावलेला कुसुमायुध **मु**क्तेला आनंद देऊं लागला.

**या** प्रमाणें कुसुमायुध आणि **मु**क्ता यांचा विलास असमाप्त झाला असतांही रात्रमात्र समाप्त होण्याची वेळ आली. कोंबडे कामीजनांच्या शापाला पात्र होण्यासाठींच ऊंच स्वरानें आरवूं लागले, चंद्र विरही जनांच्या शापानें ग्रस्त झाला असावा अशा प्रकारें निस्तेज दिसूं लागला, दरबारांत प्रभात काळ सुचवणारा नगारा गडगडूं लागला, तारका अनीतीनें प्राप्त झालेल्या धनाप्रमाणें हळुहळु नाहींशा होऊं लागल्या, प्रभात काळचा गुलजार वायु कामी जनांच्या सुरतश्रमाला शांत करूं लागला आणि पूर्व दिशा अरुणाच्या किरणांनीं रक्त झालेली दिसूं लागली.

कुसुमायुधाच्या बाहुपाशांतून सुटून जाणें अवडत नसतांही प्रभात समयीं मोठ्या बळानें त्याचा पाश सोडून मुक्त झालेली **मु**क्ता पलंगावरून खालीं उतरून केशपाश बांधूं लागली, लुगडें ठीकठाक करून सुरकुत्या वगैरे मोडूं लागली, नखक्षत आणि दंतक्षत हीं कोणत्या रीतीनें छपवून न्यावीं अशी चिंता करूं लागली आणि रात्रीचें चरित्र आठवून आठवून विस्मय पावूं लागली. इतक्यांत महाराणी **म**नोरमेनें पाठवल्यावरून पुष्कळ दासीसहित **मा**लती तेथें येऊन पोंचली. **मा**लतीचा शब्द ऐकून लागलीच महालाखालीं उतरून येणारी **मु**क्ता लुगड्याच्या पदरानें ओंठ झांकून येऊं लागली. तें पाहून अभिनंदन करून **मा**लती हांसत

हांसतच बोलली कीं—"तुह्मी दंतक्षतांस आणि नखक्षतांस गुप्त ठेवण्यासाठीं पाहिजे तेवढा प्रयत्न करा. परंतु ही नेत्रांची तंद्रा, हा लुगड्याचा चोळामोळा, ही शरीराची शिथिलता, हे तुटलेले हार, आणि ही वेणीची विलक्षण स्थिति ह्या खुणा तुमचें सगळें चरित्र उघड करीत आहेत. मी तुमचा जयजयकार करितें; परंतु ज्यानें तुह्माला सगळी रात्र जागविलें त्याचा तर अतिशायित जयजयकार केला पाहिजे. मी तुह्माला तेथें ठेवून येते वेळीं केलेला बोध कसा काय उपयोगास आला?"

"तुह्मी मला तेथें सोडून गेल्यावर मग काय झालें तें मला कांहीं बाई ठाऊक नाहीं आणि तुमच्या बोधाचेंही मला कांहीं एक स्मरण राहिलें नाहीं."

या प्रमाणें मुक्तेचें बोलणें ऐकून मंद मंद हांसणाऱ्या आणि डोळ्यांच्या विलक्षण चाळ्यांनीं परस्परांकडे पहाणाऱ्या मालती वगैरे दासी मुक्तेला आंगधुणें घालून, तिची वेणी गुंफून, तिला नटवून, नवीन वस्त्रें नेसावयास देऊन, महाराणीकडे घेऊन गेल्या. मुक्तेनें नमस्कार केला असतां मनोरमेनें फार फार सत्कारपूर्वक तिला आशीर्वाद दिले. आणि नेहमीसाठीं तिच्या तैनातीला कोण कोण दासी वगैरे सगळा बंदोबस्त केला.

जसजसे दिवस जात चालले तसतसें मुक्ता आणि कुसुमायुध यांचें परस्परांवरील प्रेम वृद्धि पावूं लागलें. दोघांची सत्कीर्तिही प्रमावाप्रमाणेंच वाढूं लागली. मुक्ता मनोरमेच्या शुश्रूषेंत आणि आज्ञेंत तत्पर राहूं लागली. कुसुमायुध आपल्या प्रभावानें राज्याचा उत्कर्ष वाढवूं लागला. आणि शत्रुजित् पुत्र आणि सून यांचे सद्गुण पाहून निरंतर प्रसन्न चित्तानें काळ कंठूं लागला.

# प्रकरण ३७ वें.

## हेमंत आणि शिशिर.

कुसुमायुध आणि मुक्ता हीं दोघें निरंतर अतर्क्य सुखाचा उपभोग घेऊं लागलीं असतां कांहींका दिवसांनीं हेमंतऋतु प्राप्त झाला. दिवस दुर्जनांच्या स्नेहाप्रमाणें आखूड झाले. रात्रि अविवेकी लोकांच्या तृष्णेप्रमाणें दीर्घ दीर्घ होऊं लागल्या. जळ आत्मवेत्याच्या चित्ताप्रमाणें अति शीतल होऊं लागलें. हेमंतऋतूनें सर्व उष्णता एकवट करून घेऊन कांतांच्या कुचमंडलाचे ठिकाणींच ठेविली असावी असें दिसूं लागलें. कामिनींचे स्तनच रात्रीस थंडीनें व्याकुळ झालेल्या तरुण जनांस जीवन देऊं लागले. नद्या विरहिणीप्रमाणें कृश होऊं लागल्या. नद्यांतील कमीकमी होत चाललेलें पाणी विरहिणींच्या नेत्रामध्यें जणों वहात असावें असें भासूं लागलें. अग्नीचें सेवन महात्म्याच्या सेवनाप्रमाणें सुख देऊं लागलें. सूर्य थंडीच्या कडाक्याला भीत असावा अशा प्रकारें नित्य उशीरां उशीरां उगवूं लागला आणि लौकर लौकर अस्त पावूं लागला. काळामुळें प्रबळ झालेलें हिम सूर्याच्या देखत सुद्धां कमळांस जाळून टाकूं लागलें. काळानें निर्बळ करून सोडलेला सूर्य धुक्यालाही मोठ्या कष्टानेंच भेदूं लागला. थंडी कामदेवाच्या उष्णतेला भीत असावी अशा प्रकारें कामिनींच्या कुचमंडलापासून दूरदूरच राहूं लागली. तूप अज्ञलोकांच्या अभिमानाप्रमाणें फारच थिजूं लागलें. कामदेव थंडीनें भय पावून कामिनींच्या कुचमंडलांतच शिरून बसला असावा असें जाणवूं लागलें. आशा जशी सद्गुणांच्या विस्तारांत न्यूनपणा आणते त्याचप्रमाणें रात्री दिवसाच्या विस्तारामध्यें न्यूनपणा आणूं लागल्या. थंडवारा पतिव्रता

विरहिणीससुद्धां अधरक्षतानें युक्त करून गुरुजनांच्या शंकेस पात्र करून देऊं लागला. वृद्धि पावलेली थंडीच मानवतींस मानीपणा सोडून देण्याचें भाग पाडून कामिजनास मदत करूं लागली. निर्धन देशाच्या दशेला प्राप्त झालेल्या फुलबागेमध्यें मखमाल वगैरे विशेष जातींचींच फुलझाडें दैववान होत असें दिसूं लागलें. रात्री, कामिनींस मानीपणा दाखविण्यास आणि त्यानंतर प्रसन्नता दाखविण्यासही पुरेसा वेळ देत असल्यामुळें, प्रिय वाटूं लागल्या. कामिनींपासून विरहपावलेल्या कामिजनांस रात्रीचा एक एक प्रहर सुद्धां एकेक कल्पाप्रमाणें जाणवूं लागला. बाहेरचा अग्नि जसा थंडी नाहींशी करून टाकीत असल्यामुळें लोकांस मदत करूं लागला, त्याच प्रमाणें आंतला जठराग्निसुद्धां जड भोजनाला पचवून टाकून लोकांस मदत करूं लागला. दिवस दरिद्र लोकांच्या मनोरथाप्रमाणें आणि व्यभिचारिणींच्या कुविचारांप्रमाणें उत्पन्न होऊन लौकरच अस्त पावूं लागले. थंडीनें प्रबळ होऊन, दुर्बळ करून टाकलेला सूर्याचा ताप, स्त्रीनें प्रबळ होऊन निर्माल्य करून टाकलेल्या पुरुषाप्रमाणें वाटूं लागला. अरण्यामध्यें थंडीमुळें कापूं लागलेले वानर, गुंजांचा ढीग करून व त्यांस अग्नि समजून पेटवूं लागले. धनाढ्य लोकांच्या शालीदुशालींमुळें पराभव पावलेली थंडी शालीदुशालींची जन्मभूमि जो काश्मीर देश त्याला हैराण करूं इच्छित असावी अशी भासूं लागली. कांसवाप्रमाणें अंगाचा संकोच करणारे दरिद्री लोक गालफड खडखडविण्याच्या निमित्तानें थंडीवर दांत चावीत असावे असें भासूं लागलें. धनाढ्य लोकांस सुख देऊं लागलेली थंडी, "जड सुद्धां पैसेवाल्याची खुषामत करितें" असें सुचवीत असावी अशी भासूं लागली. मैदानावर चरणारीं जनावरें, रणभूमीवर फिरणाऱ्या भित्र्या लोकांप्रमाणें, कापूं लागली. वृद्ध लोकांची थंडी पेटविलेल्या शेगड्यांच्या साधनानें टाळतां आली; परंतु तरुण लोकांची थंडी दूर होण्यासतर युवतींच्या प्रसंगांचीच जरूर

पडूं लागली. थंडी स्वेदाला उत्पन्न न होऊं देण्याचा अभिमान धरूं लागली; परंतु कामी जन सुरतश्रमामुळें स्वेदयुक्त होऊन थंडीचा तो अभिमान मोडून काढूं लागले. धुक्यानें मलिन झालेला चंद्रमा, रात्रि वृद्ध झालेल्या पाहून, खेदानें मलिन झालेला असावा असा दिसूं लागला. लोक, अग्नीची दाहक शक्ति पाण्यामध्यें आलेली समजत असावे अशा प्रकारें पाण्याच्या स्पर्शाला भिऊं लागले. थंडी, आपला वैरी जो सूर्य त्याच्या द्वेषामुळेंच, सूर्याची प्रियकरी जी कमलिनी तिचा द्वेष करूं लागली असावी अशी दिसूं लागली. आणि वायुही, कामदेवानें विव्हळ होऊन मस्तीला आला असावा अशा प्रकारें कामिनींच्या अंगाला रोमांचयुक्त तसेंच क्षत-युक्त करून टाकूं लागला.

कुसुमायुध, सुरतामध्यें, व्यायामामध्यें तसाच भोजनामध्यें अपूर्व आनंद देणाऱ्या हेमंतऋतूस सर्व ऋतूंमध्यें उत्तम म्हणून मानूं लागला आणि राज्यकारणी कामें आटोपल्यावर बाकीच्या वेळीं मुक्तेच्या विलासांतच निमग्न राहूं लागला.

हेमंतऋतु निघून गेल्यावर बहुतेक गुणांनीं त्याचेंच अनुकरण करणारा शिशिरऋतु प्राप्त झाला. थंडीनें पीडलेले तरुण जन उष्णतेनें भरलेल्या युवतींच्या कुचमंडलाला शरणागत होऊं लागले. कामिनींचें स्मरण होऊन देहभान रहित झालेले प्रवासी लोक शेकोट्यांच्या ज्वाळांनींसुद्धां बेशुद्धच राहूं लागले. मोगरीच्या लतांवर लटकलेल्या कळ्या युवतींच्या दातांचें अनुकरण करूं लागल्या. दिवस, बालकांप्रमाणें क्रमाक्रमानें वृद्धि पावूं लागले. सूर्य नवीनच गादीवर बसलेल्या राजाप्रमाणें दिवसानदिवस कांहीं कांहींसा अधिक अधिक शक्ति दाखवूं लागला. धान्याचीं पिकून तयार झालेलीं शेतें प्रजाजनांच्या डोळ्यांस आनंद देऊं लागलीं. उसाच्या मळ्यामध्यें रात्रंदिवस फिरणारे चरक आपल्या करकरण्यानें गांवच्या लोकांच्या निद्रेचा भंग करूं लागले. खेडवळ लोक, उंसाच्या

मळ्यात उत्पन्न होणाऱ्या वाल वगैरे भाज्यांसच मेवा म्हणून समजून आनंद मानून घेऊं लागले. वसंताचा जन्मोत्सव प्राप्त झाला असतां, घरोघर गायनाचा; गुलाल, अबीर वगैरे द्रव्यें उधळण्याचा; आणि पिचकाऱ्यांच्या धारा एकमेकांवर उडविण्याचा; अद्भुत आनंद माजला. रंगानें भिजलेलीं शिमग्याचीं वस्त्रें पांघरलेल्या युवती तरुणांच्या नेत्रांस विचित्र वळण देऊं लागल्या. कुसुमायुध आपल्या अंतःपुरांत मुक्तेबरोबर शिमगा खेळण्याचा आनंद अनुभवूं लागला. मुक्तेनें मारलेल्या पिचकारीच्या धारांच्या रोखांत सांपडलेला कुसुमायुध, मुक्तेनें कामदेवाच्या स्वाधीन करण्याकरितां पिंजऱ्यांत घालून कैद केला असावा, असा दिसूं लागला. मुक्तेच्या पिचकारीच्या धारांनीं व्याकुळ होणाऱ्या कुसुमायुधास आपल्या कबजांत घेतेवेळीं कामदेवाला जरासुद्धां प्रयास पडले नाहींत. कुसुमायुधानें फेंकलेल्या रंगाच्या धारा ह्मणजे कामदेवाच्या खड्गाची धाराच ह्मणून मुक्ता मानीत असावी अशा प्रकारें मुक्ता, वारंवार लवून, अंग वांकवून, चुकवूं लागली. आणखी रंगाच्या त्या धारा ह्मणजे कामदेवाच्या बाणांची वृष्टिच होय असें समजून कुचमंडलरूपी ढालीनें निवारण करूं लागली. कुसुमायुधानें मुक्तेच्या आंगावर फेंकलेला अबीर कामदेवानें वश करण्याकरितां फेंकलेलें मोहनचूर्णच होय असें वाटूं लागलें. मुक्तेच्या हातून कुसुमायुधाचे अंगावर आणि कुसुमायुधाचे हातून मुक्तेच्या आंगावर पडणाऱ्या कुंकवाच्या मुठी कामदेवाच्या विषारी गोळ्यांचेंच काम करूं लागल्या. पाण्याच्या संसर्गामुळें काजळ धुऊन गेलेले मुक्तेचे डोळे, सहाणेवर धार लावून स्वच्छ केलेले कामदेवाचे बाणच होत असे दिसूं लागले. कुसुमायुध आणि मुक्ता हीं जसजशीं पाण्याच्या धारांनीं शीतल होऊं लागलीं तसतसा कामदेवाचा हात बाण फेंकण्याच्या कामांत अत्यंत चपळ आणि दृढ होऊं लागला. शिशिरामुळें जशी पाहिजे तशी पुष्परूप बाणांची संपत्ति न मिळाल्याकारणानें

कामदेव मुक्तेच्या कटाक्षरूप बाणांवरच मुख्य आधार ठेवूं लागला. मुक्तेचे तीक्ष्ण कटाक्ष कामदेवाच्या बाणांचें काम करूं लागले हें ठीकच आहे; परंतु विलक्षण गोष्ट ही वाटूं लागली कीं पाण्यानें भिजलेल्या विरळ लुगड्यांतून दिसणारीं मुक्तेचीं कोमळ अंगेंसुद्धां कुसुमायुधावर कामदेवाच्या बाणांचें काम करूं लागलीं. शिमगा खेळतानां वेणी सुटून गेली, कपाळावरचें कुंकू धुपून गेलें, वस्त्रें भिजून गेलीं आणि अलंकार रंगानें लेंपटले; तरी असाही मुक्तेचा वेश कुसुमायुधाच्या मनाचें हरण करूं लागला.

याप्रमाणें नित्य शिमग्याचे खेळ खेळून न्हाऊन धुऊन, नवीं वस्त्रें आणि अलंकार धारण करून, सासूची सेवा करण्यास जाणाऱ्या मुक्तेनें आणि राज्यकारणी कामें करूं जाणाऱ्या कुसुमायुधानें, हुताशनीची पूजा करून, दुसरे दिवशीं शिमग्याची क्रीडा समाप्त केली.

कुसुमायुध मुक्तेच्या विलासांत आसक्त असतांही राज्यकारणी कामें काळजीनें बरोबर पहात असे, पित्यापेक्षांही प्रजेचें प्रेम जास्तच आकर्षण करून घेत असे, विद्वानांचें दारिद्र्य उच्छिन्न करीत असे, प्रजेच्या संतापाचें निवारण करीत असे आणि दिवसेंदिवस राज्यलक्ष्मीची अभिवृद्धि करीत असे. कुसुमायुधानें केलेल्या उत्तम बंदोबस्तामुळें निश्चित होऊन सर्व लोक रात्रीस घरांचीं दारें उघडीं टाकून खुशाल निद्रासुख घेत असत. प्रत्येक शहरीं आणि प्रत्येक गांवीं मोठे उत्सव होत असत. रात्रीस चंद्राचे किरण आणि वायूच्या लहरी हीं मात्र लोकांच्या घरांत गुप्तपणें शिरत असत. संताप विरही लोकांच्या हृदयांतच राहत असे, अतिवृष्टि शत्रूंच्या स्त्रियांच्या नेत्रांच्या ठिकाणींच दिसत असे, दुर्भिक्ष दुर्गुणांचेंच भासत असे, दारिद्र्य कामिनींच्या मध्यदेशाच्या ठिकाणींच दिसत असे, लोभ सद्गुण संपादनांतच दिसून येत असे, निर्दयता युवतींच्या आलिंगनांतच जाणवत असे, आणि वक्रता वनितांच्या कटा-

क्षांच्या ठिकाणींच राहिली असे. कुसुमायुध, दिव्य घोड्याच्या प्रभावामुळें नेहमीं अनेक देश फिरून, प्रजेच्या संतापाचें निवारण करी, आणि रात्रीस मुक्तेच्या विलासांचा आनंद अनुभवी. सर्व प्रकारें शत्रुजित् निश्चितपणें राज्यसुख भोगूं लागला, सगळी प्रजा भूलोकींच स्वर्गसुख अनुभवूं लागली, आणि कुसुमायुध आपणच राज्याचा सगळा भार उचलून मातापितरांची मनापासून सेवा करूं लागला.



# प्रकरण ३८ वें.



## वसंत.



कांहींसें अवशिष्ट राहिलेल्या मुक्तेच्या मुग्धपणाबरोबर शिशिरऋतुही समाप्त झाला असतां, वना वनाला पुष्पांनीं परिपूर्ण करून आणि कामदेवाला आपला भाता खांद्यावर वहाण्याच्या ओझ्यापासून मुक्त करून त्यास मोठें साहाय्य देणारा; आम्रवृक्षाच्या मंजरींच्या तुरट रसानें कोकिलांचे कंठ कफरहित करून त्यांच्या ठिकाणीं पंचम स्वराचा अपूर्व प्रपंच करणारा; पुष्पपल्लवांनीं गर्द झालेल्या वनामध्यें कामदेवरूपी चोराला लपवून ठेवून त्याच्या हातून प्रवासी लोकांच्या प्राणरूप धनाची लूट करविणारा; रात्रीबरोबर मुग्धांच्या लज्जेला तसेंच विरही जनांच्या शरीरालाही कृश करून टाकणारा; मलयाचलावरील अरण्यांमध्यें तप करणाऱ्या पवनरूप महागुरूला बोलवून आणून, त्याच्या हातानें वनितांस रसराजाची दीक्षा देवविणारा; फुलें वेंचूं लागलेल्या युवतींच्या हस्तांमध्यें मकरंदरूप जळ देऊन, कधींही मानीपणा न सोडण्याविषयीं संकल्प करविणारा; कामदेवाच्या लष्कराचा पगार चुकविण्यासाठीं चंपक पुष्पांच्या मिषानें सोन्याच्या मोहोरांचा संग्रह करीत असावा असा दिसणारा; कामदेवाच्या लष्करांतील वीरांस वीरपान पाजण्यासाठीं पुष्परूप प्यालयामध्यें मकरंदरूप मधाला घालून त्यांच्यावर भ्रमररूप सील करून ठेवीत असावा असा भासणारा; प्रवासी लोकांस जाळून टाकण्याच्या हेतूनें पळसाच्या फुलांच्या मिषानें अग्नीच्या ज्वाळाच प्रदीप्त करून ठेवीत असावा असा दिसणारा; अशोक वृक्षाच्या पल्लवांच्या हालण्यानें कामदेवास बोलावून आणण्याची खूण करीत असावा असा भासणारा; महादेवाच्या तृतीय

नेत्रस्थ अग्नीनें दग्ध झालेल्या कामदेवाची राख परागपुंजांच्या मिषानें एके ठिकाणीं जमवून व तिच्यावर मकरंदरूप अमृत सिंचन करून, तींतून हजारों कामदेव उत्पन्न करूं लागला असावा असा भासणारा; थंडीच्या भयानें मलयाचलाच्या गुहांमध्यें शिरून बसलेल्या वायूला कोकिलांच्या कूजितांनीं शीतकाळ निघून गेल्याबद्दल अभिनंदन करून गुहांतून त्यास बाहेर काढूं लागला असावा असा दिसणारा; मलयाचलावरील वाऱ्याशीं तोंड देणाऱ्या थंडीला प्रतिबंध करण्याचा उद्देश धरला असावा अशा प्रकारें सूर्याला दक्षिणेकडून उत्तर दिशेला खेंचून धरून जाणारा; अत्यंत प्रिय कामीजनांच्या सुरतस्वेदाचें निवारण करण्यासाठीं दक्षणेकडील वायूला थेट हिमालयापर्यंत हेराचें काम करविणारा; धनुष्य ओढण्यानें कामदेवाच्या हाताला उत्पन्न होणाऱ्या घामास नाहींसा करण्यासाठींच आम्रवनांतील परागपुंज उधळीत असावा असा दिसणारा; मानवतींस मानज्वरापासून मुक्त करण्याच्या इच्छेनें आंब्याच्या मंजरी उत्पन्न करीत असावा असा दिसणारा; आणि वनितांकडून मुग्धाव्रताचें तसेंच नवोढाव्रताचेंही उद्यापन करविणारा; असा वसंतकाळ प्राप्त झाला.

वसंत ऋतु प्रगट होतांच, मलयाचलावरील पवन, चंदन वृक्षांवर रहणाऱ्या सर्पांच्या संसर्गानें विषारी बनला असावा अशा प्रकारें स्पर्शमात्रें करूनच विरही जनांचे प्राण घेऊं लागला, आणि कामिनींच्या कुचमंडलाच्या ठिकाणीं अडथळल्यामुळें तसाच उपवनामध्यें चिकट झालेल्या मकरंदाच्या निसरड्यावर पाय सरल्याकारणानें लंगडा झाला असावा अशा प्रकारें मंद मंद वाहूं लागला. कोकिलांच्या पंचमस्वरामुळें पीडलेल्या विरहिणी, उपवनांतून कोकिलांस हाकलून देण्याच्या उद्देशानें जसजशा कोलाहल करूं लागल्या, तसतशा अधिक अधिक एके ठिकाणीं जमलेल्या कोकिलांनीं बावरून जाऊं लागल्या. मोत्यांचे अलंकार, पांढरीं पातळें आणि मोगरीच्या फुलांच्या वेण्या, चंद्राभिसरिकांस भारीच

साहाय्य देऊं लागल्या. दिवसही, चौफेर चंपकपुष्पांच्या उधळण्यानें पिंवळे झाल्याकारणानें, ते सुवर्णमय आभरणें अंगावर वालणाऱ्या अभिसारिकांस अत्यंत अनुकूळ वाटूं लागले. भ्रमरांच्या गुंजारवानें घाबरून गेलेल्या विरहिणी बहिरेपणाची प्रशंसा करूं लागल्या. कावळ्यांच्या पंक्तींतून कोकिलांचा उद्धार करणारी आणि प्रसंगविशेषाच्या बळानें उत्कर्ष पावलेली त्यांच्या पंचमस्वराची करामत कामी जनांपाशीं दूतिकेचें काम करूं लागली. कोकिलांचा स्वर, भ्रमरांचा गुंजारव आणि पुष्पांचा विकास एकाच वेळीं चोंहोंकडे उदय पावलेला पाहून सखीजन विरहिणींच्या प्राणरक्षणाची आशा सोडून देऊं लागला. नवपल्लवरूप कुसुंबी लुगडीं नेसलेल्या, पळसाचीं फुलें हींच नखक्षतें त्यांनीं शोभणाऱ्या, कोकिलांच्या स्वरांच्या रूपानें गायनकला प्रगट करणाऱ्या, चित्रविचित्र पुष्पें हींच रत्नें त्यांनीं खचित असे अलंकार धारण करणाऱ्या, भ्रमरपंक्तिरूप वीणाध्वनि काढणाऱ्या, आणि पल्लवांचें हलणें हेंच अभिनय होत ज्यांचे अशा, वनस्थळी, रागी जनांच्या अंतःकरणाबरोबरच विरागी जनांच्या अंतःकरणाला परवश करूं लागल्या. मदोन्मत्त भ्रमरांचा ध्वनि, विरही जनांस अविचार मंत्राप्रमाणें, मानवतींस कामदेवाच्या धनुष्याच्या टंकाराप्रमाणें, कामदेवाला आपल्या यशोवर्णनाप्रमाणें, कामी जनांस शृंगाररहस्याच्या पाठाप्रमाणें, विरहिजनांच्या प्राणांस प्रयाणसमयींच्या नौबदीच्या नादाप्रमाणें, आणि पुष्पांची लूट करूं लागलेल्या दंपतींस रक्षक जनांच्या ओरडीप्रमाणें, भासूं लागला. पवन, परागाचें ओझें उचलून, थकून गेला असावा; हलणाऱ्या वृक्षांच्या शाखांच्या प्रहारांनीं घायाळ झाला असावा; पुष्पांतील सुगंधाची चोरी करूं गेला असतां भ्रमरांच्या दंशानें पीडला असावा; केतकीच्या वनामध्यें फिरत असतां पायांत कांटे मोडल्यामुळें लंगडा झाला असावा; ताडांच्या वनांत फिरतां फिरतां त्यांच्या मद्याच्या संसर्गानें बेशुद्ध झाला असावा; वियोगी जनांचे शाप

लागू पडल्यामुळें अशक्त झाला असावा; नारळीचीं फळें लागल्यामुळें मस्तकावर व्रणित झाला असावा; लतांचीं नृत्यें पाहण्यामध्यें आसक्त होऊन गेला असावा; कामिनींच्या मदमंथरगतीचें अनुकरण करीत असावा; युवतींच्या स्तनमंडलाच्या आणि नितंबाच्या ठिकाणीं अडथळ्याकारणानें लंगडा झाला असावा; आणि मकरंदामध्यें नहाल्यानें जड होऊन गेला असावा; अशा प्रकारें तो मंद मंद येऊं लागला. रानामध्यें पसरलेल्या पुष्पांचे थवे ठेवलेल्या चित्रविचित्र गालिच्याप्रमाणें शोभूं लागले. पुष्पांनीं खेळत असावा; भ्रमरांनीं तंबुरा वाजवीत असावा; कोकिलांनीं गात असावा; लतांनीं नाचत असावा; वृक्षांच्या शाखांनीं गुंफित असावा; आणि वियोगी जनांच्या निःश्वासांनीं पुष्ट होत असावा; असा भासणारा वासंतिक पवन, विरहिणींस पळसाचीं फुलें ह्याच सुया त्यांनीं विंधूं लागला; स्तंब वगैरे वस्तूंच्या प्रत्याघातांनीं मागें फिरणाऱ्या श्वासानेंही त्यांस त्रास देऊं लागला; कामदेवाच्या धनुष्याच्या दोरीपेक्षांही त्यांस बारीक करून सोडूं लागला; त्यांच्या अतिकृश झालेल्या अंगावर बाण फेंकवून कामदेवाच्या सूक्ष्म वेधिपणाच्या कीर्तीला वाढवूं लागला; आणि त्यांच्या प्राणांचा बळी देऊन कामदेवाला तृप्त करूं लागला.

**कामी** जनांच्या अंतःकरणाला निरंकुश करणारा, लज्जा नाहींसा करणारा, आणि अनेक अनीतींची मनांत प्रेरणा करणारा, असा वसंतकाळ सर्वत्र माजला असतांही, कुसुमायुधाचें हृदय, **मुक्तेच्या** मोठ्या नितंबामुळें, अडकून राहिलें असावें अशा प्रकारें दुसऱ्या कोणाही युवतीला आपल्या ठिकाणीं थारा देत नव्हतें, **मुक्तेच्या** विलासांतच कामदेवाचीं सगळीं रहस्यें सामावलेलीं आहेत असेंच समजत होतें, आणि **मुक्तेच्या** स्तनमंडलाच्या मोठ्या ओझ्याखालीं दबून गेलें असावें अशा प्रकारें दुसऱ्या कोणाही कामिनीच्यानें ओढून घेववत नव्हतें. वसंताच्या प्रभावानें सर्व

जग रतिमय आणि उत्सवमय होऊन गेलें असतां, कामिनींच्या वियोगानें—वियोगानें तर काय ?—पण शिथिल आलिंगनानेंही खेदच व्हावा एवढी कामदेवाची बलवत्तर सत्ता सर्वत्र पसरली असतां, आणि कामदेव, तरुणांचीं अंतःकरणें हींच अतिचंचल लक्ष्यें त्यांसही विंधून टाकण्याची अद्भुत कीर्ति संपादन करूं लागला असतां आणि अबलांसही विंधून टाकण्यानें होणाऱ्या वीरधर्माच्या हानीचीही बिलकुल पर्वा करूं लागला नसतां, कुसुमायुध आणि मुक्ता हीं उपवनांत जाऊन विहारसंबंधीं अपूर्व सुख अनुभवूं लागलीं. उपवनामध्यें मुक्तेला हिंदोळ्यावर बसवून कुसुमायुध हेलकावे देऊं लागला असतां, जसजसा मुक्तेच्या नितंबाच्या भारानें हिंदोळा कर-कर-कर शब्द करूं लागला, तसतसा कुसुमायुधाला विंधून टाकण्यासाठीं सज्ज होऊन उभा राहिलेल्या कामदेवाच्या धनुष्याची दोरीही अधिक अधिक टंकार करूं लागली. मुक्ता, आपल्या नितंबमंडळाला झोंपाळ्यावर हेलकावे खाण्याची पुरती कसरत मिळाल्याकारणानें विपरीतरतीमध्यें संपूर्ण विजय त्यांस प्राप्त होईल अशी आशा धरूं लागली. कुसुमायुध, मुक्तेच्या अंगावर पडणाऱ्या पुष्पांच्या परागाला रुमालानें पुसपुसून आपलें जन्म कृतार्थ झालें असें मानूं लागला. मुक्ता, कुसुमायुधाचें आलिंगन करण्याच्या हेतूनें, समजून उमजून, हातांतली हिंदोळ्याची दोरी सोडून देऊं लागली. मुक्ता, हिंदोळ्यावरून उतरून, थोडा वेळपर्यंत कुसुमायुधाच्या मांडीवर विश्रांति घेऊन, त्याचा हात धरून, फुलें वेंचण्यासाठीं पुढें चालली असतां, उपवनांतील वृक्ष कोकिलांच्या शब्दांच्या मिषानें स्वागत करीत असावे, पुष्पांच्या मिषानें अभिनंदन करीत असावे, आणि भ्रमरांच्या शब्दांच्या मिषानें मंगलपाठ करूं लागले असावे, असे दिसूं लागले. मुक्तेच्या कंठांतील स्वरच कोकिलांचा वस्तादजी झाला असावा ; नूपुरांचा शब्दच हंसांचा नृत्याचार्य झाला असावा ; मंदहास्यच कलिकांचा उपदेशक झाला असावा; नखक्षतेंच

पलाश वृक्षांचा कुलगुरु बनला असावा; भ्रुकुटीच कामदेवाला धनुष्य ओढण्यांत शिक्षक झाल्या असाव्या; स्तनच अशोकाच्या गुच्छांना अध्यापक झाले असावे; मांड्याच केळींना उपाध्याय बनल्या असाव्या; आणि कटाक्षच कामदेवाच्या बाणांना महामहोपाध्याय झाल्या असाव्या; असें वाटूं लागलें. कुसुमायुध पुष्पें वेंचविण्यासाठीं मुक्तेला अशोक वृक्षावर चढवूं लागला असतां, तो वृक्ष मुक्तेच्या चरणाच्या स्पर्शानेंच आपल्या बुंधांतही पुष्पित होऊं लागला. मुक्ता फुलें खुडून खुडून जसजशी लतांस सुगंधरहित करूं लागली तसतशा लता तिच्या श्वासाच्या संसर्गामुळेंच अधिक सुगंधमय होऊं लागल्या. मुक्ता कुसुमायुधाला उंच ठिकाणचें फूल काढून देण्याविषयीं विज्ञप्ति करूं लागली असतां, तिच्या स्तनमंडलाच्या उन्नतीचा चमत्कार पहाण्याला उत्कंठित झालेला कुसुमायुध ती विज्ञप्ति प्रकारांतरानें बाजूस ठेवून तिच्याच्च हातानें फुलें तोडवूं लागला. कुसुमायुधानें दोन्ही हातांनीं उंच करून बकुळीच्या वृक्षावर चढविली असतां व मुक्ता त्याच्या शाखांवरून पुष्पें वेचून घेऊं लागली असतां, तितक्यांत शाखाच मुक्तेच्या नितंबभारानें कंपायमान होऊन पुष्पांचा त्याग करूं लागल्या. मुक्तेच्या शरीरसौगंध्याच्या लोभामुळें पुष्पांस सोडून देऊन तिच्याच सभोंवती फिरणारे आणि गुंजारव करणारे भ्रमर, मुक्तेजवळच नेहमीं सिद्ध असणाऱ्या कामदेवापाशीं, पुष्पें खुडून घेण्याविषयींची मुक्तेची फिर्याद करीत असावे असें वाटूं लागलें. सभोंवती फिरणाऱ्या भ्रमरांचें आपल्या हातानें निवारण करणारी मुक्ता बाल्यावस्थेंतच खेळलेल्या चेंडूच्या खेळाचा अभ्यास सफळ झाला ह्मणून मानूं लागली. वाऱ्यामुळें कंपित झालेल्या लतांवरून कुसुमायुध आणि मुक्ता यांजवर पडणारीं असंख्य पुष्पें कामदेवाच्या धनुष्यांतून पडणाऱ्या बाणवृष्टींचें काम करूं लागलीं. मुक्तेला घाबरून सोडून कुसुमायुधाचें स्वयंग्रह आलिंगन करण्याविषयीं भाग

पाडणारे भ्रमर कुसुमायुधाचा आशीर्वाद मिळवूं लागले. पुष्पांच्या मकरंदानें आर्द्र झालेल्या परागामुळें रंगलेली मुक्ता, कामदेवरूपी सूत्रधारानें कुसुमायुधाच्या वक्षस्थळरूप रंगभूमीवर नाचविण्यासाठीं तयार केलेली नटी होय अशी शोभूं लागली. कुसुमायुध, मुक्तेच्या वेणीमध्यें पुष्पांच्या माळा गुंफूं लागला असतां, त्याचें अंतःकरणसुद्धां त्यांतच गुंफून राहूं लागलें. मुक्ता आणि कुसुमायुध यांच्या फिरण्याच्या प्रदेशापासून दूर दूर फिरणाऱ्या दासी मुक्तेच्या कंकणांचा आणि नूपुरांचा कांहीं विलक्षण शब्द ओळखून त्यांच्या चेष्टांविषयीं अनुमान करूं लागल्या.

मुक्ता उपवनामध्यें विनोद करतां करतां थकून गेली असतां आणि मोत्यांप्रमाणें दिसणाऱ्या स्वेदकणिकांनीं तिचें कपाळ व्याप्त होऊन गेलें असतां, कुसुमायुध तिला उपवनाच्या रमणीय तलावामध्यें जलविहार करण्यासाठीं घेऊन गेला. तेथें तीं पाण्यामध्यें यथेच्छ विहार करूं लागलीं असतां, पाण्याचे तरंग मुक्तेच्या स्तनमंडलावर आपटून आपटून, मोडून जाऊं लागले. कुसुमायुध, पाण्यामध्यें बुड्या मारून अनेक प्रकारांनीं मुक्तेला फसवूं लागला. हातांनीं पाणी उडविणारी मुक्ता लज्जेला जणों जलांजली देत असावी अशी भासूं लागली. पाण्यामध्यें मोकळी होऊन लांब झालेली मुक्तेची वेणी, कामदेवानें कुसुमायुधाला बांधून ठेवण्यासाठीं नागपाश टाकला असावा अशी वाटूं लागली. मुक्तेच्या अंजनरहित नेत्रांची आणि मेंदीच्या रंगानें रहित झालेल्या चरणांची शोभा, अंजनानें आणि मेंदीच्या रंगानें आपलेंच उलटें नुकसान झालें अशी शाबिती करून देऊं लागली. तिच्या स्तनमंडलाच्या तसेंच नितंबमंडलाच्या आघातानें उसळणारें पाणी, मुक्तेच्या लावण्यपूरानें मिश्र झाल्या कारणानें वृद्धि पावून, उसळत असावें असें वाटूं लागलें. कमळामध्यें वास करणारी लक्ष्मी त्यांच्या धिंगामस्तीमुळें कमळें तुटून गेलेली पाहून मुक्तेच्या शरीरांतच येऊन बसली असावी असें भासूं लागलें.

हंस, मुक्तेच्या अंगलतेच्या ठिकाणीं विजेची भ्रांति पावून वर्षाऋतुला भ्याले असावे अथवा तिची गति आपल्या गतीहून अधिक चमत्कार दाखविणारी पाहून लाजले असावे अथवा तिच्या प्रभेला दूध ह्मणून समजून तिच्यांतून पाणी निराळें करण्याच्या कामीं असमर्थ झाल्या कारणानें खट्टू झाले असावे अशा प्रकारें त्या तलावांतून उडून जाऊं लागले. मुक्तेच्या अंगकांतीमुळें दुधासारख्या दिसणाऱ्या जळानें भरलेला तलाव पाहून दासींच्या मनांत क्षीरसागराची भ्रांति उत्पन्न झाली असतां, त्या भ्रांतीला, विष्णुसारखा कुसुमायुध, लक्ष्मीसारखी मुक्ता, कौस्तुभासारखें दिसणारें संध्याकाळच्या सूर्याचें प्रतिबिंब, कल्प वृक्षासारखीं भासणारीं कांठावरील वृक्षांचीं प्रतिबिंबें, अप्सरांप्रमाणें दिसणारीं स्वतां मुक्तेचींच प्रतिबिंबें, विषाप्रमाणें काळा दिसणारा मुक्तेचा केशपाश, आणि सुरेप्रमाणें दिसणाऱ्या धुपलेल्या मेंदीच्या रंगाच्या रेषा, हीं सर्व बळकटी देऊं लागलीं. कुसुमायुध आणि मुक्ता यांचीं मुखें, खगोलविद्येविषयीं अजाणते जैन लोकांनीं मानलेल्या चंद्राच्या जोडीची भ्रांति उत्पन्न करूं लागलीं.

या प्रमाणें जलामध्यें बहुत काळपर्यंत यथेच्छ विहार करून, सूर्याचे किरण कमळांच्या कंटकांनीं विंधून गेल्याकारणानें रक्तबंबाळ होऊन स्रवत असावे असे लाल झाले असतां आणि सूर्य पाताळांतील अंधकाराचा क्षय करण्याकरतां पश्चिम समुद्रांत उतरत आहे असें पाहून पूर्व दिशेकडून पृष्ठकोपाप्रमाणें अंधकार चाल करून येऊं लागला असतां, मुक्ता आणि कुसुमायुध हीं दुसरीं वस्त्रें नेसून व पांघरून आपल्या अंतःपुरांत आलीं.

मण्याच्या आणि दीपकाच्या प्रभांच्या संमिश्रणानें अपूर्व तेजोमय भासणाऱ्या अंतःपुरामध्यें येऊन कुसुमायुधानें मद्यपानाच्या लीलेस आरंभ केला. कुसुमायुध मुक्तेला, आणि मुक्ता कुसुमायुधाला, मद्य पाजूं लागलीं. कुसुमायुधानें मुक्तेच्या ओठाशीं धरलेल्या मद्याच्या प्याल्या-

मध्यें दिसणारा चंद्र, कुसुमायुधाच्या दृष्टीसमोर मुक्तेच्या ओठाचें चुंबन करण्यास भीत असावा अशा प्रकारें कांपूं लागला. मदिरा त्या दोघांच्याही हृदयांत वास करणाऱ्या विवेकाला लोटून घेऊं लागली; यथोचित आणि स्पष्ट अक्षरांनीं युक्त असें भाषण करण्याचें नैपुण्य नाहींसें करून पुरतें न समजे असें असंबद्ध भाषण करवूं लागली; मुक्तेच्या मुखास मानीपणावांचूनही लाल डोळे, लाल गाल, आणि भृकुटींचे विलक्षण विभ्रम यांनीं शोभणारें करूं लागली; दोघांच्याही प्रेमास अत्युच्च पदवीवर नेऊन बसवूं लागली; कामदेवाला अत्यंत उन्मत्त करूं लागली; प्रसंगावाचून अव्यवस्थित अशीं अनेक चापल्याचीं कृत्यें करवूं लागली; मानीपणाच्या आणि प्रसादाच्या क्षणिक आणि विलक्षण प्रकारच्या आवृत्ति दर्शवूं लागली; कामदेवानें दोघांवरही जादूचा प्रयोग योजला असावा अशी भासूं लागली; थोडथोड्या वेळानें डोळे मिटून आणि वाणी बंद करून योगस्थितीमध्यें नेऊन सोडीत असावी अशी दिसूं लागली; स्वतांसुद्धां मुक्तेच्या श्वासाचा सुगंधरूप मद मिळाल्याकारणानें मत्त होऊन गेली असावी अशी जाणवूं लागली; मुक्तेला लाज आणि विवेक यांपासून मुक्त करून जन्माचें सार्थक करून देऊं लागली; अनीतीप्रमाणें आपल्या सेवनाचें फळ लौकरच प्राप्त करून देऊं लागली; आणि कधींही न अनुभवलेल्या नव्या नव्या क्रियांविषयीं पूर्ण व्युत्पत्ति करून देऊं लागली.

मद्यपानाचा विनोद थोड्याच वेळांत समाप्त करून जेवणाची वेळ प्राप्त होतांच अल्पभोजन करून कुसुमायुध मुक्तेसहित शयनगृहामध्यें गेला.



# प्रकरण ३९ वें.

## ग्रीष्म.

अद्भुत विहार करून वसंत काळचे सगळे दिवस एकेक क्षणाप्रमाणें निघून गेले असतां, ग्रीष्मऋतु त्या दंपतीस सर्व ऋतूंपेक्षांही विशेष आनंद देण्याला उत्सुक झाला असावा अशा प्रकारें, अनाहूत असतांही, येऊं लागला. ग्रीष्मऋतु अनेक वनांचा दाह करण्याच्या पापापासून मुक्त होण्याकरितां भागिरथीमध्यें न्हाऊनच काशींत प्रवेश करीत असावा अशा प्रकारें अनुष्णच भासूं लागला. भागीरथीची हवा, वाळ्याचे पडदे, मंदिरांची उंची, आणि उपवनांची संपत्ति, हीं सर्व ग्रीष्मकाळाचा गर्व शांत करूं लागलीं. अनेक जलाशय, कलिकाळानें घेरलेल्या क्षुद्र लोकांच्या अंतःकरणाप्रमाणें, शुष्क होऊन गेले असतां, भागीरथि साधुजनांच्या अंतःकरणाप्रमाणें प्रौढच राहूं लागली. कुसुमायुध आणि मुक्ता जलावगाहनानें, मोत्यांच्या अलंकारांच्या धारणानें, कारंज्यांच्या जलधारांच्या संसर्गानें, उपवनामध्यें केलेल्या विहारानें आणि चंदनाच्या वगैरे लेपानें, जसजशीं ग्रीष्मकाळची उष्णता शांत करण्याचा प्रयत्न करूं लागलीं तसतशीं त्यांच्या आंगामध्यें कामदेवाची उष्णता वृद्धि पावूं लागली. फक्त मोत्यांचाच श्रृंगार धारण करणारी मुक्ता, यौवनरूप कल्पवृक्षाच्या कळ्यांनीं अलंकृत झाली असावी अशा प्रकारें शोभूं लागली. ग्रीष्मकाळच्या उष्णतेचा पराभव दुसऱ्या साधनांनींही होऊं लागला, परंतु यौवनाच्या उष्णतेचा पराभव मात्र उपचारांनीं शीतळ झालेल्या कामिनींच्या प्रसादावांचून बहुतेक असाध्यच वाटूं लागला. मुक्तेला सुगंधी पाण्यानें न्हाऊं घालून तिच्या केसांची वेणी गूंफुं लागलेला

कुसुमायुध स्वतांच कामदेवाच्या हातानें आपल्या पराजयाचें साधन तयार करीत असावा असा दिसूं लागला.

पृथ्वी द्रव्यलोभी मनुष्याच्या चित्तवृत्तीप्रमाणें परितप्त होऊन गेली असतां; सूर्याचे किरण राक्षसांच्या डोळ्यांप्रमाणें क्रूर दिसूं लागले असतां; थंडी सुद्धां थंडीचीच इच्छा करीत असावी अशा प्रकारें मोठमोठ्या जलाशयांच्या आंत प्रवेश करून बसूं लागली असतां; छायासुद्धां छायेचीच इच्छा करीत असावी अशा प्रकरें वृक्षांच्या पायाशींच लकटून बसली असतां; सूर्यसुद्धां तापापासून मुक्त होऊं इच्छित असावा अशा प्रकारें करांच्या द्वारां जलाशयांतून जलाचें आकर्षण करूं लागला असतां; चंदनरसही उष्णतेपासून आकळला असावा अशा प्रकारें स्नान करून शीतल झालेल्या कामिनींच्या अंगाचा आश्रय करूं लागला असतां; आणि कमळेंसुद्धां सूर्याच्या तापापासून पीडित होत असावीं अशा प्रकारें आपल्या मस्तकावर भ्रमरांच्या पंक्तीच्या रूपानें काळा पडदा धरून बसलीं असतां; कुसुमायुद्ध मुक्तेस बरोबर घेऊन कारंजांच्या धारागृहामध्यें जाऊन विहार करूं लागला.

कारंजांचें धारागृह, सूर्याच्या किरणासही कदलीपत्रांच्या घट्ट अंधकारानें, आंधळेंच करून सोडीत होतें; केवड्याचीं पानें ह्याच करवती त्यांच्या योगानें उष्णतेला करवतून काढीत असावें असें वाटत होतें; खिडक्यावाटें बाहेर निघणाऱ्या सहस्त्र धारांच्या मिषानें सूर्याच्या तापावर बाणांची वृष्टि करीत असावें असें वाटत होतें; विधात्यानें एक कल्पपर्यंत सर्व हेमंत आणि शिरिरऋतूमध्यें उपयोग करण्यासाठीं याच धारागृहांत थंडीचें कोठार भरून ठेवलें असावें असें जाणवीत होतें; चोहोंकडून बांधलेल्या कदलीपत्रांसही थंडीनें थरथर कांपवीत असावें असें भासवीत होतें; उष्णतेच्या त्रासामुळें जगांतून लौकर लौकर निघून जाणाऱ्या रात्रींचें गुप्त रहाण्याचें हें ठिकाण होय असें वाटवीत

होतें; आपली मुलगी अन्नपूरणा हिला भेटावयास आलेल्या हिमालयाचें हें बिऱ्हाडाचें ठिकाण होय असें वाटवीत होतें; विजेच्या तडाक्यामुळें आणि वाऱ्याच्या झपाट्यामुळें जरजर झालेल्या मेघांचें हें विश्रामस्थान होय असें भासवीत होतें; आणि महिन्या महिन्याला कमी कमी होत जाणाऱ्या चंद्रबिंबाच्या कळांनींच हें रचलें असावें असें भासवीत होतें.

मुक्तेबरोबर विहार करतांना कुसुमायुधाला या धारागृहामध्यें ग्रीष्म-काळ शिशिरमय वाटत होता; उष्णता चंदनमय भासत होती; सूर्याचे किरण कर्पूरमय लागत होते; वारा हिममय भासत होता; आणि दिवस पौषमासचे रात्रिमय वाटत होते. या गृहामध्यें कोठें कोठें फुलांचे हिंदोळे, कोठें कोठें सुंदर गायन करणाऱ्या पुतळ्या, कोठें कोठें काळ्यावस्त्रांनीं झांकलेले रूप्याचे कलश, कोठें कोठें शीतरसांनीं भरलेलीं भांडीं, कोठें कोठें कमलतंतूंनीं मिश्र केलेल्या वाळ्याचे पंखे, कोठें कोठें सुगंधयुक्त शुभ्र पुष्पांच्या माळा, कोठें कोठें चंदनरसाचे पाट, कोठें कोठें पुष्पशय्या, कोठें कोठें स्फटिकमय आसनें, कोठें कोठें मोत्यांचे हार आणि कोठें कोठें अशाच प्रकारचे दुसरेही अनेक शीत उपचार तयार करून ठेविले होते.

वारंवार चांदण्याचें स्मरण देणारा, हेमंतकाळाचे गुण आठवावयास लावणारा, प्रदोष काळाच्या दर्शनासाठीं उत्कंठा करविणारा, रानच्या पक्ष्यांस दमेकऱ्याप्रमाणें करणारा, सूर्याच्या किरणांच्या ठिकाणीं अग्नीनें विरघळलेल्या रुप्याच्या रसाची भ्रांति उत्पन्न करणारा, निद्रेला सुद्धां पाण्याच्या छायेमध्यें विश्रांति घेण्याची इच्छा उत्पन्न करणारा, जलाशयाप्रमाणें प्रवासी लोकांससुद्धां दीन करणारा, शीतल वायूला प्रयाणसमयीं यमघंटाचें फळ देणारा, भ्रमरांस कमळांवरून उठवून संकीर्ण लतांमध्यें शिरून वास करण्याचे भाग पाडणारा, चंदनादिकांच्या लेपामुळें शोभणाऱ्या कामिनींच्या कुचमंडळाच्या ठिकाणीं सुस्त नि-

जळेल्या कामदेवालासुद्धां निद्रासुखांतून उठविणारा, वाऱ्याला सुद्धां पंख्याच्या सेवनाची जरूर पाडणारा, केवळ परोपकाराचें व्रत धरणाऱ्या वृक्षांसही परक्यांस छाया देण्याचे कामीं कृपण बनविणारा, केवळ प्रवासी लोकांसच नव्हे तर वृक्षांच्या सावलीसही वृक्षाचा बुंधा सोडून बाहेर पडतांना भारी त्रास देणारा, सूर्याच्या किरणांसही जलाशयांचें पोट फाडून जल पिण्याचे कामीं उत्सुक करून सोडणारा, थंडीला हरामखोर समजत असावा अशा प्रकारें तिचे सगळे आश्रय ह्मणून पाडण्याचे कामीं सज्ज राहणारा, आणि प्रवासी लोकांप्रमाणें दिवसासही अत्यंत संतप्त करून चालण्यास असमर्थ करून टाकणारा, असा मध्यान्हसमय कुसुमायुध आणि मुक्ता हीं जलक्रीडेच्या आनंदामध्यें अज्ञाताप्रमाणें घालवूं लागलीं.

चोहोंकडे फिरविलेल्या अनेक छिद्रांनीं युक्त अशा नळांतून स्रवणाऱ्या जळधारांनीं भिजून गेलेल्या बोरीच्या काटीच्या कुंपणीनें घेरलेला; कुंपणींत असलेल्या छिद्रांतूनही बाहेर निघणाऱ्या जळाच्या धारांच्या प्रभावामुळें सूर्याच्या तापाला आंत प्रवेश करण्याला अवकाश न देणारा; उष्ण वाऱ्याला प्रतिबंध करण्याकरितां चौकी बसविली असावी अशा प्रकारें सभोंवार योजिलेल्या चंदनाच्या रसानें संयुक्त अशा पाण्याच्या पाटानें क्षुद्र नद्यांच्या मध्यें असलेल्या लहानशा खेड्याप्रमाणें दिसणारा; स्तंभाच्या ठिकाणीं रचलेल्या वाळ्याच्या, पल्लवांच्या आणि पुष्पांच्या रचनेनें अंधकारित झाल्यामुळें कांहींसें अकालिक वर्षाडंबराचें अनुकरण करणारा; सुगंधमय आणि पुष्पमय असल्याकारणानें वसंताची लीला दाखविणारा; प्रफुल्लित शुभ्र पुष्पांच्या मिषानें दांत दाखवून पराजय पावलेल्या ग्रीष्म काळाची मस्करी करीत असावा असा भासणारा; वृष्टि बंद पडल्यावर ढगांप्रमाणें दिसणाऱ्या पांढऱ्या चांदव्यानें शारद काळची शोभा दाखविणारा; आणि उष्णतेनें शीतलतेपासून भय पावून अस्पृश्यच

गणलेली असावा; असा जलमंडप, कुसुमायुधाला आणि मुक्तेला, शंकराच्या नेत्रांतील अग्नीनें दग्ध झालेल्या कामदेवानें आपल्या रक्षणासाठीं जपलेल्या मृत्युंजय मंत्राप्रमाणें, आयुर्वेद तपासून शुद्ध केलेल्या शीतोपचाराप्रमाणें आणि आराधन करून वरून खालीं उतरलेल्या चंद्रलोकाप्रमाणें दिसूं लागला. शीतकाळीं वर्ज्य असतांही शीताचें अतिशय रक्षण करणाऱ्या, आणि नेहमीं मोठ्या वेगानें धांवल्यामुळें थकून जाणाऱ्या रात्रींचें विश्रांति घेण्याचें हें एक ठिकाणच योजिलें असावें अशा दिसणाऱ्या जलमंडपामध्यें कामदेवालाच साक्षी राहण्याची आणि जामीन राहण्याची कामगिरी सांगून, पराजयाच्या बदला चुंबन आणि आलिंगन वगैरे क्रिया करण्याच्या शर्ती करून, बहुत बुद्धिबळाचे तसेच सोंगट्यांचे खेळ खेळल्यावर राज्यकारणी कामकाज पहाण्यासाठीं कुसुमायुध चाललेला पाहून, मुक्ता त्याला गायन वगैरे अनेक युक्ति योजून आडवून धरूं लागली. केव्हां केव्हां कुसुमायुध गाऊं लागला असतां आणि वाजवूं लागला असतां त्यांत रागशास्त्राच्या नियमाप्रमाणें मुक्ता चुका काढूं लागली; केव्हां केव्हां नखक्षतामुळें स्तनमंडलावर तंबुरा न धरतां आल्याकारणानें कुसुमायुधाकडे वांकडी दृष्टि करून पाहूं लागली; केव्हां केव्हां राजकीय कामांमुळें येण्याचा वेळ टळून गेल्यावर आलेल्या कुसुमायुधाकडे चमत्काररहित दृष्टीनें पाहून आणि तोंड फिरवून निजून, शिक्षा करूं लागली; केव्हां केव्हां त्याचे श्रम हरण्याकरितां श्रमहारक मद्यें पाजूं लागली; आणि केव्हां केव्हां त्याला लौकर येण्याचें भाग पडावें ह्मणून विलासक्रीडेमध्यें अर्ध्या विलासांनीं अर्ध तृप्तच ठेवूं लागली. कुसुमायुधही केव्हां केव्हां मुक्तेला वीणेप्रमाणें मांडीवर घेऊन तिच्या तुटलेल्या हारांचे तंतु गांठूं लागला; केव्हां केव्हां मुक्ता मृदंग वाजवूं लागली असतां, गाण्याच्या स्वरामध्यें उलट पालट करून तिला लाजवूं लागला; केव्हां केव्हां जाणून बुजून, लपून बसून, मुक्तेच्या चेष्टा पहाण्याचा आनंद अनुभवूं लागला;

केव्हां केव्हां अलंकार आणि वस्त्रें तिच्या अंगावर घालीत असतांना हाताला घाम आल्याकारणानें तिच्या हशाला पात्र होऊं लागला; केव्हां केव्हां आरशामध्यें अधरक्षताचीं वगैरे चिन्हें पाहूं लागलेल्या मुक्तेच्या पाठीमागें अचानक येऊन उभा राहूं लागला; केव्हां केव्हां राजकीय पोशाकाहूनही उपभोगाचे पोशाक श्रेष्ठ ह्मणून लेखूं लागला; केव्हां केव्हां दिवसाहूनही रात्र श्रेष्ठ ह्मणून मानूं लागला; केव्हां केव्हां रात्रीहूनही दिवसच अधिक चमत्कार दाखविणारा ह्मणून समजूं लागला; आणि केव्हां केव्हां दुसऱ्यास कृत्यांमध्यें गुंतवून ठेवणाऱ्या युवराज पदवीलाही भाररूप लेखूं लागला.



# प्रकरण ४० वें.

## अचिंत्यदैव.

कुसुमायुध आणि मुक्ता हीं येथेष्ट कामसुख भोगीत असतां; राज्य, व धनधान्य यांची समृद्धि निरंतर होत असल्याकारणानें कार्तिकी पुनवेच्या चंद्राहूनही आणि समुद्राहूनही अधिक श्रेष्ठ तीं दोघें दिसूं लागलीं असतां; देशांत शोक आणि संताप हीं नांवानेंच मात्र अवशेष राहिलीं असतां; शत्रुजिताच्या आज्ञेप्रमाणें कुसुमायुधाची आज्ञा कोठेंही प्रतिबंध पावत नसतां; प्रवासी जन घराप्रमाणेंच अरण्यामध्येंही निर्भय फिरूं लागले असतां; कोणीही शत्रु लढाईस उठण्याची धास्ती राहिली नसतां; विद्वान याचकवृत्ति सोडून वदान्यपणाला प्राप्त झाले असतां; प्रजाजनांच्या अंतःकरणांतून राजभक्ति यत्किंचितही दूर होण्याचें भय राहिलें नसतां; शत्रुजिताची आणि कुसुमायुधाची कीर्ति शुक्लपक्षांतील चंद्राच्या कलांप्रमाणें प्रतिदिवस वृद्धि पावूं लागली असतां; मनोरमा आणि मुक्ता ह्या भाग्यशाली वनितांमध्यें अग्रगण्य होऊन बसल्या असतां; आणि शत्रुजित् स्वतां संसारसुखाच्या अत्यंत सीमेला पोंहचलों ह्मणून गणूं लागला असतां; दैव अथवा जें कांहीं ह्मणाल तें प्राण्यांस अखंड सुख भोगूं देण्यास कधींही आनंदित होत नाहीं, क्षणमात्र जळीं स्थळ आणि स्थळीं जळ करण्यासही समर्थ आहे, अघटित घटना घडवून आणण्यामध्यें मोठ्या शिल्पकाराप्रमाणें आहे, लोकांच्या मागण्याप्रमाणें नव्हे तर स्वतांच्या इच्छेप्रमाणेंच व्यवस्था करितें, दुःख देण्याची इच्छा होईल तेव्हां जे आपले सहाय त्यांसही आपली उपेक्षा करण्यास लावितें अथवा शत्रु करून टाकतें, सुख देण्याची मर्जी होईल तेव्हां पशुपक्ष्यांसही मित्र बनवितें,

प्रतिकूळ झालें असतां मोत्याचा दाणा हिरावून घेऊन अन्नाचा दाणाही देत नाहीं, अनुकूल झालें असतां ज्याला अन्नाच्या दाण्याचीही पंचाईत पडावी त्यास मोत्याचे दाणेही हवे तेवढे मिळवून देतें, समर्थाला अशक्त आणि अशक्ताला समर्थ करण्यामध्यें एक प्रकारची मौज मानितें, उद्योग आणि आलस्य यांच्यामध्यें कसलाच विशेष राहूं देत नाहीं, ब्रह्मादिक देवांसही परवश करून हवें तसें नाचवितें, मारण्याची इच्छा होईल तेव्हां तारत्याकडूनही मारवून टाकितें, तारण्याची लहर लागली असतां कल्पांतामधूनही रक्षण करूं शकतें; सुख आणि दुःख हीं दोन्ही आपल्याच ताब्यांत ठेवितें, कोणासही निश्चित पाहिलें असतां मनांत निरंतर जळत असतें, निंदेपासून यत्किंचितही क्रोध पावत नाहीं, स्तुतीपासून तिळमात्रही द्रव पावत नाहीं, साधनाला असाधन आणि असाधनाला साधन बनवून देण्यांत अद्भुत लीला दाखवितें, त्रैलोक्याची उलटापालट करून हालवून सोडणाऱ्या पुरुषांचीही क्षणार्धांत चलबिचल करून टाकितें, उंच निंच किंवा सद्गुण दुर्गुण यांचा यत्किंचितही हिशोब ठेवीत नाहीं, उन्मत्ताप्रमाणें वागण्यांत लवमात्रही शरमत नाहीं, कांठाशीं नेऊन लाविल्यावरही एकाएकीं बुडवितें, महासागरामध्यें बुडलेल्यालाही सुरक्षित ठेऊं शकतें, हातांत दिल्यावरही परत ओढून घेऊं शकतें, परत घेतल्यावरही पुन्हा देऊं शकतें, सर्वांच्या पाठोपाठ धांवतच आहे, छायेप्रमाणें निरंतर जवळ असतांही पहिल्यानें दिसण्यांत येत नाहीं, ज्याच्या हातानें जीवन मिळालें असतें त्याच्याच हातानें पुढें मारूनही टाकवितें, लोकांस चिंतारूप चक्रावर चढवून भ्रमण करावयास लावितें, बुद्धिमान पुरुषासही मूर्ख बनवितें, फार करून कोणत्याही स्थळीं एकच स्थिति निरंतर राहूंच देत नाहीं, स्वतां ज्या रस्त्याला धांवत जातें त्याच रस्त्यानें लोकांची बुद्धिही ओढून घेऊन जातें, लोकांस कैद्यांप्रमाणें बलात्कारानें बांधून नेऊन

दुःखांत अथवा सुखांत फेकून देतें, स्वप्नींही न यावें अशा योगायोगांची योजना करितें, मनुष्यांनीं केलेल्या बळकट योजनांसही तोडून मोडून टाकितें, इष्ट गोष्टींतूनही अनिष्ट आणि अनिष्ट गोष्टींतूनही इष्ट गोष्ट निष्पन्न करितें, प्रत्येक प्रसंगीं आपला हात घातल्याशिवाय रहात नाहीं, अकस्मात कोठून येऊन पोंचतें हें लक्षांतही येत नाहीं, मागितल्यावांचून देतें, मागितलें असतांही कांहींएक देत नाहीं, व निर्दय आणि अविवेकी लोकांमध्यें जें अग्रेसर आहे तें शत्रुजित्, मनोरमा, कुसुमायुध आणि मुक्ता यांच्या सुखाविषयीं हेवा उत्पन्न होऊन, त्यांशीं मत्सर करूं लागलें.

कामसुखांत आसक्त झालेल्या कुसुमायुधानें दोन तीन महिन्यांपासून ऋषींच्या आश्रमांत फिरावयास जाण्याचा कंटाळा केला होता, तेवढीच संधि साधून, कित्येक दैत्य अनेक कपटें योजून आश्रमांचा विध्वंस करूं लागले आणि त्यामुळें महाराज शत्रुजिताच्या दरबारीं त्या ऋषींकडून अनेक फिर्यादी येऊं लागल्या. यास्तव एके दिवशीं शत्रुजितानें कुसुमायुधास आज्ञा केली कीं “ कुमार कुसुमायुधा ! सर्व दुष्ट दैत्यांचा क्षय झाल्याचें आणि आश्रम एकंदरीनें निर्भय झाल्याचें तुह्मीं समजलां त्यांत कांहींशी चुकी झाली असें ह्मटलें पाहिजे, कारण तुमच्या समजाप्रमाणें अजूनपर्यंत तसें झाल्याचें दिसत नाहीं. संग्रामाला पराङ्मुख न होणें, प्रजेचें पालन करणें आणि ब्राह्मणाची शुश्रूषा करणें यांतच क्षत्रियांचें परम कल्याण आहे. शेतकरी जसा धान्य राखतो आणि गवत उपटून काढितो त्याचप्रमाणें राज्यांतल्या अधिकाऱ्यानीं प्रजाजनांचें रक्षण केलें पाहिजे आणि दुष्ट लोकांस निवडून काढून निर्मूळ केलें पाहिजे. ज्या राजाच्या राज्यामध्यें कोणत्याही प्रकारची प्रजेची कुरकुर असेल त्या राजाचें जीवित बकरीच्या गळ्यावरील अचुळांप्रमाणें व्यर्थ समजलें पाहिजे. राजा अथवा राजकुमार प्रमादग्रस्त होईल तर तें राज्यही कालग्रस्त झाल्याविना राहणार नाहीं. पुत्रा ! क्षत्रिय शब्दाचा खरा अर्थ

नेहमीं ध्यानांत ठेवून, ऋषींच्या आश्रमांमध्यें हिंडून, दुष्ट दैत्यांचा नाश करीत जा आणि आश्रमांचा द्वेष करणारा कोणीही उरला नाहीं असें झालें ह्मणजे लागलाच इकडे परत येत जा." पित्याची आज्ञा होतांच ती शिरसा मान्य करून, चाबुकानें चमकावलेल्या चलाख घोड्याप्रमाणें उत्साह-युक्त होत्सात्या कुसुमायुधानें पित्याचे चरणीं प्रणाम केला आणि त्यानें दिले-ल्या आशीर्वचनांस तसेंच आपल्या धनुष्यास हजारों रक्षकांहूनही अधिक योग्यतेचीं समजून तो एकवीर कुसुमायुध, मनोरमेचा निरोप घेण्याकरितां, तिच्या महालांत गेला.

थोडा वेळापूर्वींच उजवा डोळा फुरफुरूं लागल्याकारणानें, चिंताग्रस्त झाल्यामुळें धुक्यानें ग्रासलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें मुख झालें आहे जिचें अशी, अकस्मात मुखावर विकार दिसून आल्याकारणानें या दुःखाचे कारणाविषयीं अनेक प्रकारच्या असंभवित कल्पना करण्याविषयीं दासी-जनांस भाग पाडणारी, आणि कुटुंबाच्या कल्याणाकरितां मनांत विश्वे-श्वराच्या चरणांचें ध्यान करणारी अशा मनोरमेपाशीं जाऊन चरणीं प्रणाम करून, कुसुमायुधानें शत्रुजिताची आज्ञा निवेदन केली आणि तुमचा निरोप घेण्यास आलों आहे ह्मणून कळविलें. त्याबरोबर मनोरमेनें, मनास खेद झाला असतांही, राजाची आज्ञा आणि क्षत्रियाचा धर्म अनु-ल्लंघनीय होत असें समजून, आशीर्वादपूर्वक निरोप दिला, मंत्रोच्चार-पूर्वक रक्षाबंधन केलें, आणि प्रवासामध्यें बंधुजनांच्या विरहाची भावना न करण्याविषयीं, भोजनाच्या वेळेचा अतिक्रम न करण्याविषयीं, आणि सर्व प्रकारें सावधगिरीनें राहण्याविषयीं पुनःपुनः सांगितलें. मातेनें सां-गितलेल्या शिकवणीचा स्वीकार करून तो उठला. उठते वेळीं त्यानें पुनः प्रणाम केला. प्रणाम करते वेळीं, मनोरमेच्या मुखांतून निघालेल्या चिंतेच्या भारानें चिरडून गेला असावा, अमृतानें भिजून गेला असावा, आणि स्नेहानें संपुटित झाला असावा, अशा प्रकारें दिसणारा, व लौकर

लौकर परत या अशा शब्दांस मधुर प्रतिवचनानें मान देणारा कुसुमायुध, यापूर्वीं कधींही जरूर न पडलेल्या मुक्तेच्या मनाच्या समाधानाची प्रक्रिया कशी करावी याविषयीं योजना करीत करीत, स्वतांच्या महालामध्यें आला.

चातुर्यानें दरबारामध्यें घडणारी सर्व हकिगत काढून घेणाऱ्या दासींच्या सांगण्यावरून पतीच्या प्रयाणाची बातमी ऐकून, हेमंतऋतुचा आरंभ झाला असतां कमलिनीची जी दशा होते तीप्रत येऊन पोंहचलेली; पुढें येणाऱ्या वर्षाऋतूच्या प्रभावाचें पुनःपुनः चिंतन करून बावरी झालेली; स्वतां पाळलेल्या मैना, पोपट वगैरे पक्ष्यांचा संभाळ करण्याविषयीं वारंवार सांगून दासींस भय पाडणारी; विधात्यानें ललाटीं लिहिलेलीं अक्षरें काय आहेत याची चौकशी करण्याविषयीं इच्छित असावी अशा प्रकारें वारंवार कपाळावर हात ठेविणारी; निघून जाण्यास तयार झालेल्या प्राणांस पक्की खबर मिळे पर्यंत थांबविण्याविषयीं इच्छित असावी अशा प्रकारें ओठांस मुरडून मुरडून त्यांवर बोट ठेविणारी; आणि शरीरानें कृश होऊं लागली असतांही लांब लांब निःश्वासांच्या प्रवृत्तींनीं फुगल्या आहेत नाकपुड्या जीच्या; अशा मुक्तेपाशीं येऊन, कुसुमायुधानें, भीतभीतच शांतवन करून आणि वर्षाऋतूस आरंभ होण्यापूर्वींच परत येण्याची प्रतिज्ञा करून, प्रवासास जाण्याविषयीं तिची परवानगी मागितली. त्याबरोबर तेच वेळीं वर्षाऋतूचा देखावा दाखवूं इच्छित असावी अशा प्रकारें ती आसवांच्या धारा सोडूं लागली; तोंड खालीं करून संख्येच्या परिमितीवांचून हाराचीं मोत्यें गणूं लागली; भाषण आणि प्राण यांचा, प्रथम कोण निघून जाणार याविषयीं वाद चालू झाला असतां त्यांतून कोण जिंकणार याचा निर्णय करण्यासाठीं वामदक्षिण नाड्यांचा स्वर पाहण्यास इच्छित असावी अशा प्रकारें नासिकेच्या अग्रावर बोटें धरूं लागली; हातांतून कंकणें गळून पडलीं असतां बोटांतून गळून पडलेल्या आंगठ्यांसच

कंकणांच्या जागीं घालूं लागली; स्तनमंडल कृश झाल्याकारणानें आडवें येण्यास असमर्थ असल्यामुळें, आपलें तोंड सहजगतीनें कुसुमायुधाच्या उरावर ठेवून कांहींएक आवाज न करितां, आतले आंत रुदन करूं लागली; संध्याकाळीं याल किंवा सकाळीं याल असें विचारूं लागली; कुसुमायुधाच्या नेत्रांच्या चाळ्यांनींही चमत्कृत होणारी असतांही आलिंगनानेंही या वेळीं चमत्कृत झाल्याशिवाय राहूं लागली; प्रवासामध्यें कुसुमायुधाची बरोबर बरदास्त ठेवण्यासाठीं प्राणांची पहिल्यानेंच रवानगी करूं लागली असावी अशा प्रकारें मोठमोठे निःश्वास सोडूं लागली; भविष्यकाळीं आपली स्थिति कशी होईल याचा खोल विचार करण्यासाठीं ध्यानस्थ बसली असावी अशा प्रकारें मूर्च्छित होऊं लागली; आणि मूर्च्छेंतून शुद्धीवर आली असतां तुह्मी "केव्हां आलां" असें पुसूं लागली.

मुक्तेची स्थिति प्रयाणाला उशीर लावीत असतां आणि पित्याची आज्ञा प्रयाणाची घाई करीत असतां, कुसुमायुधाचें चित्त दोलायमान होऊं लागलें; परंतु क्षत्रियाच्या धर्मानें, पित्याच्या आज्ञेचा पक्ष उचलून धरल्यामुळें, कुसुमायुधाच्या चिताला पित्याच्या आज्ञेकडेसच वळविलें.

दृढ आलिंगन करून, वर्षाऋतूस प्रारंभ होण्यापूर्वींच परत येण्याची वारंवार पुनरुक्ति करून, शास्त्ररीतीप्रमाणें पित्याची आज्ञा आणि क्षत्रियांचा धर्म अनुल्लंघनीय होत हें समजावून सांगून, कुसुमायुध मोठ्या आग्रहानें परवानगी मागत असतां आणि प्रोषितभर्तृकांच्या कर्तव्याचा उपदेश करूं लागला असतां, मुक्ता ह्मणाली:—"प्राणप्रिया ! आपण धर्मानें बांधलेले आहां ह्मणून मी तुह्मांस थांबण्याविषयीं सांगूं शकत नाहीं. तुमचा विरह असह्य होय. यास्तव परत येण्याविषयींही बोलूं शकत नाहीं; औदासीन्य प्रेमाला प्रतिकूळ आहे, ह्मणून 'वाटेल तसें करा' असेंही ह्मणूं शकत नाहीं; आणि आपल्यास कामीपणाचा कलंक

लागण्याच्या भीतीनें 'बरोबर घेऊन चला' असेंही सांगूं शकत नाहीं. अधिक काय बोलूं? आपल्या वियोगसमयीं मला जें कांहीं करावयाचें तें वियोगच मजकडून करवील."

मुक्तेचें भाषण ऐकून मनांत घाबरून गेला असतांही मोठ्या कष्टांनीं उठून व दासींस एकीकडे बोलावून, कुसुमायुधानें त्यांस मुक्तेचा नीट संभाळ करण्याविषयीं बजावून सांगितलें. यानंतर ब्राह्मणांस यथोचित दक्षणा देऊन, त्यांचे आशीर्वाद घेऊन, संग्रामोचित पोषाक करून, आयुधें धारण करून, घोड्यावर स्वार होऊन, आणि विश्वेश्वराचें व जगदंबेचें स्मरण करून, तो चालू झाला.



# प्रकरण ४१ वें.

## दैत्यविनाश आणि आश्रमरक्षण.

कुसुमायुधानें, शहरांतून बाहेर निघतांना सर्व लोकांस यथोचित मान देण्यासाठीं, तसेंच घोड्याच्या वेगानें जाणाऱ्या येणाऱ्या कोणासही हरकत न व्हावी यासाठीं, घोड्यास हळुहळु चालविलें होतें. परंतु शहराच्या बाहेर येऊन रानांत शिरतांच मध्यम वेगानें आणि जेथें जेथें शहरें अथवा गांवें लागत तेथें तेथें मधुर वेगानें तो चालवीत असे. सर्व प्रदेशभर सुख व शांति पसरलेली पाहून आनंदित झालेला कुसुमायुध, त्या त्या प्रदेशींच्या अम्मलदारापाशीं थोडथोडा वेळ थांबून, बंदोबस्तांतला कमीपणा काढून टाकीत आणि लोकांच्या हकिगती ऐकून घेऊन त्यांस योग्य सल्ला देत देत, पित्याच्या आज्ञेवर मुख्य लक्ष्य ठेवून, मोठमोठीं रानें, वनें उल्लंघून जाऊं लागला.

अरण्यांत चालला असतां ग्रीष्मऋतूच्या प्रभावानें कित्येक ठिकाणीं अत्यंत सुकलेल्या; कित्येक स्थळीं वाटसरू लोकांनीं उकरलेल्या डबक्यामध्यें थोडथोडें पाणी असलेल्या; कांहीं ठिकाणीं भेगा पडलेल्या; चिखलानें युक्त असल्याकारणानें याचक लोकांस निराश करणाऱ्या खेदानें भग्नहृदय झाल्या असाव्या अशा दिसणाऱ्या; कित्येक ठिकाणीं निर्धन झालेल्या कुलीन स्त्रियांप्रमाणें याचकलोकांस थोडथोडें देऊन शांत करणाऱ्या; कित्येक ठिकाणीं पालण पोषण करून वाढविले वृक्षांनींही ऐन प्रसंगीं सोडून दिल्यामुळें परिताप पावत असाव्या अशा प्रकारें उकळणारे पाण्यानें युक्त अशा; कित्येक ठिकाणीं शाखांस लागलेल्या दावानलाच्या ज्वालांच्या मिषानें जिभा लांब काढून काढून पाणी मागूं लागलेल्या; कांठा-

वरच्या वृक्षांसही पाणी न देऊं शकणाऱ्या आणि कित्येक ठिकाणीं हरिण वगैरे पशूंस छायेच्या भ्रांतीनें भुलवून चिखलामध्यें रुतवून हैराण केल्यामुळें निर्दयेप्रमाणें वाटणाऱ्या; अशा अनेक नद्या कुसुमायुधाच्या पहाण्यांत आल्या. समुद्र ग्रीष्मऋतूच्या तापानें संतप्त झाला असावा असें समजून त्याला शीतोपचार करण्यासाठीं थंडगार पाणी घेऊन जात असावी अशा प्रकारें कित्येक मोठमोठ्या नद्याही त्याच्या दृष्टीस पडल्या.

"सूर्यही उष्णतेनें संतप्त होऊन आकाशगंगेमध्यें स्नान करण्यास गुंतला असेल काय? सगळ्या पृथ्वीच्या रसाचें भक्षण करून अतिपुष्ट झाल्याकारणानें चालूं शकत नाहीं काय? पृथ्वीवरून निघून जाऊन पाणी मेघामध्यें शिरत असलेलें पाहून त्याला सुकवून टाकण्याच्या उद्देशानें थांबलें असेल काय? अथवा दावानलाच्या फार उंच चढणाऱ्या धुराचे लोट आडवे आल्याकारणानें पुढें चालतां चालतां अडकून राहिला असेल काय?" अशा अशा अनेक कल्पना करणारे; उष्णतेमुळें अत्यंत तप्त झाले असतांहीं चित्तामध्यें धरलेल्या वनितारूप चंद्रिकेमुळें जिवंत राहणारे; हृदयांत वसत असलेल्या वनितांनीं घाबरून जाऊं नये अशा उद्देशानें पाण्यानें भिजलेले रुमाल उरावर दाबून दाबून धरणारे; रस्त्यामध्यें धर्मात्मे लोकांनीं बांधलेल्या कोणत्याही पाणपोईवर पाणी प्याल्यावांचून पुढें न जाणारे; रागावलेल्या वेणेकऱ्याप्रमाणें दिसणाऱ्या सूर्याला पाहून देणेदाराप्रमाणें विवर्ण होऊन गेलेले; आपल्या आश्रयास राहिलेल्या जंगलांचा विनाश झाला असतां वैराग्य धरून बसला असावा अशा प्रकारें दावानलाच्या भस्मानें उद्धूलित झालेले पर्वत पाहून मुक्कामास पोंचण्याची सर्व आशा सोडून देणारे; हिरव्या गवताच्या जमिनीवर फिरणाऱ्या हरणांस अपुरत्याही छायेमध्यें येऊन बसलेले पाहून काळाच्या दुष्टतेविषयीं लांब लांब व्याख्यानें झोडणारे; कोकिल अथवा भ्रमर यांचा शब्द कोठेंही ऐकूं येत नसल्याकारणानें

त्यांच्या महोत्सवाचा अधिमासच आला ह्मणून समजणारे; उन्हानें घेरलेल्या घरट्यामध्यें तमकश्वासाच्या रोग्याप्रमाणें धापा टाकणारे; तसेंच चोंची वांसून व चातकपक्ष्याप्रमाणें पाण्यासाठीं उत्कंठित होऊन घरट्यांतून धबाधब खालीं पडणाऱ्या पक्ष्यांस पाहून दयेला वश होणारे; मध्यान्हकाळच्या प्रचंड उन्हाला फुंकर घालून, भिजवून टाकूं इच्छित असावे अशा प्रकारें धापा टाकणारे; छायेच्या वियोगाहून आपल्या प्रियतमांच्या वियोगाला अधिक असह्य मानणारे; स्वतांची सावलीही पायां पडून प्रचंड उन्हांत न चालण्याविषयीं विनवीत असावी असे दिसणारे; आणि निर्जल प्रदेशामध्येंसुद्धां मोठ्या कष्टानें जिवंत राहिलेल्या हरिणांच्या जीविताचा हेवा उत्पन्न झाल्याकारणानें त्यांस खूब धावाधाव करावयास लावून, मारून टाकूं इच्छित असावीं अशा प्रकारें दूरदूरचें मृगजळ दाखविणाऱ्या, आणि जळाच्या आयुष्याबरोबर दृष्टीचें आयुष्यही हिरावून घेणाऱ्या, सूर्याच्या किरणांचा धिःकार करणारे; अशा शेंकडों पथिकलोकांकडे पाहून कुसुमायुध अशा ग्रीष्मऋतूला नांवें ठेऊं लागला. त्याच प्रमाणें या ऋतूंतील चंद्राचे किरणांच्या हलक्या, सूक्ष्म, स्वच्छ, पांढऱ्या वस्त्रांचा, अम्ल मधुर अशा पेयांचा, कारंजांचा, पंख्यांचा, वाळ्याचा, चंदनाचा, कापुराचा, सुगंधयुक्त पुष्पांचा, सारंगरागाचा, अशोकाच्या वगैरे नवपल्लवांचा, केळीचा, गर्द छायेचा, शीतळ जळाचा, सायंकाळचा, जलविहाराचा, मोत्यांच्या आभरणाचा, आणि आतांच न्हालेल्या कांतांच्या कुचमंडलांचा आणि मांड्यांचा ग्रीष्मऋतु खरा गुण जाणणारा आहे असें जाणून तो त्याची वाखाणणीही करूं लागला.

दिव्य घोड्यावर बसल्यामुळें उच्चैःश्रव्यावर बसून दैत्याला मारण्यास निघालेल्या इंद्राप्रमाणें शोभणारा कुसुमायुध, अनेक देश, अनेक अरण्यें आणि कित्येक योजनें यांचें उल्लंघन करून, संध्याकाळीं मुनीच्या आश्रम-

मंडलांत येऊन पोंचला. ऋषींनीं मोठ्या प्रेमानें त्याचा सत्कार करून, एका अशोक वृक्षाच्या बुंध्याला घोडा बांधून, धर्माच्या जन्मभूमी-प्रमाणें, वेदाच्या विहारस्थलीप्रमाणें, आणि आश्रममंडळांच्या शोभे-प्रमाणें दिसणाऱ्या एका पर्णशालेमध्यें त्यास उतरावयास जागा दिली. कुसुमायुधानें, मुनींच्या पायांस अभिवंदन करून आणि मुनिपत्नींस प्रणाम करून, आश्रमांतील निवासी जन, वृक्ष, पशु आणि अग्निहोत्र यांच्या संबंधानें कुशलप्रश्न विचारिले असतां, ऋषि बोलले कीं "महाराज! आपल्या आगमनानें आह्मीं आश्रमाच्या भाग्याचा उदय आणि आ-श्रमाचा विध्वंस करणाऱ्या दैत्याचा क्षय झालाच ह्मणून समजतों. खरेंच, वेदांताचा बोध कानावर न येई तों पर्यंतच मुमुक्षूस कुतार्किकांचा त्रास भोगावा लागतो."

मुनींच्या भाषणांनीं प्रसन्नचित्त होऊन, प्रणामांबद्दल त्यांचे अमुल्य आशीर्वाद घेऊन, आपल्या उतरण्याच्या जागीं येऊन व शारीरिक क्रिया आटपून घेऊन, कुसुमायुध भेटावयास येणाऱ्या ऋषींबरोबर दैत्याच्या कपटाविषयीं हकिगतीच्या गोष्टी बोलत बसला आणि रात्रीचा बराच भाग या गोष्टी सांगण्यांतच त्यानें घालविला. प्रातःकाळीं उठल्याबरोबर तो दैत्याचा शोध लावण्याकरतां बाहेर पडला.

"जोंप्रर्यंत आश्रमामध्यें यत्किंचितही विघ्नसंबंधीं पीडा शिल्लक असेल, जोंपर्यंत दैत्यांच्या जातीचें दुर्भिक्ष पडणार नाहीं तसेंच जों-पर्यंत दैत्यांस या आश्रममंडलामध्यें येऊन विघ्न करण्याची उमेद व्हावी अशी स्थिति राहील तोंपर्यंत माता, पिता कीं मुक्ता यांस तोंडही दा-खवावयाचें नाहीं" असा मनाचा संकल्प करून, आणि प्राप्त झालेला समय हा एक यशाच्या खरेदीचा बाजारच होय असें समजून, कुसुमायुध सर्व तयारीनिशीं घोड्यावर बसून आश्रममंडलामध्यें फिरूं लागला. त्या बरोबर शेंकडों दैत्य त्रास पावून पाताळांत पळून गेले, शेंकडों युद्ध

करावयास आले असतां दिव्यावर येणाऱ्या पतंगांच्या दशेला प्राप्त झाले आणि शेंकडोंजण कुसुमायुधाच्या यशाबरोबरच द्वीपांतरास पळून गेले.

कुसुमायुधाच्या प्रभावानें आणि पराक्रमानें आश्रममंडल दैत्यांच्या उपद्रवापासून मुक्त झालें. ऋषि निर्भयपणें आपापल्या क्रिया करूं लागले. ऋषिपत्नी झाडीच्या अंधकारामध्येंही निःशंकपणें वावरूं लागल्या आणि पाणी भरण्यास जाण्याचीं वगैरे गृहकृत्यें निःशंकपणें करूं लागल्या. ऋषिकुमार एकांतस्थळीं बसून उंच स्वरानें वेदाध्ययन करूं लागले. ऋषिकन्या सुंदर गीतें गात गात दूरच्याही जलाशयामध्यें आंग धुण्यास वगैरे जाऊं लागल्या. आश्रम वृक्ष, पत्र, पुष्प आणि फळ यांहीं भरपूर होऊं लागले. आणि गाई जंगलांत दूर चारा खाऊन येऊन सुरक्षितपणें रवंथ करीत करीत निद्रासुख घेऊं लागल्या.

थोड्याच अवकाशांत सर्व आश्रममंडल निर्भय करून सोडून भविष्यकाळींही मुनिजनांस तेथें उपद्रव होणार नाहीं अशी खात्री करून, कीर्तिसहित त्यांचे पवित्र आशीर्वादही संपादून सर्वांस प्रणाम करून व त्यांची अनुज्ञा घेऊन, वियोगसमयींच्या मुक्तेच्या दीन स्थितीचें स्मरण करीत करीत आणि वर्षाऋतूच्या प्रारंभापूर्वींच हातीं धरलेलें कृत्य समाप्त झालें ह्मणून आनंदित झालेल्या कुसुमायुधानें आपल्या दिव्य घोड्याला पित्याच्या राजधानीकडे चालविलें.



# प्रकरण ४२ वें.

## कपट.

मुक्तेला प्रसन्न करण्याविषयीं अनेक संकल्प करणारा; दुरूनही रूपानें आणि गुणानें मुक्तेचें दर्शन करविणाऱ्या वियोगाचीही वाखाणणी करणारा; शेंकडों योजनें धाई धाईनें उल्लंघन करणाऱ्या घोड्याच्या वेगालाही अल्प समजणारा; विरहामध्यें सुद्धां टवटवीत राहिलेलें आपलें जीवित मुक्तेच्या स्मरणरूप रसायनानेंच टिकलें असें समजणारा; हृदयामध्यें मुक्तेच्या मुखचंद्राचें सान्निद्ध्यच असतांही वाढत जाणाऱ्या तापानें विस्मय पावणारा; मोठमोठ्या अस्त्रांचें निवारण करण्यास समर्थ असतांही कामदेवाच्या अस्त्रांचें निवारण न करूं शकणारा; त्रैलोक्याला वश करण्यास समर्थ असतांही मनाला वश न करूं शकणारा; मुक्तेकडे पाठविलेलें हृदय परत न आल्यामुळें शून्यहृदय झाला असावा असा भासणारा; दयाळु असतांही हृदयरूप समुद्रामध्यें बुडालेल्या मुक्तेला त्यांतून ओढून बाहेर न काढणारा; मुक्ता हृदयांतच राहिली असतांही तिचें दर्शन न झाल्याकारणानें अत्युत्कंठित झालेल्या नेत्रांनीं दर्शन करविण्याविषयीं वारंवार विनवण्या केलेल्या ऐकणारा; मुक्तेला कामदेवाच्या बाणांनीं व्याप्त झालेल्या हृदयामध्यें आश्रय न मिळाल्याकारणानें त्यांतून बाहेर येऊन समोर उभी राहिलेलीच पाहणारा; मुक्तेला भावनेच्या बळानें पाहत असतांही ती भावना खोटी, कल्पनारूप आहे, असें भासविणाऱ्या जाग्रत अवस्थेचा धिःकार करणारा; "मी कामदेवाच्या आज्ञेचें उल्लंघन करून आश्रममंडळामध्यें गेलों ह्मणून त्यानें मजवर राग करून माझ्या

हृदयाचें मंथन करण्याकरितां त्यांत मुक्तेला आणून घातली असेल काय?"
याप्रमाणें कल्पना करणारा; मुक्तेला कामदेवानें बाणरूपी कोरणीनें कोरलेल्या आपल्या हृदयामध्यें वज्रलेपानें मजबुत बसविलेली असावी असें मानणारा; मन मुक्तेच्या निर्विकल्प समाधीमध्यें लागून राहिलें असतांही तें संतापानें पीडित झालेलें पाहून विस्मय पावणारा; उद्भिन्न झालेल्या रोमावलीवरून, हृदयाच्या आंत खुपसलेल्या कामदेवाच्या बाणाच्या पिसाऱ्याची कल्पना करणारा; चित्त हृदयांत वसलेल्या मुक्तेच्या स्तनमंडलामध्यें कैदी होऊन राहिलें असतांही वाराणसीकडे धावत चाललें आहे असें पाहून त्याच्या शक्तीची प्रशंसा करणारा; संयोगसमयीं अमृताची वृष्टि करण्याची आणि वियोगसमयीं धगधगणारे अंगार ओंतण्याची कामदेवाच्या बाणांच्या आंगची विलक्षण शक्ति पाहून कामदेव आपल्याहूनही धनुर्विद्येचा अधिक अभ्यास केलेला समजणारा; भुजांवरून मणगटावर उतरणाऱ्या सलकड्यांना वारंवार मागें सारणारा; ज्या ज्या दिशेस दृष्टि फिरेल त्या त्या दिशेमध्यें मुक्तेला पाहणारा; आणि त्यांतही एकच आकृतीची नव्हे तर क्षणांत विपरीत रतीतें मोतींलग ललाट धारण करणारी, क्षणांत आपल्या ललाटाचें चुंबन करणारे चरण धारण करणारी, क्षणांत पिचकारीच्या धारांनीं विपरीत वर्तन पावणारी, क्षणांत तलावामध्यें मासळीला पाहून वावरल्यानें कंठाला चिकटून राहणारी, क्षणांत मद्यपानानें वश होऊन तुटक तुटक अक्षरें बोलणारी, क्षणांत कोंबड्याच्या प्राभातिक ओरडण्यानें खेद पावणारी, आणि क्षणांत नेत्रांस अश्रूंनीं मळवून टाकून लुगड्याचा पदर धरून उभी राहिलेली, अशा मुक्तेस पाहून, कुसुमायुध, दैत्यस्त्रियांच्या अश्रूंच्या प्रवाहाप्रमाणें काळवट पाण्यानें भरलेली, हंसांनीं आणि प्रफुल्लित झालेल्या कमळांनीं मुक्तेच्या गतीचें व नेत्रांचें स्मरण देणारी, भागीरथीमध्यें मिळून गेल्याकारणानें सर्व स्त्रियांस सवतींशीं मिळून मिसळून वागण्याची शिकवणी देत आहे अशी दिसणारी,

आणि ग्रीष्मऋतूच्या प्रभावालाही न जुमानणारी, अशा यमुनानदीच्या तीरावर येऊन पोंचला.

कुसुमायुध यमुनेच्या तीरावर आला. तेथें सूर्याच्या शौर्याला अपवादाप्रमाणें, उष्णतेला घातस्थळाप्रमाणें, दावानलाला शत्रूप्रमाणें आणि वृक्षांला अंधकाराप्रमाणें व्याप्त असल्याकारणानें आपल्या तमोगुणमयपणाला सुचवीत असावा; सूर्याच्या किरणांच्या स्पर्शानेंही विटाळ झाला ह्मणून समजत असावे अशा प्रकारें शाखारूप हातांनीं, यमुनेचें पाणी पुनःपुन्हा घेऊन, प्रोक्षण करूं लागलेल्या वृक्षांमुळें स्वतांचा दांभिकपणा जाणवीत असावा; ऋतूच्या नियमांचें उल्लंघन करून धारण केलेल्या सर्व प्रकारच्या पुष्पफळादिकांच्या समृद्धीनें स्वतांच्या मायामयपणाची सूचना देत असावा; पुष्परूप अनेक ताऱ्यांच्या पडण्यानें स्वतांचा उत्पातमयपणा उघड करीत असावा; वृक्षांमध्यें अडखळत अडखळत परत फिरणाऱ्या अग्निहोत्राच्या धुराला मेघ समजून आणि पाणी भरतांना होणाऱ्या कलशांच्या ध्वनीला गर्जना समजून, फसलेल्या मयूरांनीं स्वतांच्या ठकपणाला सुचवीत असावा; आणि सिंहिणींनीं चाटून चाटून स्वच्छ केलेल्या मृगशावकांनीं, आपली सृष्टि विधात्याच्या हातानें बनलेली नाहीं असें जाणवीत असावा; असा एक रमणीय आश्रम त्याच्या पाहण्यांत आला. हा आश्रम, पूर्वीचें वैर स्मरून भीमासुराचा बंधु शुंभासुर यानें कुसुमायुधाला ठकविण्याकरितांच कपटानें उत्पन्न केला होता.

मध्यान्हसमयींच्या उष्णतेनें संतप्त झालेला; मुक्तेच्या विरहानें व्याकुळ झाल्याकारणानें इंद्रियावरही बरोबर स्वामित्व न राखूं शकणारा; विरहाचें विस्मरण करण्यामध्यें क्षणक्षणीं मूर्च्छेला उपकार करणारी असें मानणारा; दिव्य घोड्याच्या प्रभावानें वाराणसींत लौकरच येऊन पोंचण्याला सोईचा असतांही विरहानें प्राप्त झालेल्या

शरीर शैथिल्यामुळें घोड्याला पूर्ण वेगानें न चालवूं शकणारा; मुक्तेच्या विलासांलाच जीविताचें फळ ह्मणून समजणारा; मुक्तेला रडत सोडून आल्याकारणानें स्वतांला केवळ धूर्तच मानणारा; मुक्तेपासून क्षण-मात्रही न ढळणाऱ्या आपल्या मनाला स्वतांच्या शरीराहून अति भाग्यशाली ह्मणून गणणारा; हृदयामध्यें वास करणाऱ्या मुक्तेच्या अश्रुप्रवाहांनीं आपलें सर्व धैर्य धूपून गेलें असें मानणारा; कामदेवाच्या बाणांनीं आपलें हृदय उकरलें गेलें ह्मणून समजणारा; आणि आश्रमाच्या अंधकारानें हृदयांत दुप्पट अंधकार प्राप्त झाला असें लेखणारा; कुसुमायुध फक्त पाणी पिण्याच्या उद्देशानें त्या आश्रमांत शिरला आणि घोड्याला एका झाडाखालीं बांधून जलाशयाकडे चालला.

कुसुमायुध जलाशयाकडे जात असतां तेथें रमणीय पर्णशाळेच्या आंत पद्मासन घालून बसलेला; कलियुगाच्या अवयवांस रुद्राक्षांचें रूप देऊन त्यांस धारण करून बसला असावा असा; वारंवार प्रणवाच्या उच्चारानें चलित होण्याऱ्या लांब आणि पांढऱ्या दाढीनें शोभणारा; सर्वांगीं भस्मानें उद्धूलित झाल्याकारणानें दावानलाच्या राखाडीनें व्याप्त झालेल्या पर्वतशिखराप्रमाणें दिसणारा; मनांत आणलेल्या पापकर्मांचा कधींहीं विसर न पडावा ह्मणून गणीत बसला असावा अशा प्रकारें जप-माळेचे मणी फिरवणारा; दृष्टि नाकाच्या अग्रावर ठेवून शत्रुजिताच्या कु-टुंबाचें अमंगळ करण्याविषयीं चिंतन करणारा; त्रिपुंड्राच्या रेखांनीं देदीप्यमान दिसत आहे ललाट ज्याचें असा; खांद्यापर्यंत येऊन पोंह-चलेले लांब कान असलेला; लांब, सडक, पिंगट जटेनें झांकलेली पाठ असलेला; अद्भुत जरेनें व्याप्त झाल्याकारणानें अनेक प्रलयांचें निरीक्षण केलें असावें असा दिसणारा; निरनिराळ्या प्रकारें सेवा करण्यांत गुंतलेल्या अनेक शिष्यांनीं घेरलेला; सर्पाच्या कांतीप्रमाणें पांढरें आणि हलकें यज्ञोपवीत असलेला; पांढऱ्या केंसांच्या झुबक्यानें झाकल्यामुळें छिद्रच

नसावें अशा नाकपुड्या आहेत ज्याच्या असा; दावानलाच्या ज्वाळां प्रमाणें बाहुल्या असलेला; आणि पापण्यांकेसरहित असतांही भुवयांच्या केसांनीं झांकलेले डोळे आहेत ज्याचा असा; एक महामुनि त्याच्या दृष्टीस पडला.

कुसुमायुध, मुक्तेच्या विरहानें तसाच तृषेनें पीडलेला असतांही, धार्मिकपणामुळें, प्रथम या मुनीजवळ जाऊन, प्रणाम करून उभा राहिला. मुनीनें, मोठा सत्कार करून, जवळ बसवून घेऊन, हकिगत विचारली असतां, कुसुमायुधानें, सर्व हकिगत त्यास कळविल्यावर, पाणी पिण्यास जाण्याविषयीं अनुज्ञा मागितली. निर्मळ अंतःकरणांचीं मनुष्यें दुसऱ्यासही स्वतांप्रमाणें निर्मळ अंतःकरणाचेच समजतात. कुसुमायुधाकडील हकिगत ऐकून त्या कपटवेशधारी मुनीनें "तुह्मी माझे अतिथि आहां, अतिथीची सेवा करणें हा सर्व मनुष्यांचा सामान्य धर्म आहे" असें ह्मणून, शीतलतेनें बर्फाचाही तिरस्कार करणारें, ग्रीष्मऋतूचा ताप क्षणांत परिहार करणारें, आणि वाळा वगैरे सुगंधी पदार्थांनीं सुवासयुक्त केलेलें पाणी, शिष्याच्या हातीं मागवून, कुसुमायुधास प्यावयास दिलें आणि कुसुमायुधास वाराणसीस जाऊन पोंहचण्याची घाई असल्याकारणानें नको नको ह्मणत असतांही फारफार आग्रह करून अति मधुर फळेंही कित्येक खावयास दिलीं. जळपान आणि फळभक्षण केल्यावर आराम पावलेल्या कुसुमायुधानें, स्वाभाविक औदार्यानें, ब्राह्मणाच्या उपकाराची फेड क्षत्रियांनीं लौकरच करावी अशा धर्मसंबंधी प्रेरणेनें आणि दैवगतीच्या अनिवार्य खेळानें, "आपल्यास जें पाहिजे असेल तें मागा" अशी विज्ञाप्ति केली असतां, कुसुमायुधाला फसून जाळ्यांत सांपडलेल्या पक्ष्याप्रमाणें समजून आणि आपल्या मनोरथाची सिद्धि झाली असें मानून त्या पापी राक्षसानें त्याला खालीं लिहिल्याप्रमाणें ह्मटलें.

" कुमार महाराज! माझ्या मनामध्यें जी ईच्छा दीर्घकाळापासून घोळत आहे ती मी आपल्याजवळ निवेदन करतों आणि आज दिवस पर्यंत आपल्या कुळामध्यें प्रतिज्ञेचा भंग करणारा कोणीही उत्पन्न झाला नाहीं ह्मणून माझी प्रार्थना सफळ झालीच असें मानतों. रणभूमीवर परम उत्साहानें शरीराचा त्याग करणें एक वेळ सोपें आहे परंतु याचकजनाजवळ परम उत्साहानें धनाचा त्याग करणें ह्मणजे मोठें कठीण. सोधूं जाणाराला शूर, पंडित, वक्ता अथवा विरक्त कोठेंतरी सांपडेल अशी खात्री असते परंतु दाता सांपडण्याची खात्री वाटत नाहीं. शाळेंत सगळ्या अक्षरांचा एकाच रीतीनें आभ्यास केला असतांही कृपण लोकांस नकार आणि उदार लोकांस हकार विशेष उपस्थित होतो. धनाचा त्याग तर दात्याला आणि अदात्यालाही करणें प्राप्त आहे, तरी दाते जीवमान असतां आणि अदाते मेल्यानंतर तो करितात एवढाच विशेष. नपुंसक पुरुष जसे स्त्रीच्या अंगावर हात फिरविण्यानेंच खूष होतात त्याचप्रमाणें लक्ष्मीवर हात फिरल्यानेंच खूष होणारे कृपण मनुष्य लक्ष्मीरूपी व्यभिचारिणी स्त्रीनें आपला केलेला उपहासही ओळखूं शकत नाहींत. लक्ष्मीरूप वेश्या कृपण मनुष्यास, स्वतांत्र नेहमी चिकटून राहिल्याकारणानें, तुच्छ मानून उपभोगही घेऊं देत नाहीं, परंतु उदार, खंद्या, तरुण पुरुषाला ती इतकी वश्य होऊन जाते कीं त्यांस यथेष्ट उपभोग मिळून आणखी त्यांच्या मर्जीप्रमाणें दुसऱ्यांपाशीं जाऊनही त्यांचेंच हित करते. कृपण मनुष्य लक्ष्मीला आपलें जीवित समजत असावे अशा प्रकारें ते कोणास कांहींही देऊं शकत नाहींत; ती शरणागत आली असें मानून ते तिला सोडूंही शकत नाहींत; आपली पुत्री होय असें समजून भोगूं शकत नाहींत; व्यभिचारणी असावी असें समजून निरंतर रक्षण करण्यांत तत्पर रहातात; व्याधिग्रस्त असावी असें समजून ते तिचेसाठीं रात्रंदिवस जाग्रणही

करितात; विषारी असावी असें समजून उपभोगापासून दूर रहातात; महापाप असावें असें समजून कोणाच्या लक्षांतही येऊं देत नाहींत; गुप्त ठेवलेला हरामखोर असावा असें जाणून विचारणाऱ्यापाशींही नन्नाचा पाढा वाचतात; भगवद्भक्ती असावी असें समजून मरेतोंपर्यंतही तिला विसरत नाहींत; मुठींत लपलेली असावी असें मानून मूठ उघडीतच नाहींत; याचकांच्या स्पर्शानें विटाळत असावी असें मानून त्यांजपासून तिला दूर ठेवितात; म्हातारी आजीबाई असावी असें मानून मरतेवेळीं मुलांसही तिला जपण्याविषयीं शिफारस करून जातात; ज्वराची पीडा असावी असें मानून कडवेपणाचेंच सेवन करितात; आणि क्षयरोगी असावी असें मानून यावज्जीव बृंहण उपायांचीच योजना करितात. अशा अनेक कारणांनीं कृपण मनुष्य धिक्कारालाच पात्र आहे. तुमच्यासारखे महाशय पुरुष दानानें आणि उपभोगानेंच धनाचें साफल्य समजतात. संचयामध्यें नव्हे तर दानामध्येंच प्रतिष्ठा मानतात. संपतिरूप मोठ्या रोगानेंही आंधळे, बहिरे, किंवा मुके होऊन बसत नाहींत. लक्ष्मीरूप मदिरेनेंही मार्गभ्रंश अथवा अपभाषण वगैरे कसलीही विकृति पावत नाहींत. सर्व प्रकारें सुखी असतांही परक्याच्या पीडेचें दुःख ओळखूं शकतात. धनरूप ऊष्म्यानें भरलेले असतांही दुसऱ्याच्या संतापाला शांत करितात. दयेमुळें याचकांचीं दीनस्वर, कंप इत्यादि मरणसमयासारखीं चिन्हें पाहण्याला नाखुष असल्याकारणानें पहिल्यानेंच त्यांचे मनोरथ पूर्ण करण्याचें वचन देतात. धनाला हाताच्या मळासमान समजून तें देऊन टाकण्यास यत्किंचितही उशीर लावीत नाहींत. याचकांस पाहून आनंद मानण्याहूनही त्यांस पाहिजे तें देण्यांतच जास्त आनंद मानतात. प्रतिज्ञाभंगाला प्राणाच्या भंगाप्रमाणेंच लेखितात. दान करण्यांत पाठ दाखविणें ह्मणजे युद्धांत पाठ दाखविण्याप्रमाणेंच होय असें मानतात. दानाचा संकल्प करते वेळीं

हातांत धरलेल्या दर्भावरून धन तृणसमान समजतों असें सुचवितात. आणि या लोकीं एकपट देऊन परलोकीं सहस्रपट परत घेणारे पक्के मारवाडी असतांही स्वतां कीर्तीलाच पात्र होतात. अशा अनेक कारणास्तव दात्या पुरुषास मी सहस्रवेळां अभिवंदन करितों.

"कोण जाणे, कुसुमायुध निसटून तर जाणार नाहीं?" अशा भयानें मधून मधून लांब लांब गोष्टी सांगूं लागलेल्या कपट मुनीला, प्रियेकडे त्वरित जाण्याच्या उत्कंठेमुळें कुसुमायुधानें, "माझी निंदा श्रवण करण्यापेक्षां आत्मस्तुतीच्या श्रवणानें मला अत्यंत लाज वाटते यासाठीं आपण माझी स्तुति न करतां जें कांहीं मागणें असेल तें मागावें," असें सांगितल्यावर तो कपट मुनि बोलला कीं "मला धर्माच्या अभिवृद्धीसाठीं यज्ञ करावयाचा आहे आणि त्या संबंधांत कित्येक इष्टिही कराव्या लागतील; पण ऋत्विजांस दक्षिणा देण्यासाठीं मजपाशीं धन नाहीं. यासाठीं मागणें ह्मणून इतकेंच कीं तुह्मी जो हा हार गळ्यांत घातला आहे तो मला द्यावा आणि मी प्रजांच्या कल्याणासाठीं पाण्यांत शिरून वरुण देवाची स्तुति करून परत येतों तोंपर्यंत तुह्मी एथें राहून या माझ्या आश्रमाचें संरक्षण करावें ह्मणजे झालें."

कपट मुनीचें हें मागणें ऐकतांच, युद्धांतल्याप्रमाणें दानांतही शौर्य दाखविणारा कुसुमायुध प्रफुल्लित झाला; रोमांचित झाला; कुलीनपणाच्या आणि प्रभावाच्या प्रौढीनें स्वतांच्या अंगाकडे पाहूं लागला; राज्य-लक्ष्मीचें महत्व मनांत आणून हाराची मागणी ह्मणजे काय, अगदीं हलकी असेंच गणूं लागला; मंदहास्यच करूं लागला; "हार मागण्या-करितां एवढा स्तुतिपाठ कशासाठीं करावा लागला असेल?" असा भुवया चढवून विचार करूं लागला; आणि ब्राह्मणाच्या निर्धनपणाचा विचार मनांत आणून मनाला ठिकाणावर आणून बसवूं लागला; परंतु आश्रमांत अडकून बसण्याच्या प्रार्थनेला तर अकस्मात येऊन पडलेल्या उत्पाता-

प्रमाणेंच लेखूं लागला. आश्रमांत अडकून बसण्यास नाखुष असतांही धर्माच्या बंधनाला नागपाशाच्या बंधनाहूनही अधिक बळकट ह्मणून समजणारा ; प्रतिज्ञेचा भंग पुरुषपणाची हानि करणारा ह्मणून समजणारा ; वचनांत बदल करणें ह्मणजे पित्याचाच बदल करण्याप्रमाणें होय असें मानणारा ; आणि कामाच्या हानीपेक्षांही धर्माची हानि अधिक दुःख देणारी आहे असें मानणारा; अशा कुसुमायुधानें, चंद्राच्या कांतीची स्पर्धा करणारा, मुक्तेच्या कुचमर्दनाच्यावेळीं साक्षी असणारा, मुक्तेच्या कठोर कुचांवर रुळल्यामुळें चुरला असतांही ताजा टवटवीत राहिल्याकारणानें मुक्तेनें जणों दिलेलें शिफारसपत्रच अशा भासणाऱ्या मुक्तेच्या अंगरागानें अंकित झालेला, हृदयांत वास करणाऱ्या मुक्तेच्या मंदस्मितानींच बनविला असावा असा दिसणारा, क्षीरसागराच्या आणि चंद्राच्या हृदयानेंच बनविला असावा असा भासणारा, एकत्र जमलेल्या सद्गुणांचा समूह होय असा दिसणारा, सर्व रत्नांचा अध्यापक होय असा वाटणारा, सुरतप्रसंगीं मुक्तेच्या स्तनमंडलाचा स्पर्श मिळाल्यानें आपला गुणीपणा आणि विद्ध झाल्याचे सर्व कष्ट सफळ झाले असें जाणून किरणांच्या प्रसाराच्या मिषानें फुललेला असावा असा भासणारा, भुजांवर धारण केलेल्या रत्नगर्भा पृथ्वीचा रत्नमय प्रसवच होय असा दिसणारा, आणि दैत्यावर विजय पावून मिळविलेल्या यशाचा पुंजच होय असा भासणारा, तो अतिसुंदर हार गळ्यांतून काढून संकल्पपूर्वक मुनीच्या हातांत देऊन कुसुमायुध ह्मणाला, "तुह्मीं सुखानें वरुणदेवाकडे जावें, तुह्मी परत येईपर्यंत मी तुमच्या आज्ञेप्रमाणें एथें रहातों, आणि आश्रमाचें रक्षण करितों. मी एथें असल्यावर कोणीही दुष्टजन तुमच्या आश्रमास येऊन कसलाही उपद्रव करूं शकणार नाहीं, यास्तव निश्चित असा आणि इष्टकार्य सिद्धीस नेऊन लौकर परत या, ह्मणजे मला माझ्या मातापित्यांच्या चरणसेवेला वेळेवर जातां येईल."

फार दिवसांचा सूड उगवण्याची मनाप्रमाणें योजना झाल्यानें उत्पन्न झालेला अपूर्व आनंद, यज्ञाचें साहित्य मिळाल्यानें झालेल्या खोट्या आनंदाची मुद्रा दाखवून, लपवून नेऊं पाहणारा शुंभासुर, तो हार हातांतच ठेवून, शिष्यांस डोळे मिचकावून इषारा देत देत, त्वरितच तेथून चालता झाला, तो यमुनेच्या पाण्यांत शिरला आणि धर्मानें बद्ध झालेला, सरळ मनाचा कुसुमायुध त्याच्या आश्रमाचें रक्षण करीत बसला.



# प्रकरण ४३ वें.

## अनिष्टचिंतन.

वृद्धब्राह्मणाचा वेष धारण करून पापबुद्धि शुंभासुर, यमुनेच्या पाण्यांतून गंगेच्या पाण्यामध्यें शिरून, परभारेंच शत्रुजिताची राजधानी वाराणसी तीस जाऊन पोंहचला. पापबुद्धि लोकांस निर्मळ करण्याच्या तीर्थांच्या कीर्तीला कलुषित करणारा आणि राजकुटुंबाला दुःखित करण्यासाठीं रूपांतर करून आलेला, त्याच्या पूर्वजन्मींच्या पापाचा जणों समूहच होय अथवा कांहीं मोठा उत्पात होय असा दिसणारा, शुंभासूर जेव्हां वारणसीमध्यें शिरला, त्यावेळीं शत्रुजित, मनोरमा आणि मंत्री हीं सर्व जण, 'फार दिवस झाले, कुसुमायुधाचा कांहीं ठिकाण नाहीं' ह्मणून चिंतातुर होऊन बसलीं होतीं; जोशांकडून प्रश्न पाहवीत होतीं; निरनिराळ्या देवांस नाना प्रकारचे नवस करीत होतीं; ब्राह्मण अनुष्टान करण्यासाठीं बसवीत होतीं; आणि याशिवाय नाना प्रकारच्या दैविक आणि लौकिक उपायांच्या योजना करवीत होतीं. कुसुमायुधाच्या प्रयाणदिवसापासूनच कृष्णपक्षांतील चंद्रकलांप्रमाणें अधिक अधिक क्षीण होऊं लागलेली; विषाप्रमाणें जास्ती जास्ती भिनणाऱ्या विरहाच्या परितापानें घाबरून जाणारी; कुसुमायुधाचा विरह होतांच न जाणाऱ्या प्राणांस फक्त दुःख भोगण्यासाठींच टिकून राहिले ह्मणून समजणारी; जन्मांतरींच्या पापांसच प्राणांचा बचाव करणारीं ह्मणून मानणारी; कामदेवाला दग्ध केला असतांही साफ निर्मूळ न करणाऱ्या सदाशिवाच्या कोपाग्नीचा धिक्कार करणारी; हृदयाचा दाह होत असतांही त्यांत बसलेला कामदेव दाह पावत नसल्या-

कारणानें विस्मय पावणारी; चंद्राचे किरण विरहिणींच्या अंगाचा दाह करणारे होत असें समजून खरोखर दग्ध होण्यासाठीं वारंवार रात्रीं त्यांचें सेवन करणारी; कामदेवाला अगदीं निर्मूळ करून टाकण्याची विज्ञप्ति करण्याच्या उद्देशानें शिवलोकीं जन्मांतर होवो असें मागणारी; दर्पण, आभरण, तसेंच चंदन इत्यादि पदार्थ विषमय आणि अग्निमय होत असेंच मानणारी; चंद्राचे किरणांचें सेवन करीत असतांही शरीर दग्ध न झाल्याकारणानें साहित्यशास्त्रास खोडसाळपणाचा बोल लावणारी; "चंद्राच्या किरणांमध्यें दाहकपणा नाहीं तर विषारीपणा आहे" अशी कल्पना करणारी; कुसुमायुधाला निर्दय समजून त्याचा पक्षपात करणाऱ्या कामदेवाला महामूर्ख ह्मणून गणणारी; पलंगास निखाऱ्यांनीं भरलेला ह्मणून समजणारी; मूर्च्छेला उपकारक मानणारी; स्वप्नामध्यें कुसुमायुधाच्या समागमाचें सुख देणारी निद्रा यावी ह्मणून योजना करीत असतांही, काय कारणास्तव येत नाहीं ह्मणून निद्रेला आपली वैरिणीच होय ह्मणून मानणारी; कामदेवरूपी अग्नीच्या ज्वाळा स्नानादिक उपचारांनींही शांत होत नाहींत असें पाहून कामदेवाला केरोसीन तेलानेंच निर्माण केला असावा अशी कल्पना करणारी; बाहेरून ज्वाळांचा लेशही न दिसून येतां, आंतून पेटत असणाऱ्या आपल्या कायेला कुंभाराच्या भट्टीची उपमा देणारी; कमल, पत्र, पल्लव, चंदन इत्यादि शीत उपचार आपल्या शरीराच्या स्पर्शानेंच सुकून जातांना पाहून कामदेवाला महादेवाच्या ललाटाग्नीनेंच पेटणारा समजणारी; अनुरागरूपी कुपथ्याच्या सेवनानें आपण कृश झालेली जाणीत असतांही अनुराग न सोडूं शकणारी; ज्याच्या समागमामध्यें पुष्पमाळेची आडकाठीही सोसवत नव्हती तो आज अनेक योजनें दूर असलेला पाहून कोठेंही खेदाची सीमा न पाहणारी; पंख्याच्या वाऱ्यानेंही हृदयाचा अग्नि प्रज्वलित होण्याची शंका धरणारी; दाह पावणाऱ्या हृदयांतूनही

दूर न सरणाऱ्या जीवनाला अग्निस्तंभनाची करामत साध्य असावी असें मानणारी; ध्यान हें ध्येयाचें स्वरूप जाणवितें असें योगशास्त्रामध्यें वाचण्यांत आलें असल्यावरून "असें कांहीं पुरुषपण प्राप्त झाल्याकारणानें कुसुमायुधाशीं भोगिलेल्या रतिसुखापासून भ्रष्ट होईन कीं काय" असा संशय धरून त्याच्या ध्यानानेंही भय पावणारी; भय पावत असतांही कुसुमायुधाच्या ध्यानाला न सोडूं शकल्याकारणानें घाबरी होणारी; कुचमंडलामध्यें धनुष्य सज्ज करून बसलेल्या कामदेवाची मूठ शिथल करून टाकूं इच्छित असावी अशा प्रकारें अश्रुधारांनीं कुचमंडलाला भिजवून टाकणारी; स्तनमंडलामध्यें वसणाऱ्या कामदेवाला शंकराच्या कोपाग्नीनें भस्मावशेष करून टाकिलें असें जाणून त्यास पार उडवून देऊं इच्छित असावी अशा प्रकारें दीर्घ निःश्वास टाकणारी; अश्रूंनीं पलंगपोस भिजवून टाकीत असल्याकारणानें वारंवार बदलण्यासाठीं दासींसही आपल्या बरोबरच निद्रासुख न घेऊं देणारी; प्रभात काळच्या चंद्राप्रमाणें दिसणाऱ्या गालावर हात टेकून बसणारी; मोत्यांप्रमाणें अश्रुबिंदूंनीं व्याप्त होणाऱ्या पापण्या वारंवार पुसून काढणारी; कुसुमायुधाबरोबर जाण्याचा आग्रह न करूं देणाऱ्या लज्जेचा वारंवार तिरस्कार करणारी; एकाग्र मनानें नाकाच्या अग्रावर दृष्टि ठेवीत असल्याकारणानें जणों योगसाधन करीत असावी अशी भासणारी; संकल्प करकरून स्वतांच वाढविला असतांही स्वतांलाच विंधून टाकणाऱ्या कामदेवावर कृतघ्नपणाचा आरोप ठेवणारी; सासूपासून संताप छपवून ठेवीत असतांही आहारादिकांमध्यें उणेपणा आल्याकारणानें संतापाची पुरती परीक्षा होऊं देणारी; आणि निःश्वास सोडून नाकांतील नथीच्या मोत्यांसही, धुक्यानें घेरलेल्या नक्षत्रांप्रमाणें, करून टाकणारी; अशी मुक्ता, वर्षाऋतूचा प्रवेश बहुतेक जवळ येऊन ठेपला असतां आणि दरबारांत कुसुमायुधासंबंधीं सर्वांस

चिंता लागलेली आढळून आली असतां, हेमंतांतल्या वाऱ्यानें पी-डलेल्या लतेप्रमाणें दिसूं लागली; दुरून येणाऱ्या वाऱ्यालाही कुसुमायुधासंबंधी बातमी पुसूं लागली; पल्लवांच्या स्पर्शालाही न सहन करूं शकण्याइतकी अशक्त होऊन गेली. ती सर्व विषयांची अवज्ञा करूं लागली; मरणाचीच प्रार्थना करूं लागली; विधात्यानें रुप्याच्या रसानेंच निर्माण केली असावी अशी दिसूं लागली; कुसुमायुधाच्या येण्याच्या मार्गाकडे दृष्टि लावून दीर्घ निःश्वास सोडूं लागली; क्षणक्षणीं मूर्च्छित होऊं लागली; अन्यायानें उपहत झालेल्या राज्यलक्ष्मीप्रमाणें दिसूं लागली; दिवसांची गणणा करण्यासाठीं नखांनीं रेघा काढूं लागली; परंतु कुसुमायुधानें सांगितलेल्या अवधीचा दिवस मुकर होईल अशा भीतीनें त्या रेघा मोजिण्यासही शंकूं लागली; लोभानें कलंकित झालेल्या कीर्तीप्रमाणें भासूं लागली; अभ्यासाच्या अभावानें मलिन झालेल्या विद्येप्रमाणें दिसूं लागली; प्रतिघात पावलेल्या आशेचें अनुकरण करूं लागली; समुद्रांत बुडूं लागलेल्या नौकेप्रमाणें दिसूं लागली; आणि प्राण कंठांतच मुक्काम करण्याविषयीं विचारीत असावे अशा प्रकारें दीन होऊन गेली.

**श**त्रुजित अतिगंभीर मनाचा असल्याकारणानें, कृपण मनुष्य जसा आपलें धन बाहेर कोणाच्याही दृष्टीस पडूं देत नाहीं, त्याचप्रमाणें अंतःकरणांतील खेद तो बाहेर कोणाच्याही दृष्टोत्पत्तीस येऊं देत नव्हता. परंतु **म**नोरमा मात्र कुसुमायुधाच्या प्रयाणसमयीं फुरफुरूं लागलेल्या उजव्या डोळ्याचें, पूर्वींच्या शेंकडों प्रयाणाचे वेळीं कधींही न अनुभवलेल्या परितापाच्या आकस्मिक उत्पत्तीचें, आणि दुश्चिन्ह दिसत असतांही कुसुमायुधाला राहवून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं या आपल्या चुकीचें स्मरण करून करून घाबरी होत होती; पिलांस हुडकून काढण्यासाठीं वळसे मारणाऱ्या हरिणीच्या दशेस प्राप्त झाली होती; राजाच्या नजरेस न येईल अशा रीतीनें एकांतांत स्फुंदस्फुंदून रुदन

करीत होती; शारीरिक विधिही वेठीला धरल्याप्रमाणें मोठ्या कष्टानें उरकून घेत होती; राजाच्या पुढें तोंड पुसण्याचा बहाणा करून पापण्यांतून निघणारीं अश्रूंचीं जाडीं जाडीं टिपें लुगड्याच्या पदरानें पुसून टाकीत होती; आपल्या पुण्याच्या अपूर्णतेची शंका मनांत धरीत होती; दासींस मुक्तेला संभाळण्याविषयीं वारंवार सांगत होती; दासींकडून होत असलेल्या उपचारांचाही अनादर करीत होती; कांहीं तरी समाचार कळावा ह्मणून उत्कंठेनें दासीस पाठवून वारंवार मंत्र्यांस विचारवीत होती; जों जों विसरण्याचा प्रयत्न करूं लागे तों तों जिभेच्या अग्रावर अधिक अधिकच नाचूं लागणारें "उन्नति आली कीं शेवटीं पतन आलेंच" हें वाक्य उच्चारीत नसतांही मनांत येऊन, कंटाळून जात होती; हृदय भरून येत असतांही शब्दांनीं बोलून दाखवून, त्यांतून दुःखाचा लोट ओकून टाकण्याची सवड नसल्याकारणानें आतले आंत संकोच पावत होती; प्रयाणसमयीं "लौकर या हो" या वाक्याचा कुसुमायुधानें स्वीकार केल्याचें स्मरण करीत होती; विपरीत चिंतन करूं लागलेल्या चित्ताला कोणत्याही उपायानें आळा घालूं शकत नव्हती; दुसऱ्या मनुष्यांबरोबर गोष्टी बोलते वेळीं डोळ्यांत येणाऱ्या अश्रूंस व्याकूळ झालेल्या बाहुल्यांनीं युक्त अशा डोळ्यांनींच पिऊन जात होती; परंतु कंठ सद्गदित होत असतां तो मोकळा करण्यास निरुपाय होत होती; रूपांतर पावली असावी अशी दिसत होती; प्रबळ झालेली चिंता जें कांहीं करवी तें सर्व करीत होती; "काय केलें असतां सुख होईल?" तो उपाय जाणत नव्हती; चिंतेच्या भारानें पीडित होऊन जणों हृदयानें आपणास सोडून दिलें असावें अशी दिसत होती; गुरुजनांच्या चरणांस केशपाशाच्या स्पर्शानें सुगंधमय करून सोडीत होती; सर्व जगाला शून्य पहात होती; आणि हृदयांत कोणीतरी टोंचीत असावें, चिरून टाकीत असावें, जाळून टाकीत असावें, तळून टाकीत असावें, फोडून

टाकीत असावें, आणि भ्रमवीत असावें अशा प्रकारें दिसत होती. मंत्रीसुद्धां बातमी मिळविण्याकरितां शत्रुजिताच्या आज्ञेप्रमाणें आणि आपल्या विचाराप्रमाणें नाना प्रकारच्या तजविजी करीत होते. कुसुमायुध गेला होता तें आश्रममंडळ फार दूर असल्याकारणानें त्वरित बातमी आणविण्याची आशा ते धरूं शकत नव्हते; मनोरमा स्त्रीस्वभावामुळें जे जे दोष ठेवीत असे ते ते मान्य करीत होते; मनोरमेनें चौकशी करण्याकरतां पाठविलेल्या दासींस कांहीं तरी काल्पित उत्तरें देतां देतां थकून जात होते; कुसुमायुध एकवीर असतां आणि दिव्य घोड्यावर बसणारा असतांही फार दिवस लागल्याकारणानें त्याच्याविषयीं कित्येक विपरीत शंकांच्या आधीन होत होते; शत्रुजिताचा वृद्धापकाळ झाल्याकारणानें राज्याच्या पुढील स्थितीविषयीं अपार चिंता करीत होते; कुसुमायुधाच्या संबंधें बहुमुखी प्रजेनें उठविलेल्या विचित्र गप्पांमुळें शत्रुमंडळामध्येंही खळबळाट होऊन जाण्याच्या धास्तीनें अनेक युक्ति योजीत होते; आणि अनेक कामांमुळें अंतःकरणाची व्यग्रता झाल्याकारणानें शारीरिक क्रियाही बरोबर करूं शकत नव्हते.



# प्रकरण ४४ वें.

## वाईट ख़बर आणि दुःखित आईबाप.

काशीमध्यें आलेल्या कपटी शुंभासुरानें, निरनिराळे वेष घेऊन, नगरांत चोहोंकडे फिरून, लोकांच्या तोंडून राज्याच्या स्थितीविषयीं माहिती काढली. मग नीटशी संधि साधून, रस्त्याच्या धुळीनें मलिन झालेल्या बृद्ध मुनीचा वेष धरून, कंठ मोकळा करून, आणि रडून रडून चोळवटलेले डोळे करून, दरबारांत गेला आणि "कांहीं महत्वाची खबर घेऊन आलों आहें" असें कळवून शत्रुजितापुढें येऊन उभा राहिला. शत्रुजितानें त्याचें स्वागत ह्मणून आणि अर्घ्यपाद्यानें सत्कार करून, योग्य आसनावर बसविलें; आणि त्याच्या मुखचर्येवरूनच यानें कांहीं वाईट खबर आणिली असावी आणि ती कुसुमायुधासंबंधींच असावी असें जाणून लागलेंच मनोरमेला आणि मंत्र्यांना बोलावणें पाठवून आपल्या पुढें आणविलें. नाकाच्या अग्रावर दीन दृष्टि ठेवून बसलेला; पिशाचानें घेरल्यासारखा दिसणारा; धुळीनें मळिण झालेल्या दाढीवरून आणि वस्त्रांवरून सांगितल्यावांचूनच दूर देशाहून आल्याचें सुचविणारा; आणि प्रवासाच्या परिश्रमाच्या आवासासारखा दिसणारा, अशा ह्या वृद्धमुनीस पाहातांच, मनोरमा त्याला, हा खेदाचा पुंजच असावा, दुःखाचा उदय असावा, पडत्या काळाचा प्रारंभच असावा, दुर्दैवाचा दूतच असावा आणि अनिष्टाचा निश्चय असावा असें भावून, घामानें सर्वांगीं डबडबून गेली; अश्रूंनीं अंध होऊन गेली; चिंतेनें चिरडून गेली; खेदानें खिळून गेली; भयानें भिऊन गेली; कंपानें व्याकुळ होऊन गेली; शरीराचें धारण करण्यासही अशक्त होऊन गेली; अगोदरच कळून

आलें असतांही मुनीच्या तोंडांतून निघणाऱ्या शब्दांस भिऊं लागली; ऐकल्यापूर्वींच फुटून जाणाऱ्या हृदयाला धिक्कारूं लागली; सारें भान विसरून गेली; उन्मत्तासारखी होऊन गेली; भूत झोंबलेल्यासारखी दिसूं लागली; आणि प्रणामादिक उपचार केल्याविनाच शत्रुजिताच्या पायांशीं येऊन बसली. मंत्री सुद्धां मुके झाले असावे; बहिरे झाले असावे; अनाथ झाले असावे; असहाय झाले असावे; अशरण झाले असावे;. जळून जात असावे; इंद्रियरहित असावे; कधीं बोलूं शिकलेलेच नसावे; वायूच्या रोगानें झटका आलेले असावे; आणि सर्वस्व घालवून बसले असावे; असे होऊन गेले.

समजून चुकलें असतांही धिराच्या अंतःकरणाचा शत्रुजित गद्गद् स्वरानें " मनोरमे! हा वृद्धमुनि कांहीं महत्वाची गोष्ट सांगत आहे ती ऐका, " असें बोलल्यावर मनोरमा ह्मणाली—" आतां काय सांगावयाचें राहिलें आहे? जें कांहीं बोलावयाचें तें याच्या मुखचर्येनेंच सांगितलें आहे, तथापि पुनरुक्त करून घेणें असेल तर आपली मर्जी."

राजाच्या प्रेरणेवरून तो वृद्धमुनि म्हणाला कीं " महाराज शत्रु-जित्! जें कांहीं सांगावयाचें तें सांगण्याला माझी जीभ उचलत नाहीं आणि तुमच्या कुटुंबाला दुःखित झालेलें पहाण्यास मी खुशी नाहीं, तथापि कुसु-मायुधानें माझ्यावर भरंवसा टाकला तो विफळ न व्हावा म्हणून मी सांगतों इतकेंच. आश्रममंडळाचें रक्षण करण्याकरितां गेलेला कुमार कुसुमायुध तपस्व्यांच्या रक्षणार्थ आश्रमामध्यें फिरत होता आणि शेंकडों दुष्ट दैत्यांस ठार करीत होता, इतक्यांत माझ्या आश्रमाजवळ दैत्यांच्या मोठ्या सैन्याबरोबर युद्ध करण्यांत गुंतला असतां कोणा पापी राक्षसानें आसुरी मायेकरून त्यास घाबरवून टाकून आणि त्रिशूळानें त्याची छाती फो-डून त्यास ठार केलें. मरते समयीं त्यानें आपल्या गळ्यामधून काढून हा हार माझ्या हातीं दिला आणि तुम्हास ही बातमी देण्याविषयीं आणि तु-

मचें सांत्वन करण्याविषयीं मला उद्देशून सांगितलें. यास्तव मी निरुपाय होऊन येथें आलों आहें. खुणेसाठीं हा हार आपले पुढें ठेविला आहे. कुसुमायुध मरण पावला असतां आम्हीं आमच्या सद्भाग्याचेंच मरण झालें असें मानून रडत रडत आणि छाती बडवीत बडवीत, एका शूद्र तपन्याच्या हातें त्याला अग्निसंस्कार देवविला. पुढें, कुसुमायुध मरण पावलेला पाहून शोकानें आणि दुःखानें दीनवाणी होऊन एकसारखा किंकाळूं लागलेला; अश्रूंच्या धारांनीं भुईला भिजवून टाकणारा; कुसुमायुधाच्या तोंडाकडेच दृष्टि रोखून उभा राहिलेला; आणि पायांच्या खुरांनीं पृथ्वीला उखळूं लागलेला; असा त्याचा तो दिव्य घोडा तोच दुरात्मा राक्षस घेऊन गेला. हाय हाय! कांहीं मोठ्या दुर्भाग्याच्या योगानें मला ही सर्व हकीगत स्वतां नजरनें पहावी लागली. महाराज! तुमची आज्ञा पाळीत असतां आणि ब्राम्हणांचें रक्षण करीत असतां त्यांतही आणखी तोंडास तोंड देऊन लढत असतां कुसुमायुध परलोकवासी झाला आहे त्यापेक्षां त्याच्या संबंधानें कोणत्याही प्रकारें शोक करणें योग्य नाहीं. कुसुमायुधानें, कधींना कधींतरी नाश पावावयाचेंच अशा शरीराचा तपस्वांच्या रक्षणार्थ त्याग करून आपल्याकडील क्षत्रिय धर्माच्या कर्जाची फेड केली, ह्या मनोरमेचें सतीत्व प्रकाशित केलें, तुमच्या कुळाची निर्मळता प्रगट केली, स्वतांचें शौर्य प्रख्यात केलें, आणि कीर्ति दिगंतरीं पसरून दिली; मग त्याच्या मरणाचा शोक काय ह्मणून करावा? ज्यांचे पुत्र अजारी पडून घरांत खाटल्याला खिळले असतां औषध पितां पितां, दमा, श्वास इत्यादिक कष्ट भोगतां भोगतां, आणि आप्तजनांस रडवतां रडवतां, मरण पावतात, त्यांचा शोक करणें क्षत्रियांस एकवेळ योग्य होईल; ज्यांचे पुत्र गोब्राह्मणांच्या आणि धर्माच्या रक्षणार्थ संग्रामामध्यें तोंडास तोंड देऊन आयुधांनीं विंधून मरण पावतात ते क्षत्रियांनीं यत्किंचितही शोक करण्यास योग्य नव्हत. जो पुत्र याचका-

पासून, मित्रवर्गापासून, आणि शत्रूपासून कधींहीं आपलें तोंड लपवीत नाहीं त्याच पुत्रामुळें पिता पुत्रवान ह्मणून समजावा, आणि माता वीरप्रसू ह्मणून ह्मणावी. पुत्र जेव्हां संग्रामभूमीवर विजय पावून येईल अथवा तोंडास तोंड देऊन मरण पावेल तेव्हांच क्षत्रियकुलांतील स्त्रियांचा गर्भ क्लेश हरण झाला ह्मणून समजावें. रणभूमीवर तोंडास तोंड देऊन पाऊल टाकणें ह्मणजे पावला पावलास अश्वमेधाचें फळ मिळत असतें. अशा अशा अनेकशः कारणांनीं शास्त्रकारांच्या मताप्रमाणें कुसुमायुध दिव्यलोकीं गेला. यास्तव त्याच्या पाठिमागें त्याचें सुतक धरण्याची किंवा क्रिया करण्याचीही बिलकूल जरूर नाहीं, तथापि लोकांमध्यें आनृशंस्यास्तव यथोचित क्रिया करावी, आणि हृदयाच्या आश्वासनासाठीं हा हार जवळ ठेवावा."

कपटमुनि, याप्रमाणें ही खोटी पण वाईट खबर देऊन शत्रुजिताच्या चरणापाशीं तो हार ठेवून आणि त्याची रजा घेऊन, निघून गेला आणि दरबारामध्यें त्याबरोबर एकच रडारड सुरू झाली.

वाऱ्याच्या झपाट्यानें जशी केळ पडते तशी मनोरमा कपटमुनीच्या भाषणानें जमिनीवर पडली, ती मूर्च्छित झाली. थोड्या वेळानें शुद्धीवर आल्यावर जमिनीवर गडबडां लोळत लोळत विलाप करूं लागली. "अरे पुत्रा! तूं माझा आधार! तुला ही काय दशा प्राप्त झाली? मुला! तूं प्रवासास जाते वेळीं मला लौकरच परत येतों ह्मणून सांगितलेंस त्याचें स्मरण कर. प्रतिज्ञा पाळण्यासाठीं तरी एकवार माझ्यापाशीं ये. तुझ्या प्रयाणाचे वेळींच माझा डावा डोळा लवल्यानें आणि अकस्मात माझें हृदय शंकित झाल्यामुळें तुझ्या मुखाचें पुनः दर्शन होणें दुर्लभ अशी सूचना मला मिळाली तीच अखेर खरी झाली. जगामध्यें चांगल्या चिन्हांचें फळ क्वचित मिळतें; परंतु वाईट निमित्तें पूर्णपणें सफळ होतात. हा कोणाचा अपराध ह्मणून मी ह्मणूं? सगळा माझाच अपराध, दुसरें काय?

दुश्चिन्हें घडलेलीं धडधडीत माहित झालीं असतांही तुला न जाऊं देण्याचा प्रयत्न करण्यांत मी हयगय केली. मुला! आईला ह्मातारपणांत दुःख देऊन निघून जावें हें तुझ्यासारख्या सुपुत्राला शोभत नाहीं. बाळा! मी तुला कोणता बोल लावूं? माझ्या भाग्याचाच हा सर्व दोष आहे. जगामध्यें अभागी स्त्रिया पुष्कळ असतील तथापि माझ्यासारखी अभागी कोणीही नसेल. बाळा! दूर गेला असलास तरी या दीन आईची दया मनांत आणून मागें फीर, आणि "आई" अशा दीर्घस्वराच्या शब्दानें मला हाक मार. तूं माझ्या पोटीं आलाच नसतास तर मी केवळ वांझपणाच्याच दुःखाला पात्र झालें असतें. काय, दैवानें मला दीर्घ आयुष्य देऊन शेवटीं हें दारुण दुःख पाहविण्याचेंच कपाळीं आणिलेंना? हाय हाय! आतां कोठें जाऊं? कोणाला सांगू? कोणाला दोष देऊं? माझ्यावर कोण दया करील? बाळा! मी तडफडत आहे, तुला माझी दया येत नाहीं काय? अतिशय स्वादिष्ट आणि उन्हून भोजन तयार केलें आहे, तर एक वेळ जेवल्यावर जिकडे जावयाचें असेल तिकडे जा. कुसुमायुधा! कोमळ अंगकांति आहे जिची आणि विधात्यानें फावल्या वेळीं सावकाशपणें निर्माण केली असल्यामुळें अतिशय सुंदर अशी गंधर्वाची कन्या तरुण मुक्ता मंदिरामध्यें तुझी वाट पाहात आहे. कौसल्याही रामचंद्र परत येण्याच्या आशेवर जिवंत राहूं शकली, पण मी कोणत्या आधारावर जिवंत रहावें? दयाळुपणाविषयीं आणि उदारपणाविषयीं तुझी ख्याति आहे असें असतां मला एक वेळ उत्तर देण्यामध्येंही कां एवढा निर्दय आणि कृपण बनला आहेस? पुत्रा! आतां तुझ्या पित्याच्या शिरावरील राज्यकारभाराचा भार कोण उचलून घेईल? याचकांची आशा आतां कोण सफळ करील? सेवकजन आदरमान मिळविण्यासाठीं कोणापाशीं जातील? कोणाकडे जाऊन सज्जन विश्राम पावतील? कोणाच्या बाहूंवर अवलंबून राहून पृथ्वी स्थिर राहील? राज्यलक्ष्मी कोणाचें मुख

पाहील? गुणिजनांचे गुण कोण जाणील? अनाथ प्रजा कोणास शरण जाईल? तपस्वी जन दैत्यांनीं केलेल्या पीडेचें कोणापाशीं निवेदन करतील? राज्यकारभारामध्यें मंत्री कोणाची सल्ला घेतील? वृद्ध राजा उतरलेला राज्यकारभाराचा भार पुन्हा माथीं येऊन पडला असतां कसा आराम पावेल? आणि विद्या कोणाच्या हृदयांत एके ठिकाणीं मिळून परस्परसहवासाचें सुख अनुभवतील? मुला! तुझा पुत्रवत्सल वृद्ध पिता तुझ्याविना फार दिवस जगूं शकणार नाहीं. मग पृथ्वीपालनाचा निराधार बोजा येऊन पडल्यामुळें कासवाची पाठ सोलून जाईल; वराहाची दाढा भंगून जाईल; शेष सर्प अस्थिपंजर होऊन पडेल; दिग्गज चुरडून जाऊन मरतील; आणि दिग्पालही चिंतातुर होऊन बसतील. अरे दैवा! आह्मी तुझें काय घोडें मारिलें होतें कीं एक वेळ परम सुखामध्यें आणून सोडल्यावर पुन्हां दुःखाच्या अपार समुद्रामध्यें तूं आह्मांस फेंकून दिलेंस! आतां तुला तरी त्याच्यासारखें सृष्टिरत्न कसें उत्पन्न करितां येईल? तसलेच परमाणु तरी तुझ्या कोठून हातीं येतील? दैवा! तुझ्यासारखा दुर्बुद्धि तूंच खरा—कीं फार परिश्रमांनीं उत्पन्न केलेल्या अशा हिऱ्याचा तूं क्षणांत नाश करून टाकलास. स्वतां वाढविलेल्या उत्तम वृक्षास स्वतांच कापून टाकतो, आपण केलेले उपकार आपणच धुऊन टाकतो, स्वतां घडवून आणलेला उपयुक्त सुयोग आपणच विसकळून टाकतो आणि ज्यामुळें स्तुतिपात्र व्हावयाचें त्यासच्च नष्ट करून टाकून निंदेला मात्र स्वतांला पात्र करून घेतो, असा तुझ्याशिवाय दुसरा कोण असेल? अरे कुसुमायुधा! ह्मातान्या आईबापांस, मंत्र्यांस, परिजनांस आणि या प्रजेला सोडून देऊन एकटाच कोठें निघून गेलास? तुझें दयाळुपण कोठें गेलें? कठोरता नव्हती ती कोठून आली. गुरुभक्ति सोडून देण्याचा उपदेश तुला कोणीं केला? आणि वरलेल्या पतिव्रतेच्या त्याग करण्याची सल्ला तुला कोणीं दिली? हायरे हाय! माझें हृदय

कसें फुटून जात आहे, शरीर जळत आहे, सांधेनि सांधे तुटून जात आहेत, चित्त चुरडून जात आहे, मर्मस्थळें चिरून जात आहेत, प्राण जाऊं पहात आहेत, बुद्धि घाबरून जात आहे, आणि मन चेंगरून जात आहे. बाळा! तूं निर्जन जंगलामध्यें एकटाच कसा निजलास? तुझ्या साठीं बिछाना कोणी केला? तुझे पाय कोणी रगडिले? तुझ्या शरीराचें रक्षण करण्याकरितां कोणाचा चौकीपहारा आहे? तुला थंड पाणी कोणीं दिलें? उन्हून भोजन कोणीं तयार केलें? आणि वाळ्याच्या पंख्यानें वारा कोणीं घातला? मला नातवाचें मुख पहाण्याची जी इच्छा होती ती व्यर्थ झाली, इतकेंच नाहीं तर दुर्भाग्यामुळें तुझ्या मुखाचें दर्शनही दुर्लभ झालें काय? मी तुला रागावलेला कधींही पाहिलें नव्हतें, असें असतां आज अकस्मात आमच्यावर एवढा कोप काय कारणास्तव केला? तूं तुझ्या पित्यावरचा स्नेह सोडून देण्यास काय कारण पाहिलेंस? ज्यांस सुखी ठेविलें पाहिजे त्यांस दुःखी करण्यामध्यें तुला कोणता लाभ वाटला? तरुण स्त्रीला वरून तिला दुःखांत टाकून जाण्याचें तूं काय प्रयोजन मनांत आणिलेंस? पृथ्वीला बाहुदंडावर एकवार धारण करून पुन्हां फेंकून देण्यांत तुला कोणता पुरुषार्थ वाटला? आणि राज्याला चढत्या पदवीला नेऊन पुन्हा पडक्या स्थितीस आणून मिळविण्यांत कोणता गुण दाखवूं इच्छिलेंस? पुत्रा! माझें जीवित निष्फळ झालें, जन्म दुःखरूप झाला, आणि दुःखानेंही जळून न जाणारें माझें हृदय भारवत् होऊन गेलें, हें कोणास सांगूं? कोणापाशीं जाऊं? सुखरहित, आधाररहित, जगण्याच्या प्रयोजनानें रहित, आणि जन्माच्या साफल्यानें रहित झालेली ही तुझी आई यापुढें मरणाशिवाय दुसरें कोणतेंही कर्तव्य जाणत नाहीं. निष्फळ अश्रुपातानें ममता दाखविण्यापेक्षां ममत्वाला साजेसें करून दाखविणें हेंच योग्य होय. हायरे निर्दय देवा! तुझ्या पायांवर मस्तक ठेवून प्रार्थना करितें कीं माझ्यावर दयाळू

होऊन माझे प्राण घे. अरे! इतकें मोठें दुःख प्राप्त झालें असतांही माझे प्राण निघून जात नाहींत त्यापेक्षां असें वाटतें कीं विधात्याच्या हातानें माझ्या कपाळीं दीर्घ काळपर्यंत रडण्याचेंच लिहिलें आहे, अथवा या वेळीं यमपुरीमध्यें माझ्यासाठीं जागा रिकामी नसेल, अथवा काळ प्राप्त झाल्याविना प्राण्यांस मरणही येत नसेल, अथवा अदल्या जन्मीं केलेलीं पापेंच दुःख भोगविण्यासाठीं प्राण अडकवून ठेवीत असतील, अथवा हें शरीरच असंख्य दुःखें सहन करूं शकत असेल, अथवा दुष्ट दैवानेंच मला दुःख देण्यासाठींच अशा प्रकारची नीच युक्ति केली असेल! माझीं व्रतें, माझीं दानें, मीं केलेले संय्यम तसेंच आचरलेलें तप निष्फळ झालें! हाय हाय! ज्याला जेवते वेळीं पंक्तींत भूषणांनीं भूषित करविण्यामध्यें आणि उत्तम उत्तम वहनावर बसविण्यामध्यें अग्रणी करावयाचें त्यालाच त्याच्या पित्यानें दैत्याबरोबर लढण्याच्या कामांत अग्रणी केलेंना? त्यापेक्षां क्षत्रिय धर्माला धिःकार असो. अरे पुत्रा! तूं त्रिशूळानें जखमी होऊन रक्तबंबाळ झालेला जेथें पडला असशील तेथें पृथ्वीसुद्धां शोभिवंत दिसत असेल. मुला! ये ये. तुझ्या दर्शनानें तृप्ति न पावलेल्या या अभागी आईच्या मांडीवर बसून तिला एकवार आलिंगन दे. मला कळत नाहीं कीं मी तुझ्यावरील प्रेमामुळें रडत आहें? कीं तुझ्या यौवराज्यामुळें रडत आहें? कीं तुझ्या भार्येच्या विधवापणामुळें रडत आहें? कीं तुझ्यावर पडलेल्या शस्त्राच्या आघातामुळें रडत आहें? कीं माझ्या दुर्दशेमुळें रडत आहें? कीं तुझ्या पित्याच्या म्हातारपणाकडे पाहून रडत आहें? कीं प्रजेच्या अनाथ स्थिति पाहून रडत आहें? कीं याचक जनांस निराश व्हावें लागणार म्हणून रडत आहें? किंवा तुला वाढविण्यामध्यें भोगलेल्या क्लेशांस स्मरून रडत आहें? परंतु तूं तर माझ्या हृदयांतच बसलेला आहेस, त्यापेक्षां तूं माझ्या रडण्याचें खरें कारण जाणतच असशील. कोण-

त्याही स्त्रीला एकुलता एकच मुलगा होऊं नको आणि होशील तर गुण-वान आणि विद्वान होऊं नको. दुसऱ्या कोठेंही शोधला तरी कुसुमायुध मिळावयाचा नाहीं. पण हे प्राणांनों! तुम्हीं वायुरूप असल्याकारणानें सर्व स्थळीं जाण्या येण्याला शक्तिमान आहां म्हणून त्याला हुडकून काढण्या-साठीं चला. मी पुत्राशिवाय सर्व जगाला, शिवलिंगावांचून शिवालय असावें त्या प्रमाणें, सूर्यावांचून अंतरिक्षाप्रमाणें, चंद्रावांचून मध्य-रात्रीप्रमाणें, प्राणांवांचून शरीराप्रमाणें, आणि पदकावांचून हारा-प्रमाणें समजतें. आज गुणरूप रत्नांचा समुद्र आटून गेला, कवींचा कल्पवृक्ष उन्मळून पडला, विद्यांचें भांडार लुटलें गेलें, याचकांचा चिंतामणि चूर्ण झाला, गुणी जनांचा आधार तुटून गेला, सच्छी-लाचा आश्रय फुटून गेला, पितृभक्तीचा विधि नष्ट होऊन गेला, आणि स्वकुलाचा सूर्य अस्त पावला. पुत्रा कुसुमायुधा! तुझ्यावरील प्रे-मामुळें अथवा तुझी आकृति डोळ्यांपुढें असावी ह्मणून अथवा स्त्री जातीच्या ठिकाणीं स्वाभाविकच वसणाऱ्या मूढतेमुळें आतांपर्यंतही माझ्या हृदयाला तुझ्या मरणाविषयीं विश्वास येत नाहीं. अरे हायरे हाय! या सर्व कल्पना केवळ मिथ्या होत. अरे! आज हजारों दासींच्या ऐवजीं तुझ्या आसपास गिधाडें फिरत असतील. स्तुति करणारे शेकडों भाट चारणांच्या ऐवजीं आज तुझ्यापुढें कोल्हें आणि कावळे वगैरे मांसाहारी प्राणी विचित्र कोलाहल करीत असतील. अरे! तुला मऊ मऊ बिछान्याच्या अमूल्य पलंगावर शयन करण्याची संवय आहे; तरी आज तुला दगडगोट्यांनीं आणि धुळीनें आच्छादि-लेली रणभूमि कशी आवडली? अरे! आतां मी पुनवेच्या चंद्राप्रमाणें तुझें मुख केव्हां पाहीन? हाय हाय! स्वप्नामध्यें मिळालेलें धन जसें क्ष-णांत नाहींसें होतें तसा तूं नाहींसा झालास. मुला! जीभ उचलत नाहीं तरी बोलते कीं जितेंद्रियांस, केलेले उपकार न विसरणारांस, पर-

स्त्रीच्या ठिकाणीं मातृदृष्टि ठेवणारांस, स्वधर्मानें वर्तणारांस, आणि अतिथींची सेवा करणारांस जी गति प्राप्त होते तीच गति तुला प्राप्त होवो !

भिंती कोसळून पडतील, चित्रांतील माणसेंसुद्धां रडूं लागतील, क्रूर लोकसुद्धां करुणारसानें द्रवतील, वृक्षसुद्धां अश्रूंनीं परिप्लुत होतील, आणि पशुही शोकनिमग्न होतील, अशा प्रकारच्या मनोरमेच्या आक्रंदयुक्त विलापांनीं शत्रुजिताची आणि मंत्र्यांची सगळी गंभीरता नष्ट झाली; धैर्याचा बांध वाहून गेला; प्रौढता लटपटून गेली; आणि शोक अत्यंत वृद्धि पावला. मग प्रबळ शोकानें ग्रासलेला शत्रुजितही मोकळा कंठ करून विलाप करूं लागला.

"पुत्रा कुसुमायुधा ! तूं प्रयासावांचूनच दिग्विजय केला होतास, सगळ्या राजांस हुकुमांत आणलें होतेंस, आणि भीमासुरासारख्या प्रबळ दैत्याला आणि त्याच्या सेनेलाही क्षणमात्रें करून तोडून टाकिलें होतेंस; तो तूंच आज एका क्षुद्र दैत्याच्या हातें कसा मरण पावलास? हाय हाय! आतां तुझ्यावांचून कसें राज्य करावें? शत्रूंस कसें जिंकावें? प्रजांचा बंदोबस्त कसा करावा? आणि आह्मीं तरी कसें वांचावें? तूं या अभागी पित्याला म्हातारपणामध्यें सोडून देऊन असा कोणता लाभ मिळविलास? जर शेवटीं असें दुःख द्यावयाचें तुझ्या मनांत होतें तर तुला पहिल्यापासूनच सुखाची आस लावण्याची काय जरूर होती? माझी सर्व इच्छा परिपूर्ण झाल्यावर तपोवनांत जाण्याची शेवटली इच्छा परिपूर्ण करण्यांत तुला भलतेंसें तें काय वाटलें? हाय हाय! धिःक्कार आहे माझ्या प्राणांस कीं ते तुझ्यापाशीं उडून जात नाहींत! अरे! काय, छत्राची छाया पडण्याला योग्य अशा तुझ्या मुखावर कावळ्यांच्या आणि गिधाडांच्या पंखांची छाया पडावी? आज तुझ्या जाण्यानें यमपुरीसुद्धां उज्वल झाली असेल! आणि यमराज तुझें आतिथ्य करीत असेल! जर आश्रममंडळाचें रक्षण करण्याला या वेळीं मींच गेलों असतों आणि रणभूमीवर लढतां लढतां

पडलों असतों तर किती बरें होतें? परंतु हाय हाय! माझें प्रारब्ध एवढें कोठें आहे?—कीं युद्धामध्यें मरण यावें आणखी पुत्राच्या हातीं पिंडदान मिळावें! अरे दैवा! वृद्धाच्या आणि तरुणाच्या मरणामध्यें तूं कांहींच कींरे अनुक्रमाचा विचार पाहिला नाहींस! ही केवढी मोठी चूक? कदाचित् हा अनुक्रम तुला आवडत नव्हता तर एवढें स्नेहबंधन तयार करण्याची तुला काय गरज होती? हा शोकरूपी प्रबळ अग्नि माझ्या मर्मस्थळाला भाजून टाकीत आहे, देहाला शुष्क करून टाकीत आहे, आणि अंतःकरणाला लासीत आहे. दैव विमुख झालें आणि पुत्र परलोकवासी झाला, आतां मनची चिंता कोणापाशीं बोलावी? कोणाची मसलत घ्यावी? दुःखतरी कोण टाळील? कोण सहाय्य करील? अरेरे! पुत्रास आश्रममंडळाकडे एकटा पाठविण्यांत माझ्या चुकीचाच हा परिणाम आहे, आतां कोणास दोष देऊं? कोणाचा अपराध काढूं? आणि कोणास धिक्कारूं? मनोरमा पुत्रावांचून जगेल असें वाटत नाहीं, आणि मुक्ताही जिवंत राहील असा संभव दिसत नाहीं; आतां त्यांचे विलाप ऐकावे, त्यांचीं मरणें डोळ्यांनीं पाहावीं, आणि पुत्रावांचून एकट्यानें अशा दीन स्थितीमध्यें दिवस काढावे त्यापेक्षां राज्याचा त्याग करून अरण्यांत जाऊन रहावें हें फार बरें. शिव शिव! आज सूर्य पृथ्वीवर तुटून पडला, चंद्र अंधकारांत बुडून गेला, पराक्रमाचें संग्रहस्थान नष्ट झालें, धर्माचें स्वरूप लय पावलें, शत्रुदावानल थंडगार झाला, नीतीचा आधार तुटून पडला, आणि उद्योग क्रियाहीन होऊन गेला. अरे पुत्रा! तूं वृद्ध आईबापांवर कसा निर्दय झालास? पतिव्रता धर्मपत्नीवर कसा निःस्नेह झालास? युवराजपदवीविषयीं एवढा विरक्त कसा झालास? मित्राविषयीं उदासीन कसा झालास? आणि प्रत्येक कामामध्यें मंत्र्यांची मसलत घेणारा असतांही त्यांच्या मसलतीशिवाय परलोकवास कसा पतकरलास? अरे! पित्याचा वंश चालविणारा आणि त्यास पिंड देणारा

मी एकटाच आहें असा तुझ्या मनामध्यें काय विचारही आला नाहीं? शत्रू-पासून दुःख प्राप्त व्हावें ही गोष्ट संभाव्य आहे, पण पुत्रापासून दुःख व्हावें याचा मात्र आज नवा अनुभव मला मिळाला. अरे पुत्रा! त्या पतिव्रता अबलेचें पाणिग्रहण करून अझून पुरें एक वर्षही लोटलें नाहीं. पुत्रा! तुझा मित्र बुद्धिबळें खेळण्यासाठीं आला आहे. मंत्रिजन राज्य-कारणीं कार्यांमध्यें तुझी मसलत घेण्याविषयीं उत्कंठित झाले आहेत. राजे चरणास अभिवंदन करण्याची इच्छा करीत आहेत. प्रजाजन न्याय मागण्यासाठीं आले आहेत. कवि कविता रचून ऐकविण्यास आले आहेत. गुणी जन आपापले गुण दाखविण्यास उतावीळ झाले आहेत. देवपूजेची आणि भोजनाची वेळ चुकून गेली आहे. अचारी नाना प्रकारचीं अन्नें सिद्ध करून वाट पहात आहेत. स्नान घालणाऱ्या दासी स्नानशाळेंमध्यें वाट पहात राहिल्या आहेत. माळिणी पुष्पांचे बिछाने वगैरे तयार करून केव्हांच निघून गेल्या. युवराजपदवीच्या अधिकाराचीं कामें फार दिवसांची सांचून राहिलीं आहेत आणि आश्रम-मंडळांतील मुनिजन आश्रमाच्या रक्षणासाठीं बोलावूं आले आहेत. तर लौकर ये. एकदां येऊन सर्वांच्या इच्छा परिपूर्ण कर. शिव शिव! मी हें काय बोलतों? तो तर केव्हांच निघून गेला, आणि आतां पुन्हा परतही यावयाचा नाहीं. अरे पुत्रा! तूं इंद्रलोकीं माझ्या पित्याला सांग कीं शत्रुजितसुद्धां थोड्याच दिवसांत येथें येणार आहे. हर हर हर! हा मी काय निरोप पाठवीत आहें? इंद्रलोकाची प्राप्ति मला कोठून होणार? पाठीमागून पुत्राच्या हातें ज्याला पिंडदान होतें त्याला आणि युद्धामध्यें तोंडास तोंड देऊन पुढें पाऊल टाकीत असतां ठार झालेल्यासच इंद्र लोकाची प्राप्ति होते. अरे पुत्रा! हें तुला कोठून सुचलें? तुझ्या जन्माला, स्नेहाला, शीलाला आणि शिक्षणाला न साजे असें हें कर्म तूं केलेंस. पशुपक्षीसुद्धां आईबापांवर साहजिकपणें स्नेह धरतात, पालन-

पोषण करणारांचे उपकार जाणतात, परिचयाची बूज ठेवितात, आणि वाढविणाराच्या इच्छेप्रमाणें वर्तन ठेवितात. हाय हाय! हा अपरंपार शोक ऐंद्रजालिकाप्रमाणें असंभाव्य प्रकार दृष्टीस पाडीत आहे. एथें बसल्या बसल्या मी दैत्याच्या सेनेचा गोंगाट ऐकत आहें. कुसुमायुधाचा ऊर त्रिशूळाच्या घायानें विदारलेला मी पहात आहें. त्याचें शरीर अग्नींत जळत असलेलें माझ्या दृष्टीस पडत आहे. हर हर! मी अगदींच कींहो आंधळा झालों! मला रस्ता कोण दाखवील?"

या समयीं "अहो महाराज कुमार कुसुमायुध! आमच्या सगळ्या मनोरथांस निर्मूळ करून तुह्मी कोठें निघून गेलां? तुमच्या मातापितरांनीं, प्रजांनीं किंवा आह्मीं तुमचा कोणताही अपराध केला असावा असें आह्मास आठवत नाहीं. तुह्मी एकाएकीं निघून गेल्यामुळें—पुन्हा परत येण्याचा संभव नाहीं अशा प्रकारें निघून गेल्यामुळें—महाराजांच्या वंशाबरोबर प्रजेच्या अभ्युदयाचाही उच्छेद केला हें लक्षांत आणा. तुह्मीं आईबापांबरोबरच प्रजेसही अनाथ केलें; राज्याच्या अवस्थेबरोबरच शत्रूंच्या हर्षालाही उत्पन्न होण्याचें कारण करून ठेविलें; पृथ्वीबरोबरच राज्यलक्ष्मीलाही निराधार करून टाकिलें; याचकजनाबरोबरच मुनिजनांसही निराश केलें; तरुण पत्नीबरोबरच गुरुभक्तीचाही त्याग केला; आणि पाणिग्रहणाच्या वेळीं पत्नीला दिलेल्या वचनांबरोबरच गुरुजनांच्या उपदेशालाही विसरून गेलां. हाय हाय! उगवता सूर्य अस्त पावला. हातास लागलेलें भांडार गडप झालें. तोंडाशीं आलेला घास खालीं गळाला. सफळतेप्रत पोंचलेली आशा निर्मूळ झाली. वाढविलेला आम्रवृक्ष सुकून गेला. नऊ महिन्यांचा पुरा गर्भ गळून पडला. तयार झालेलें मंदिर कोसळून पडलें आणि जिव्हाग्रावर आलेलें उत्तर जागच्या जागीं विरून गेलें. शिव शिव! जगांतून औदार्य विदीर्ण झालें; गांभीर्य गुप्त झालें, गुण गळून पडले, गुणज्ञता गमावली, सांत्वन समाप्त

झालें, नोकरी निष्फळ झाली, भूतदया दयापात्र झाली, सुभाषित भस्म झालें, समाधान निराधार झालें, पुण्य परलोकवासी झालें, विद्या विच्छिन्न झाल्या, उत्साह उच्छिन्न झाला, अस्त्रयुद्ध अस्तंग झालें, न्याय नष्ट झाला, पांडित्य प्रलय पावलें, चातुर्य चोरलें गेलें, परीक्षेला पंख फुटले, स्वतंत्रता सुटून गेली, निर्मळता निर्मूळ झाली, वत्सलता विच्छिन्न होऊन गेली, उद्योग उन्मूलित झाले, शूरता शांत झाली, गुरुभक्ति भग्न झाली, विज्ञान विघ्नित झालें, आणि श्रेष्ठता भ्रष्ट झाली. महाराज कुमार! एकाएकीं आपण कोठें निघून गेलां? आमची प्रार्थना स्वीकारून मागें फिरा. तुमच्यावांचून महाराणी, महाराज, आह्मी मंत्री अथवा प्रजाजन क्षणमात्रसुद्धां जिवंत राहूं असें नाहीं. आह्मी तुमची मसलत घेण्याकरतां बसून राहिलों आहों. आज्ञांकित होण्यासाठीं उत्कंठित झालों आहों. आपल्या हातें सेवा घडावी ह्मणून आतुर झालों आहों. विनंती करण्यासाठीं आमचें मन अधीर झालें आहे. सही करण्यासाठीं साहित्य घेऊन उभे आहों. आणि कामकाज तपासण्यासाठीं तत्पर होऊन वाट पाहात आहों. तर लौकर या, मसलत द्या, हुकूम करा, सेवा सांगा, विनंति ऐका, सही करा, विचार करा आणि व्यवस्था करा."

याप्रमाणें अनेक प्रकारें विलाप करूं लागलेल्या मंत्रिजनांनीं, शत्रुजिताला आणि मनोरमेला शोकानें बेशुद्ध झालेलीं पाहून आणि मुक्तेच्या शरीराचा सांभाळ करण्याची आवश्यकता जाणून आणि आपण या वेळीं काय केलें पाहिजे हाही विचार मनांत आणून, शत्रुजितास विज्ञप्ति केली कीं—"महाराज जें व्हावयाचें तें होऊन गेलें, जें झालें तें आतां न झालें असें व्हावयाचें नाहीं, विलाप करून आतां कांहीं उपयोग नाहीं, पाठीसलागपणानें कोणतीही गोष्ट परत येणार नाहीं, आणखी दैन्य भाकिलें तरी दैवाला दया येईल अशी गोष्ट नाहीं, कितीही शोक केला

तरी तो शांत व्हावयाचा नाहीं, रडण्यानें कंठ शोषण्याशिवाय दुसरें कांहींच प्राप्त व्हावयाचें नाहीं, आसवें गाळण्यानें अंधतेवांचून दुसरा कोणताही लाभ व्हावयाचा नाहीं, आणि लोळण्यांत शरीर मळिण होण्याशिवाय दुसरा कोणताही गुण नाहीं, यास्तव आतां जें आपल्या हातीं आहे त्याची काळजी करावी हेंच योग्य आहे. कोणा दासीच्या द्वारा ही वाईट बातमी समजल्यावरून कुमारवधु मुक्ता फार आक्रोश करीत आहे, दासींनीं धरून ठेविली असतांही त्यांच्या हातून निसटून जाऊन जमिनीवर आंग टाकीत आहे, ऊर बडवीत आहे, कपाळ कुटीत आहे, आणि अनुमरण करण्याचा निश्चय जाणवीत आहे; यासाठीं तिला अगोदर आश्वासन देण्याकरितां महाराणीला येथून मुक्तेच्या मंदिरांत पाठवून देणें जरूर आहे."

मंत्र्यांची ही विज्ञाति ऐकून शत्रुजिताला कांहीं धीर येऊन तो बोलला कीं—"मनोरमे! कालगति अलंध्य आहे, जेवढें पुण्य केलें असेल तितकेंच सुख प्राप्त होणार, आपल्या पूर्वजन्मींची पुण्याई थोडी असेल आणि पापें पुष्कळ असतील, ह्मणूनच सुख लौकर समाप्त झालें आणि दुःखमात्र जिवंत आहों तोंपर्यंत भोगणें आलें. दैव शब्दाचा अर्थ ह्मणजे पूर्वजन्मीं केलेलीं पापें व पुण्यें हाच होय, या पलीकडे दुसरा कांहीं नाहीं; ह्मणून जो कांहीं दोष द्यावयाचा तो स्वतांस आपल्यासच दिला पाहिजे. दैव कोणाच्या अधीन नाहीं, परंतु सर्व कांहीं दैवाच्याच अधीन आहे. चंद्र एकच दिवस संपूर्ण असतो, आणि त्याची क्षीणता पुष्कळ दिवसपर्यंत चालत असते, यावरून काय सिद्ध होतें?—तर देवादिकांसही सुखापेक्षां दुःखाचा समयच लांबवर भोगावा लागतो. ज्यांच्या निःश्वासानें जगाचा प्रलय होतो, आणि उच्छ्वासानें सृष्टि उत्पन्न होते, ते देवही कालाच्या अधीन असतात; मग इतरांची कथा काय? वायु जसा हजारों दिव्यांस एकदम मालवून टाकूं शकतो तसा काळ हजारों

चक्रवर्तीराजे, इंद्र आणि ब्रह्मा यांस नष्ट करतो. सगर, मांधाता, नहुष, ययाति, रामचंद्र, भगीरथ इत्यादि राजे जे इंद्राहूनही अधिक होते ते आज कोठें आहेत? आपण आजच ज्यांस हसते, खेळते, गाते पाहात असूं त्यांसच वेळेनुसार आजच पुन्हां पाहणार नाहीं. आपण जन्मापासून आज दिवसपर्यंत पाहिलेले किती किती पदार्थ केवळ स्वप्नवत् होऊन गेले आहेत? त्यांची आज आठवणही बुजून जाऊन मागमूसही उरला नाहीं याचा विचार करा. सुख अकाल वृष्टीसारखें अकस्मात येतें आणि अकस्मात निघून जातें. मनोरमे! तुह्मी शोकाचा त्याग करून सुनबाईकडे जा, आणि तिला आश्वासन द्या. गंधर्वाची पुत्री, सुकुमार शरीराची मुक्ता, पतीच्या असह्य शोकामुळें, न जाणों, प्राणही सोडील. तिच्यापाशीं लौकरच जाऊन भेटा. अशा वेळीं वृद्ध मनुष्यांनीं जवळ असणें फार जरूर आहे."

शत्रुजिताच्या सांगण्यावरून चिंतेनें दुप्पट घेरलेली, शोकानें विव्हळ झालेली, कसलेंही कर्तव्य कर्म न ओळखणारी, राजापासून उठली असतांही डोळ्यांपुढें आंधेरी आली असल्याकारणानें रस्ताही न पाहूं शकणारी, आणि जिनें आपले दोन्ही बाहु दासीच्या खांधांवर ठेकिले आहेत अशी मनोरमा रडत रडत मुक्तेच्या मंदिरांत गेली.



# प्रकरण ४८ वें.



## अनुमरण.



**म** नोरमा मुक्तेच्या मंदिरांत येऊन पोंहचली ते वेळीं मुक्ता पडत-झडत, ऊर बडवीत बडवीत आणि लोळत लोळत, विलाप करीत होती. ती ह्मणाली—"अहो प्राणनाथ! अहो चंद्रमुख! तुह्मी परत येण्याची जी मुद्दत कबूल केली होती ती पुरी झाली असतां, तुह्मी आल्यावर तुमच्या-वर रुसण्याचे, तुह्मी विनवण्या केल्या असतांही तुमच्याशीं न बोलण्याचे, आणि पायां पडला असतां बराच वेळपर्यंत तुमच्यापासून विमुख राह-ण्याचे संकल्प मी करीत होतें. पण दुर्दैवानें हे सर्व संकल्प मोडून काढले, आणि उलटें आज माझ्यावरच तुह्मास रुसावयास लाविलें आहे. आणखी हा रुसवा अशा प्रकारचा आहे कीं मी जिवंत असें तों पर्यंत तुह्मी माझ्याजळ कधीं येऊंच नये. हे माझ्या प्राणा! मी तुमचा काय अपराध केला?—कीं तुह्मी विवाहाच्या वेळीं केलेले करार तोडून टाकून मला अनोळख्यासारखें टाकून एकदम निघून गेलां. राजकुमारा! पृथ्वीच्या धुळीनें आणि दगडगोट्यांनीं तुमचें कोमळ शरीर कष्टी होत असेल, लौकर उठा आणि माझ्या पलंगावर येऊन बसा. तुह्माला काय, माझ्यापेक्षां ही पृथ्वी अधिक प्रिय वाटते? सगळ्या गात्रांनीं पृथ्वीचेंच आलिंगन करणें तुह्मास अधिक गोड वाटतें? तुह्मीं स्वर्गलो-कींच्या अप्सरांस उपभोगण्याच्या लालसेनें माझा त्याग केला काय? असें असेल तर मी तुह्मांस खचित सांगतें कीं स्वर्गलोकींची कोणीही अप्सरा माझ्याहून श्रेष्ठ नाहीं, आणि तुह्मालाही अनुभव असेल कीं स्वीयेच्या उपभोगासारखा सामान्येच्या उपभोगापासून कधींहीं आनंद

होत नाहीं. आज तुमच्या आयुष्याबरोबर माझ्या विहाराची परिसमाप्ति झाली, आशांचा शेवट झाला, आणि सुखाचाही अंत झाला. शिव शिव! जन्मापासूनच सुखांत वाढलेली आणि तुह्मी आणखी अपार सौख्यामध्यें ठेविलेली ही मुक्ता अनाथाप्रमाणें आणि अमंगळाप्रमाणें विधवापणाला तसेंच शोकसंतापाला कशी सहन करील? कोणीही कन्येनें शूर पुरुषाबरोबर विवाह करूं नये, या महावाक्याचा मला आज पुरतेपणीं अनुभव आला. माझें हृदय पहिल्यानें कामरूप अग्नीनें आणि या वेळीं शोकरूप दावानलानें भाजत असतांही त्याची मेल्याची राख कशी होत नाहीं? अरेरे! मी अनाथ होऊन गेलें. राज्यलक्ष्मी भटकूं लागली. सासूसासरे निराधार होऊन पडले. विद्या निष्फळ झाली. कळा निरुपयोगी झाल्या. मुनिजन निराश झाले. परिजन परिताप पावले. आणि केवळ दैव व शत्रु प्रसन्न झाले. हाय हाय! मलातर आजपासूनच नव्हे तर तुह्मी एथून प्रयाण केलें त्या दिवसापासूनच विधवापणाला प्रारंभ झाला ह्मणून समजलें पाहिजे. सूर्य अस्तास गेला असतांही जशी त्याची प्रभा त्यास सोडीत नाहीं त्याच प्रमाणें तुह्मांस रणभूमीवर निजते वेळीं आणि चितेवर अग्नीनें जळते वेळीं सुद्धां राज्य लक्ष्मीनें सोडिलें नाहीं. अरे! जें शरीर कामदेवाच्या पुष्पमय बाणांनींही संतप्त होत होतें आणि ग्रीष्मकाळच्या उष्णवायूनेंही घाबरून जात होतें, तेंच शरीर आज चितेच्या ज्वाळा कशा सहन करूं शकलें असेल? पहिल्यानें पतीला मरण यावें हें स्त्रीचें मोठें दुर्भाग्य समजलें पाहिजे, तें आज या नीच दैवानें मला प्राप्त करविलें! अहो प्राणनाथ! तुह्मी माझ्या जीविताबरोबर माझ्या सासूच्या जीवितालाही व्यर्थ केलें, इतकेंच नाहीं तर तुमचें दीर्घ आयुष्य सांगणाऱ्या जोशांचीं, आणि मी अविधवा राहवयाची आणि पुत्र प्रसूत व्हावयाची ह्मणून सांगणाऱ्या सामुद्रिकांचीं भाषणेंहीं खोटीं पाडलीं. माझें पाणिग्रहण करते वेळीं तुझा त्याग करणार

नाहीं या प्रतिज्ञेची आठवण करून मलाही तुमच्याबरोबर घेऊन चला. मी आपल्या स्तनमंडलाचीही भीति धरून ज्या तुमच्या शरीराचें आलिंगन घेत होतें त्याच तुमच्या कोमळ शरीराची रानामध्यें काय दशा झाली असेल? तुह्मी संग्रामरूप अश्वमेध करून दुष्ट दैत्याच्या त्रिशूळाच्या पाण्यानें अवभृथस्नान केलें, परंतु तिकडे तुमच्या धर्मपत्नीवांचून तसें करण्याला तुह्माला अधिकार कोठून मिळाला? अरेरे! मला तुमच्या पाटीं बसून राजसूय आणि अश्वमेध इत्यादि यज्ञांच्या पुण्यामध्यें विभागी होण्याची आणि शेवटीं अग्निहोत्राच्या अग्नीनें दग्ध होण्याची मोठी आशा होती, ती तुह्मीं निष्फळ करून टाकिली. "पतिव्रता अबलेचा कोणत्या अपराधास्तव त्याग केला?" असें तुह्माला जेव्हां पुसतील तेव्हां त्यांस तुह्मीं काय उत्तर द्याल? हे दुर्दैवा! मी तुझें काय घोडें मारलें होतें, कळत नाहीं. असें असतां माझ्यावर एवढा कोप कशासाठीं केलास? मी तुला हात जोडून मस्तकानें प्रणाम करून विनवितें कीं माझे सगळे अपराध क्षमा करून माझे प्राण काढून घे आणि त्वरितच माझ्या पतीची गांठ घालून दे. विधवापण प्राप्त व्हावें असें एकही सामुद्रिक लक्षण माझ्या आंगीं दिसून येत नाहीं, इतकेंच नव्हे तर पतीबरोबर राज्याभिषेक व्हावा अशी मात्र अनेक चिन्हें दिसून येतात, असें असतांही ही दशा कां प्राप्त झाली? रोमावली कोमळ, वर्ण माणिकासारखा, नाभि खोल, स्तन पुष्ट, दांत निबिड आणि वट्ट, केश बारिक, अंगानें सुपिंड, तसेंच मांड्या आणि कानशिलें वगैरे भाग मांसल अशीं आहेत, त्यापेक्षां या लक्षणांवरून सामुद्रिक शास्त्राप्रमाणें मला महाराणीपद मिळण्याविषयीं आणि अविधवा स्थिति कायम राहण्याविषयीं सुचवितात, असें असतां हें सर्व आज कसें विफळ होऊन गेलें? हाय हाय! मी अशीच्या अशीच आहें तरी थोड्याच अवकाशांत काळानें मला भलतीच करून टाकलें! काळ सुलट्याचें उलटें करून टाकतो

आणि उलट्याचें सुलटें करण्यालाही तोच समर्थ आहे. पिता गंधर्वराज, सासरा चक्रवर्ती आणि पति त्रैलोक्याला जिंकणारा, ह्मणून मी सर्वदा गर्व वाहात होतें, परंतु दैवानें तो माझा सारा गर्व हरण केला. अरे ! मी फसून गेलें, दुःखित झालें, अनाथ झालें, अशरण झालें आणि दुर्भंग होऊन गेलें. शिव शिव ! गळा दाटून आला तरी हृदय फाटत नाहीं. आसवें टप टप पडतात तरी शरीर पडत नाहीं. विलाप बाहेर निघतात तरी प्राण निघत नाहींत. मन जळत आहे तरी शरीर जळत नाहीं. संकटावस्था दिसत आहे तरी मरणाची आशा दिसत नाहीं. हाय हाय ! ज्याच्यासाठीं मुलींस न शोभे अशी स्वतंत्रता स्वीकारली, अपकीर्ति पतकरली, लाज सारी सोडून दिली, शिक्षण एकीकडे सारलें, निंदेला कान झाकले, अनंगप्रभेला घाबरवून सोडलें, गुरुजनांचीही पर्वा केली नाहीं, शास्त्रवचनेंहीं पाहिली नाहींत आणि कामदेवाच्या अधीन होऊन कोणत्याही गोष्टींत मागें वळून पाहिलें नाहीं, अशा प्राणनाथानें मला आतां सोडून दिलेंना? मग काय करूं? कोठें जाऊं? तो कोठें मिळेल? कसें होईल? काय गति प्राप्त होईल? शिव शिव! हें काय झालें? माझ्या सासूप्रमाणेंच नीतिही निराधार झाली. गुणी जनांप्रमाणेंच धर्म भ्रमिष्ट झाला. माझ्याप्रमाणें विद्याही विधवा होऊन बसली. आणि प्रजेप्रमाणें राजलक्ष्मीही विलक्ष होऊन गेली. प्रियकरा ! तुमच्यावांचून कोठें राहूं? क्षणमात्रसुद्धां वांचेन असें वाटत नाहीं. जेथें असाल तेथें मला बोलावून न्या. मी आंधळी होऊन गेलें आहें, तर जबाब द्या. माझ्यावरील प्रेम कोठें गेलें? तुमच्यासाठीं मीं काय काय केलें तें आठवा, किंवा अनंगप्रभेला विचारा. काय कारणास्तव तुमचें अंतःकरण सदय होत नाहीं? तुह्माला कोणत्या गोष्टींत मी आडवी आलें? अरे मृत्यो ! तूंही माझ्यावर कां कृपा करीत नाहींस? हं, समजलें. मृत्युही मज अभाग्येचें मुखावलोकन करण्यास राजी नसावा ! दासीनो!

चिता रचा, ह्मणजे बलात्कारानें जाळून घेऊन प्राणप्रियाची गांठ घेण्यास चालती होईन. स्नेह मोठा दुष्ट आहे, दैव विपरीत आहे आणि शोक दुसऱ्या कोणत्याही उपायानें टळेल असा नाहीं. जर मला अग्नि मिळणार नाहीं तर विष खाऊन अथवा गळफास घेऊनही मी प्राणत्याग केल्याशिवाय राहावयाची नाहीं. प्रिया या दासीचे दीन विलाप कानावर कां घेत नाहीं? साष्टांग प्रणाम करून मी विनवितें कीं येथें येऊन, या दीन अबलेला आश्वासन द्या आणि विव्हळ झालेल्या आईबापांस आनंदित करा. तुमचे ठिकाणीं स्नेह, गुरुभक्ति, धार्मिकपणा, वात्सल्य, अनुराग तसेंच पितृप्रेम इत्यादि सद्गुण वसत होते ते एकाएकीं कोठें गेले? आणि माझ्या दुर्भाग्यानें असा निर्दयपणा कोठून आला? हे दुर्दैवी माझे प्राण हरून नेण्याची उपेक्षा करून, अझूनही कोठपर्यंत मला जाळण्याची तुझी इच्छा आहे? दासीनों! माझ्या सासूबाईंची नीटपणें सेवा करीत जा बरें. त्यांच्या डोक्यावर पडलेलें पुत्रमरणाचें असह्य दुःख, माझ्या मरण्याच्या दुःखानें द्विगुणित होऊन, त्यांचे प्राण घेणार नाहीं अशा रीतीनें त्यांस जपत जा. माझे तोंडून एखादवेळ कठोर भाषणें निघालीं असतील, त्यांची तुह्मी क्षमा करा. माझ्या सासूबाईंची संमति घेऊन ह्या मंदिरामध्यें जें कांहीं माझ्या स्वामीचें अथवा माझें असेल तें सर्व ब्राह्मणांस दान करा. माझ्या बिछान्याखालीं कित्येक लज्जाकर चित्रें आहेत तीं सासूबाईंच्या दृष्टीस पाडल्यावांचून जाळून टाका. ही मैना, हा पोपट वगैरे पक्ष्यांस पिंजऱ्याच्या बंधनांतून मुक्त करा. माझ्या स्वामीनें माझ्यासाठींच देशोदेशींहून आणवून संग्रहस्थानामध्यें जमविलेल्या जनावरांस जंगलामध्यें नेऊन सोडवा. माझ्या विनोदाच्या वस्तूंमधून जें कांहीं तुह्मांस पाहिजे असेल तें तें तुह्मी माझ्या सासूबाईंच्या संमतीनें घ्या. आणि माझ्या या स्तुतीची भावना कधींहीं मनांत आणून, खेद करूं नका. स्वामीकडून बहुमान

पावलेल्या ह्या अभागी शरीराला स्वामीच्या पाठोपाठच जाऊं देणें योग्य आहे, परंतु जनसमाजामध्यें सासूबाईच्या हाताखालीं आभरणादिकांनीं सुशोभित असें जें हें दिव्यशरीर मिरवलें तेंच पुढें दमनीय आणि शोच्य स्थितीमध्यें विद्रूप होऊं देणें योग्य नाहीं. जिवंत असतां उपभोगानें आणि मेल्यावर अनुमरणानें स्वामीस अनुसरणें हाच कुलीन स्त्रियांचा धर्म होय. कुलस्त्रियांस अनुमरणच वैधव्यांतील सर्व दुःखांतून मुक्त करणारें एक साधन आहे, कीर्तीला संपादन करणारें आहे, परलोकीं प्राणप्रियाचा समागम करून देणारें आहे, पाणिग्रहणसमयींचे करार खरे करून दाखविणारें आहे, आणि कृतज्ञपणाची वरिष्ठ पदवी प्राप्त करून देणारें आहे. दासीनो! तुह्मी माझ्याकरितां अझूनही चिता तयार करून दिली नाहीं. परंतु आतां चितेचीही गरज उरली नाहीं. माझे प्राणही या शरीरास अमंगळ समजत असावे अशा प्रकारें आपण होऊनच त्यास सोडून देण्याला ते तयार झाले आहेत, पहा!"

याप्रमाणें ऐकणारांचें सुद्धां हृदय फुटून जाईल अशा प्रकारें विलाप करणारी; कुऱ्हाडीनें तोडून टाकलेल्या लतेप्रमाणें जमिनीवर पडलेली; अश्रूंच्या धारांनीं द्रवीभूत झाली असावी अशी दिसणारी; गळ्यावर येऊन पडलेल्या केशांनीं गळफास घेत असावी अशी दिसणारी; दासीजन दोन्ही हातांनीं धरून उठवूं लागला असतां त्यांच्या हातांतून शरीर निसटवून गडबडा लोळणारी; मूर्च्छेनें पाताळांत उतरून जात असावी अशी भासणारी; कोठेंही शिकली नसतां आणि ऐकण्याचाही संभव नसतां, अभ्यस्त असावी अशा प्रकारें दीन प्रलापाक्षरें काढून पिंजऱ्यांतील पक्ष्यांसही रडविणारी; जीविताच्या एक एक क्षणालाही हजार हजार वर्षांप्रमाणें आणि नरकवासाप्रमाणें गणणारी; अश्रूंच्या आणि धुळीच्या संयोगामुळें, चिखलानें माखल्याप्रमाणें दिसणाऱ्या तिच्या सुटलेल्या केशांनीं जिचें

मुख झाकून गेलें आहे अशी; अत्यंत आक्रोशानें कंठ फुटून गेल्याकारणानें जिचा स्वर घोगरा झाला आहे अशी; दासींच्या शांतवनाच्या भाषणाची यत्किंचितही पर्वा न धरणारी; डोळ्यामध्यें जळमय आणि मुखामध्यें पवनमय होऊन गेली असावी अशी दिसणारी; हृदय कुसुमायुधाकडे गेलें असल्याकारणानें शून्यहृदय झाली असावी अशी दिसणारी; माथीं दुःखरूप शिखर कडकडून पडल्याकारणानें चुरडून गेली असावी अशा प्रकारें अत्यंत दुर्बळ होऊन गेलेली; संतापाच्या भयानें पळून जाऊं लागले असावे अशा प्रकारें कंठाच्या शिंवेवर येऊन ठेपले आहेत प्राण जीचे अशी; शून्य, दीन आणि आसवांनीं व्यापलेलीं मुखें ज्यांचीं अशा दासींनीं प्राणाच्या परीक्षेसाठीं वारंवार चिंताचपल नेत्रांस आकर्षण करून घेणारी; "दैवानें सुरू केलेला विपरीत आरंभ जसा कांहीं कुसुमायुधाच्या मरणाच्याही पुढें वाढणार," अशी शंका सर्व परिजनांच्या मनांत उपजविणारी; पहिल्यानें शीत उपचारांनीं अर्धवट दग्ध होऊन नंतर कुसुमायुधाच्या वाईट बातमीच्या संतापानें पुरतेपणें दग्ध झालेली साक्षात् शोकवृत्तिच अबलेचें रूप घेऊन पडली असावी अशी दिसणारी; शोकानें आणि मरणानेंही विलक्षण स्थितीचा अनुभव आणून देऊं लागलेली; श्वासरूप हृदयस्थ विरहाग्नीच्या उष्ण वाफेनें दग्ध होत असावे अशा प्रकारें बिंबफळासारखा वर्ण टाकून जांभळासारखे ओठ होऊं लागले आहेत जीचे अशी; दोनही कोपऱ्यांतून अश्रूंच्या धारा वहात असतांही जिचे डोळे फिकट झाले आहेत अशी; मस्तक स्थिर ठेवूं न शकल्याकारणानें दासींच्या उठविण्याच्या प्रयत्नाला व्यर्थ करणारी; अशी मुक्ता मनोरमेच्या दृष्टीस पडली.

मुक्तेच्या शरीराची अशी दशा पाहतांच आपल्या शरीराला स्थिर न ठेवूं शकणारी, घाबरलेली, संकोच पावणारी, थरथर कांपणारी, रडणारी, भयभीत झालेली, भानावर नसलेली आणि दुःखामध्यें आणखी दुःखाची

भर घालणाऱ्या दैवाच्या स्वभावाला धिक्कारणारी मनोरमा दोन्ही हातास दासींच्या हातांतून सोडवून चटकन मुक्तेपाशीं आली. ती मुक्तेच्या कपाळ वगैरे अवयवांवर हात फिरवूं लागली आणि तिचे कुरळ केस मागें सारूं लागली; मुक्तेच्या मूर्च्छेनें शांत करूं पाहात असावी अशा प्रकारें तिच्या अवयवांस अश्रुजळानें भिजवूं लागली; लागलीच येऊन कां कळविलें नाहीं असा दासींस ठपका ठेवूं लागली; राजवैद्यांस बोलावून आणण्यासाठीं मनुष्यांस पाठवूं लागली; अपार चिंतेनें घेरल्याकारणानें चंद्राचें खग्रास ग्रहण असलेल्या पुनवेच्या रात्रीप्रमाणें दिसूं लागली; मुक्तेला शुद्धीवर आणण्याचे कामीं निरुपाय झाल्याकारणानें भ्रमिष्टासारखी होऊं लागली; निःश्वास टाकण्याचेंही विस्मरण पावत असावी अशी दिसूं लागली; आणि शेवटीं स्तब्ध आणि वेडीप्रमाणें बनून मुक्तेचें मस्तक मांडीवर घेऊन बसली. परंतु लौकरच दासींनीं सांगितलें कीं—"महाराणी साहेब! पहातां काय? दैव फिरलें. मुक्तेची मान लडबडली आहे, हातांत किंवा पायांत नाडी कोठेंही हातास लागत नाहीं, डोळ्यांच्या बाहुल्या खचलेल्या दिसतात, पापण्या हालण्याच्या बंद झाल्या आहेत, गात्रें लाकडासारखीं झालीं आहेत, हातापायांच्या तळव्यांस स्पर्श केला असतां मुळीं सुद्धां उष्णता लागत नाहीं आणि श्वास तर बिलकुल दिसत नाहीं."

याप्रमाणें दासींचें भाषण ऐकतांच महाराणीनें मोठी किंकाळी मारली. महाराणीच्या किंकाळीमागून दासीही किंकाळ्या मारूं लागून आर्तस्वरानें आक्रोश करूं लागल्या. एकावर एक वज्रपात घडल्या कारणानें बोलण्यासही असमर्थ झालेली महाराणी घरघर शब्दानें करुणाकर विलाप करूं लागली, तों आर्तस्वराचा कोलाहल ऐकून घाबरून गेलेला शत्रुजित्‌राजाही मंत्र्यांसहित तेथें आला. मुक्ताही मरण पावल्याचें लक्षांत येतांच, शत्रुजित् आणि मंत्री धैर्य सोडून रडूं लागले. सगळ्या

शहरभर एकच हाहाकार उडून गेला. दरबारामध्यें शेंकडों मनुष्यें रडत रडत आलीं. शहरचे एकंदर बाजार, दुकानें बंद झालीं. दरबार आणि शहर विलापमयच असावें असें भासूं लागलें. अजाण लोक परस्परांस या गोष्टीची हकीगत विचारूं लागले. कोणीं एका प्रकारची, कोणी दुसऱ्याप्रकारची, आणि तिसरा तिसऱ्याप्रकारची, अशा अनेकांच्या अनेक कल्पना चालू झाल्या. स्नेही लोक, महाराजांवर आणि महाराणीवर ह्यातारपणीं येऊन पडलेल्या दुर्दशेविषयीं खेद करूं लागले; कुसुमायुधाचे आणि मुक्तेचे गुण आठवून आठवून आर्तस्वरांनीं त्यांस वानूं लागले; आबालवृद्ध सर्व लोकांचीं मुखें अश्रूंनीं मलिन, दीन आणि विवर्ण होऊन गेलीं; सर्व लोकांच्या मुखांतून "हाय हाय, वाईट झालें," असा एकच ध्वनि निघूं लागला; मुमुक्षु, उदासीन आणि संन्यासीसुद्धां, स्नेहवश होऊन, इष्टमित्रांप्रमाणेंच रडूं लागले; सर्वच जण देवावर शिव्यांची वृष्टि करूं लागले; शोकामुळें दरबार, राजमार्ग, आणि गल्ल्या यामध्यें पाणी शिंपण्याचें बंद झालें असतांही लोकांच्या अश्रुपातांनींच त्याची गरज मिटविली; आणखी शत्रुजित् आणि मनोरमा हीं "कुसुमायुधाकरितां रडावें, सुनेकरतां रडावें किंवा आमच्या दुर्दशेकरतां रडावें?" असें बोलबोलून दीनस्वरांनीं विलाप करूं लागलीं.

थोड्या वेळानंतर लौकिक आणि शास्त्रीय पद्धति जाणणाऱ्या मंत्र्यांनीं तसेंच पुरोहितानें मुक्तेच्या शवाला राज्यांतील रीतीप्रमाणें मोठ्या सन्मानानें गंगेच्या कांठीं घेऊन शत्रुजिताच्या हातानें त्यास अग्निसंस्कार केला. स्मशानामध्यें शेंकडों मनुष्यें जमल्याकारणानें, दिशांच्या सांध्यांस फोडून टाकणारा मोठा जबरदस्त आर्तस्वर उठला. सरणावर मुक्तेस पाहून सर्व स्त्रिया रडत रडत बोलूं लागल्या कीं—"ज्या मुक्तेला पुष्पांची शय्याही कठिण लागत होती, जाळींतून दिसणारे सूर्याचे किरणही म्लान करून टाकीत होते, मोत्यांचीं आभरणेंही भाररूप भासत होतीं,

मेंदी लावण्याची नुसती चर्चाही पायाच्या तळव्याला खाली आणीत होती, आणि दिव्याचा प्रकाशही डोकें दुखवीत होता, तीच मुक्ता, आज कठोर अशा काष्ठांनीं दडपलेली, चितेच्या प्रचंड अग्नीच्या ज्वाळा कशी सहन करूं शकत असेल? अथवा स्नेहच असा कांहीं पदार्थ आहे कीं त्याच्या अमलाखालीं कोणतीही गोष्ट दुष्कर अथवा असत्य दिसत नाहीं. आई बाप, भाऊ बंद, सखे सोयरे, आणि मुलेंमाणसें जें कांहीं देतात तें परिमितच देतात; पण स्त्रीला पति जें देतो त्याला गणनाच नाहीं. म्हणूनच पतिव्रता स्त्रीला पतीचा विरह कसा सहन व्हावा? अशा प्रकारें सुकुमार आणि पवित्र अबला यांचें वाईट करणाऱ्या ब्रह्मदेवाचें कोठून कल्याण होईल? भागीरथी जशी भगीरथाच्या पाठोपाठ गेली तशी पतीच्या पाठोपाठ जाणारी ही अबला धन्य होय. मुक्तेच्या सारखी स्त्री शोधूं गेलें असतांही मिळणें कठीण. ज्यांचें हिंडणें फिरणें शयनगृहापर्यंतच, मंदस्मिताची छटा अधरापर्यंतच, दृष्टिची गति नेत्रांच्या पापण्यापर्यंतच स्वराची गति पतीच्या अथवा सखींच्या कानापर्यंतच, चित्ताची गति पतीच्या अभिप्रायापर्यंतच आणि प्राणांची पतीच्या जीवितापर्यंतच असते त्या स्त्रिया धन्य होत."

याप्रमाणें स्त्रियांचीं भाषणें ऐकून ऐकून घाबरून जाणारा, आपल्या आणि मनोरमेच्या दीर्घ आयुष्यास धिक्कारणारा, आणि मनोरमेचें आश्वासन करतां येणें अशक्य असें समजून काळजींत पडलेला शत्रुजित् पुरोहिताच्या सांगण्याप्रमाणें कुसुमायुधाच्या आणि मुक्तेच्या क्रिया करून सर्व लोकांसमवेत रडत रडत दरबारीं आला.

# प्रकरण ४६ वें.

## आत्मबोध आणि शोकोपशांति.

महाराज शत्रुजित्, दरबारांत आल्यावर, बरोबर आलेल्या इतर मंडळीस निरोप देऊन, मंत्र्यांबरोबर एकांतांत बसून, पुत्रसंबंधी शोक करूं लागला; आणि तिकडे मनोरमाही करुणाजनक अनेक शब्दांनीं विलाप करूं लागली. इतक्यांत एक महान, विद्वान, परमशांत, आणि ब्रम्हनिष्ट असा कोणी सन्यासी येऊन, त्यानें त्यांचें पुढीलप्रमाणें सांत्वन केलें. “महाराज! तुम्ही स्वतां शोच्य असतां कोणाचा शोक करतां? आणि स्वतां दीन असतांही कोणावर दया करतां? असाही एक वेळ यावयाचा आहे कीं तुम्ही जसा पुत्राचा आणि सुनेचा शोक करितां तसा इतर लोक तुमचाही शोक करतील आणि त्यांचा फिरून तिसरेच कोणी करतील. अनेकांच्या एकत्र अवचित गांठी पडल्या असतां, त्यांतून कोणी लौकर निघून गेले, कोणी उशीरां जाणार. मग त्यांच्या सर्वांच्यासाठीं काय शोक केला पाहिजे? तुम्ही, मी, इतर लोक आणि हा सर्व भोग्य वर्ग ज्यांतून प्रगट झाला आहे व ज्यांतच फिरून लय पावणार आहे, तेंच पद शोकरहित होय. संसारांत उत्तम, मध्यम, अथवा अधम असा कोणीही प्राणी दुःखरहित मिळून नाहींच. समुद्रांत जशीं गलबतें आणि पाणपोईवर जशीं मनुष्यें एकत्र मिळतात आणि एके ठिकाणीं जमून फिरून निरनिराळीं होतात, त्याचप्रमाणें पुत्र, पौत्र, बांधव वगैरे लोक एकत्र जमतात आणि जमा होऊन फिरून वेगळे पडतात. यास्तव अवश्य वेगळीं पडणाऱ्या या लोकांविषयीं स्नेह ठेवणें बरोबर नाहीं, तसाच विषादही धरणें वाजवी नाहीं. जर आत्मस्वरूपाचा विचार कराल तर एके परी हा देह सुद्धां आपला नाहीं, आणि दुसरे रीतीनें पाहतां

सगळें ब्रह्मांड आपल्यामध्यें अध्यस्त असल्याकारणानें आपलेंच आहे. आणि ही गोष्ट आपल्या संबंधानें जशी आहे तशीच ती इतरांच्या संबंधानेंही खरी आहे, ह्मणून कोणत्याही प्रकारें पाहिलें तरी शोक किंवा हर्ष मानणें वाजवी नव्हे. स्वप्नामध्यें मनुष्यें जशीं परस्परांविषयीं शोक करितांना आपण पाहतों त्याचप्रमाणें आतांही परस्परांचा शोक करतांना आपण पहात आहों, आणि स्वप्नांतील मनुष्यें कल्पनेनें मात्र अस्तित्वांत असल्याकारणानें वास्तविकपणें जशीं परस्परांस ओळखीत नाहींत त्याचप्रमाणें आतांही मनुष्यें कल्पनेनेंच मानिलेलीं आहेत, आणि वास्तविकपणें एकमेकांस ओळखीत नाहींत असें समजावें. तृष्णेनें दुःख होतें, दुःखाच्या नाशानें सुख होतें, आणि सुखाच्या नाशानें फिरून तृष्णा उत्पन्न होते, आणि ती फिरून दुःखालाच उत्पन्न करिते. चालत्या गाडीच्या चाकाचे आरे जसे एकामागून दुसरा, दुसऱ्यामागून तिसरा याप्रमाणें फिरून फिरून पहिला, दुसरा असे येतात त्याचप्रमाणें सुखामागून दुःख आणि दुःखामागून सुख हें चाललेंच आहे. बहुत प्रकारच्या स्नेहपाशांनीं बंधन पावलेले लोक, पाण्यामध्यें बांधलेल्या वाळूच्या पुलाप्रमाणें निरुपयोगी होऊनच नाश पावतात. यास्तव ही गोष्ट पुरी ध्यानांत ठेविली पाहिजे कीं ज्याप्रमाणें तीळ पिळण्याचें कारण स्नेहच होय त्याप्रमाणें मनुष्यांस पिळण्याचें कारणही स्नेहाशिवाय दुसरें काय असणार ? ह्मणून स्नेहच सोडून द्यावा ह्मणजे झालें. लोक दुःख टाळण्यासाठीं आणि सुख मिळविण्यासाठीं यत्न करितात, पण हें लक्षांत आणीत नाहींत कीं सुख आणि दुःख हीं प्रयत्न केल्यानें मिळत नाहींत आणि टळतही नाहींत, परंतु त्यांचें चालक दैवच होय. ज्यास अनेक मित्र असतात तोही दुःखी होतो; ज्यास अनेक शत्रु असतात तोही सुखी होतो. बुद्धिमानही दुःखी होतो, आणि मूर्ख सुख पावतो. जसें दुःख मागितल्यावाचून येतें तसेंच सुखही आपोआपच प्राप्त होतें, त्यांत

फेर मिळून इतकाच कीं दुःखाकरितां दीनता भोगावी लागते. सुषुप्ति-वांचून आणि ब्रह्मभावावांचून इतरत्र कोठेंही सुख नाहीं. यास्तव ज्यांत सुख नाहीं त्यापासून सुखाची इच्छा करणें ह्मणजे मूर्खपणाशिवाय दुसरें काय ह्मणावें? जे कोणी देहेंद्रियादिकाबरोबर आपल्या चिदाभासत्वालाही तुच्छ अथवा बाधित समजून शुद्ध चैतन्याचेंच अनुसंधान करितात त्यांस अर्थ अथवा अनर्थ कांहींही व्यथित करूं शकत नाहीं. सुख अथवा दुःख, प्रिय अथवा अप्रिय, जें कांहीं प्रारब्धाच्या गतीनें येऊन पडतें तें खुशाल येऊं द्यावें, परंतु हर्षाच्या किंवा शोकाच्या स्वाधीन आपलें अंतःकरण होऊं देऊं नये. शोकाचीं आणि भयाचीं कारणें हजारों असतात; तरी तीं अज्ञ जनासच व्याकुळ करूं शकतात; ज्ञानी जनांस करूं शकत नाहींत; ज्यानें चिदाभासाच्या उपयोगाशिवाय आपल्या अंतःकरणाच्या वृत्तीनें आणि महावाक्यांच्या लक्षणावृत्तीनें जगाच्या उत्पत्तीच्या आणि लयाच्या स्थानकाला जाणिलें नाहीं त्याला शोक स्पर्शसुद्धां करूं शकत नाहीं; कोणत्याही पदार्थावर जर ममत्व कल्पितां आलें तर तो पदार्थ परिताप देण्यास कारणीभूत झाला ह्मणून समजावें; हृदयामधून तृष्णेला उकरून उकरून काढल्यामुळें जेवढा खाडा पडत जाईल तेवढा खाडा सुखसंचयानेंच भरून येईल. इहलोकचीं किंवा परलोकचीं कोणतींही सुखें तृष्णेच्या क्षयानें होणाऱ्या सुखाच्या एक आण्याशींही तोलण्यास योग्य नव्हत. महाराज! विवेकी पुरुषानें सुख, दुःख, हानि, लाभ, यश, अपयश वगैरे गोष्टींस कालाधीन जाणून, आणि बुद्धि, पराक्रम, धन, आणि मित्र यांजपासूनही कालाचें इच्छिलेलें कार्य निवृत्त करतां येत नाहीं असा मनाचा निश्चय ठरवून, हर्ष किंवा शोक धरूं नये, आणि स्वतांच्या सामर्थ्याची निंदा किंवा स्तुति याही करूं नयेत. काळ द्वेषानें कोणास मारीत नाहीं, पक्षपातानें कोणास सोडून देत नाहीं, भय पावून कोणापासूनही पळून जात नाहीं,

लोभ दाखविल्यानें कोणाचें बरें करीत नाहीं, रडण्यानें कोणावरही दया करीत नाहीं, स्तुति केल्यानें खुष होत नाहीं, निंदेनें रागासही चढत नाहीं, मागितल्यानें देत नाहीं, आणि न मागितल्यानें उपेक्षाही करीत नाहीं, परंतु सदासर्वकाळ आपल्या नियमाप्रमाणेंच वर्तते. प्रवाहाच्या वेगानें रेती जशी एके ठिकाणीं जमून तिची रास होते आणि क्षणांत दूरही होते त्याचप्रमाणें काळाच्या वेगामुळें प्राणी एकत्र मिळतात आणि वेगळे वेगळेही पडून विखरून जातात. हा सगळा संसार जसा सृष्टीच्या पूर्वी नव्हता आणि प्रलयानंतरही असणार नाहीं, त्याचप्रमाणें आतांही तो नाहींच नाहीं. रज्जूमध्यें कल्पिलेला सर्प जसा आदीं अथवा अंतीं नाहीं तसा तो मध्येंही नाहीं. सर्प जसा तिन्ही काळीं नसतांही, मधल्या काळीं रज्जूच्या अज्ञानानें प्रतीत होतो, तसा हा संसारही तिन्ही काळीं नसतांही मधल्या काळामध्यें अधिष्ठानभूत आत्मस्वरूपाच्या अज्ञानानें प्रतीत होतो. हा संसार व्यावहारिक बोधानें सत्य आहे, यौक्तिक बोधानें अनिर्वचनीय आहे आणि श्रौत बोधानें तर मनुष्याच्या शिंगांप्रमाणें अस्तित्वरहितच आहे; यास्तव या संसारांतील कोणत्याही पदार्थाकरितां हर्ष किंवा शोक करणें उचित नव्हे. स्त्री, पुत्र, घर, धन, ऐश्वर्य, संपत्ति, नोकर, मंत्री, संबंधी, सैन्य, पृथ्वी आणि राज्य हें सारें गंधर्वनगराप्रमाणें, स्वप्नाप्रमाणें आणि मनोराज्याप्रमाणें व वास्तकपणें नसतांही दृष्टिगोचर होतें, आणि विचार केला असतां बाधितच दिसून येतें. संसार कर्मांनीं उत्पन्न झाला आहे असें घटकाभर मानिलें तरी कर्मांचें कारण मनाशिवाय दुसरें कोणतेंही सिद्ध होत नाहीं, यावरून संसाराचाही मनोजन्यपणाच शाबित होतो. संसाराला सत्य मानल्यानें शोक, मोह, भय आणि पीडा ह्या शिवाय दुसरें कोणतेंच फळ प्राप्त होत नाहीं. ह्मणून तुह्मी आत्मस्वरूपाच्या विचारानें संसाराला बाधित आणि निस्सत्वच समजून शांति धरा. ह्या ऐंद्रजालिक

प्रयोगामध्यें कर्मांच्या योगानें अनेक योनींमध्यें भ्रमणाऱ्या जीवांस माता, पिता, पुत्र, बंधु, स्त्रिया आणि मुली वगैरे अनेक प्राप्त होतात, आणि अनेक नष्टही होतात; तर यांत कोणाविषयीं हर्ष, शोक धरावा आणि कोणाविषयीं न धरावा? संसारामध्यें एकाच जीवाचे जितके जितके आईबाप, मुलीमुलगे, आणि इतर संबंधी लोक वगैरे प्राप्त झाले, तितके भागीरथींत रेतीचे कणही कदाचित् नसतील. आत्मा अविनाशी आहे आणि देहादिक सर्व पदार्थ विनाशी होत, यासाठीं आत्मा किंवा देहादिक वस्तु यांपैकीं कोणाचाही शोक वाहणें योग्य नाहीं. देह जन्म पावतो तसा आत्मा पावत नाहीं, देह जन्मल्यानंतर अस्तित्व पावतो आणि आत्मा तर सदासर्वकाळ सद्रूपच आहे, देह वृद्धि पावतो आणि आत्म्यास क्षयवृद्धि मुळींच नाहींत. देह भिन्नविभिन्न स्थितीस प्राप्त होतो आणि आत्म्यामध्यें भिन्नतेला जागाच नाहीं. देह क्षीण होतो, आत्म्याला क्षय नाहीं; शेवटीं देह नष्ट होतो आणि आत्मा नष्ट होत नाही. आत्मा देहादिक विकारांमध्यें वसत असतांही निर्विकार राहूं शकतो. सर्व विकारांस अधिष्ठानरूप असतांहीं कोणत्याही विकारांच्या स्पर्शास तो प्राप्त होत नाहीं, सर्व विकारांस कारणभूत असतांही कोणत्याही विकाराला उत्पन्न करीत नाहीं, सर्व विकारांचा प्रकाशक असतांही कोणत्याही विकारानें संग पावत नाहीं, आणि सर्व विकारांचा साधक असतांही जाणल्यानंतर कोणत्याही विकाराला सिद्ध होऊं देत नाहीं. महाराज! ही सृष्टि जी आपल्या पाहण्यांत येत आहे ती विचारानें बाधित आहे; परंतु बाधित असतांही जोंपर्यंत अंतःकरण आहे तोंपर्यंत ती मृगतृष्णिकेप्रमाणें प्रतीत होऊं लागते, आणि अशा प्रकारें प्रतीत झाल्यानें तिच्या संबंधें विवेकी मनुष्यास कसलाही लोभ उत्पन्न होत नाहीं. ही पाहण्यांत येणारी सृष्टि जीवांस कसलेंही दुःख देत नाहीं, पण तिच्या ठिकाणीं जीवांनीं कल्पिलेली, प्रिय अप्रिय आणि

उपेक्ष्य अशा त्रिविध आकाराची नवीच सृष्टि उत्पन्न होऊन दुःख देण्यास तयार होते. स्त्रीव्यक्ति एकच असतांही कोणी तिला पत्नी समजतो, कोणी मुलगी समजतो, कोणी सून ह्मणून मानतो, कोणी मेहुणी ह्मणून मानतो, कोणी आई ह्मणून समजतात, कोणी मावशी समजतात, कोणी आत्या ह्मणून समजतात, कोणी तिराहित ह्मणून समजतात आणि कोणीतर वैरी ह्मणूनच लेखतात. तर यावरून उघड दिसतें कीं आपण मानून घेतलेले आकारच हर्षशोकांचीं मूळ कारणें होत. अधिष्ठानभूत कूटस्थ आणि कूटस्थामध्यें कल्पित बुद्धि, अथवा अविद्या आणि त्यांत पडलेलें कूटस्थाचें प्रतिबिंब ( आभास अथवा चिदाभास ) ह्या तिघांसही मिळून जीव अथवा प्रमाता ह्मणून समजतात. यांत आभासरूप अंश आणि बुद्धि किंवा अविद्यारूप अंश मिथ्या बाधित अथवा कल्पित आहे, आणि कूटस्थरूप अंश अबाधित अथवा सत्य आहे. जीव आणि अंश यांस कल्पित अथवा बाधित समजून "जें कूटस्थ आहे तें माझें मूळचें स्वरूप होय," असें जेव्हां समजलें जातें तेव्हांच प्राणी जीवन्मुक्त झाला असें समजावें. जीवन्मुक्ताचीं संचित आणि क्रियमाण कर्में ज्ञानरूपी अग्नीनेंच भस्म होतात, आणि प्रारब्धकर्म स्वतां दिलेल्या वर्तमान शरीराच्या समाप्तीबरोबरच समाप्त होतें, अर्थात ज्ञानी, वर्तमानशरीर असेल तोंपर्यंत जीवन्मुक्त अथवा गौण ब्रह्मभाव धरणारा असतो, आणि प्रारब्धाचा अंत झाला असतां वर्तमान शरीर नष्ट होतें. त्या वेळीं विदेहमुक्तीला अथवा मुख्य ब्रह्मभावाला ( समरस ब्रह्मपणाला ) प्राप्त होतो. जीवाचें स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही शरीरांनीं विवेचन करूं गेलें असतां ते ते जीव कूटस्थच होतात; आणि जे कूटस्थ होतात ते परब्रह्मापासून यत्किंचितही भिन्न नाहींत, अर्थात कूटस्थाचें आणि परब्रह्माचें मुख्य सामानाधिकरण्य आहे. जेवढें कांहीं दृश्य आहे तेवढें सर्व अद्वितीय ब्रह्माच्या सत्तेपासून निराळी सत्ता धरणारें नाहीं, आणि

जीवाचें मूळचें स्वरूप कूटस्थ आहे असा पुरता निश्चय होईल तर जीवन्मुक्ति मिळालीच ह्मणून समजावें. "हा संसार आत्म्याचे ठिकाणीं वास्तविकपणें चिकटून राहिलेला आहे," अशी जी भ्रांति, तीच अविद्या ह्मणून समजावी. आणि अविद्या जीवपणाचा आणि जगत्वाचा बाध पाहिल्यानें झाल्यावर (हें सर्व मिथ्या होय असा प्रथम निश्चय झाल्यावर) केवळ शुद्ध आत्मा हाच सत्य होय असा निश्चय करविणारी जी विद्या तिच्या योगानें प्राणी निवृत्त होतो. जरी ज्ञानी आणि अज्ञानी या दोघांसही प्रारब्धकर्म अवश्य भोगावें लागतें तरी प्रवासास निघालेल्या दोघा मनुष्यांस श्रम सारखेच होत असतांही, जो पोंचावयाचें ठिकाण दूर नाहीं असें समजतो त्याच्या मनाला क्लेश वाटत नाहींत आणि दुसरा दीन होऊन बसून राहतो; याच दृष्टांताप्रमाणें ज्ञानी जनांस विदेहमुक्तीच्या दृढ आशेचा धीर आल्याकारणानें क्लेश वाटत नाहींत आणि अज्ञानी जन धैर्याच्या अभावामुळें क्लेशच पावतो. ज्यांस जगाच्या आणि जीवपणाच्या मिथ्यात्वाची वासना दृढ झालेली असते असे ज्ञानी जन आपल्या मनांत यत्किंचितही क्लेश न मानतां, प्रारब्धाचा क्षय करण्याच्या इच्छेनें आपआपल्या कर्माप्रमाणें भोग भोगतात; जगाला स्वप्नाप्रमाणें आणि ऐंद्रजालिकाप्रमाणें समजणारे ज्ञानी जन प्रारब्धाप्रमाणें भोग भोगीत असतांही भोगांविषयीं व्यसनी होत नाहींत आणि अज्ञानी लोक जगाला सत्य समजून भोगांविषयीं व्यसनी बनतात. सुखदुःखाचे भोग भोगण्याविषयींच प्रारब्धाचा आग्रह आहे; परंतु भोग्य पदार्थांस सत्य समजण्याविषयीं नाहीं. त्यामुळें प्रारब्ध हें व्यसन उत्पन्न करूं शकत नाहीं; जर भोग्यामध्यें सत्यपणाची भ्रांति असली तरच व्यसन उत्पन्न होतें. स्वप्न जसें तात्काळिक भोगाचें कारण आहे त्याचप्रमाणें जाग्रदवस्था ही तात्काळिक भोगाचें कारण आहे. ज्या प्रमाणें स्वप्न परिणामीं विरस आहे त्याच

प्रमाणें जाग्रदवस्थाही परिणामीं विरस आहे, आणि ज्याप्रमाणें स्वप्न विनाशी आहे त्याचप्रमाणें जाग्रदवस्थाही विनाशी आहे. अशा अशा अनेक प्रकारांनीं स्वप्नाचा आणि जाग्रदवस्थेचा सारखेपणा जाणणारे ज्ञानी लोक कधींही अज्ञानी लोकांप्रमाणें जाग्रदवस्थेंतील वस्तूंच्या ठिकाणीं आसक्त होत नाहींत. इतकेंच नाहीं, तर वेठीला धरलेल्याप्रमाणें प्रारब्धकर्माला भोगीत असतांही आपले ठिकाणीं भोक्तेपणा समजून व्यवहार करतांनाही संकोच पावतात. जों पर्यंत स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनही प्रकारच्या शरीरामध्यें आपल्या स्वरूपाचा अभिमान असेल तों पर्यंत अनेक प्रकारचा परिताप हा होणारच, परंतु ज्या वेळेस विचारा अंती स्वतांचें स्वरूप या तीनही प्रकारच्या शरीराहून निराळें आहे आणि साक्षी होऊन अभिन्न होय, असें समजलें जातें त्या वेळेसच कोणत्याही प्रकारचा परिताप ह्मणून उरत नाहीं. इतकेंच नाहीं तर पहिल्यानें या शरीरांच्या अभिमानामुळें जें कांहीं आपण करतों त्याचाही पस्तावा होऊं लागतो. ज्याप्रमाणें राजेपणा मिळाल्यानें दृढ आशेचा मनुष्य राजाच्या ढबीनेंच चालतो त्याचप्रमाणें साक्षी रूपानें राहाण्याची दृढ आशा उत्पन्न झालेले आणि जीवन्मुक्त झालेले चिदाभास—जे जीव ते असंगपणा वगैरे साक्षीच्या ढबीनेंच वर्ततात. महाराज शत्रुजित! तुह्मीही साक्षीप्रमाणेंच वर्तणूक ठेवा. सर्व शोकसंतापाला सोडून द्या. स्त्री, पुत्र अथवा राज्य वगैरे जें कांहीं दृश्य आहे त्यांजबरोबर तुमचा कसलाही संबंध नाहीं. जें कांहीं दृश्य आहे तें सगळें मृगजळा प्रमाणेंच आहे. ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें पुष्कळ मुलगे वगैरे दृष्टीस पडतात त्याचप्रमाणें जाग्रदवस्थेमध्यें दिसतील. कुसुमायुध आणि मुक्ता हीं दोघें स्वप्नांतील वस्तूप्रमाणें प्रतीतिमात्रच होतीं. त्यांचा नाशही प्रतीतिमात्र झाला आहे. मिथ्या गोष्टींत सत्यत्वाच्या भ्रांतीशिवाय दुसरें कांहींच दुःखदायक

नाहीं. स्वरूपात्मक सुख जें वास्तविक सत्य आहे तें सोडून देऊन स्वजनादिकांच्या सुखाची आशा धरणें हें, आपल्या शरीराच्या छायेच्या योगानें आपल्या शरीरावर पडणाऱ्या उन्हाचें निवारण होण्याची आशा करण्याप्रमाणें आहे. जे जे प्रियकर संबंध उत्पन्न होतात ते ते हृदयामध्यें शोकाचे खिळेच मारले जातात ह्मणून समजावें. सगळे दरवाजे उघडे ठेवलेल्या या शरीररूप पिंजऱ्यामध्यें प्राणरूप पक्षी कसा राहतो हेंच आश्चर्य करण्यासारखें आहे. मग तो, संधी साधतांच, उडून जातो त्यांत आश्चर्य मानण्यासारखें काय आहे? ज्याप्रमाणें बालक आंगठा चुंफीत असतांही स्तनपान मिळत आहे असेंच समजतें त्याचप्रमाणें अज्ञानी जन स्त्रीपुत्रादिकांपासून सुख मिळतें असें मानतात. पुत्र जन्मला नसतो तोंपर्यंत निपुत्रिकपणाचें दुःख वाहतात. तो दुखणेकरी पडला ह्मणजे औषधादिक उपचार करण्याविषयीं दुःख वाहतात. पुढें तो मूर्ख निघाला तर त्याच्या मूर्खपणाबद्दल दुःख वाहतात. मोठा गुणवान निघाला तर तो मरेल एखादा असें समजून धास्तीनें दुःखी होतात. आणि मेल्यावरतर अपार दुःखसमुद्रांत गटकळ्या खाऊं लागतात. मग बोला बरें कीं पुत्र हा सुखदायक आहे किंवा दुःखदायक आहे? किडेही शरीरापासून उत्पन्न होतात आणि पुत्रही शरीरापासूनच उत्पन्न होतात; मग पुत्रांच्या ठिकाणीं किड्यांपेक्षां वेगळी बुद्धि ठेवण्याचें कारण काय? संसार आणि मृगजळ हीं दोनही क्षणभंगुरपणाच्या गुणास्तव सारख्याच योग्यतेचीं होत, असें असतां मृगजळालाच मिथ्या ह्मणावें आणि संसारमात्र खरा ह्मणावा हा केवढा मूर्खपणा! चढतीच्या अंतीं पडती, संयोगाच्या अंतीं वियोग, आणि जीविताच्या अंतीं मरण हीं लागलींच आहेत. मग त्यांच्यासाठीं काय ह्मणून परिताप करावा? व्यवहारदृष्ट्या विचार कराल, तरी सुद्धां कुसुमायुध किंवा मुक्ता यापैकीं कोणाचाही शोक करणें योग्य नाहीं असेंच दिसून येईल. क्षत्रियाचा मुलगा

घरामध्यें मरण पावावा हा मोठा कलंकच होय. आणि गोब्राह्मण आणि प्रजा यांच्या रक्षणार्थ रणभूमीवर त्याचा उपयोग होईल तर त्यांत मोठा उत्कर्षच मानला पाहिजे. रणामध्यें हजारों शत्रूंचा संहार करून पुढें पाऊल टाकीत टाकीत मरण येवो असें क्षत्रिय तर मागणेंच मागत असतात. कुसुमायुध ब्राह्मणाच्या रक्षणार्थ युद्धामध्यें मरण पावला तेणेंकरून मनोरमेला जशा प्रकारची कीर्ति प्राप्त झाली आहे तशी ती तिच्या सासूला किंवा आईलाही झाली नाहीं. कुलीन आणि महापतिव्रता मुक्ता जर कुसुमायुधाच्या मरणाचें दुःख सहन करून मागें रहाती तर त्या-साठीं मात्र शोक करणें वाजवी झालें असतें, परंतु कुसुमायुध मरण पाव-ल्याची वार्ता ऐकतांच तीही त्वरित त्याच्या पाठोपाठ निघून गेली, त्या-मुळें तिच्या साठीं तर हर्षच मानिला पाहिजे."

या प्रमाणें त्या महात्म्या सन्याशाच्या पारमार्थिक आणि व्यावहा-रिक भाषणानें आश्वासनायुक्त झालेल्या शत्रुजितानें, त्याच्या चरणीं प्रणाम करून, हात जोडून, ह्मटलें कीं—"ग्रीष्मऋतूंतील उष्णतेनें तप्त झालेला मनुष्य जसा शीतळ जळ मिळाल्यानें शांति पावतो, आणि व्याधीनीं घेरलेला मनुष्य उत्तम औषध मिळाल्यानें शांति पावतो, त्याच प्रमाणें कुसुमायुध आणि मुक्ता यांच्या मरणाच्या शोकानें व्याप्त झालेले जे आह्मीं त्यांस आपल्या सुबोध भाषणानें शांति प्राप्त झाली आहे. या समयीं आपण येऊन आह्मांस शोकरूप सागरांतून काढिलें आणि आमचा मोहरूप अंधकार दूर करून आत्मबोध केला याबद्दल आह्मी आपले को-णत्या रीतीनें उतराई व्हावें तें कळत नाहीं. अझूनही आपलें सुबोध भा-षण जास्ती ऐकण्याविषयीं माझी इच्छा आहे, तर हीं सारीं लौकिक कृत्यें आ-टपून घेऊन मी आपल्या चरणांच्या कृपेनें ही इच्छा सफळ करीन ह्मणतों."

शत्रुजिताच्या भाषणानें प्रसन्न झालेला तो सन्यासी जिकडे त्यास जावयाचें होतें तिकडे निघून गेला; आणि शत्रुजित, मनोरमा आणि मंत्री हीं सर्वजण उदासीनाप्रमाणें आपापलीं व्यावहारिक कृत्यें करूं लागलीं.

# प्रकरण ४७ वें.



## शोकांत हर्ष आणि हर्षांत शोक.



वाचकहो आतां आपण त्या खोट्या आश्रमाचें रक्षण करण्याकरितां बसलेल्या कुसुमायुधाची काय स्थिति झाली ती पाहूं. तो कपटी शुंभासुर तर शत्रुजितास खोटीच वाईट बातमी सांगून गुप्त रीतीनें काशींतच राहिला. आपण मनांत धरलेलें सर्व काम यथास्थित तडीस गेलेलें पाहून हर्षित होत्साता तो लौकरच यमुनेच्या काठीं स्वतां उत्पन्न केलेल्या मायेच्या आश्रमाकडे गेला; तों तेथें फसून गेलेला कुसुमायुध आपल्या दिव्य घोड्यावर बसून चौकीपाहरा करीत असलेला त्याच्या दृष्टीस पडला.

वृद्ध मुनीचा वेष घेऊन शुंभासुर जसा यमुनेच्या पाण्यांत शिरला तसाच त्यांतून बाहेर निघून तो आपल्या आश्रमांत आला आणि कुसुमायुधाला आशीर्वाद देऊन बोलला कीं—"महाराज कुमार! आतां आपण सुखानें आपल्या राजधानीस जावें. तुमच्या कृपेनें माझें इष्टकार्य सिद्धीस गेलें. आशीर्वाद देतों कीं तुमचें निरंतर कल्याण असो."

मुनीची अनुज्ञा मिळतांच कुसुमायुध त्याला प्रणाम करून, खड्या स्वारीनेंच तेथून वाराणसीकडे जावयास निघाला. रस्त्यानें चालत असतां, "माझ्या विरहानें अत्यंत तप्त होऊन शुक्लपक्षांतील द्वितीयेच्या चंद्राच्या कळांप्रमाणें झालेली माझी प्रिया मुक्ता हिला आज माझ्या येण्याची बातमी देण्यासाठीं दासी, एकमेकींस या गोष्टीचा थांग न लागूं देतां, आपापल्यापरी सांगण्यास जातील. प्रिया मुक्ता आज पहिल्यानें ही बातमी देणाऱ्या दासीस असें असें इनाम देईल. विरहाच्या

तापाच्या शांतीसाठीं करण्यांत आलेले सारे शीतोपचार बंद करून ती आज रमणीय वस्त्रें आणि आभरणें ल्याईल. आनंदानें उत्पन्न होणारे कामविकार लजेस्तव गुप्त ठेवण्याविषयीं ती प्रयत्न करील. हातांतून गळून पडणारीं कंकणें एकदम घट्ट झालेलीं पाहून दासींसही मोठा विस्मय उत्पन्न करील. आनंदाच्या अश्रूंनीं आणि सात्विक विकाररूप घर्मबिंदूंनीं विरहाच्या संतापाला दाहांजली देईल. कामदेव संताप देणारा आहे ही गोष्ट विसरून जाऊन तो आल्हाददायक आहे असेंच ती मानूं लागेल. मी तिच्या मंदिरांत पाय ठेवतांच माझी मंदस्मितरूप पुष्पांनींच पूजा करील. प्रथम कंकणांच्या शब्दांनीं स्वागत प्रश्न विचारून मग तेच तोंडानें विचारील. मी तिच्या कृशपणाचें कारण विचारीन तेव्हां माझी मुळचीच अंगलता अशी आहे असें ती सांगेल. माझी आठवण होत होती किंवा नाहीं या माझ्या प्रश्नास ती आश्रुबिंदूंनींच उत्तर देईल. मुदती बाहेर एक दिवस अधिक झाला ह्मणून ती जर मान धरून बसेल तर मला दृढ आलिंगन देऊन शिक्षा कर असें बोलेन. मी प्रयाणाच्या वेळीं तिच्या आश्रुबिंदूंस खालीं पडूं दिलें त्यांस आतां माझ्या पदरानें पुसून काढून त्याचें प्रायश्चित करीन. मानीपणाचीं भाषणें बोलूं लागेल तर मी चुंबनानींच तिचें तोंड बंद करीन. नाहीं ह्मणेल तरीही कामदेवाच्या कोशाप्रमाणें नकाराचा अर्थ हकार असें समजून तिला जवळ आवळून धरीन. तपश्चर्येनेंही मिळणार नाहीं अशा तिच्या अधरामृताचें पान करून माझ्या आत्म्याला इंद्राहूनही अधिक लेखीन. फार दिवसांच्या विरहरूप अग्नीला दृढ मर्दनानें उत्पन्न झालेल्या स्वेदजळानें शांत करीन. आणि सुरतसुख जें, पुष्कळ वेळां अभ्यस्त असतांही, पुनरुक्त वाटेल असें नाहीं, कवींनीं शेंकडों प्रकारांनीं वर्णिलेलें असतांही अनिर्वचनीयच आहे, केवळ स्पर्शात्मक असतांही सर्व इंद्रियांस संतोष देणारें आहे, दोन शरीरांमध्यें अद्वैत उत्पन्न करीत

असल्याकारणानें ब्रह्मज्ञानाहूनही श्रेष्ठ आहे, कामदेवरूपी अग्नीनें भरलेलें असतांही शीतल उपचारांनीं वृद्धि पावतें, अरण्यालाही प्रासादा सारखें लेखतें आणि परिश्रममय असतांही मनाला प्रफुल्लित करतें—त्याचा अनुभव घेऊन जन्माचें सार्थक्य करीन. आणि यापुढें कधींही प्रियेस बरोबर घेतल्याशिवाय प्रवासास निघणार नाहीं अशी प्रतिज्ञा करीन." याप्रमाणें अनेक संकल्प आणि मनोरथ मनांत आणीत आणीत, दिव्य घोड्याच्या प्रभावानें लौकरच वाराणशीच्या शिंवेवर तो येऊन पोंचला.

वाराणसी नगरीच्या शींवेंत पाय ठेवल्यावर त्याच्या दृष्टीस कांहीं निराळीच स्थिति पडली. यामुळें मनांत खिन्न होऊन तो विचार करूं लागला कीं—"या नगरीमध्यें नेहमी स्त्रीपुरुषांचा आणि वाद्यांचा वगैरे आनंदमय शब्द ऐकूं यावयाचा, तो आज कां ऐकूं येत नाहीं? सायंकाळीं कामिनीसहित बगीच्याची हवा घेण्याकरितां जाणाऱ्या आणि बगीच्यामध्यें फिरून परत जाणाऱ्या गृहस्थांच्या गाड्यांची नेहमी धामधूम चालावयाची, त्याचे जागीं आज सर्व शुष्क कां दिसत आहे? दरवाज्यांतूनही कोणी मनुष्य किंवा वहन जात येत असलेलें दिसत नाहीं. भागीरथीचें तीर ब्राह्मणांच्या वेदघोषानें, व दीपधूपाच्या सुगंधानें नित्य परिपूर्ण असावयाचें तेंही आज निर्जन जंगलाप्रमाणें दिसत आहे हें कसें? यासमयीं देवळांतून घंटा वाजत आसावयाच्या आणि ईश्वरस्तुतीच्या पठणाचे शब्द फार लांबूनही ऐकूं यावयाचे; परंतु यापैकीं कांहींच आज ऐकूं येत नाहीं, कसें? आणि माझा डावा डोळा व डावा बाहू वारंवार स्फुरण पावत आहेत, तर यांचें कारण काय असावें? दरबारांत सर्वस्वी कांहीं तरी अनिष्ट घडलें असावें असें वाटतें. माझें मनसुद्धां कारणावाचूनच संकोच पावत आहे, हें ही अशुभ चिन्हच होय. मी ज्या ज्या मनुष्यांस भेटून प्रवासास गेलों होतों त्या सर्वांस आज मी पाहीन ही गोष्ट दुर्लभ वाटत आहे. माझीं पूज्य आईबापें कुशळ असोत

ह्मणजे झालें. जणों कांहीं, प्रिय मुक्ता जी माझ्या प्रयाणसमयींच अर्धमृताप्रमाणें झालेली दिसत होती ती विरहाग्नीनें भस्म होऊन गेली असावी असें तर नसेल ना?"

ह्या प्रमाणें विचार करीत करीत कुसुमायुध शहरांत आला, तेव्हां सर्वलोक दीन होऊन रुदन करीत होते. घरें निस्तेज आणि झाडलोट न केलेलीं दिसत होतीं. बाजार बंद ठेवला होता. व्यापार अस्त पावला होता. देवमंदिरें उत्सवरहित होतीं. राजमार्गावर पाणी शिंपलें नव्हतें. आणि सर्व शहर कांहींतरी मोठ्या व्याधीनें अथवा महात्म्याच्या शापानें उद्ध्वस्त झालें असावें असें दिसत होतें. परंतु थोड्याच वेळांत इंद्रजाळाप्रमाणें, सर्व लोक, हर्षानें परिपूर्ण मुखें धारण करणारे, प्रफुल्लित नेत्रांनीं पहाणारे, आणि अत्यंत कौतुकानें परस्परांचें आलिंगन करणारे— असा देखावा दिसूं लागला. "फार चांगलें झालें, फार चांगलें झालें, उत्कृष्ट झालें, दीर्घायुषी व्हा, शतायुष्य असो, तुमचे शत्रु आणि सर्व विघ्नें नष्ट झालीं. आईबापांचीं मनें प्रसन्न करा आणि चिरकाळ राज्य-सुखाचा पउभोग घ्या." असे मधुर आणि आनंदसूचक शब्द कानीं पडूं लागले. लोकांची हर्षसूचित मुद्रा पाहून आणि वाणी आनंदमय ऐकून "क्षणामध्यें हा काय फेरफार झाला, जणों कांहीं कोणी हा इंद्रजाल प्रयोग केला असावा अथवा कोणा मायावीचीही माया असावी" याप्रमाणें विस्मय पावणारा आणि विविध कल्पना करणारा कुसुमायुध आसपास पाहूं लागला. इतक्यांत आनंदाचा कोलाहल करीत, हजारों ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, स्त्रिया, बालक, सुजन, दुर्जन, मुनी, मुमुक्षुजन, विरक्तलोक, आणि संन्यासी ही सर्व मंडळी विचारपूस करण्याकरितां, खबर काढण्याकरितां, हकीगत विचारण्याकरितां, कुसुमायुधाच्या घोड्यासभोंवार जमा होत असलेली दृष्टीस पडूं लागली. लोक जमा होत असतां एकमेकांच्या आंगावर पडूं लागले, एकमेकांस ध-

काबुकी करूं लागले, ओढून बाजूस सारूं लागले, लौकर जवळ जातां यावें ह्मणून एकमेकांशीं तंटे करूं लागले, ढोंसळण्यामुळें धोतरें आणि पागोटीं पडून गेलीं असतांहीं तसेच उघडे बोडके आंत शिरूं लागले, आणि गर्दीमुळें घाबरून गेलेल्या घोड्याच्या मस्तीनें फार जवळ येतां न आल्यानें दुरूनच विचारपूस करूं लागले. मोठ्या गलबल्यामुळें आणि घोडा बिथरल्यामुळें लोकांच्या विचारपुशीचे शब्दही कानावर बरोबर न पडल्यामुळें त्यांस केवळ मान देण्यासाठीं ह्मणून हाताच्या संज्ञेनेंच आश्वासन देणारा, कांहीं विचित्र प्रकार घडून आला असावा अशी कल्पना करणारा, पित्याजवळ जाऊन पोंचण्याच्या घाईनें गर्दीमध्येंही मोठ्या युक्तीनें घोड्यास हकलून नेणारा, आणि मागें पुढें आणि आजुबाजूस धांवत येणाऱ्या लोकांनीं वेष्टलेला, कुसुमायुध, दरबारांत येऊन, घोड्यावरून उतरून, आपल्या दर्शनानें विस्मित होणाऱ्या एका खासदाराच्या हातांत घोड्याची लगाम देऊन, आपण आंत गेला. तेथें मंत्री वगैरे शेंकडों लोकांनीं वेष्टलेला, शुभवार्ता कळविणाऱ्या लोकांस आपलीं आभरणें आणि वस्त्रें काढून देणारा, घाईघाईनें चालण्याच्या परिश्रमामुळें धांपा टाकणारा, अपूर्व रीतीनें लोकांच्या जयजयकाराच्या उंच उंच शब्दांनीं अभिनंदन पावणारा, अंगावरून पडणाऱ्या उत्तरीय वस्त्राला पुन्हा ओढून आंगावर जेमतेम ठेवूं शकणारा, अविच्छिन्न पडूं लागलेल्या हर्षाश्रूंच्या बिंदूंनीं भिजून गेलेला, आनंदाची वार्ता सांगणाऱ्या लोकांस "कोठें आहे? कितीं दूर आहे?" असें विचारणारा, कठीण स्थितीचा अम्मल पाहून "ही बातमी खोटी तर नसेलना?". असें समजून कंप पावणारा, समोर दिसणाऱ्या दिव्याच्या प्रकाशामध्यें कुसुमायुधाच्या आभरणांच्या चकचकाटाची भ्रांति पावणारा, आणि अनुचरांनीं आणलेल्या राजचिन्हांसही बाजूस सारून देणारा, उघड्या पायांनींच चालून येणारा, शत्रुजित त्याच्या दृष्टीस पडला.

शत्रुजिताबरोबरच्या सर्व लोकांचीं पागोटीं साधीं आणि पांढरींच असलेलीं पाहून राज्यांत कोणी मोठा मनुष्य मरण पावला असावा असें समजणारा, सर्व लोकांचीं मुखें प्रफुल्लित झालेलीं पाहून या मनच्या कल्पनेचें समाधान करणारा, आणि या विचित्र देखाव्यानें विस्मय पावलेला, कुसुमायुध, शत्रुजितासमोर चालून येत असलेला, लोकांच्या पहाण्यांत येतांच एकदम जयजयकार होऊं लागला, हर्षाच्या टाळ्या पडूं लागल्या, सर्व लोकांनीं, पैस पैस ह्मणून हात केल्यावांचूनच, आपल्या आपण बाजूस सरून, कुसुमायुधाला शत्रुजिताजवळ जाण्याचा रस्ता करून दिला, आणि कुसुमायुधानें लौकर लौकर धांवत जाऊन शत्रुजिताच्या चरणीं प्रमाण केलें.

कुसुमायुधाच्या दर्शनानें आपलें अहोभाग्य मानणारा, पुत्रदर्शनाच्या हर्षानें तसाच मुक्तेच्या निष्कारण मरणाच्या शोकानें मुखावर अर्धप्रफुल्लित झालेल्या कमलाची शोभा धारण करणारा, आणि संभ्रमानें शरीराचें भानही विसरून जाणारा, अशा शत्रुजितानें प्रणाम करणाऱ्या कुसुमायुधाला दोनही हातांनीं उठवून, उराशीं धरून, दृढ आलिंगन दिलें. आणि त्याचा हात धरून, दुसरें कांहींच न बोलतां, "आज माझें जीवित निरर्थक व्हावयाचें तें टळलें, आज माझें जीवित निरर्थक व्हावयाचें तें टळलें" इतकेंच फिरून फिरून बोलूं लागला. ह्या वेळीं कुसुमायुध परत आला ह्मणून दासींच्या द्वारा मनोरमेला खबर मिळतांच तीही कित्येक दासींस बरोबर घेऊन तेथें आली. मनोरमा येऊन पोंचतांच शत्रुजितानें उंच स्वरानें "मनोरमे! आज आपला जन्म विफळ व्हावयाचा पण टळला. विश्वेश्वराचा, देवाचा आणि पितरांचा अनुग्रह प्राप्त झाला आहे, आणि ब्राह्मणाचे आशीर्वाद सफळ झाले आहेत." असें ह्मणून कुसुमायुधाला मनोरमेच्या चरणीं प्रणाम करण्यास सांगितलें. मनोरमेनें लागलीच त्याला उठवून, उराशीं आवळून,

धरून, हर्षाच्या आश्रूंनीं भिजवून टाकलें. कोमळ हातांनीं त्याच्या आंगावरील रस्त्याची धूळ सारी झाडून टाकूं लागली आणि संभ्रमानें लिंबलोण उतरण्यासही विसरली, परंतु दासींनीं स्मरण दिल्यावर बोटाचीं पेरें टचटच वाजतील अशा रीतीनें लिंबलोण उतरून पुन्हां त्यास उराशीं दाबून धरलें. थोड्या वेळानंतर मुक्तेच्या मरणाचीं हकीकत निवेदन करण्याला जीभ न उचलल्यामुळें रडत रडतच प्रवासाची हकीकत विचारूं लागली असतां, शहरच्या, दरबारच्या, लोकांच्या, आणि मातापितरांच्या, या विलक्षण आणि अपूर्व देखाव्यामुळें "हा काय प्रकार आहे?" असा विस्मय पावलेला आणि मनांत अनेक शंका आणणारा, अशा कुसुमायुधानें बोलतांना शुंभासुराच्या आश्रमाची गोष्ट न विसरतां प्रवासाची सर्व हकीकत थोडक्यांत सांगितली आणि या विलक्षण प्रकाराचें कारण काय ह्मणून विचारलें. तेव्हां शत्रुजितानें आणि मनोरमेनें मोठ्या कष्टानें मनांत संकोच पावून आणि घाबऱ्या घाबऱ्या गद्गद स्वरानें सर्व हकीकत सविस्तर सांगितली, आपल्या मूर्खपणाचा खेद केला, दैवगति प्रबळ आहे असें ह्मटलें, कपाळावर हात ठेविले, आणि कुसुमायुधाला अनेक दृष्टांत देऊन मुक्तेच्या मरणाचा शोक न करण्याविषयीं सांगितलें.

आईबापांच्या तोंडून वज्रपातासारखी, तोफेच्या गोळ्यासारखी, सर्वस्वाच्या नाशासारखी, आणि प्राणहरणासारखी, मुक्तेच्या मरणाची हकिगत ऐकून कुसुमायुध मनामध्यें निसत्वासारखा, निर्धनासारखा, निर्जीवितासारखा, निर्बळासारखा, निराधारासारखा, एकट्यासारखा, निराशासारखा, उन्मत्तासारखा, आणि अनवस्थितासारखा, होऊन गेला. परंतु आईबापांच्या समोर बसला असल्यामुळें लाजेस्तव पापण्यापर्यंत आलेल्या अश्रुबिंदूंस आणि जिभेच्या अग्रावर आलेल्या विलापवचनांस मोठे युक्तीनें आणि कष्टानें दाबून धरून तो स्वस्थ बसला.

लाजेच्या आणि शोकाच्या गतिमध्यें येऊन पडलेला कुसुमायुध, फार वेळपर्यंत एकाच ठिकाणीं बसण्यानें, आपल्या मनाची प्रवृत्ति दाबून ठेवणें कठीण आहे असें जाणून, शारीरिक विधि उरकण्याचें निमित्त करून, लौकरच आपल्या महालामध्यें गेला आणि तेथें, त्याला भेटावयास आलेल्या मंत्री वगैरे लोकांस लौकरच विसर्जन करून आहारादिक क्रियांचा अनादर करून एकांतांत राहिला. आणि लोळपट घेऊन शोक करूं लागला,—"अरे दैवा! ही माझ्यावर तूं काय विपत्ति आणलीस? माझ्यासाठीं जी मरण पावली त्या या मृगाक्षीवांचून मी जगून राहिलों आहें त्यापेक्षां मी अनार्य आहें, कृतघ्न आहें, अविश्वास्य आहें, निंद्य आहें, आणि महाठक आहें. प्रिये! तूं एथें होतीस तेव्हां मला प्राणनाथ इत्यादि प्रिय संबोधनांनीं, अनुवर्तनानें, आणि विलासांनीं इंद्रपदाहूनही श्रेष्ठ पदाचा अनुभव घडवीत होतीस. तीच तूं आज स्वतां स्वर्गलोकीं जाऊन मला पृथ्वीवरील धुळीमध्यें कां ह्मणून लोटीत आहेस? पलंगावर चढण्याच्या समयीं सुद्धां पडून जाण्याच्या भीतीनें माझा हात धरून तूं चढत होतीस, तीच आज तूं मला खालीं टाकून देऊन एकटीच स्वर्गामध्यें कशी चढून जाऊं शकलीस? प्राणप्रिये! आज तुझ्या शिवाय कुटुंब निराश्रित झालें, सगळे उपभोग निराधार झाले, सर्व कला विफळ झाल्या; हितोपदेश अस्त पावला आणि कुसुमायुध असहाय होऊन बसला! आज माझ्या सर्व सुखांची परिसमाप्ति झाली, मंदिर शून्य झालें, शैय्या चितेप्रमाणें झाली, उपवनें दुःखमय झालीं, ऋतु अरुचिमय झाले, आराम अस्त पावला, आनंद नाहींसा झाला, विहार केवळ स्मरणानेंही दुःखद झाला, आणि मधुर मधुर भोजनें विषासारखीं झालीं. हे मृत्यो! तूं माझ्या प्यारीला घेऊन गेलास त्याचवेळीं तिच्याबरोबर मलाही घेऊन जाण्यास तुला काय एवढा भार लागला असता? आतां हा कुसुमायुध नव्हे, तर

प्राणांशिवाय नुसता सांगाडा आहे. अगे मुक्ते! मला येण्यास एका दिवसाचा उशीर लागला ह्मणून तूं रुसली असशील तर मी तुला सांगतों कीं त्यांत माझा अपराध नाहीं, तर राजधर्माचाच अपराध होय. अरेरे! दुष्ट दैत्याचें कपट मला समजलें नाहीं हा माझाच अपराध नव्हे काय? प्रिये! तुझ्याबरोबर क्रीडा करीत असतां अपुरा राहिलेला हा बुद्धिबळाचा डाव जशाचा तसाच मोहऱ्यांसहित पडलेला आहे तो पुरा करण्याकारितां एक वेळ तर येऊन जा? ह्या डावांत मला जिंकण्याची तूं प्रतिज्ञा केली होतीस तिचें स्मरण कर. सुंदरि! हा तूंच काळजी घेऊन वाढविलेला बागेंतील आंब्याचा वृक्ष, गरीब बापडा होऊन, तुझ्या कोमळ हातानें पाणी मिळण्याविषयीं प्रार्थना करीत आहे. त्याचा अनादर करणें तुजसारखीला योग्य नव्हे. अरेरे! माझ्या हातानें पवित्र आणि मधुर अन्नाचे घांस जेवणारी जी ही मुक्ता ती आतां माझ्याच हातानें अश्रूंनीं विटाळलेले आणि हिरवेचे हिरवे, जव आणि तीळ याणीं केलेले पिंड कशी खाईल? हाय हाय! आतां काय करूं? हा माझा सारा दुःखदायक जन्म कसा काढूं? मुक्तेनें माझ्यासाठीं प्राण सोडले, मग मीही तिच्यासाठीं प्राणावर पाणी सोडूं काय? नाहीं नाहीं, प्राण सोडल्यानें मुक्तेला काय उपकार होणार? मग काय मी रडून रडून सारा जन्म घालवावा? अशा रीतीनें जन्म घालवणें हें पुरुषपणाला कलंक लावणारें आहे. मग काय शोक करून, जड होऊन, दीन बनून, स्नानसंध्या वगैरे केल्यावांचून, मलीन अवस्थेंतच बसून रहावें? छे छे! असें करण्यानेंही कांहीं उपयोग होईल अशी गोष्ट नाहीं. नाहीं नाहीं, हें असह्य दुःख भोगण्यापेक्षां मरावें हें उत्तम. शिव शिव! पित्यानें राज्याचा सर्व भार आपल्या शिरावरून उतरून माझ्यावर टाकला आहे त्यापेक्षां तो भार फिरून पित्याच्या शिरावर टाकून त्यास मी पीडा देण्यास तयार होऊं काय? माझी आई मनो-

रमा मला मृत झालेला पहातांच तडफडून तडफडून आणि लोळून लोळून प्राण टाकील, आणि मग पित्याचीही हीच अवस्था होईल. मग त्यांनीं माझ्याहूनही अधिक पाळलेली ही सगळी प्रजासुद्धां विलाप करकरून, आणि कष्टी होऊन, अवश्य प्राण टाकील. आईबापांस आणि साऱ्या प्रजेस आमरणांत दुःखामध्यें सोडून मला परलोकीं कल्याणाची कशी आशा धरतां यावी? तर मग मुक्तेसाठीं आतां मीं काय करावें? ठीक ठीक, आजपासून मरेपर्यंत स्त्रीभोगाचा एकंदर त्याग करावा ह्मणजे झालें. स्त्रीभोगाचा परित्याग केल्यानें मरण पावलेल्या मुक्तेस तो उपकारक होवो अथवा न होवो, मला तर अवश्य ह्मणून तो केलाच पाहिजे." याप्रमाणें विलाप करतां करतां, शतशः संकल्प मनांत आणतां आणतां, आणि कोणाबरोबरही कोणत्याही बाबतींत गोष्टी सांगणें, संभाषण करणें वगैरे यांपैकीं कांहीं एक न करतां, शोकांतच कुसुमायुधानें सारी रात्र घालविली. प्रातःकाळीं पित्याची संमति आणवून मुक्तेची तेरा दिवसपर्यंत प्रायश्चितासहित विधिपूर्वक पारलौकिक सर्व क्रिया केल्यावर त्यानें सर्व लोकांच्या समक्ष आमरणांत मुक्तेवांचून दुसऱ्या कोणत्याही स्त्रीबरोबर विहार न करण्याची सत्य प्रतिज्ञा प्रगट केली. कुसुमायुधाची ही अद्भुत प्रतिज्ञा ऐकून मनोरमा, मंत्री, तशीच सगळी प्रजा यांच्या मनामध्यें मोठा खेद उत्पन्न झाला. पण शत्रुजितानें कुसुमायुधाची जन्मपत्रिका पाहिली होती ह्मणून खुणगांठ बांधून तो स्वस्थ राहिला.



# प्रकरण ४८ वें.

## मित्रलाभ.

कुसुमायुध मोठा धीर धरून, स्त्रीभोगांस आणि स्त्रीभोगाच्या संबंधी सगळ्या उपचारांस विमुख होऊन, अंतःकरणामध्यें ठोकलेल्या शोकरूप खिळ्यानें पिडीत झाला असतांही, गंभीरपणानें पहिल्याप्रमाणें राज्यकार्य पाहूं लागला आणि अवकाश सापडे तेवढ्यांत चांगल्या चांगल्या मित्रमंडळीबरोबर विद्येच्या व कलांच्या गोष्टीविषयीं विनोद करूं लागला. बुद्धि, अवस्था, धैर्य, पराक्रम आणि चेष्टा इत्यादिकांनीं सर्वांशीं कुसुमायुधासारखेच गणतां येतील असे पुष्कळ राजे कुसुमायुधाबरोबर राहूं लागले. या मित्रमंडळींत केव्हां केव्हां शास्त्राविषयीं चर्चेनें, केव्हां केव्हां शिक्षणाविषयींच्या गोष्टींनीं, केव्हां केव्हां काव्यांच्या संलापांनीं, केव्हां केव्हां गायनप्रकारांनीं, केव्हां केव्हां नाटकांच्या प्रयोगांनीं, केव्हां केव्हां बुद्धिबळांच्या वगैरे डावांनीं, केव्हां केव्हां शस्त्रास्त्रांच्या क्रीडाचातुर्यानें, केव्हां केव्हां व्यायामानें, आणि केव्हां केव्हां हत्ती, घोडा, रथ वगैरे वहनांवर बसून त्यांस फिरविण्याच्या पद्धतीनें, आपले मनास रमवूं लागला. मुक्तेच्या शोकाचें विस्मरण व्हावें ह्मणून रात्रीसही मित्रमंडळीच्या संगतींतच राहूं लागला. समान गुणांच्या आणि समान अवस्थेच्या राजकुमारांवाचून दुसरेही कित्येक गृहस्थांचे कुमार या राजकुमारांच्या मंडळीमध्यें स्नेहास्तव नेहमीं येऊन बसत उठत असत. गृहस्थांच्या या कुमारांमध्यें एके दिवशीं पाताळांत राहणाऱ्या चित्रभोग नांवाच्या नागराजाचे दोघे पुत्रही ब्राह्मणांच्या पुत्रांचा वेष घेऊन या मंडळींत

येऊन मिळाले. याप्रमाणें कित्येक दिवस राहतां राहतां नागकुमारांचें चित्त कुसुमायुधाच्या सद्गुणांनीं इतकें प्रसन्न झालें कीं ते सुद्धां इतर राजकुमाराप्रमाणेंच नेहमी कुसुमायुधाच्या संगतींत राहण्यांत आनंद मानूं लागले. तरुण, रूपवान आणि सर्व विद्यामध्यें आणि कलांमध्यें प्रवीण असे ते नागकुमार स्वतांची खरी जात प्रगट न करितां कुसुमायुधाबरोबर, इतर राजकुमारांबरोबर, अन्य वर्णांतील कुमारांबरोबर अनेक प्रकारचे विनोद करूं लागले, आणि खाण्यापिण्यांत, वस्त्रपात्रांत, फिरण्यांत सवरण्यांत, मौजमजेंत आणि मित्रत्वाला अनुसरून दुसऱ्याही सर्व प्रकारच्या आचरणांत मिळूनमिसळून राहूं लागले. त्यांच्या अनेक प्रकारच्या विनोदरीतींनीं परम सुख पावणारा कुसुमायुधसुद्धां या नागकुमारांवांचून खाणें पिणें, मौजमजा, विद्या विनोद आणि कलाकुसरीचें काम अथवा दुसरें कोणतेंही मैत्रीच्या संबंधाचें कार्य करीत नसे. हे नागकुमार सारा दिवसभर कुसुमायुधाबरोबर राहून रात्रौ आपल्या बापाच्या नगरीस पाताळलोकीं जात असत आणि पुन्हां प्रातःकाळ होतांच कुसुमायुधापाशीं येऊन हजर होत. कुसुमायुधावांचून आपल्या बापाच्या घरीं रात्रीच्या रात्र राहणेंसुद्धां त्यास गमत नसे, तथापि परतंत्रता आडवी आल्यामुळें त्यांचा निरुपाय होता.

एके दिवशीं महात्मा चित्रभोग नागराज आपल्या पुत्रांस विचारूं लागला कीं "पुत्रहो! तुह्मी सारा दिवसभर पाताळलोकीं कोठें दिसत नाहीं आणि फक्त रात्रीचे वेळीं मात्र दिसतां हें कसें? सर्व दिवसभर कोठें असतां? आणि तुमची एवढी घटमुठ सोबती कोणाबरोबर जुगली आहे? पितृधर्माप्रमाणें माझ्या मनाला चिंता प्राप्त होते कीं तुह्मी एखाद्या वाईट मार्गांत तर लंपट झालां नाहींना?"

पित्याच्या या प्रश्नास मान देऊन, नम्रपणें प्रणाम करून आणि हात जोडून, त्यानीं उत्तर केलें,—"ताता! मर्त्यलोकीं वाराणसी ह्मणून

ज्जी प्रख्यात नगरी आहे तेथें शत्रुजित नांवाच्या चक्रवर्ती राजाचा मुलगा कुसुमायुध ह्मणून आहे, तो अत्यंत रूपवान, सरळ स्वभावाचा, शूर, निरभिमानी, प्रियवादी, वक्त्यामध्यें सर्वोत्तम, विद्वान, मित्रत्वाला योग्य, मित्रांचें गुणं जाणणारा, गुणांचें भांडार, आणि लक्ष्मीच्या भारानें नम्र असा असतांही लक्ष्मीला तृणसमान लेखणारा, आपल्या प्रतिज्ञेच्या अक्षरांस पाण्यावर लिहिलेल्याप्रमाणें नव्हे तर शिळेवर कोरलेल्या अक्षरांप्रमाणें समजणारा, क्षीरसागराच्या दुधाप्रमाणें कधींही विकार न पावणारा, उदय आणि अस्त या दोनही दशांमध्यें सूर्याप्रमाणें सारखाच रंगलेला, दारुण दुःखाचे प्रहारसुद्धां धैर्यरूप वज्रमय चिलखताच्या प्रभावानें तुच्छ मानणारा, परोपकारास्तव चंदनाप्रमाणें आपलें शरीरही अर्पण करणारा, वसंत जसा वृक्षांस मागीतल्यावांचूनच लक्ष्मी देतो तसा आश्रितांस मागीतल्याविनाच लक्ष्मी देणारा, खोटी गोष्ट कधींही कानावर न घेणारा, गुणी जनांचा मित्र झाल्यावांचून कधींही न राहणारा, सुगंध जसा भ्रमराचें आणि चंद्र जसा समुद्राच्या पाण्याचें आकर्षण करतो त्याचप्रमाणें सज्जनाचें मन आकर्षण करून घेणारा, आणि माननीय लोकांस मान दिल्यावांचून ज्यास कधींही बरें वाटूं नये असा आहे. आणखी त्यास राज्यलक्ष्मीचा संयोग असतांही तो शहाणा आहे, तरुण असतांही कामलंपट नाहीं, समर्थ असतांही प्रमत्त नाहीं; पान्याप्रमाणें विपत्ति भोगूनही परहित करणारा असा आहे; दांत जसे स्वतांचा कोणताही स्वार्थ नसतांही जिभेसाठीं परिश्रम करितात त्याचप्रमाणें आपला कसलाही स्वार्थ नसतां दुर्बळ लोकांसाठीं तो परिश्रम करणारा आहे; याचकांस कल्पवृक्षाप्रमाणें आहे; सज्जनांस कुटुंबी जनाप्रमाणें आहे; यौवनरूप महादोषाच्या प्रकोपामध्येंही स्वस्थ रहाणारा आहे; उपकार करूनही प्रत्युपकाराची बिलकुल आशा न ठेवणारा आहे; महात्मे जनांचीच भक्ति करणारा आहे; आत्मश्लाघेपासून आणि

परस्त्रीपासून विमुख राहणारा आहे; वृक्ष जसा पृथ्वीनें गुप्तपणें पोंचविलेलें जळही पानांच्या अग्रापर्यंत उंच नेऊन प्रगट करतो त्याचप्रमाणें कोणीही गुप्तपणें केलेला उपकार गौरवून सर्वांस विदित करीत असतो. पाणी जसें तेलाचा लहान बिंदुही विस्तीर्ण करितें त्याचप्रमाणें पराचे अल्पगुणही विस्तीर्ण करणारा आहे आणि निंदेनें जसा तो लज्जित होतो तसा स्तुतीनेंही होणारा आहे. अशा अशा अनेक गुणांनीं युक्त अशा ह्या राजकुमाराबरोबर आमची मैत्री जमली आहे, त्याच्या सहवासांत राहण्यांतच आमचें चित्त आसक्त झालें आहे, आणि त्यामुळेंच आह्मांस पाताळलोकीं रहाणें आवडत नाहीं. बाबा! आह्मांस रात्रसुद्धां त्याच्या वियोगामुळें मध्यान्हासारखी संताप देणारी वाटते आणि दिवस त्याच्या समागमामुळें मध्यरात्रीसारखा मोठा शीतळ वाटतो."

"पुत्रहो! ह्या पुण्यवान शत्रुजितराजाला मी भाग्यशाली ह्मणून समजतों, कारण कीं तुमच्यासारखे गुणी जनही त्याच्या परोक्ष त्याच्या पुत्राची प्रशंसा करितात. कित्येक स्वतां विद्वान असतांही वाईट स्वभावाचे असतात, आणि कित्येक अविद्वान असतांही चांगल्या स्वभावाचे असतात; परंतु ज्यांच्या ठिकाणीं विद्वत्ता आणि चांगला स्वभाव या दोहोंचाही सन्निवेश झाला असेल अशा पुत्राच्या पित्याला भाग्यशाली ह्मणूनच समजलें पाहिजे. मित्र परोक्षही सर्वकाळ ज्याच्या गुणाची एकसारखी प्रशंसाच करीत असतात, आणि शत्रुही परोक्ष सर्वकाळ एकसारखी ज्याच्या पराक्रमाचीच प्रशंसा करीत असतात, अशा पुत्रानेंच पिता पुत्रवान ह्मणून ह्मटला पाहिजे. ज्याला असा पुत्र नाहीं तो पिता पुत्रवान असतांही वांझच समजावा. उपवनाचा सुगंध जसा दूर राहणाऱ्या भ्रमरांचेंही आकर्षण करितो त्याचप्रमाणें पुरुषाचे सद्गुण दूर असलेल्या लोकांचेंही आकर्षण करितात. सद्गुणांस कांहीं एक अलभ्य नाहीं, सद्गुणरहित पुरुष निर्मळ असला तरी फुटलेल्या कांचेच्या

भांड्याप्रमाणें निरुपयोगी होय. पुष्पाची प्रशंसा जशी सुगंधानेंच होते त्याचप्रमाणें पुरुषाची प्रशंसा सद्गुणामुळेंच होते. ज्याचें नांव, गुणी जनांची गणना करूं लागलेल्या पुरुषाच्या कनिष्ठिकेच्या पहिल्या परावरच येऊन उभें राहतें त्याचाच जन्म धन्य होय असें मी समजतों. पुत्रानों! गुणी जनांचा शिरोमणि जो राजकुमार कुसुमायुध तो जेणेंकरून प्रसन्न होईल असें त्याचें कार्य तुह्मीं कांहीं केलें आहे किंवा नाहीं? जरी कितीही प्रत्युपकार केले तरी ते उपकारांची चेष्टा केल्याप्रमाणेंच होत असें समजावें. पहिल्यानें झालेल्या निष्काम उपकाराची सर त्यांस कधींही येऊं शकणार नाहीं. हात जसे शरीराचें आणि पापण्या जशा नेत्राचें सांगितल्यावांचूनच कार्य करितात त्याचप्रमाणें न सांगतांही जे पुरुष मित्राचें प्रिय करितात ते श्रेष्ठ होत ह्मणून समजलें पाहिजे. मित्राच्या दुःखानें दुःखित झाल्यानें आणि मित्राच्या सुखानें संतोषित झाल्यानेंच कोणासही मित्र समजतां येत नाहीं; तर मित्रावर विपत्ति येऊन पडली असतां जो तींतून त्याला काढील आणि त्यास संपत्ति प्राप्त झाली असतांही जो ती वाढविण्याचा यत्न करील तोच खरा मित्र. मित्राचें बरें करण्यांत जो पुरुष दुर्बळता जाणवीत नाहीं त्याचेंच जीवित सफळ झालें असें ह्मटलें पाहिजे. रीत अशी आहे; यासाठीं सुवर्ण, रत्न, वाहन, आसन, आभरणें आणि वस्त्रें यापैकीं ज्याच्या योगानें त्या राजकुमाराचें मन खुष होईल असें तुह्मांस वाटतें तें निःशंकपणें घेऊन जाऊन त्यास अर्पण करा. ज्या पुरुषास उपकार करणाऱ्या मित्राचा उतराई होतां येत नाहीं तो, मी जीवंत आहें असें जरी मानीत असला तरी त्याच्या जीविताला धिःकार आहे. जो पुरुष मित्रावर उपकार करूं शकत नाहीं आणि शत्रूवर अपकार करूं शकत नाहीं त्याच्या जीवितापेक्षां पशूचें जीवितही शतपट बरें!"

"बाबा! ज्या राजकुमारापासून सगळे याचक हरएक इष्ट वस्तु संपादन करून व संपूर्ण सत्कार पावून जातात त्याच्यावर इतर पुरुषानें कोणता उपकार करावा? त्याच्या घरीं जशीं जशीं रत्नें, वाहनें, आसनें, आभरणें, आणि वस्त्रें वगैरे आहेत तशीं आपल्याही घरामध्यें नाहींत, किंवा सगळ्या पाताळ लोकामध्येंही नसतील. आणखी त्याच्या ठिकाणीं विद्यासंबंधीं आणि कळासंबंधीं जसें विज्ञान वसत आहे तसें तें इतर कोणत्याही मनुष्याच्या ठिकाणीं वसत असलेलें आढळून येत नाहीं. हा राजकुमार मोठमोठ्या विद्वानांचे संशयही छेदून दूर करितो. शिव शिव! परंतु ब्रह्मा, विष्णु, किंवा शंकर यांच्या वरप्रदानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपायानें टाळतां येणार नाहीं अशा एका बाबतींत त्याचें मन दुःखीकष्टी आहे. आणि ही गोष्ट तरी आह्मीं त्याच्यापाशीं राहूं लागल्यापासूनच आमच्या समजण्यांत आली. जी गोष्ट केवळ निरुपायाची ती आपल्यास कळवून तरी काय उपयोग?"

"पुत्रांनो! तुमच्या मित्राचें दुःख कदाचित् टाळतां येणार नाहीं असें असेल, तथापि तत्संबंधीं हकिगत ऐकण्यास मी इच्छितों आणि असें समजतों कीं कितीही बिकट कार्य असलें तरी उद्योगी विद्वानास तें असाध्य नाहीं. विद्वान मनुष्य देवपदवी, इंद्रपदवी आणि तिजहूनही अधिक उंच अशा पदवीला दृढ उद्योगाच्या बळानें पावतात. इंद्रियें आणि मन शांत जिंकून उद्योगास चिकटून राहाणाऱ्या पुरुषास इहलोकीं किंवा परलोकींही कांहीं अप्राप्य, अगम्य किंवा अज्ञेय असें नाहीं. किडा सुद्धां थोडें थोडें चालून चालून हजारों योजनें उल्लंघून जाऊं शकतो आणि गरुड जर बसून राहिला तर एक कोसही त्यास जातां येणार नाहीं. विचार करा कीं उत्तानपाद राजाचा मुलगा जो ध्रुव त्यानें मिळविलेलें कोट्यावधी उंच असें जें विष्णुपद तें कोठें आणि पृथ्वी कोठें? रथाची गति जशी दोन चाकांनीं साध्य होते त्याचप्रमाणें

प्रत्येक कार्य दैव आणि उद्योग ह्या दोहोंच्या साहाय्यानेंच सिद्ध होतें. अशक्य वाटणारीं कार्यें ही उद्योगानेंच सिद्ध होतात, आणि सुकर कार्यें ही बसून राहिल्यानें घडत नाहींत. देवांनीं अमृत, विष्णूनें लक्ष्मी, ब्रह्मदेवानें ब्रह्मबल, आणि विश्वामित्रराजानें ब्रह्मर्षिपण मिळविलें, तें कशामुळें? केवळ उद्योगानें, दुसऱ्या कशानेंही नाहीं. पाप किंवा पुण्य जें पूर्वजन्मीं केलें असेल त्यासच दैव ह्मणून ह्मणतात. यासाठीं दैव शब्दाचा अर्थही उद्योग शब्दाच्या अर्थाच्या बाहेर जात नाहीं. जो मनुष्य उद्योग न करितां बसून राहतो तो दगडाच्या सिंहासारखा, चित्रांतील राजासारखा, चिरगुटाच्या केलेल्या बाहुल्यासारखा आणि मळ्यांत उंच टांगलेल्या गवताच्या बाहुल्यासारखाच समजला पाहिजे. उद्यम, साहस, धैर्य, बुद्धि, शक्ति आणि पराक्रम हीं प्रतिकूळ दैवालासुद्धां अनुकूळ करूं शकतात. भ्रमर जसा कमळाकडे, पक्षी उपवनाकडे, लोखंड चुंबकाकडे, चकोर चंद्रिकेकडे, दुर्गुण लोभाकडे, सद्गुण सच्छीलाकडे, दुःख दारिद्र्याकडे, सिद्धि योग्याकडे, मक्षिका माधुर्याकडे आणि मुमुक्षु तत्ववेत्त्याकडे आपोआप ओढला जातो त्याचप्रमाणें सर्व संपत्ति उद्योग्याकडे आकर्षित होते. मुलानों! मी तुह्मांस उद्योगाचा महिमा कोठवर सांगूं? तर आतां सांगा बरें कीं तुमचा मित्र जो हा राजकुमार त्याजवर कोणत्या बाबतींत दुःख येऊन पडलें आहे? ह्मणजे मला तें दूर करण्याचा उद्योग करितां येईल, आणि असें झालें असतां तुह्मीही आपल्या मित्राच्या ऋणांतून मुक्त व्हाल."

पित्याचें भाषण ऐकून त्यांनीं भीमासुराच्या नाशाची, शुंभासुराच्या कपटाची, मुक्तेच्या मरणाची आणि कुसुमायुधाच्या प्रतिज्ञेची सविस्तर हकीगत सांगून ह्मटलें कीं—" बाबा! अशा प्रकारचें आमच्या मित्राचें दुःख

ब्रह्मादिक देवांच्यानींही निवारण होणें दुर्घट आहे; मग इतरांची कथा काय? ”

“ पुत्रांनो! अशक्य समजून जर कोणतेंही कृत्य करण्याला कोणी उद्योग करणार नाहीं तर त्यासारखें मूर्खपण आणि नुकसान दुसरें कोणतेंही नाहीं. कोणत्याही कृत्याची सिद्धि एकट्या दैवावरच किंवा एकट्या उद्योगावरच अवलंबून नाहीं; तर उद्योग आणि दैव या दोहोंवर अवलंबून आहे. नीतिशास्त्राची अशी मर्यादा आहे कीं पुरुषानें आपला पुरुषार्थ न टाकण्याविषयीं नेहमीं सावधगिरी ठेवली पाहिजे. मीं तुमच्या मित्राच्या कार्याच्या सिद्धीसाठीं आणि तुह्मास सन्मित्रांच्या पंक्तींत बसविण्यासाठीं तप करण्याचाच उद्योग आरंभितों. काळजी करूं नका.”



# प्रकरण ४९ वें.

## सन्मित्रतेचें साफल्य.

मोठ्या कामामध्यें इतरांच्या साहाय्याचीही जरूर लागते असें समजून, चित्रभोग नागराजानें, आपला भाऊ कुलिक नांवाचा नाग होता, त्यासही बरोबर ठेवून घेऊन सरस्वतीची सेवा केली आणि तिच्यापासून गायन आणि वादन या नांवाच्या दोन्ही कलांचा संपूर्ण अभ्यास केला. हा अभ्यास झाल्यावर त्या कलांच्या साहाय्यानें सदाशिवाचें आराधन त्यानें मांडिलें. चित्रभोग आणि कुलिक हे दोघे भाऊ हिमालयामध्यें जाऊन, इंद्रियांचा निग्रह करून, मन स्वाधीन ठेवून, प्रातःकाळीं, माध्यान्हकाळीं, संध्याकाळीं आणि रात्रीच्या वेळींही मृदंग, वीणा, सतार इत्यादि वाद्यें वाजवून ध्रुपद, ताल, लय आणि यति यामध्यें शुद्ध अशा उत्तम गायनानें स्तुति करूं लागले.

असें करतां करतां कांहीं काळ लोटला, तेव्हां त्रैलोक्याची सगळीं संकटें टाळणारा; साधनांच्या साहाय्यावांचूनच त्रैलोक्यरूपी अपूर्व कारागिरीनें काम निर्माण करणारा; स्वतां दिगंबर असतांही भक्तजनांस सर्व प्रकारची संपत्ति देणारा; शरीरावर सर्प धारण करणारा असतांही अभय देणारा; काळकूट प्याला असतांही काळालाही वश न झालेला; संकल्पमात्रें करून त्रैलोक्यातें भस्म करून टाकणारा असतांही त्रिपुरवधाच्या समयीं अनेक साधनें संपादन करण्याच्या लीलेंत व्यग्र झालेला; स्मशानवासी असतांही महापवित्रता धरणारा; आपल्या शरीराच्या एका कोपऱ्यांत सगळ्या ब्रह्मांडालाही समावूं शकणारा असतांही ब्रह्मां-

डांतील केवळ एक देश जो कैलास पर्वत त्यावर निवास करणारा; वसिष्ठ इत्यादि महा मुनिजनांसही आपला घोडा पाळण्याचें काम लावून देणारा; इंद्रादि लोकपाळांच्या हातून आपल्या वस्त्रप्रावर्णाचें रक्षण करविणारा; हजारों ब्रह्मांडांच्या अंत्येष्टि करणारा असतांही यज्ञाचा ध्वंस करणारा ह्मणून प्रख्यातीस आलेला; पार्वतीनें मानीपणानें शंभर दिवसपर्यंत अबोला धरण्याची प्रतिज्ञा नेत्राच्या शंभर उन्मीष निमिषानींच पुरीं करणारा; विवाहाच्या समयीं सासऱ्यानें गोत्र, उद्योग, धंदा, आईबाप, पूर्वज, वगैरे माहिती विचारली असतां कांहींच उत्तर न देऊं शकणारा; बाजुबंदाच्या एका अग्रावरच सगळ्या पृथ्वीचा भार तोलून धरणारा; चंद्राला तिलक रूपानें आणि आपल्या प्रियेसाठीं आरशीप्रमाणें धारण करणारा; समुद्राच्या पत्नीला मस्तकावर धरून स्वतांच्या स्त्रीला हेवा करण्याचें कारण उत्पन्न करून ठेवणारा; मुनिजनांच्या आणि राजऋषींच्या यज्ञसंबंधीं हविष्यांस आपल्या डोळ्यांतच होमविणारा; नेत्राच्या प्रभावानें भागीरथींतील कमळें आणि कुमुदें यांस एकाच वेळीं प्रफुल्लित करणारा; सर्वदा प्रेतांच्या आणि पिशाच्चयांच्या सोबतींत राहाणारा असतांही अपार सौम्यता धरणारा; कांतेला सर्वकाळ आपल्या अंगामध्येंच धारण करणारा असतांही सर्व योगीश्वरांमध्यें अग्रेसर ह्मणून निवडलेला आणि गंगाजळाहूनही पवित्र आणि मनुष्यांच्या करट्यांची माळा धारण करण्यानें अपवित्रही न होणारा अशा देवाधिदेवानें त्यांस प्रत्यक्ष दर्शन देऊन "वरं ब्रूतम्" अशी आज्ञा करितांच दोघां बंधूंनीं प्रणाम करून, हात जोडून विज्ञप्ति केली कीं "भक्तवत्सला त्रैलोक्यनाथा! काशींतील शत्रुजित नांवाच्या राजाचा युवराज पुत्र जो कुसुमायुध त्याची स्त्री मुक्ता कोणा दुष्ट दैत्यानें कुसुमायुधाच्या मरणाची खोटी बातमी सांगितल्यावरून मरण पावली. महाराज! ती जेवढ्या वयाची, जशा रूपाची, आणि जशा गुणाची होती तशीच्या तशीच जिवंत होईल असें करा

आणि आह्मींच तिला कुसुमायुधाच्या हातीं परत देण्याला भाग्यवान होऊं अशी कृपा करा.”

नागराज चित्रभोग आणि त्याचा बंधु कुलिक यांची ही विज्ञप्ति ऐकून मायेचा अधिपति जो शंकर त्यानें लागलीच आपल्या ललाटीं असलेल्या चंद्रकळेंतून पाहिल्या सारखीच दिसणारी मुक्ता प्रगट केली आणि त्यांच्या हातीं देऊन स्वप्नांत पाहिलेल्या वस्तूप्रमाणें त्यांच्या हृदयांतच अंतरध्यान पावला.

मुक्तेच्या लाभाला अठरा सिद्धींच्या लाभाहूनही अधिक मानणारा तो नागराज, चित्रभोग, मुक्तेला बरोबर घेऊन आपल्या भावासहित पुन्हा पाताळलोकांत आला आणि आपल्या पुत्रांस याबद्दल कसलीही बातमी न लागूं देतां मुक्तेला घरामध्येंच स्त्रियांच्या मंडळांत गुप्तरूपें ठेवून नेहमी प्रमाणेंच आपापलीं कामें आणि व्यवहार करूं लागला. नागकुमार नेहमीच्या नियमाप्रमाणें दिवसास कुसुमायुधाच्या संगतींत राहून रात्रीस पाताळलोकीं येऊन पित्याची सेवा करीत आणि निद्रासुखाचा अनुभव घेत असत. याप्रमाणें कित्येक दिवस लोटल्यावर एके समयीं चित्रभोग नागराजानें आपल्या पुत्रांस बोलावून आणून आनंदानें सांगितलें कीं “मित्रावर उपकार करावे हा मित्र ह्मणविणाराचा धर्मच होय. ही गोष्ट सज्जनांनीं कधींही हृदयांतून दूर करितां कामा नये. तर, एक दिवस तुह्मी तुमच्या मित्राला घेऊन येऊन पाताळलोकचा पाहुणा करा.” आपल्या मित्रास आपल्या घरीं पाताळलोकीं घेऊन येण्याविषयीं पित्याची इच्छा आहे असें जाणतांच त्या नागकुमारांनीं दुसरेच दिवशीं खेळतां खेळतां, प्रसंग पाहून, कुसुमायुधाला आपल्या घरीं येण्याविषयीं विज्ञप्ति केली.

मित्रांची प्रेमभावपूर्वक केलेली विज्ञप्ति ऐकून कुसुमायुधानें ह्मटलें कीं—“विप्रकुमारानों! हें घरसुद्धां तुमचेंच आहे. तुह्मीही माझे परम मित्र असतांही माझ्या घराला आपलें घर ह्मणून लेखीत नाहीं यावरून

मी समजतों कीं दुष्ट दैवानें मला फसविलें. मित्र म्हटला ह्मणजे इकडे तिकडे बाहेर फिरणारा प्राणच होय. यासाठीं माझी तर समजूत अशी आहे कीं जें कांहीं माझें ह्मणून आहे तें सगळें तुमचेंच आहे, आणि जें कांहीं तुमचें असेल तें सारें माझें आहे. तुमचा माझ्यावर खरा स्नेह जर असेल तर धन, रत्न अथवा दुसरी कोणतीही वस्तु पाहिजे असेल ती तुह्मीच घेऊन जा, आणि दुसरे कोणास द्यावयाची असेल तर खुशाल द्या. तुमचे मनांतून मला आनंदित करावयाचें असेल अथवा माझ्यावर दया करावयाची असेल तर माझ्या घरावर आणि माझ्या संपत्तीवरही ममत्व ठेवून वागत जा. विप्रकुमारानों! मी खरें खरें सांगतों कीं तुह्मी माझ्यापाशीं यापुढें अशा प्रकारची वेगळेपणाची गोष्ट कधींही करूं नये. माझ्या सर्व वस्तु तुह्मी आपल्याच समजा, न समजाल तर तुह्मास माझ्या गळ्याचीच शपत आहे."

कुसुमायुधाचें प्रेमपूर्वक खरें भाषण ऐकितांच रोमांचित व स्नेहार्द्र होऊन त्या नागकुमारांनीं कांहींसा प्रेमानें रुसल्याचा भाव दाखवून ह्मटलें— "प्रियंकर राजकुमार! तुह्मीं जें ह्मणतां तें तसेंच आहे. जसें तुमच्या मनामध्यें आहे तसेंच आमच्याही आहे; यांत यत्किंचितही संशय नाहीं. परंतु आमच्या पित्यानें तुह्मांस पहावें अशी इच्छा आमचेपाशीं वारंवार दर्शविल्यावरून आणि तुह्मांस घेऊन येण्याविषयीं सांगितल्यावरून तुमच्यापाशीं अशी विज्ञप्ति करित आहों. तुमचें बोलणेंच तुमच्या आड येत आहे. तुह्मीही आमच्या घरावर तुमच्या घराप्रमाणेंच ममत्व धरलें पाहिजे."

"तुमचे बाबा मला भेटण्याची उत्कंठा धरतात त्यापेक्षां मी धन्य आहें, मोठा पुण्यवान आहें आणि माझ्या सारखा दुसरा कोणीही एवढा भाग्यशाली नसेल असें मी समजतों. चला, उठा तर, मला तुमच्या पित्याची आज्ञा शिरसा मान्य आहे. पित्याच्या आज्ञेचें लेशमात्रही मी

उल्लंघन करूं इच्छित नाहीं." असें बोलतां बोलतां, कुसुमायुध त्या आपल्या दोघां मित्रांसहित शहराच्या बाहेर पडला. ते नागकुमार कुसुमायुधाचा हात धरून भागीरथीच्या कांठावरून चालत असतां "याच कांठावर कोठें त्यांचें घर असेल" असें कुसुमायुधास वाटलें. इतक्यांत ते नागकुमार, कुसुमायुधास धरून, ओढून, भागीरथीच्या पाण्यांत प्रवेश करून, आंतील रस्त्यानें पाताळलोकीं पोंचले. अतिगंभीर आणि सर्व प्रकारच्या समृद्धीनें परिपूर्ण असा तो पाताळलोक पाहून कुसुमायुध बहुत विस्मित झाला, आणि "हे ब्राह्मणाचे पुत्र होत." असे मानलेले हे मित्र, मोठमोठ्या फडांचे, प्रत्येक फणेवर स्वस्तिकाचें चिन्ह असणारे, फणांवर असलेल्या मण्यांच्या प्रकाशानें पाताळाला प्रकाशमय करून सोडणारे, रत्नमय अलंकारांनीं शोभणारे, दिव्यवस्त्रें आणि दिव्य पुष्पांच्या माळा आंगावर धारण करणारे असे दृष्टीस पडले.

अपार विस्मयानें प्रफुल्लित झालेल्या नेत्रांनीं, कुसुमायुधानें, प्रेमपूर्वक हंसून, पाताळलोकाची तशीच त्यांची वाखाणणी केली आणि "प्रिय मित्रानों! मी तुह्मांस ब्राह्मण ह्मणून समजत होतों परंतु आतां असें विचारतों कीं—'तुह्मीं कोण आहां? आणि मला कशासाठीं येथें आणिलें आहे?' असें विचारलें. तेव्हां देवादिकापासूनही सन्मान पावणाऱ्या आपल्या पित्याचें नांव सांगून व खरीखरी हकिगत त्यास निवेदन करून, अति स्नेह दाखवीत दाखवीत चालू झाले. कुमार, तरुण आणि वृद्ध अशा अनेक नागांनीं शोभणारा; सुंदर वस्त्रें आणि अलंकार धारण करून क्रीडा करणाऱ्या नागकन्यांनीं, आकाश जसें तारकांनीं शोभतें त्याप्रमाणें, शोभणारा; गायन आणि वाद्यें ह्यांच्या मंजुळ शब्दांनीं चोंहोंकडून मनाचें आकर्षण करणारा; मंदिरें आणि बगीचे यांच्या शोभेनें इंद्रलोकाचाही तिरस्कार करणारा; सूर्यचंद्रांनीं विरहित असतांही प्रकाशाचा उणेपणा नसलेला; गुरुडाच्या उत्पाताशिवाय दुसऱ्या कोणत्याही उत्पा-

ताचें तोंडही न पाहणारा; आणि सगळ्या सुखांची केवळ जन्मभूमिच होय असा तो पाताळलोक पाहून विस्मयाच्या परम सीमेला पोंचलेला, कुसुमायुध त्या नागकुमारांसहित चित्रभोग नागराजाच्या दरबारांत येऊन पोंचला. ह्या दरबारांत विचित्र मण्यांनीं जडलेल्या सुवर्णमय सिंहासनावर बसलेला; निर्मळ मोत्यांच्या हारांनीं आणि दुसऱ्याही अनेक अलंकारांनीं चमकणारा; आणि दिव्यवस्त्रांनीं व दिव्यपुष्पांनीं अद्भुत रसमय भासणारा तो चित्रभोगनागराजा त्याच्या दृष्टीस पडला. त्यास पाहतांच नागकुमारांनी "हा आमचा पिता" असें ह्मणून कुसुमायुधाला चित्रभोगाची आणि "हा आमचा मित्र कुसुमायुध" असें सांगून चित्रभोगाला कुसुमायुधाची ओळख करून दिली. मित्राच्या बापाची ओळख होतांच कुसुमायुधानें त्याच्या चरणीं प्रणाम केला. त्याबरोबर "चिरंजीव" असें बोलून, मुद्दाम उठवून, छातीशीं आवळून धरून, चित्रभोगानें त्यास दृढालिंगन दिलें, आणि नंतर ह्मटलें कीं—"पुत्रा! ज्याच्या गुणांची प्रशंसा परोक्षही होते त्याला भाग्यशालीच ह्मटलें पाहिजे. माझ्या पुत्रांकडून मला तुमच्या गुणाची माहितगारी झाली आहे. गुणवान पुरुषाचें जीवित सफळ होय आणि गुणरहित पुरुष जिवंत असतांही मेल्यासारखाच होय. गुणवान पुरुष आपलेंच हित करीत असतांही आईबापांस आनंद देतो, शत्रूस परिताप देतो, आणि इतर लोकांच्या मनांत विश्वास उत्पन्न करितो. देव, पितर, ब्राह्मण, मित्र, बंधु, याचक, आणि अपंग इत्यादि लोकसुद्धां, गुणवानांस ईश्वरानें चिरंजीव करावें ह्मणून इच्छितात. परक्याच्या निंदेला पापरूप समजणारे, दीन लोकांवर दया करणारे, आणि विपत्तींत पडलेल्यांस आश्रय देणारे अशा गुणवान पुरुषांचाच जन्म सफळ होय. मुला! मी तुमचे गुण पाहून प्रसन्न झालों आणि आनंदानें आशीर्वाद देतों कीं तुह्मी सदा सर्वकाळ मातापित्याची सेवा करीत जा, शत्रूचा विनाश करीत जा, कायावाचामनानें

शुभ कृत्यें करून सुशील वागत जा आणि तुमच्या सारख्याच गुणवान् मुलाच्या पित्याचें नातें जोडा."

**या** प्रमाणें प्रशंसा करून आणि आशीर्वाद देऊन त्या उदार मनाच्या **चि**त्रभोग नागराजानें कुसुमायुधाला प्रसन्न केलें आणि कुसुमायुध व आपले पुत्र यांच्या समागमांत स्नानपानादि क्रियाकरून यथेष्ट प्रकारें आनंदांत भोजन आणि मद्यपान केलें आणि दुसरे अनेक भोग्य वस्तूंचा उपभोग घेतला.



# प्रकरण ८० वें.

## आश्चर्य आणि आनंद.

नागराज चित्रभोग, कुसुमायुध आणि नागकुमार हे सर्व भोजन केल्यावर एका रमणीय आवासांत येऊन बसले. कुसुमायुध आणि नागकुमार हे चित्रभोग नागराजाची सेवा करूं लागले आणि चित्रभोगही विचित्र आणि योग्य गोष्टींनीं कुसुमायुधाच्या मनांत आपल्याविषयीं प्रेम उत्पन्न करूं लागला. गोष्टी सांगतां सांगतां प्रसंग आणून चित्रभोगानें कुसुमायुधाला ह्मटलें–"पुत्रा! आपले घरीं पाहुणा आलेल्याचें कांहींतरी प्रिय केलें पाहिजे अशी गृहस्थपणाची रीत आहे. ह्मणून मी ह्मणतों कीं महाराज शत्रुजितावर जसा तुह्मी विश्वास ठेवितां तसाच माझ्यावरही ठेवून व सर्व शंका दूर करून जें कांहीं तुह्मांस पाहिजे असेल तें मोकळे मनानें मागा. अतिदुर्लभ तथापि तुह्मांस जें प्रिय असेल तें सुद्धां तुह्मी खुशाल मजपासून मागून घ्या."

"बाबा! माझा पिता महाराज शत्रुजित् हजारों वर्षेपर्यंत पृथ्वीचें राज्य करो. आणि आपणही हजारों वर्षेपर्यंत पाताळाचें राज्य करा. माझ्या डोक्यावर माझ्या पित्यासारखे आणि आपल्या सारखे वडील जन असतां मला कोणत्या वस्तूची उणीव असणार? पित्याच्या आणि आपल्या कृपेमुळें माझ्या मनाला अमुक एक गोष्ट मागून घेण्याविषयीं उन्मुख होण्याची जरूर आहे असें वाटत नाहीं. सर्व लोक आपल्या सारखे मित्र, शरीराचें आरोग्य, धन, आणि यौवन यांची इच्छा करितात, तर यांतून मला कोणत्या गोष्टीची उणीव आहे? मला आपल्या चरणारविंदीं मिलिंदायमान होऊन प्रणाम करण्याचा आणि आपल्या अंगाच्या स्पर्शाचा महालाभ मिळाला, त्यामुळें मी आपल्या

आत्म्याला कृतार्थ झालेला समजतों. आपण कृपा करून मला आपल्या घरीं बोलावून आणून दर्शन दिलें, यासारखा दुसरा कोणता लाभ पाहिजे? माझें प्रिय करावें असा आपल्या मनाचा आग्रहच असेल तर मी एवढेंच मागतों कीं माझ्या हृदयांतून पुण्य कर्म करण्याची अभिरुचि कधींही दूर न व्हावी. सुवर्ण, मणि, रत्न, वाहन, घर, आसन, स्त्री, अन्नपान, पुत्र, सुवासयुक्त अनुलेपन, उत्तम उत्तम पुष्पें, गायन, वाद्य आणि दुसऱ्याही सुखोपभोग देणाऱ्या ज्या ज्या वस्तु आहेत त्या सर्व पुण्यरूप कल्पवृक्षांचींच फळें होत. ह्मणून समजुतदार मनुष्यानें या वृक्षाच्या मुळाशींच सेचन करण्याविषयीं प्रयत्न केला पाहिजे. पुण्यकर्मांत अभिरुचि धरणारांस कसलेंही सुख ह्मणजे दुर्लभ आहे अशी गोष्ट नाहीं."

"तुह्मी मागत आहां त्याप्रमाणेंच तुमची बुद्धि पुण्यकर्मांतच आसक्त राहील. तुह्मी विनयानें माझ्यापासून जरी दुसरें कांहींएक मागून घेण्यास इच्छित नाहीं तरी माझे घरीं आलां आहां त्यापेक्षां मला संतोषित करण्यासाठीं आणि आतिथ्यधर्माचें बरोबर रक्षण झालें असें माझ्या मनाला वाटावें ह्मणून तुह्मीं मजपासून अशी एखादी वस्तु मागून घ्यावी कीं ती तुमच्या मतें मनुष्यलोकामध्यें दुर्लभ आहे."

नागराजाचें भाषण ऐकून मनामध्यें मुक्तेच्या पुन्हा प्राप्तीची मागणी करावी अशा उत्कंठेनें प्रेरणा होऊन पण लज्जेमुळें कुंठित होऊन कुसुमायुध आपले मित्र जे नागकुमार त्यांच्या तोंडाकडे पहात राहिला. मित्राच्या इंगितावरून त्याचा अभिप्राय जाणून नागकुमारांनीं पित्यास प्रणाम केला आणि हात जोडून विनंती केली कीं, "बाबा! या राजकुमाराची मुक्ता नांवाची प्रियपत्नी होती. तिनें कोणा दुष्टाच्या सांगण्यावरून पति मरण पावला असें समजून आपल्या प्राणांचा परित्याग केला. त्या दिवसापासूनच कृतज्ञ जनांमध्यें शिरोमणीपणाची प्रथम पदवी धारण करणाऱ्या ह्या राजकुमारानें मुक्तेशिवाय दुसऱ्या कोण-

त्याही स्त्रीचा अंगीकार करणार नाहीं अशी प्रतिज्ञा केली आहे, आणि आपणही आपल्या पहिल्याच आशीर्वचनांत 'तुमच्या सारख्याच गुणवान् पुत्राचे जनक व्हा,' असें सुचविलें आहे, तर या दोनही परस्परविरुद्ध गोष्टींचा कोणत्या रीतीनें उलगडा होईल? ह्या विचारांतच हा राजकुमार बुचकळत आहे! तेव्हां आह्मीं अशी इच्छा करितों कीं या दोनही गोष्टी-पैकीं एकही विफळ होऊं नये."

"पुत्रांनो! मरण पावलेल्या प्राण्यापासून वियोग पावलेल्या प्राण्यांस जसाच्या तसाच त्याच प्राण्यांचा योग घडून येणें ह्मणजे स्वप्नाशिवाय अथवा शांबरीमायेशिवाय येणें नाहीं."

चित्रभोग नागराजाच्या तोंडांतून "माया" हा शब्द निघतांच कुसुमायुध लाजेनें दबून गेला असतांही प्रेमाच्या अपार जोरानें लाजेच्या तड्याक्यांतून जरा बाहेर निघून हळुहळु ह्मणूं लागला,—"ताता! प्रस्तुत जर कोणी मला मायामय मुक्तेचेंही दर्शन करवील तर त्यानें मज-वर मोठा अनुग्रहच केला असें मी मानीन."

"घरीं आलेल्या आणि पाहुणा झालेल्या बाळकालाही वृद्धासमान समजून त्याचा यथास्थित सत्कार करणें हा गृहस्थाचा धर्म होय." असें ह्मणून—"पुत्रा! जर तुमची अशीच इच्छा आहे तर मग मायामय मुक्तेचें दर्शन करविण्यास कांहीं अडचण नाहीं." याप्रमाणें बोलतांच नागराजानें आपल्या घरामध्यें गुप्त रीतीनें मोहांतच निजवून ठेविलेली मुक्ता तेथें आणवून कुसुमायुधाच्या नजरेस पाडविली.

मुक्तेला पाहतांच विस्मित झालेला, स्वतांच्या प्राणांच्या लाभाहूनही आज अधिक लाभ झाला असें मानणारा, "हें काय स्वप्न आहे, अथवा मनोराज्य आहे, अथवा एखाद्या दोषाचा प्रकोप आहे?" असे तर्क करणारा, मायेमध्यें सर्व प्रकारचा संभव आहे असें मानून ते तर्क पुन्हा झाडून टाकणारा, "माया असेल तर कांहींतरी वैलक्षण्य असलें पाहिजे,"

असा विचार करून पुन्हा दुसरेच तर्क मनांत आणणारा, "हा भ्रम तर नसेलना?" असें समजून तिच्या अवयवांकडे बारीक नजरेनें पाहणारा, अवयवांकडे पाहतांच नीरस होणाऱ्या भ्रांतीलाही, "माझें एवढें भाग्य कोठें आहे?" असें मनांत आणून, फिरून जन्म देणारा, "महात्म्यांची कृपा असाध्य वस्तूचीही सिद्धि करून देते" असा विचार मनांत आणून त्या भ्रांतीलाही पुन्हा शांत करणारा, "नागराजाच्या तोंडांतूनच ही माया असल्याविषयीं निवालें आहे" असा विचार मनांत येतांच निराश होणारा आणि निराश झाला असतांही प्रेमाच्या वेगाचा निरोध न करूं शकणारा असा कुसुमायुध लाज सोडून "प्रिये! प्रिये!" असें ह्मणत ह्मणत मुक्तेजवळ जाऊं लागला. त्याबरोबरच चित्रभोग नागराजानें त्याला थांबवून ह्मटलें—"कुमारा! तिला स्पर्श करूं नको. मी तुह्मांस पहिल्यानेंच सांगितलें होतें कीं ही माया आहे, स्पर्श केल्यानें लागलीच उडून जाईल. हा मायेचा गुणच आहे."

नागराजाचें याप्रमाणें भाषण ऐकून कुसुमायुध मूर्च्छेनें व्याप्त होत्साता पृथ्वीवर पडला. मग शुद्धीवर आल्यावर आपलें सर्व गांभीर्य आणि धैर्य विसरून "हे प्रिये! हे प्रिये!" असें वारंवार बोलूं लागला. आणखी तो असेंही ह्मणूं लागला कीं—"वाहवारे मोह! मोहपण मोह! मला माझ्या मनाचाही विश्वास येत नाहीं. सर्व शत्रूंस हाणून पाडणाऱ्या कुसुमायुधाला शस्त्रावांचूनच या मोहानें सपशेल जमीनीवर पाडलें! नागराजानें मला ही मायाच दाखविली आहे आणि ही माया असें स्पष्टपणें मला उद्देशून सांगितलेंही आहे; असें असतांही नीच कामदेव आणि मोह हे दोघे मला कसे भ्रमवीत आहेत पहा!" याप्रमाणें घाबरलेल्या आणि विविध विचारांमध्यें वाहून जाणाऱ्या कुसुमायुधाला धैर्य देऊन व आश्वासन देऊन, चित्रभोग नागराजानें आपल्या पुत्रांचा मित्रत्वाचा संबंध लक्षांत आणून व मुक्तेला जिवंत करण्याची त्यांची

प्रार्थना मान्य करून, आपण आणि आपला भाऊ या दोघांनीं शंकराचें आराधन करून मिळविलेल्या वरदानाची आणि मुक्तेच्या संजीवनाची एकंदर खरी हकिगत कुसुमायुधास सांगितली. ती ऐकतांच तो विस्मयाच्या आणि हर्षाच्या परम सीमेला जाऊन पोंचला. आपल्या मित्रांचे तसेंच नागराजाचे फार फार उपकार मानूं लागला. सज्जनांच्या मैत्रीच्या चमत्काराची प्रशंसा करूं लागला आणि संभ्रमानें नागराजाला तसाच आपल्या मित्रांलाही वारंवार प्रणाम करूं लागला. मोहरूप निद्रेंतून जाग्रत झालेली मुक्ताही आपल्या पूर्व वृत्तांताचें स्मरण झाल्यावर आश्चर्य पावूं लागली. कपटमुनीची सगळी लुच्चेगिरी कळून येतांच खऱ्या खोट्याचा विचार न करण्याच्या आपल्या मूर्खपणाचा ती धिक्कार करूं लागली आणि कुसुमायुधाचा प्रवास त्याच वेळीं समाप्त झाला असें मानून आगतस्वागत करूं लागली. मुक्तेला पुनर्जन्म लाधला असतांही पूर्वजन्मींचें तिला संपूर्ण स्मरण आहे, तसेंच तिचीं आभरणें आणि वस्त्रेंही तींनी तींच कायम आहेत हें पाहून, महात्म्यांच्या कृपेचा चमत्कार परम अद्भुत होय असें मानणारा, दैव गति विचित्र आहे ही गोष्ट लक्षांत आणणारा, जीवित आणि धैर्य हीं सफळ झालीं असें मानणारा, आणि मातापितरांकडे जाण्यास उत्कंठित झालेला, असा तो कुसुमायुध, नागराजास आणि आपले मित्रांस प्रणाम करून, घरीं जाण्याविषयीं त्यांजपाशीं अनुज्ञा मागूं लागला, इतक्यांत आपला दिव्य घोडाही आपल्यापाशीं येऊन उभा राहिला आहे असेंही त्याच्या दृष्टीस पडलें.

नागराज आणि त्याचे पुत्र यांनीं कुसुमायुधास आणि मुक्तेस अनेक अमूल्य अलंकार आणि वस्त्रें अर्पण केलीं आणि स्नेहयुक्त भाषणांनीं त्यांस प्रसन्न करून कधीं कधीं इकडे येत जा अशी पुनःपुन्हः विनंती करून व घोड्यावर बसवून निरोप दिला. मग मुक्तेसहित कुसुमायुध निघाला तो, विजेसहित दिसणाऱ्या मेघाप्रमाणें त्वरितच वाराणसीनगरी-

मध्यें येऊन पोंहचला, आणि पिता शत्रुजित् आणि माता मनोरमा यांस भेटून आश्चर्यपूर्वक अपूर्व आनंद देता झाला.

कुसुमायुधानें काशींत येऊन दरबारांत पित्याच्या सिंहासनाच्या जवळ आसनावर बसून यथानुक्रम आणि सविस्तर सगळी हकिगत सर्वांस ऐकविली व आनंदित केलें. शहरांत सर्वत्र महोत्सवाची गर्दी उडाली. शत्रुजित् राजानें ब्राह्मणांस हजारों गाई दान दिल्या आणि सोन्याच्या मोहरा वाटविल्या. गरीब लोकांस अन्नवस्त्रादि देऊन संतुष्ट केलें आणि कुसुमायुधाच्या जन्मोत्सवाचे वेळीं जशी धामधूम केली होती तशीच मुक्तेच्या या पुनर्जन्ममहोत्सवाचे वेळींही करविली. कुसुमायुध आणि मुक्ता हीं पूज्यलोकांस नमस्कार करून, मान्य लोकांस मान देऊन आणि अपार धन वेचून, सर्व लोकांचा सत्कार करून, दररोज पूर्वींप्रमाणेंच राज्यकारणीं कामांत हरकत न येई अशा रीतीनें महालांत, बगीच्यांत, जलाशयांत, नदीच्या तीरीं, पर्वतशिखरावर आणि दुसऱ्याही अनेक रमणीय स्थळीं यथेच्छ विहार करूं लागलीं.

आपल्या सुखांत आतां कसलीही उणीव राहिली नाहीं असें पाहून महाराज शत्रुजितानें कुसुमायुधास विधिपूर्वक पट्टाभिषेक करविला आणि पूर्वींच्या राजर्षींच्या मार्गाचें अवलंबन करून, मनोरमेसहित तपोवनांत जाण्याच्या बदली मुक्तिपुरी वाराणसींतच एका एकांतस्थळीं राहण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें लौकरच एक योग्य स्थळ निर्माण करून, तो तपश्चर्यादि सत्क्रियांनीं अंतःकरणाची शुद्धि संपादूं लागला आणि श्रवण, मनन व निदिध्यास या साधनांनीं ब्रह्मविद्येचा अभ्यास करूं लागला.

पट्टाभिषेक झाल्यावर कुसुमायुधही यथाशास्त्र प्रजेचें पालन करूं लागला आणि दिवसें दिवस प्रजेचें व मुक्तेचें प्रेम अधिकाधिक वाढवूं लागला.



## डोळ्यांच्या विकारावर
# नेत्रानंदमंदार.

**किंमत अर्धा तोळ्याच्या गोळीस १ रुपया.**

डोळे येणें, फूल पडणें, मोतिबिंदु, झांपड, पडदा, पाणी गळत असणें, डोळे रक्तासारखे होणें, खरणें, व भिलभिलणें इत्यादि विकारांचा नाश करण्याच्या कामीं या औषधाची जेवढी प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे! हें औषध डोळ्यांच्या तेजाची वृद्धि करून वृद्धावस्थेंत होणाऱ्या दृष्टिमांद्याचें भय दूर करितें. जीवितास आधाररूप अशा नेत्रांचें संरक्षण करण्याची इच्छा बाळगणाऱ्या प्रत्येक स्त्रीपुरुषानें हें औषध वापरल्यावांचून कधींही राहूं नये! नामांकित नेत्रवैद्यांसही आमची अगत्याची सूचना आहे कीं, कसल्याही नेत्रविकारांमध्यें योजीत असलेल्या औषधोपचारांनीं त्यांस यश येत नसेल तर त्यांनीं आमच्या **नेत्रानंदमंदारा**चा एकवेळ तरी अवश्य अनुभव घेऊन पहावा! आमची पक्की खात्री आहे कीं, ते हटकून यशस्वी होतील!

हें औषध तांब्याच्या भांड्यावर पाण्यांत मध्यम पातळ झरवावें व दिवसांतून कोणत्याही वेळीं पण एकदाच डोळ्यांत घालावें आणि थोडावेळ झोंप घ्यावी.

---

# कर्णतेल.

**२ तोळ्यांच्या शिशीची किंमत १ रुपया.**

कानासंबंधीं नानाप्रकारचे रोग जसें: कान वाहत असणें, कान फोडणें, ठणका, मळ होणें, आंत आवाज झाल्यासारखें भासणें, अल्पकाळाची बधिरता इत्यादि विकारांवर या **कर्णतेला**चे एकदोन बिंदु कानांत टाकतांच आराम वाटूं लागतो. व या प्रमाणें थोडे दिवस क्रम ठेविला असतां रोग समूळ नाश पावतात.

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

# बालमित्र.

## मुद्दाम बालकांकरितांच !

### ३०० गोळ्यांच्या डबीची किं० १ रुपया.

बालकांचे सर्व आजार, जसें ताप, खोकला, श्वास, परसाकडील विकार, शरीर पिंगटवर्णी होणें, छाती भरून येणें, पोटाचें डेंरके वाढणें, अजीर्ण इत्यादि सर्व विकारांचा नाश करून, **बालमित्र** औषध बालकांस चलाख करितें, त्यांचा उत्साह वाढवितें, व रक्तांतही योग्य फेरफार आणि सुधारणा करितें. त्याचप्रमाणें बालकांची जीवनशक्ति वाढविण्याचा अपूर्व गुण या औषधाच्याठायीं आहे. बालकांचें रक्षण आणि पोषण करण्याच्या गुणाविषयीं तर या औषधाची जागोजाग वाखाणणीच करण्यांत येते ! यायोगें बालकास अन्नपचन होतें. जंतांचा विकार नाहींसा होतो. तात्पर्य या औषधाच्या सेवनानें बालकांची शरीरप्रकृति दुरुस्त रहाते.

बालकांचें वय जितक्या वर्षांचें असेल तितक्या गोळ्या पाण्यांत हरड्यासमवेत उगाळून सांजसकाळ द्याव्या.

---

### अतिशय नांवाजलेलें मलम.

# व्रणमर्दन.

### डबीची किंमत १ रुपया.

या मलमापासून फायदा झाला नाहीं असें आजपर्यंत घडलें नाहीं, इतकेंच नव्हे तर फायदा होणार नाहीं असेंही घडणार नाहीं.

चांदी, चट्टे, जखमा, स्तनपाक, मुलांचें मस्तक वगैरे सडणें, रुवे होणें, सुखी खरूज इत्यादि पू होणाऱ्या चामडीच्या विकारावर हें मलम चांगला गुण करितें. एखाद्या रोगावर मलम लावण्याची गरज असल्यास फक्त या **व्रणमर्द**नाचाच उपयोग करावा !

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

# आयुष्य आणि आरोग्यवर्धक तेल.

## ५ तोळ्यांच्या शिशीची किंमत १ रुपया.

हें तेल शरीरास मर्दन केलें असतां दुबळे मनुष्य पुष्ट होतात, आणि मेदानें—चर्बीनें स्थूल झालेल्यांचीं शरीरें पातळ होतात. यापासून शरीरास कोणत्याच प्रकारचा दुर्गंध येत नाहीं. त्याचप्रमाणें हें सांसर्गिक रोगाचा प्रवेश आंत होऊं देत नाहीं. यायोगें शरीरावरील रोमांच मृदु आणि सतेज होतात. अंगकांतिही उत्तम सुधारते. मस्तकावरील केश अल्पावकाशांतच कोमळ आणि तकतकीत बनून पुष्कळ वाढतात. टक्कल नाहींसें होतें. वृद्धावस्थेमुळें किंवा चिंता, रोग अथवा दुसऱ्या कित्येक अन्य कारणांनीं झालेल्या पांडुरवर्ण केशांस त्वरित काळेभोर करण्याचा चमत्कारिक गुण याच्या अंगीं खरोखर वाखाणण्याजोगा आहे! एक **आयुष्यवर्धक** तेल घेतलें ह्मणजे मग केश काळे होण्यास्तव कलप किंवा दुसरें कसलेंही अन्य औषध घेण्याची कोणासही बिलकूल गरज लागणार नाहीं. या तेलानें डोळे थंड होऊन त्यांचे सामर्थ्य वाढतें. दृष्टि तीव्र होते. तोंडावरील मुरुमें ( तारुण्यपीटिका ) समूळ नष्ट होतात. हें तेल **जननेंद्रियावर हळूहळू लाविल्यानें निर्बळ पुरुष उत्तम वीर्यवान बनतो!** याचे एकदोन थेंब कानांत टाकिल्यास कानांचे सर्व विकार नाहींसे होतात व पुन्हा कधींही उद्भवत नाहींत. आणि त्याचप्रमाणें बहिरेपणाची भीतिही राहत नाहीं. हें तेल इतकें सुवासिक आहे कीं, याच्या तोडीचें दुसरें क्वचितच असेल!

रात्रीं निजतेवेळीं ह्या तेलाचा हात हातापायांस पुसला असतां साऱ्या दिवसामधील श्रम नाहींतसे होऊन जिवास मोठा आराम वाटतो, नवीन कामकाज करण्यास उत्साह येतो, झोंप चांगल्या रीतीनें लागते व एकंदरींत आयुष्याची वृद्धि होते.

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

# मोत्यांचा सुरमा.

**१ तोळ्याची किंमत १॥ रुपया.**

डोळ्यांत सतत सुरमा घालावा अशी आह्मींच नाहीं पण आयुर्वेदही निक्षून आज्ञा करितो. त्यानें डोळ्यांचें तेज वाढतें; दृष्टि तीव्र होते; अगदीं सूक्ष्म वस्तु व लांबलांबचे पदार्थ पाहण्यास नेत्र समर्थ होतात; डोळ्यांची खाज, दाह, लाली, झांपड, अंधुकपणा, डोळे वाहणें, एकास एक डकणें, किंवा त्यांत रेंद उत्पन्न होणें वगैरे विकारांचा नाश होतो; वाऱ्याचा आणि उष्णाचा प्रखर ताप ते सहन करूं शकतात. जुने विकार नाहींतसे होतात व नवीनांचा प्रतिकार होतो. आमच्या औषधालयांत तयार होत असलेल्या सुरम्याच्या अंगीं अनेक अपूर्व गुण आहेत. डोळ्यांत घालतांच डोळे एकदम थंडगार होतात. वैद्यकशास्त्रांत सांगितलेल्या शुद्ध क्रियेप्रमाणें हा बनविण्यांत येत असल्यामुळें आह्मी बिनदिक्कत सांगूं शकतों कीं, असा निर्दोष आणि गुणकारी सुरमा अन्यत्र क्वचितच मिळूं शकेल! बाजारांत मिळत असलेल्या सुरम्याच्या पंक्तीला हा सुरमा कोणीही बसवूं नये.

---

# कासांतक.

**५० गोळ्यांच्या डबीची किंमत १ रुपया.**

हें औषध कास अर्थात् खोकल्याचा काळ आहे! क्षय, दमा, श्वास, छातीचे रोग, नवा व जुनाट खोकला इत्यादिकांचा समूळ नाश करण्याच्या कामीं या औषधानें मोठी कीर्ति मिळविली आहे! क्षयासारख्या दुस्तर व असाध्य रोगांचाही ज्यापक्षीं नाश होतो त्यापक्षीं वर सांगितलेले रोग यायोगें सहज दुरुस्त व्हावेत यांत आश्चर्य नाहीं! ह्या गोळ्या दिवसांतून तीन वेळ, थंड पाण्याबरोबर घ्याव्या.

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

# झोंपेच्या गोळ्या.

**१६ गोळ्यांच्या डबीची किंमत १ रुपया.**

पुष्कळदा कठीण रोगांमध्यें, किंवा उदासीनता प्राप्त झाली असतां अथवा शारीरिक आणि मानसिक उपाधींच्या योगें उत्पन्न झालेल्या अस्वस्थतेमुळें, पुष्कळांची झोंप नाहींशी होते. नीज उडाल्यामुळें शरीरांत नानाप्रकारचे रोग उद्भवूं लागतात व असलेले विकोप पावतात. अशा प्रसंगीं झोंप लागण्याचा कांहींतरी उपाय अवश्य केला पाहिजे. झोंप येण्याकरितां पुष्कळ इसम भांग, अफू वगैरे कैफी पदार्थांचा उपयोग करितात. परंतु यायोगें नुकसानच विशेष होतें. अशा संधीस आमच्या झोंपेच्या **गोळ्यां**पैकीं २ गोळ्या पाण्यांतून घेतल्या तर खात्रीनें पाव तासाच्या आंत ६ पासून ८ तासांपर्यंत गुलाबी झोंप येईल. निजेच्या दुसऱ्या कित्येक अमली औषधांप्रमाणें यापासून बिलकूल नुकसान होत नाहीं, किंवा बद्ध कोष्टही होत नाहीं. नीज लागल्यानंतर मध्यंतरी उठावयाचें असल्यास उठतांही येतें. हें औषध बालकास देणें असल्यास फक्त १ च गोळी द्यावी आणि अगदीं लहान बालकास तर देऊंच नये.

---

# रेचक गोळी.

**३२ गोळ्यांच्या शिशीची किंमत ८ आणे.**

या रेचक गोळ्या अतिशय काळजीपूर्वक तयार केल्या आहेत. जमालगोटा किंवा अशाच सारखी दुसरी कसलीही प्रखर औषधी यांत बिलकूल वापरलेली नाहीं. रात्रौ निजतेवेळीं यांतील २ गोळ्या पाण्यांतून घेतल्या असतां सकाळीं एक वेळ शौचास साफ होतें. शरीरास स्वस्थता वाटते. पोटांत मुरडा किंवा दुःख बिलकूल होत नाहीं. गोळ्या अतिशय लहान आहेत खऱ्या, पण त्या आपली कामगिरी फार आश्चर्यकारक रीतीनें बजावतात आणि लहान असल्यामुळेंच त्या गिळण्यास बिलकूल त्रास पडत नाहीं. मृदु कोठ्याच्या मनुष्यांनीं फक्त १ गोळीच घ्यावी.

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

# ज्वरांतक नंबर १ ला व नंबर २ रा.

**नंबर १ ला १० गोळ्यांची किंमत १ रुपया.**
**नंबर २ रा १० गोळ्यांची किंमत १ रुपया.**

हिंवताप, एकांत्राड येणारा, चातुर्थिक वगैरे कोणत्याही जातीचा ताप ज्यावेळीं अंगामध्यें भरतो त्यावेळीं १५ वर्षांच्या आंतील मनुष्यास २ आणि त्याच्या पुढील वयाच्या मनुष्यास १ गोळी दिली असतां घाम येऊन ताबडतोब ताप उतरतो. ताप नाहींसा होण्यास या गोळ्या हाच एक रामबाण उपाय आहे! पहिल्यानें २ गोळ्या दिल्यावर ताप उतरण्यास पुन्हा गोळ्या देण्याचा क्वचितच प्रसंग येतो. **ज्वरांतक नं. २** मधल्या गोळ्या लहान वयाच्या मनुष्यास १ व मोठ्या वयाच्या मनुष्यास २ कसल्याही जातीचा ताप येण्यापूर्वी ४ तास अगोदर द्याव्या. पुन्हां दोन तासांनीं पूर्ववत् द्याव्या. असें केलें असतां ताप येण्याचें बंद होतें. या दोनही नंबरच्या गोळ्या ५ वर्षांच्या आंतील बालकांस देऊं नयेत.

---

# गजकर्णगुटी.

**२ तोळ्यांच्या गोळीची किंमत ४ आणे.**

कितीही वर्षांचें जुनें आणि अतिशय पसरलेलें, काळें किंवा लाल, कसलेंही गजकर्ण असो, ही **गजकर्णगुटी** पाण्यामध्यें दगडावर झरवून सुदहु भागीं लाविली असतां तात्काळ गजकर्णाचा नाश होतो. या औषधानें बिलकूल दाह होत नाहीं किंवा तें जरासुद्धां वासत नाहीं. उलटें हे फार सुगंधी आहे. या विकारावर नामांकित इंग्रजी आणि देशी औषधें वापरून कंटाळलेल्यांनीं व निराश झालेल्यांनीं आमच्या या औषधाचा एक वेळ अवश्य उपयोग करून पहावा अशी सर्वांस नम्रतेची सूचना आहे.

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

# कालरा पिल्स.

**३० गोळ्याची किंमत १ रुपया.**

आमच्या औषधालयांत तयार होत असलेल्या वरील गोळ्या कालऱ्याचा एकदम नाश करितात. आह्मीं मोठ्या हिंमतीनें सांगूं शकतों कीं, कालऱ्याचीं साधारण चिन्हें दिसूं लागतांच या औषधाचा उपयोग करण्यांत आला तर कधींही निष्फळ परिणाम घडणार नाहीं! कालऱ्याचें लक्षण दिसतांच प्रथमतः यांतील २ गोळ्या घ्याव्या. त्या लागू न झाल्या तर पुढें प्रत्येक कलाकानें किंवा दोन दोन कलाकांनीं लागू होईपर्यंत थंड पाण्यांतून घ्याव्या. या गोळ्या साधारण परसाकडील विकार, अजीर्ण, अग्निमांद्य इत्यादि विकारांचाही नाश करितात. या गोळ्या बाळोपचारी आहेत कीं कोणी अडाणी मनुष्यास त्यांचा उपयोग करतां येऊन रोग मुक्त होतां येतें.

---

# दंतमंजन.

**४ तोळ्यांच्या पुडीची किंमत ४ आणे.**

तोंडासंबंधीं नाना तऱ्हेचे विकार पुष्कळांस होतात. कित्येकांचे दांत सडतात; कित्येकांचे खराब होतात; कित्येकांच्या दांतांच्या हिरड्यांतून रक्त येतें; तोंडास खराब वास येतो; आणि कित्येकांचे तर दांत गळूनही पडतात. या साऱ्या उपाधींचें निर्मूलन करण्याच्या कामीं, व ह्यांचा प्रथमपासूनच प्रतिकार करण्याच्या कामीं आमचें दंतमंजन एक नांवाजलेला उपाय आहे. हें मंजन दंतधावनकाष्ठानें किंवा नुसत्या बोटांनींच दांतांवर घांसावें. यायोगें दांत बळकट आणि सर्व रोगमुक्त होऊन तोंडास सुवास येतो.

**वैद्यशास्त्री मणिशंकर गोविंदजी, जामनगर, काठेवाड.**

या गोळ्यांबद्दल **शिकंदराबादेहून** डेंटल सर्जन मि. **एम. एन. घीस्ता** लिहितातः—

"आतंकनिग्रह नामक गोळ्यांच्या अपूर्व गुणांची तारीफ माझ्या कानावर आल्यावरून आपल्याकडून सदर्हू औषधाच्या चार डब्या मागवून त्या मीं अनुभवून पाहिल्या. मला कळविण्यास अतिशय आनंद होतो कीं, आपण लिहिलेले सर्व गुण या गोळ्यांच्या ठायीं पूर्णपणें आहेत इतकें केवळ नाहीं, परंतु दुसऱ्या कित्येक औषधांप्रमाणें कसलाही अवगुण न करतां आपली कामगिरी चमत्कारिक रीतीनें बजाविण्याचा अपूर्व गुण त्यांच्या अंगी वसत असल्याचें माझ्या अनुभवास आलें. आपल्या गोळ्यांची किंमत माफक असल्यामुळें, एकंदर गरीब गुरीबांवर आपले फार उपकार झाले आहेत."

मुंबईहून मि. **बेहेरामजी रुस्तमजी** लिहितात :—

"थोडया महिन्यांपूर्वी मी मेंदूची अशक्तता, चक्कर व दुसऱ्या कित्येक साधारण विकारांमुळें आजारी होतों. सदर्हू विकारांवर पुष्कळ औषधें केलीं. त्यांतील कित्येक थोडाबहुत गुण दाखवीत, व कित्येक अवगुणही दाखवीत. माझा अशक्तपणा कांहीं केल्या साफ ह्मणून नाहींसा होईना! शेवटीं साताऱ्यास राहणारे माझे एक स्नेही मि. पिरोजशहा मंचेरजी यांनीं कसल्याशा गोळ्यांनीं भरलेली एक टीनची डबी माझ्याकडे पाठविली, व तींतील एकेक गोळी सांजसकाळ दुधांतून घेण्याविषयीं मला लिहिलें. त्यांच्या लिहिल्याप्रमाणें त्या गोळ्या मी सुरू केल्या आणि त्यायोगें मला बराच आरामही वाटूं लागला. 'सदर्हू गोळ्यांची आणखी एक डबी कृपा करून मला पाठवून द्या.' ह्मणून मी त्यांस साताऱ्यास पत्र लिहिलें, परंतु त्यांच्याजवळ तें औषध शिल्लक नसल्याकारणानें त्यांनीं मला परस्पर आपल्याकडूनच मागविण्याविषयीं लिहिलें; तरी मेहरबानी करून सदर्हू गोळ्या माझ्या पत्यावर पाठवाल अशी मी आशा करितों."

मुंबईहून मि. **केखुश्रु मंचरजी मेथा** लिहितात :—

"आपण पाठविलेल्या आतंकनिग्रह गुटिकांच्या १० डब्या मी आणि माझे कित्येक मित्रांनीं मिळून वापरून पाहिल्या. त्यांपासून आह्मांस चांगला फायदा वाटत आहे. यास्तव त्यांतल्या आणखी १० डब्या व्ही. पी. पार्सल मार्फत कृपा करून त्वरित पाठवाव्या."

# मराठी सर्टिफिकीटें.

## नंबर १.

वि. वि. × × मागें एक वेळीं मजला आपलें 'कामशास्त्र' नांवाचें बुक एका मित्रापासून वाचावयास मिळालें होतें, तें वाचून आपणांकडून दोन वेळां व्ही. पी. नें दोन दोन डब्या प्रमाणें चार डब्या मागविल्या होत्या. त्यांचा गुण तर बराच आला यांत संशय नाहीं. अमोलिक औषध खरेंच, वर्णन करावें तेवढें थोडेंच. × × × व आपल्या औषधानें ज्याला बराच गुण आला आहे असा मनुष्य.

**गोपाळ शिवराम निडसोशी,**
रिसबुड यांचे घरीं जमखंडी.

## नंबर २.

वि. वि. आपण दोन महिन्यांपूर्वीं पाठविलेल्या आपल्या 'आतंकनिग्रहगुटिका' पोंचल्या × × माझ्या मित्रामध्यें आतां बरीच सुधारणा झाली आहे. त्याचे तोंडावर आतां बराच तजेला आला आहे; तर कृपा करून आपण आणखी तीन रुपयांच्या त्या गोळ्या ( आतंकनिग्रह गुटिका ) व्ही. पी. नें मागच्या प्रमाणेंच घोळे यांच्या नांवावर रवाना कराव्या कळावें.

आपला **गोविंद रामचंद्र पटवर्धन,**
पुणें.

## नंबर ३.

वि. वि. पत्र पाठविण्यास कारण कीं मी मुंबईंत असतांना मला आपल्या आतंकनिग्रह नांवाच्या औषधाचा गुण दोन डब्यांनीं आला होता. त्यास दोन वर्षें झालीं परंतु आतां दोन महिने प्रकृति ठीक नाहीं. जेवणाचा बेत व पाणी पिण्याचा बेत राहत नसल्यामुळें ( प्रकृति बिघडते ) असा अदमास आहे; तरी आतंक निग्रहाच्या दोन डब्या पाठवाव्या जास्ती लागल्यास मागाहून कळवीन. डब्या व्ही. पी. पोस्टानें पाठवाव्या.

**बापू दाजी रानडे,**
वसई.

नंबर ४.

वि. वि. आपण आमच्या करितां एक डबी पाठविली त्याचा गुण आल्यासारखा वाटतो. आपल्या गोळ्यांचा गुण १२ आणे आला आहे. गोळ्या पत्र देखत पाठवाव्या. रुपयाच्या सुमारें ४० देत असाल तर ३|४ रुपयांच्या पाठवाव्या, नाहीं तर २ रुपयांच्या पाठवाव्या.*

हरी भिकशेट मोरे,

दाभोळ.

**आतंकनिग्रह** गोळ्यांच्या उपयोगाविषयीं व लोकांस त्या किती पसंत झाल्या आहेत त्याविषयीं, आतां कांहीं नवीन विशेष सांगावयास पाहिजे असें नाहीं. कारण गुजराथेंत व महाराष्ट्रांत त्यांचा खप शेकड्याच्या हिशोबानें नाहीं पण हजारांच्या हिशोबानें आज १९ हून अधिक वर्षें सारखा चालू आहे. त्यांच्या उत्कृष्ट गुणांच्या योगानें सर्जन्स, पास झालेले डाक्टर्स, नामांकित वैद्य, आणि ज्यांचें वजन मोठें आहे असे संभावित गृहस्थ यांच्याकडून आह्मास जीं असंख्य सर्टिफिकिटें मिळालीं आहेत व रोज मिळत आहेत त्यांपैकीं कांहीं आह्मीं वेळोवेळीं प्रसिद्ध केलीं आहेत. **आतंकनिग्रह** गोळ्यांचा एवढा प्रसार झाला आहे कीं या पुढें त्यांच्या गुणवत्वाविषयीं आणखी सर्टिफिकिटें दाखविण्याची गरज आहेसें वाटत नाहीं. तथापि आह्मास कळविण्यास फार संतोष होत आहे कीं सन १८९७ सालच्या जानेवारीपासून आमच्या औषधालयाची जी एक नवी नं. २ ची शाखा कलकत्ता येथें स्थापन करून सुरू केली आहे तिच्या योगानें बंगाला, वायव्य प्रांत, मध्य हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं सुद्धां आमच्या या अमूल्य गोळ्यांचा प्रसार मोठ्या झपाट्यानें सुरू झाला आहे व सर्व लोकांच्या पसंतीस त्या पूर्णपणें पडल्या आहेत. या गोळ्यांस सदर्हू प्रदेशांत कितपत

---

* आमच्या औषधालयांत एकच दर आहे. ठरावा बाहेर कमी जास्ती गोळ्या कोणासही देण्यांत येत नाहींत.

यश प्राप्त झालें आहे हें जाणण्याची आमच्या वाचकांस फार उत्कंठा होईल यांत नवल नाहीं. यास्तव तिकडील प्रसिद्ध व वजनदार गृहस्थांकडून जीं सर्टिफिकिटें आह्मास मिळालीं आहेत त्यांपैकीं कांहीं मात्र याखालीं दाखल करतों, व त्यांकडे वाचकांस लक्ष देण्याविषयीं शिफारस करतों.

नंबर १.

**कविराज मणीशंकर गोविंदजी शास्त्री**

( बंगाल्यांत वैद्यास ' कविराज ' या नांवानेंच बोलतात. )

**( मूळ बंगाली भाषेंतून. )**

**महाराज,**

मी 'बंगवासी' नामें पत्रांत आपल्या आतंक-निग्रह गोळ्यांची जाहिरात वाचून व आपण जामनगरांतील एक प्रसिद्ध वैद्य आहां हें जाणून, आपलें हें औषध सेवन करावें अशी उत्सुकता उत्पन्न झाली. मग मी येथील बडा बझारांतील तुमच्या आतंक-निग्रह औषधालयांतून दोन डब्या विकत घेतल्या. कारण मी जुन्या प्रमेहानें व दुसऱ्याही कित्येक रोगांनीं फार ग्रासलों होतों. त्यावर निरनिराळ्या जातींचीं पेटंट औषधें तसेच किविराजांचेही देशी उपाय मी करून पाहून थकलों. त्यांचा मला कांहीं गुण आला नाहीं. परंतु आपणा महाशयांच्या आतंक-निग्रह गोळ्यांच्या सात दिवस सेवनानेंच, वाटत नव्हता, असा गुण दृष्टीस पडला आणि मीं खात्रीनें सांगूं शकतों कीं मी या दुष्ट रोगाच्या तडाक्यांतून मुक्त झालों आहें. आपल्या सारख्या अनुभवी आणि विद्वान कविराजांला ईश्वर सुखांत ठेवो. अशा करतां कीं तेणेंकरून गरीब भारतवासी जनांचें जीवित तसेंच द्रव्य व्यर्थ जाऊं नये.

आपला वशंवद,

**श्रीरसिकलाल चट्टोपाध्याय.**

भवानीपूर-**कलकत्ता.**

नं० २

( बंगालीवरून )

**महाशय,**

हें पत्र पोंचतांच तुमच्या आतंकनिग्रह नांवाच्या ६४ गोळ्या ह्मणजे डब्या २ खालील ठिकाणीं व्हि. पी. नें पाठवून याव्या व त्यांची किंमत रु. २-६ आकारावी.

आपल्या आतंकनिग्रह गोळ्यांची अत्यंत ऐंद्रजालिक शक्ति पाहून मी मोहित झालों आहें. थोड्याशा गोळ्या घेऊन पाहतां मला जो विलक्षण गुण वाटला तो तसा वाटेल असें वाटलें नव्हतें. वर्तमानपत्रांतल्या जाहिरातींतील गुणाविषयीं वर्णन हें, यथासांग, आतंकनिग्रह गोळ्यांशिवाय इतर कोणत्याही औषधांस लागू पडत नाहीं. मी मात्र माझ्या स्मरणशक्तीचा अनियमितपणा घालविण्यासाठीं या गोळ्या घेतल्या. परंतु मी आपल्या स्वतांच्या अनुभवावरून सांगू शकतों कीं माझे जे विकार या गोळ्यांनीं बरे होतील अशी आशा नव्हती ते बरे होत चालले आहेत. या पुढेंही आणखी गोळ्या घेऊन कसा गुण येतो तें मागाहून कळवीन. आतांच माझा जो फायदा झाला ह्मणून मी समजतों तो तुह्मास कळविला आहे.

एच्. बोस

केअर आफ बाबू राधिका प्रसाद

एच. डा० नूतनगंज, बरद्वान.

मि. एच. बोस आपल्या पहिल्या पत्रांत आतंकनिग्रह गोळ्यांविषयीं, 'या गोळ्यांचा आणखी उपयोग करून पाहिल्यावर विशेष लिहून कळवीन' असें लिहितात, त्याप्रमाणें पुष्कळ दिवस गोळ्या सुरू ठेवल्यावर दुसऱ्या एका पत्रांत पुढील प्रमाणें कळवितात.

नं० ३

( बंगालीवरून )

जसजसा मी अमृतासारख्या गुणावह तुमच्या आतंकनिग्रह गोळ्या वापरूं लागलों, तसतसा माझा विश्वास त्यांवर अधिक बसत चालला. या वेळींही आणखी २ डब्या पूर्वी प्रमाणेंच खालील पत्यावर पाठवाव्या.

एच. बोस.

नूतनगंज, बरद्वान.

नं० ४

महाशय,

विनयपूर्वक कळवितों कीं पूर्वी लिहिलेल्या प्रमेहाच्या रोग्याकरितां आपल्या

आतंकनिग्रह गोळ्यांची एक डबी मागितली होती. तिच्यापासून कांहीं गुण आलेला दिसतो, यास्तव आणखी एक डबी त्वरित पाठवावी.

**कविराज श्री अमरनाथ गोस्वामी;**
**पुलसीटीया ग्राम,**
**जि. मेदिनीपूर.**

नं० ५

( बंगालीवरून )

महाशय,

आमचा एक मित्र सहा वर्षांपासून प्रमेहाच्या व्यथेनें दुःख भोगीत होता. त्यानें एका मित्राच्या सांगण्यावरून आतंकनिग्रह गुटिकांची एक डबी सेवन केली. पण महाशय, मोठी आश्चर्याची गोष्ट ही की ज्या रोगावर ५।६ वर्षे झालीं, फार फार औषधें केलीं असतां व मर्यादे बाहेर खर्च केला असतांही आराम पडत नव्हता; त्यावर आपल्या वर लिहिलेल्या (आतंकनिग्रह) औषधाचा फक्त ५।६ दिवस उपयोग केल्यानेंच एकदम समूळ आराम पडला. प्रमेह रोगावर आतंक निग्रह हें ब्रह्मास्त्र आहे यांत शंका नाहीं. ईश्वरापाशीं प्रार्थना करितो कीं त्यानें आपल्यास दीर्घायुषी करावें.

**श्री अन्नदाकुमार भट्टाचार्य,**
**लालगोला, मुर्शिदाबाद, ठाकूरवाडी.**